# खास बातम्या

## इ.स. २००० मधील विक्रम

### २००० सालांत कांही आगळे विक्रम केले गेले.



• तुम्हाला हातांत मायक्रोफोन घेऊन १०४ तास बसायला कसे वाटेल? मलेशियांत राहणाऱ्या बरहान मोहतरुद्दीन या डिस्क-जॉकीने हा विक्रम ऑक्टोबरमधें केला. कुआला लंपुरमधल्या बेस्ट १०४ रेडियोसाठीं तो काम करीत होता. गाण्यांच्या रेकॉर्डस् लावायच्या व अधूनमधून त्या गाण्यांबद्दल खुसखुशीत गप्पा मारत टीकाटिप्पणी करायची हे काम होते. त्याने रविवारी रेकॉर्डस लावायला जी सुरवात केली ती त्याने शुक्रवारी संपवली. दर सहा तासानंतर तो पंधरा मिनिटांची सुटी घेई. यापूर्वीचा असा विक्रम ९४ तासांचा होता.

• लार्स-गोरन कार्लसन हा स्वीडनचा चित्रपट कलाकार त्याच्या संवादाबद्दल प्रसिद्ध आहे. माल्मो इथल्या पुस्तक प्रदर्शनांत सप्टेंबरमधें त्याने गोष्टी वाचून दाखवण्याचे काम केले. मात्र मुलांना नव्हे हं, प्रौढांना! प्रदर्शनांत स्वीडनचे सर्वश्रेष्ठ लेखक ऑगस्ट स्ट्रिंडबर्ग यांच्या पुस्तकाची जाहिरात चालली होती. स्ट्रिंडबर्ग यांची पांच पुस्तकें कार्लसन यांना दिली होती. आणि ती त्यांनी सतत २५ तास मोठ्याने वाचून दाखवली. शनिवार रविवारी हे वाचन झाले. दर तासानंतर ते पांच मिनिटांची विश्रांति घेत. यापूर्वीचा विक्रम २४ तास २४ मिनिटे होता. सुदैवाने कार्लसन यांचा आवाज बिलकूल बसला नाही. पण झोंप येऊं नये म्हणून त्यांना शर्थीचे प्रयत्न करावे लागले. त्यांचे श्रोते जागे होते की नाही? कुणास ठाऊक!





• ऑस्ट्रियाच्या हॅन्स श्वाइने लिहीलेले एक पत्र त्याच्याकडे तब्बल ४४ वर्षानंतर परत पोंचले. १९५६ सालचे ऑलिंपिक खेळ पाहायला श्वार्झ बोटीने ऑस्ट्रेलियाला गेला होता. प्रवासांत त्याने एक पत्र इंग्लिश व जर्मनमधें लिहीले, तो कागद एका बाटलींत घालून बाटली सीलबंद केली, आणि ती बाटली त्याने हिंदी महासागरांत फेंकली. समुद्राच्या लाटांवर ती बाटली कुठेही गेली असती. पण गंमत म्हणजे ऑस्ट्रियाला रामराम ठोकून न्यूझीलंडमधें जिथें श्वार्झ स्थायिक झाला त्या गांवाच्या किनाऱ्यावरच ती बाटली येऊन विसावली. त्याला जेव्हां ही गोष्ट ऑक्टोबरमधे समजली, तेव्हां तो उद्गारला, "दहा लाखांत एखादीच अशी योगायोगाची घटना असेल."

• जगांतल्या सर्वांत उंच पर्वताच्या शिखरावर चढणारे 'अेव्हरेस्टर्स' बहुतेक वेळां बेस कँपहून निघाल्यापासून दोन ते चार दिवसांत शिखरावर पोंचतात. पण शेरपा बाबू छिरी ह्याने २००० च्या मोसमांत १७ तासाला चार मिनिटे कमी, इतक्या कमी वेळांत पोंचण्याचा विक्रम केला. चौतीस वर्षाचा छिरी अेव्हरेस्टवर प्रथम चढून गेला त्यावेळेस तो फक्त तेरा वर्षांचा होता. एका परदेशी गिर्यारोहकांच्या पथकाबरोबर तो साधा हमाल म्हणून गेला होता. १९८९ सालीं तो एकटाच अेव्हरेस्ट चढला आणि त्यानंतर तो दहा वेळां माऊंट अेवरेस्टच्या शिखराबर गेलेला आहे. १९९५ सालीं तर तो चौदा दिवसांत दोन वेळां चढला. १९९९ सालीं तो ऑक्सिजनच्या बाटल्यांशिवाय एकवीस तास शिखरावर थांबला. असं करणारा तो पहिलाच वीर होता. त्याचं निरीक्षण आहे की बहुतेक 'अेव्हरेस्टर्स' शिखरावर त्यांचे पाय टेकलेले आहेत, असे फोटो काढून होईपर्यंतच त्या पर्वतमाथ्यावर थांबतात. छिरी हे विक्रम वेगळ्या कारणासाठीं करीत आहे. त्याला त्याच्या खेड्यांत शेरपा मुलांसाठी एक शाळा काढायची आहे. त्याला स्वत:ला शाळेंत जाऊन शिकायची संधी मिळूं शकली नव्हती!



## या महिन्यांत जन्मलेली श्रेष्ठ व्यक्ती

''भूतकाळांतला हिंदुस्तान आपल्याला पुन्हां जिवंत करता येणार नाही. पण भविष्यकाळांतल्या भारतवर्षाला घडवणें, त्याला चांगला आकार देणें हे आपल्यावर अवलंबून आहे. हा देश जो बनणार आहे त्यांत वंशभेद, वर्णभेद किंवा पंथभेद यांना स्थान असणार नाही.... आपण प्रथम भारतीय आहोत आणि अखेरपर्यंत भारतीयच असूं हे ध्यानांत ठेवूं या!''

### महादेव गोविंद रानडे



ही हांक शंभर वर्षांपूर्वी महादेव गोविंद रानडे या एका महान समाजसुधारक व शिक्षणतज्ञाने दिली होती. त्या सभेंत त्यांच्यानंतर बोलणाऱ्या प्रत्येक वक्त्याच्या भाषणांत त्यांच्या शेवटच्या वाक्याचा प्रतिध्वनी येत होता.

त्यांनी अनेक सामाजिक सुधारणांचा पाठपुरावा केला. स्त्रियांना शिक्षण मिळावे अशी त्यांना तळमळ होती. त्याकाळचा समाज फारच कर्मठ होता आणि या स्त्रीशिक्षणा-मागची भूमिका समजून घेत नव्हता. त्यांनी समाजाला स्वतःच उदाहरण घालून द्यायचे ठरवले. त्यांची अकरा वर्षांची पत्नी अशिक्षित होती. तिला शिकवायचे त्यांनी ठरवले. छोट्या रमाबाईला शिकवण्यासाठी जेव्हां त्यांनी एका इंग्लिश महिलेला विनंती केली, तेव्हां त्यांच्या घरांतल्या इतर बायका चिडल्या होत्या. मिस हरफर्ड शिकवणी संपवून गेल्या की रमाबाईंना पुन्हां आंघोळ करावी लागत असे.

महादेवरावांचा जन्म १८ जानेवारी १८४२ रोजीं नाशिक जिल्ह्यांतल्या निफाड या गांवी झाला. त्यांचे वडील गोविंदराव रानडे कोल्हापूर संस्थानात एक अधिकारी होते. असं सांगतात की एकदा त्यांची आई गोपिकाबाई, छोटा महादेव व नवजात बहीण दुर्गा, अशी बैलगाडीतून कोल्हापूरला येत होती. तीन वर्षांचा महादेव बैलगाडीतून घसरून रस्त्यांत पडला. ते कुणाच्याच लक्षांत आले नव्हते. सुदैवाने गोपिकाबाईंचे बंधू घोड्यावरून मागून येत होते. त्यांनी 'मामा, मी पडलोय' हे भाच्याचे शब्द ऐकले. त्यांनी महादेवला उचलून घेतले व घोड्याला टांच मारून ते गाडीजवळ पोंचले. त्या प्रसंगानंतर गोपिकाबाईंची महादेववर विशेष ममता राहिली.

कोल्हापूरच्या मराठी शाळेंत रानड्यांचे शिक्षण झाले. तेरा वर्षांचे ते झाले तेव्हां पुढील शिक्षणासाठी त्यांना मुंबईला एल्फिन्स्टन इन्स्टिट्यूटमधें पाठवण्यांत झाले. नंतर त्यांनी एम.ए., एल.बी, व एल.एल.बी. (ऑनर्स), या पदव्या मिळ-वल्या. मॅट्रिकपासून प्रत्येक परीक्षेत ते उत्कृष्ट यश मिळवून उत्तीर्ण झाले.

विधवाविवाह ही सुधारणा अंमलात आणण्याचा त्यांनी आटोकाट प्रयत्न केला. ते जेव्हां बॉंबे लेजिस्लेटिव्ह काऊन्सिलचे कायदेसभासद झाले, तेव्हां त्यांनी हिंदू कायद्यांत अनेक दुरुस्त्या करण्यांत महत्वाची भूमिका निभावली. विधवांच्या पुनर्विवा-हाला सरकारी मान्यता मिळाली.

भारताचा हा खरा सुपुत्र १६ जानेवारी १९०१ रोजीं निधन पावला.



वेताळ कथा

# राजसन्मान

निश्चयाचा पक्का विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला. झाडावरुन ते प्रेत त्याने खाली काढले. आपल्या खांद्यावर ते टाकले आणि तो स्मशानाच्या दिशेने जाऊं लागला. तेव्हां प्रेताच्या आंत लपलेला वेताळ राजाला म्हणाला, ''राजन्, तुझा हट्ट पाहून तूं फारच हटवादी आहेस अशी मला शंका येते आहे! कुणाच्याही सहनशक्तीला एक सीमा असते, पण तुझी सहनशक्ती तर त्या सीमेपलीकडची आहे. मी इतका तुला समजावतो आहे, पण तूं समजून घेण्याचा यत्किंचित प्रयत्न करीत नाहीस. मी वारंवार तुला सांगितलंय की तुझा जीव धोक्यांत आहे. या अरण्यांत हिंस्र श्वापदें आहेत. कोणत्याही क्षणीं ती तुझ्यावर हल्ला करतील, व तुझ्या मृत्यूला कारणीभूत होतील. या स्मशानांत तूं मोकळेपणी हिंडतो फिरतो



आहेस. तुझं कांही कुणी बिघडवूं शकणार नाही असं तुला वाटतंय! तुझ्या राज्यांत परत जाण्याची गोष्ट तूं काढतच नाहीस. तूं एक राजा आहेस आणि राजाचा कांही एक निश्चित धर्म असतो, हे तूं विसरलेला दिसतो आहेस. तुझ्या राज्यांत बराच गोंधळ आहे आणि तिथल्या परिस्थितीशी तूं सामना करुं शकणार नाहीस अशी तर खरी गोष्ट नाही ना? माझं ऐक आणि आपल्या राज्यांत परत जा. राजा शंतनूलाही अशाच समस्येला तोंड द्यावं लागलं होतं. एक दिवस अचानक त्याला वाटलं, त्याला त्याच्या समस्येचं निराकरण करण्याचा मार्ग सापडला. पण ही केवळ त्याची आत्मवंचना होती, त्याचा फक्त भ्रम होता. त्याची गोष्ट माझ्याकडून ऐक. तुझा थकवा जरा कमी होईल." असं म्हणून वेताळाने शंतनूची गोष्ट सांगायला सुरवात केली.

"फार फार पूर्वीची गोष्ट आहे ही. विदर्भ देशांत राजा शंतनू राज्य करीत होता. त्या वेळेस राज्यांत सुबत्ता नांदत होती. पण धार्मिक झगडे असल्यामुळें राज्यांत शांतता नव्हती. शिवभक्त आणि विष्णुभक्त लहानसहान कारणांवरुन एकमेकांशी भांडत होते. एकमेकांची मंदिरे उध्वस्त करीत होते. लुटालूट होत होती. तेवढ्यानेच समाधान झालं नाही तर मारामारी करण्यास, व विरुद्ध असलेल्यांना ते ठार मारण्यास कमी करत नव्हते.

शंतनूच्या लक्षांत आलं की ही धार्मिक भांडणे अशीच चालूं राहिली तर राज्य खिळखिळे होईल व शत्रू ही संधी साधतील. त्याने मंत्र्यांचा सल्ला घेतला. शिवभक्त मंत्र्यांनी मत दिले की वैष्णवभक्ती निषिद्ध मानली जावी. विष्णुभक्त मंत्री तर त्याही पुढे गेले. शिवाचे नांव उच्चारायलाच बंदी घालावी, असा विचार त्यांनी मांडला. धार्मिक भेदभाव मंत्र्यांच्या मनांतही पक्के ठाण मांडून बसलेले आहेत हे राजाच्या लक्षांत आले आणि तो काळजींत पडला.

विवेकवती ही शंतनूची पत्नी होती. राजाच्या काळजीचे कारण समजल्यावर तिने विचारलं, "महाराज, आपण शिवभक्त आहात की विष्णुभक्त?"

"मी देशभक्त आहे. माझी प्रजा या दोन्ही देवांची पूजा करते. तेव्हां हे दोन्ही देव माझे आराध्यदेव आहेत" शंतनू म्हणाला.

"आपली पुराणें तर सांगतात की शिव व वैष्णवांचे रूप वेगळे असेना कां, ते दोन्ही एक आहेत. आणि भगवानही एकच आहे. शिवाच्या रूपांत विष्णूची आणि विष्णूच्या रूपांत शिवाची आराधना करणे ही आपली परंपरा आहे. शिव केशव एक आहेत. हे सत्य पटवून देण्यासाठीं कुठेकुठे हरिहरनाथाची मंदिरेदेखील बांधलेली आहेत. हल्ली मात्र त्यांची देखभाल फारशी होत नाही. आपण हरिहरनाथाच्या माहात्म्याचा प्रचार करायला हवा. प्रजेंत या विचाराचा पाठपुरावा करावा. त्याच्यामुळें, प्रजाजनांच्या विचारसरणींत, त्यांच्या दृष्टीकोनांत, बदल होण्याची शक्यता आहे." विवेकवतीने उपाय सुचवला.



शंतनूने हंसून म्हटले, "हरी व हर हे दोन वेगवेगळे नसून एकच आहेत, हे जनतेला समजावून सांगणे हे फारसे कठीण काम नाही. पण कांही स्वार्थी मंडळी धर्माच्या नांवावर जनतेला भडकवतात. धार्मिक एकी स्थापन होण्याच्या मार्गात ही मंडळी अडथळे निर्माण करतात. मला ते धर्मद्रोही ठरवतील. आणि प्रजेला माझ्याविरुद्ध जाण्यास चिथावणी देतील. असं झालं तर माझ्या संरक्षणासाठी मला सैन्यबळाचा उपयोग करावा लागेल. आणि ते मला मुळींच आवडणार नाही. रक्ताचे पाट वाहाणे हे माझ्या सिद्धांताच्या आणि आदर्शांच्या विरुद्ध आहे."

"आपण प्रजाजनांच्यामधें राजा शंतनू म्हणून जाऊंच नका. आपण हरिहरनाथ नांवाचा एक योगी बनून त्यांना उपदेश करावा." विवेकवतीने सांगितले.

"स्वार्थी वृत्तीची मंडळी जेव्हां महाराजांच्या विरुद्ध लोकांना प्रक्षुब्ध करण्याचा प्रयत्न करायला लागतात, तेव्हां ते काय एका योग्याची पर्वा करतील? खरी परिस्थिती कळली तर राज्यभर खळबळ माजणार नाही कां?" राजाने प्रश्न केला.

या समस्येचे निराकरण करण्यासाठी विवेकवती-जवळ एक अचूक उपाय होता.

राणीच्या बालवयांत त्यांच्या राजवाड्यांत एक मुनी येऊन राहिले होते. छोट्या राजकन्येने त्यांची मोठ्या श्रद्धेने सेवा केली होती. परत जाताना मुनींनी प्रसन्न होऊन तिला एक जादूची आंगठी दिली, आणि सांगितले, "ही आंगठी जो घालील त्याच्यावर शस्त्र किंवा अस्त्राचा कांहीही परिणाम होणार नाही. निसर्गाची शक्तीदेखील त्याच्यावर आपला प्रभाव पाडूं शकणार नाही. पण एक लक्षांत ठेव. या आंगठीचा उपयोग फक्त लोकहितासाठीं होणारे एखादे कार्य असेल त्यासाठीं करता येईल, आणि ही आंगठी आपले सामर्थ्य त्यावेळेस दाखवूं शकेल."

राणीने शंतनूला ही कथा सांगून म्हटले, "आजपर्यंत मी ही आंगठी आपल्या देवघरांत गुप्तपणें



लपवून सुरक्षित ठेवली होती. आता हिचा उपयोग प्रजाजनांसाठी होऊं दे. या आंगठीचा उपयोग करण्याची वेळ आली आहे." एवढं बोलून विवेकवती ती आंगठी घेऊन आली व राजाला तिने ती आंगठी दिली.

ती आंगठी राजाने आपल्या बोटांत घातली आणि त्याचे एका योग्यांत रूपांतर झाले. राजाने राणीच्या हुशारीची प्रशंसा केली आणि तो मोठ्या आत्मविश्वासाने प्रजाजनांत जाऊन मिसळला. हरिहरनाथाचा प्रचार करण्यांत राजा गुंतला. लोकांना उपदेश करूं लागला. शिव व विष्णु हे वेगवेगळे नसून एकाच देवाची दोन नांवे आहेत असं सांगूं लागला. लोक तऱ्हेतऱ्हेने त्याला त्रास देऊं लागले. परंतु जसा हिरण्यकशिपुच्या प्रहारांचा प्रल्हादावर कांहीच परिणाम झाला नाही, त्याचप्रमाणे गोंधळलेली जनता राजाला कांहीही करुं शकली नाही. पण जनता कांही हिरण्यकशिपुसारखी दुष्ट थोडीच होती? जनतेचे मत लौकरच बदलले. राजाने सांगितल्याप्रमाणे लोक शिव



व विष्णूची पूजा सारख्याच रूपांत करायला लागले. स्वार्थी दुष्ट बुद्धिवाद्यांचा खेळ संपून गेला. त्यांनी आपला पराजय स्वीकारला.

आपल्या या विजयाचा शंतनूला खूप आनंद झाला. जेव्हां तो राजधानीला परत येत होता तेव्हां एका निर्मनुष्य रस्त्यावर एका तरुणाने त्याच्यावर हल्ला केला. राजा बळकट होता त्यामुळें बघताबघता त्याने त्या तरुणाला पकडले. राजा त्याला म्हणाला, "मी हरिहरनाथ योगी आहे. परमेश्वराच्या कृपेने मला एक अमोघ शक्ती प्राप्त झालेली आहे. तुला हे ठाऊक नव्हते म्हणून तूं हल्ला केलास, तरीही मी कांही तुला रागावणार नाही. फक्त मला इतकंच सांग की तूं माझ्यावर हल्ला कां केलास?"

त्या तरुणाने राजाकडे अत्यंत तिरस्काराने पाहून म्हटले, "मी जाणूनबुजून तुमच्यावर हल्ला केला आहे. तुम्ही कोण आहात नि तुमचं ध्येय काय आहे हे मला ठाऊक आहे. योगामुळें सिद्धी प्राप्त करता येते, आणि त्या शक्तींच्यामार्फत जनतेला योग्य मार्गावर आणता येतं. पण तूं आपल्या शक्तीचा दुरुपयोग केला आहेस. आपल्या देशांत जे अराजक माजले आहे त्याचे खरे कारण आहे दैवभक्ती! कोणत्याही देशाची उन्नति व्हायला हवी असेल, तर त्यासाठी नास्तिकताच हवी ! तुम्ही लोकांच्या दैवभक्तीचा मार्ग बदलला आहेत, पण त्यांच्या मनांत दैवभक्तीबद्दल जे अज्ञान आणि मूर्खपणा ठसलेला आहे, भिनलेला आहे, त्याच्यापासून तुम्ही लोकांना वांचवू शकला नाहीत. तेव्हां तुम्हाला वाटतो तसा हा तुमचा विजय नसून उलट पराजय आहे."

शंतनूने उत्तर दिले, "या जगांत जास्तीत जास्त लोक आस्तिक आहेत. दैवावर श्रद्धा असणे हा एक अद्भुत विश्वास आहे. साऱ्या जगांत दैवाची भक्ती या एका नांवाखाली कितीतरी चांगली कामें होत राहातात. जेव्हां ही दैवभक्ती मूढभक्ती बनते, तेव्हां लोकांच्या मनांतली माणुसकीची भावना दूर होऊं लागते. त्यांच्यात आणि जनावरांत कांहीही फरक राहात नाही. म्हणून माझा विश्वास आहे की अशा गोंधळून गेलेल्या लोकांना योग्य मार्गावर आणणें हे आपले कर्तव्य आहे. आणि तेच आपले ध्येयदेखील असायला हवे. या विश्वासाच्या बळावर मी तसा प्रचार केलेला आहे. माझ्याप्रमाणे तूदेखील या विचारांचा प्रचार जर लोकांच्यामधे केलास तर तुझं कल्याण होईल."

त्यावर त्या तरुणाने आपले एक काव्य राजा शंतनूला वाचून दाखवले. शंतनूने अतिशय खूष होऊन त्याला म्हटले, "तूं फारच उत्तम काव्यरचना केली आहेस. जर तूं ही राजाला ऐकवलीस तर दरबारांत तुझा सन्मान होईल."

त्यानंतर दोघेही आपापल्या वाटेला लागले. राजधानीला परत आल्यावर राजाने राणीला ती आंगठी परत दिली. एक दिवस राजा दरबारांत सिंहासनावर बसला होता. त्यावेळेस तो नास्तिक युवक तिथें आला. राजाची अनुमती घेऊन भरसभेंत त्याने





आपली काव्यरचना वाचून दाखवली. उपस्थित मंडळींनी टाळ्या वाजवून त्याचे कौतुक केले. शंतनूनेही त्याची स्तुती करुन म्हटले. "मुला, तू एक प्रतिभावंत कवी आहेस. तुझे काव्य दहा हजार रुपयांचे बक्षीस मिळवण्याच्या योग्यतेचे आहे."

यावर मंत्र्यांनी उठून मधेच हस्तक्षेप करीत म्हटले, "महाराज, हे अगदी खरं, की या तरुणाचं काव्य श्रेष्ठ आहे. पण यांत परमेश्वराची टर उडवलेली आहे; देवाला कधीकधी दोषी ठरवलेलं आहे. आपल्या देशांतली आस्तिक मंडळी त्याच्याशी सहमत होणार नाहीत. उलट हे वाचून त्यांच्या मनाला फार दुःख होईल. म्हणून या काव्याचा राजसन्मान होऊं शकणार नाही."

शंतनूने मान डोलावून मंत्रीजींच्या तर्काशी आपण सहमत असल्याचे दर्शवले. आणि त्या तरुणाला एकांतात भेटण्यास सांगितले. जेव्हां राजाला भेटायला तो तरुण आला, तेव्हां शंतनूने त्या युवकाला सांगितलं, "तुझं काव्य उत्तम आहे निश्चित ! आणि तुझे विचार आणि विश्वास याचा प्रसार करण्याची तुझी इच्छा आहे. तेव्हां मी तुला माझ्यापाशी असलेली शक्ती देण्यास अनमान करणार नाही. मात्र त्या शक्तीचा उपयोग केवल लोकहितासाठीच झाला पाहिजे हे नीट ठेव. स्वतःच्या स्वार्थी हेतुसाठी नव्हे!"

त्या युवकाने नकार देत म्हटले, "प्रत्येकजण योगी होऊं शकणार नाही. लोकहितासाठी मी काय करूं शकणार? असली अनेक काव्यें लिहावीत अशी माझी मनीषा आहे. या देशांत माझ्या कवितेला जर राजाश्रय मिळाला तर मी आणखी अनेक कविता लिहूं शकेन. नाहीतर जगण्यासाठी मला काबाडकष्ट करायला लागतील. तेव्हां ह्या काव्यांबद्दलचा नाद विसरून जाणे हेच श्रेयस्कर होईल."

त्यावर शंतनूने त्याला एक चित्र देऊन सांगितले, "नगरांतला प्रमुख सराफ रत्नाकर याच्याकडे जाऊन त्याला हे चित्र विकत दे. तो तुला त्याचे दहा हजार रुपये देईल. नंतर तू आणखी कांही कविता लिही व त्या माझ्याकडे घेऊन ये. तोपर्यंत मी आणखी एक चित्र रंगवून ठेवीन. परंतु एक मात्र लक्षांत ठेव. कोणत्याही परिस्थितींत हे चित्र मी काढलंय हे गुपित



रत्नाकरला समजता कामा नये."

तो तरुण आश्चर्यचकित झाला नि राजाला म्हणाला, "महाराज, आपण आपले चित्र विकून मला पैसे द्यायची काय आवश्यकता आहे? आपला खजिना कांही रिकामा थोडाच आहे? कवी आणि कलाकार, यांचा सत्कार करण्याची रीत या देशांत नाही कां?

शंतनू हंसून बोलला, "अर्थातच आहे. आमच्या देशातही कवि, लेखक व कलाकार यांचा सन्मान होतो. परंतु देशाचा अर्थ राजा नव्हे, प्रजा आहे. मी प्रजेचा प्रतिनिधी आहे, म्हणून मी प्रजेचे निर्णय मानतो व ते अंमलात आणतो. तुझे काव्य प्रजेचा आदर मिळवूं शकले नाही, म्हणून तूं राजसन्मानास पात्र ठरला नाहीस. जोपर्यंत तुझे विचार तू इतरांच्यावर लादत नाहीस, तोपर्यंत तुझे विचार व्यक्त करण्याचे तुला पूर्ण स्वातंत्र्य आहे. मी कांही तुझ्या काव्यावर बहिष्कार घालणार नाही. खरोखरच मला तुझी रचना आवडली. म्हणून मी माझ्या फावल्या वेळांत जे काम करतो आणि त्यांतून जी कमाई होते, त्यांतून मी तुझा सत्कार करतो आहे. रत्नाकर हा कलाप्रिय व्यापारी आहे. त्याला अशी चित्रे खूप आवडतात. पण जर त्याला कळले की हे चित्र ही राजाने काढलेली कलाकृती आहे, तर तो त्या चित्राची किंमत वाढवील. या चित्राची योग्य किंमत त्याने तुला द्यावी अशी माझी इच्छा आहे. म्हणून मी माझं नांव तू त्याला सांगता कामा नयेस असं सांगितलं."

त्या तरुणाने दोन्ही हात जोडून राजाला वंदन केले आणि तो म्हणाला, "महाराज, एक राजा इतका आदर्शवादी असू शकतो याची मी कल्पनादेखील करुं शकलो नसतो. मी खरा नास्तिक आहे. पण मला आपल्यांतच परमेश्वर दिसतो आहे. यापुढें मी कोणत्याही सन्मानाची इच्छा करणार नाही. आजपासून माझ्यापुढें आपला आदर्श आहे. स्वतःचा चरितार्थ मी कष्ट करूनच चालवीन."

शंतनूने त्याच्या खांद्यावर प्रेमाने हात ठेवला नि म्हटले, "जनता मूर्खपणाच्या आहारी जाणार नाही, याच्यासाठी तुझ्यासारख्या कवी व लेखकांची नेहमीच जरूर असते. जर मी तुझ्यासारख्या प्रतिभावंताचा सन्मान करून कलेची कदर केली नाही, तर माझ्यासारख्या हौशी कलावंतांना चित्रें रंगवायची स्फूर्ति कुठून मिळेल? कोणत्याही कलेला कांहीतरी प्रयोजन आवश्यक असतं. माझी कला तुझ्या काव्यरचनेला प्रोत्साहन देईल. तुला जर माझ्यांत परमेश्वर दिसूं लागला तर तूं ज्या कविता यापुढें लिहीशील. त्या काव्यरचनांमुळें मानवाचे कल्याण होईल. हे चित्र घेऊन जा. रत्नाकरने चित्रकाराचे नांव सांगण्यासाठी हट्ट धरला तरी तू गप्प बैस. कोणत्याही परिस्थितींत माझं नांव सांगायचं नाही."

तो तरुण मोठ्या नम्रपणें म्हणाला, "महाराज, भर दरबारांत महाराज म्हणून आपण माझा सन्मान



करूं शकला नाहीत. परंतु तुम्ही दिलेला हा उपदेश व मदत ही मी दरबारांतल्या सन्मानापेक्षां श्रेष्ठ समजतो. आपण सांगितलेल्या सल्ल्यानुसार आणि दिलेल्या सूचनांनुसार मी माझ्या आयुष्याची यापुढची वाटचाल करीन. एक ना एक दिवस आपल्या दरबारांत आपल्या हातून मला पुरस्कार मिळेल याची मला खात्री आहे."

वेताळाने ही गोष्ट सांगून नंतर म्हटले, "राजन्, राज्य चालवणें हे तरवारीच्या पात्यावर चालण्या-सारखे कठीण आहे. राज्यांत निरनिराळ्या पंथाचे लोक असतात. आस्तिक असोत वा नास्तिक, सारेच आपला पंथ योग्य समजत असतात. ते आपसांत भांडत राहातात. आणि हेही कांही अस्वाभाविक नाही. साऱ्या जगाला वाटतं की राजाला अशा वेळेला अनेक कटकटींशी सामना करावा लागतो आहे. तेव्हां अशा त्रासदायक लोकांशी राजाने कडक धोरण स्वीकारले पाहिजे. वेळ आलीच तर त्यांना कडक शिक्षादेखील द्यावी. असं करण्याऐवजीं चांगल्यागोष्टींबद्दल बोलून, उपदेश करून त्यांचे हृदयपरिवर्तन करणें तरी शक्य आहे कां? आणि समजा, ते शक्य झालं, तरी तो विजय तात्पुरताच नाही कां? असले लोक कोणत्याही क्षणीं आपला अविश्वास प्रकट करूं शकतात, मत बदलतात आणि बंड करायला पेटून उठतात. अशा तात्पुरत्या विजयावर विश्वास ठेवून राजा शंतनूने चुकीची समजून करून घेतली. त्याला वाटले की ही समस्या आपण सहजगत्या सोडवली. मी तर म्हणेन की हा त्याचा केवळ भ्रम होता. ही तर शुद्ध स्वतःची फसवणूक होती. खरं की नाही? आपणच आपल्याला धोका दिल्यासारखी? माझ्या या शंकांची उत्तरें तुला माहीत असूनही जर तू गप्प बसलास तर तुझे मस्तक फुटून त्याचे तुकडेतुकडे होतील."

विक्रमार्कांने सांगितलं, "मानव समाज हा चेतनारहित किंवा न बदलणारा, असा नसतो. परिवर्तन आणि परिणाम ही समाजाची सहज लक्षणें आहेत. म्हणून परिस्थितीला अनुरूप असा व्यवहार राजाला करावा लागतो. समस्यांचे निराकरण करावे लागते. लोकांची आपसांतली भांडणें मिटवावी लागतात.

राजा शंतनूने हेच धोरण ठेवलं. नैतिक समस्या कांही फक्त शिक्षा करण्याने सुटत नाहीत. माणसांच्यामधील फरक, धर्मांच्यामधले फरक हे नेहमीच राहातील. अशा समस्यांचे कायमचे निराकरण होईल असं समजणं हा केवळ भ्रम आहे."

राजाचे मौन भंग करण्यांत सफल झालेला वेताळ शवासहित अदृश्य झाला आणि पुन्हां झाडावर जाऊन बसला.





# नशीबवान

गोपालनगर एक लहानसा गांव आहे. खूप वर्षांपूर्वी तेथे रसीला नांवाचा एक व्यापारी राहात होता. त्याला भाग्यवर्मा नांवाचा एक मुलगा होता. त्याच्या जन्मानंतर रसीलाची व्यापारांत मोठ्या प्रमाणांत वाढ झाली होती. परंतु भाग्यवर्माने तारुण्यांत प्रवेश करताना सर्व कांही उलटे झाले. पत्नी अचानक मरण पावली. व्यापार करण्यासाठी गेलेली जहाजे समुद्रांत बुडून खूप नुकसान झाले. जवळपासच्या राज्यांत विकण्यासाठी पाठवला जाणारा माल जंगलामध्ये चोरांनी पूर्णपणें लुटला. अशा रीतीने रसीलाची सर्व संपत्ती नाहीशी होत गेली व लवकरच तो निर्धन, गरीब झाला. या सर्व आघातांमुळे तो आजारी पडला.

आपले शेवटचे दिवस जवळ आलेले पाहून त्याने आपल्या मुलाला, भाग्यवर्माला जवळ बोलावले व म्हटले - "बाळा, तुझ्या जन्मानंतर माझ्या व्यापारांत खूप वाढ झाली, त्यामुळें मी तुझे नांव भाग्यवर्मा ठेवले. परंतु आत्ता आपली सध्याची स्थिती अतिशय गंभीर आहे. आपल्याकडे जे होते ते सर्व आपण गमावले आहे. देव आपल्यावर इतका कां निष्ठुर झाला आहे मला समजत नाही. कुठलं पाप केलं म्हणून ही शिक्षा भोगावी लागते आहे हेच मला कळत नाही. आणि आत्ता माझा मृत्यूही अगदी जवळ आला आहे. तुला या जगांत एकट्याला सोडून, अनाथ करून मी मरणाला सामोरा जाणार आहे. तुझ्या भविष्याची चिंता मला लागून राहिली आहे, खूप दुःखी होत आहे. पण काय करूं? उपाय नाही." डोळ्यांत आंसू आणि भरल्या कंठाने तो म्हणाला.

भाग्यवर्माने आपल्या वडिलांना धीर दिला व म्हणाला, - "नारळांत ज्याप्रमाणे पाणी येते, त्याप्रमाणे संपत्तीसुद्धा येते. ती पाहता पाहता नाहीशीही होते. तुफान, वादळ आलं की पिकाची हानी होते. त्यामुळे शेतकऱ्यांचे अपार नुकसान होते. जर तो वरुणदेवावर व पृथ्वीवर नाराज होऊन कांहीही न करता स्वस्थ बसला, व शेती केली नाही, तर त्याचा उदरनिर्वाह कसा होईल? तो आपल्या कुटुंबियांना कसे पाहणार? हीच गोष्ट व्यापाराच्या संदर्भातही लागू पडते. व्यापारांत नुकसान झाले तर व्यापाऱ्याने हताश होऊन स्वस्थ बसून चालणार नाही. त्याने पुन्हां पुन्हां प्रयत्न केले पाहिजेत. आपण मोठ्या प्रेमाने माझे नांव भाग्यवर्मा ठेवले. माझे नांव योग्य आहे की नाही ते भविष्यच सांगेल. माझ्या प्रयत्नांना यश मिळूं दे, असा मला फक्त आशिर्वाद द्या."

आपल्या मुलाच्या आत्मविश्वासाचे कौतुक करत रसीला म्हणाला, "बघ बाळा, तूं याच गांवात राहून व्यापार केला पाहिजे असे कांही नाही, तसेच मी ज्याचा व्यापार केला, त्याचाच व्यापार तूं करावा अशीही कांही जरुरी नाही. तू तुला हवा असेल त्या वस्तूंचा व्यापार करूं शकतोस. सुरवातीला मी तर लहान लहान जहाजातून येणाऱ्या वस्तूंवर करवसुलीचे काम करत असे. चक्रधर नांवाचा माझा मित्र आहे, त्याला तू भेट, त्यानेच मला ती नोकरी दिली होती. तुला पण तो नोकरी देईल. ती नोकरी तू मन लावून कर. माझा आत्मा नेहमी तुझ्याबरोबर असेल."

रसीलाच्या मृत्यूनंतर भाग्यवर्मा चक्रधरला भेटला. त्याच्याजवळ छोट्या छोट्या अनेक नावा होत्या. व्यापारी लोक आपल्या वस्तू एका गांवाहून दुसऱ्या गांवी पोहोचवण्यासाठी व त्या विकण्यासाठी या नावांचा उपयोग करत असत. या विक्रीसाठी आलेल्या मालावर व विकून गेलेल्या वस्तूंवर कर वसूल केला जात असे. व तो वसूल



करण्यासाठी कांही लोकांना नियुक्त केले जात असे. वसूल केलेल्या रक्कमेतला कांही हिस्सा सरकारी खजिन्यांत भरला जात असे. हे सारे काम चक्रधर सांभाळत असे.

चक्रधरने भाग्यवर्माचे प्रेमाने स्वागत केले. तो म्हणाला, "मी यांत जो थोडाफार नफा मिळाला, त्यातून कांही नावा घेतल्या. तुझ्या वडिलांनी सुद्धा अशीच जी कमाई केली, त्यातून व्यापार सुरू केला, व मग मोठा व्यापारी झाला, व नंतर लाखों रूपये कमावले. अशा रीतीनेच आम्ही आमच्या जीवनांत प्रगती केली. तू माझ्या मित्राचा मुलगा आहेस, तुला ही छोटीशी नोकरी द्यायची माझी इच्छा नाही. तुला हवी असेल तितकी संपत्ती मी तुला कर्ज म्हणून देतो, त्याचा उपयोग करून तो व्यापार सुरू कर व भरपूर धन कमव, व आपले वैभव पुन्हां आण. मी तुला सर्व प्रकारची मदत करेन."

हात जोडून भाग्यवर्मा नम्रपणे म्हणाला, -

संदीप



''काका, तुमच्या या मदतीबद्दल मी अत्यंत आभारी आहे पण मोठ्या लोकांनी सांगितले आहे की जिथे हरवले आहे तिथेच शोधा. मी माझ्या वडिलांच्या आज्ञेचे पालन करू इच्छितो. माझ्या वडिलांचा आशिर्वादच माझी मोठी संपत्ती आहे. माझी खात्री आहे की जी नोकरी करून माझे वडील मोठे व्यापारी झाले, तीच नोकरी मलाही जीवनात यश देईल. म्हणून तीच नोकरी तुम्ही मला द्या. तेच तुम्ही दिलेले कर्ज असे मी मानेन. आपल्या मित्राचीसुद्धा तीच इच्छा होती.''

चक्रधरने भाग्यवर्माच्या इच्छेनुसार त्याला ती नोकरी दिली. असेच कांही महिने लोटले.

एक दिवस नावेवर तीन पेट्या आणत्या गेल्या. पेट्यांच्या मालकाने पेट्या उघडल्या व भाग्यवर्माला दाखवत म्हटले - ''साहेब, या पेट्या रिकाम्या आहेत. नियमानुसार यांना कर द्यायला हवा पण या पेट्या रिकाम्या असल्यामुळे त्याच्यावर कर द्यायची जरूरी नाही असे मला वाटते.''

भाग्यवर्माने पेट्यांची सूक्ष्मपणे परीक्षा केली व म्हटले - ''या एकेका पेटीत तीन मण माल भरता येतो. तसेच या पेट्या विकल्या तर भरपूर संपत्ती मिळू शकते.''

पेट्यांचा मालक आर्त स्वरांत म्हणाला, - ''कृपा करून मी काय सांगतो ते लक्षपूर्वक ऐका. कांही वर्षापूर्वीची गोष्ट आहे. व्यापार करण्यासाठी खूप सारी सामग्री घेऊन व्यापाऱ्यांचा एक जथा जंगलातून जात होता. त्या जथ्यांत मी एक नोकर होतो. जंगलात चोरांनी व्यापाऱ्यांचा सर्व माल लुटला. आम्ही सर्व जिवाची पर्वा न करता त्यांच्यावर तुटून पडलो, पण कांही उपयोग झाला नाही. मी बेशुद्ध होऊन खाली पडलो. गाढवाच्या पाठीवर बांधलेल्या या तीन पेट्या अस्ताव्यस्तपणे पडल्या होत्या. कांही मूल्यवान वस्तू इकडे तिकडे पडली असेल म्हणून आशेने मी सर्वत्र शोधले, पण मला या रिकाम्या पेट्यांव्यतिरिक्त कांही मिळाले नाही. वाटेत मी ऐकले की या तीन पेट्या गोपालनगरचा व्यापारी, रसीलाच्या आहेत, म्हणून मी या त्यांना परत द्यायला निघालो आहे. त्याचबरोबर ते मला कदाचित त्यांच्याकडे नोकरी देतील अशी आशा करूनही मी तिकडे चाललो आहे. त्या पेट्या विकण्याचा माझा कांही इरादा नाही.''

हे सर्व ऐकून भाग्यवर्माला जरा उत्साह वाटला. याचा अर्थ असा की त्याच्या वडिलांच्या रिकाम्या पेट्या त्याला परत मिळाल्या व कुणास ठाऊक, यांच्यामुळे त्याचे भाग्य पुन्हा उजळेल. हा विचार मनांत येताच तो त्या माणसाला म्हणाला, ''मी त्यांचाच मुलगा आहे. तुझी इमानदारी मला आवडली. यापुढे मी तुला मदत करीत. माझ्या



नशिबाने मला साथ दिली तर मी लवकरच व्यापार सुरू करेन व तुला माझा प्रामाणिक मदतनीस बनवीन.''

पेट्या घेऊन तो चक्रधरजवळ गेला व म्हणाला, - ''जरी या माणसाने या पेट्या माझ्या वडिलांच्या म्हणून सांगितल्या तरी आपली अनुमती असल्याशिवाय मी त्यांना माझ्या म्हणणार नाही. आपणच सांगा की त्या माझ्या कशा होतील?''

चक्रधरने पेट्या लक्षपूर्वक पाहिल्या व आनंदातिशयाने चुटकी वाजवत म्हटले - ''खरंच, तुझ्या वडिलांनी म्हटल्याप्रमाणे त्यांचा आत्मा सदैव तुझ्याबरोबरच असेल. त्यांचे म्हणणे अगदी खरे ठरले. तुझे वडील सोन्यासारख्या चमकणाऱ्या नकली दागिन्यांचा व्यापार करत असत. ते ठेवण्यासाठीच त्यांनी या पेट्या बनवून घेतल्या होत्या. या प्रत्येक पेटीत तीन तीन गोट्या आहेत. देवी लक्ष्मीची कृपा सतत व्हावी म्हणून सोन्याची पूजा केली व त्या सोन्याच्या गोट्या करून त्या या पेट्यांत बसवल्या. त्यावर बसलेली धूळ बाजूला केलीस तर तुला दिसेल. त्या गोट्याच आज रक्षक बनून या पेट्यांना तुझ्याकडे घेऊन आल्या आहेत. देव तुझे भले करो.''

भाग्यवर्माने त्या गोट्या काढायला लावल्या. त्या खरेच सोन्याच्या होत्या चक्रधर म्हणाला, - ''तुझ्या वडिलांच्या म्हणण्याप्रमाणे जिथून तू आपला व्यापार सुरू करावा म्हणून विचार करत होतास त्याच जागेवर तुला या पेट्या मिळाल्या. हे सोनेच तुझी आता संपत्ती आहे. आपल्या वडलांसारखा तू ही इथूनच व्यापार सुरू कर.''

भाग्यवर्मा खुषींत म्हणाला, - ''माझ्या वडिलांनी आशिर्वाद देताना म्हटले होते की माझा आत्मा सदैव तुझ्याजवळ राहील. ह्या माणसाच्या रूपाने या पेट्यांच्या बरोबर ते माझ्याजवळ आहेत. त्यांच्या नांवावरच मी व्यापार सुरू करतो. खरंच, नशिबाने मला साथ दिली आहे.''

भाग्यवर्माने व्यापार सुरू केला. दोन तीन वर्षातच तो एक मोठा व्यापारी झाला. चक्रधर त्याच्या व्यापारी कौशल्यावर खुष असे. लवकरच त्याने आपल्या मुलीचा विवाह त्याच्याबरोबर केला. भाग्यवर्माने त्या मदतनीसाला आपल्या पित्यासमान मान दिला. आत्ता दोघेही सुखाने राहू लागले. त्यांचे नशीब उजळले.



# भारताची गाथा

एका महान् संस्कृतीचा शोध
युगायुगांचा गौरवशाली इतिहास

## ११. सावित्रीची साहसपूर्ण गाथा



रविवारचा दिवस होता. त्यामुळे देवनाथांची इच्छा होती की सर्व कुटुंबियांबरोबर कुठेतरी लांब निसर्गरम्य ठिकाणी जावे व ते सौंदर्य, तो आनंद लुटून यावे. ते सकाळीं आठ बाजेपर्यंत तयार होऊन बसले. पण संदीपच्या मित्रांचे फोन येत राहिले की - "आजोबा, सावित्रीची गोष्ट ऐकायला आम्ही तिकडे किती वाजता यायचं?" आपल्या संस्कृतीविषयी जाणून घेण्याची मुलांची आतुरता पाहून देवनाथांना खूप आनंद झाला. त्यांनी विचार केला की ही सहल पुढच्या आठवड्यांत देखील करता येईल. त्यांच्या सुनेने या विचाराचे आनंदाने स्वागत केले.

दुपारी तीन वाजेपर्यंत सर्व मुले एकत्र झाली व संदीपच्या घरासमोर असलेल्या डेरेदार वृक्षाखाली बसली. देवनाथ समोर ठेवलेल्या खुर्चीवर स्थानापन्न झाले व म्हणाले - "आपल्या कथांमध्ये एक प्रमुख कथा आहे सावित्रीची. तीच मी तुम्हाला आज सांगणार आहे. मद्रदेशचा राजा अश्वपतीची मुलगी म्हणजे सावित्री. मद्रदेश कुठे आहे, तुमच्यापैकी कुणाला माहिती आहे का?"

"आजकाल चेन्नई म्हणतात, तो मद्रास प्रांत म्हणजे मद्रदेश कां आजोबा?" किशोरची बहीण म्हणाली.

"नाही बाळा, आजचा अफगणिस्तानच त्या काळी मद्रदेश म्हणून ओळखला जायचा. आमच्या पुराणांतल्या गांधार देशालाच आज कांधार म्हणतात."

"ओहो, याचा अर्थ असा झाला की हे सर्व प्रांत भारताचेच भाग आहेत तर!" किशोरने विचारले.

"तूं अगदी मुख्य प्रश्न विचारलास. आपल्याला हे सविस्तर जाणून घ्यायचे असेल तर प्राचीन राजनैतिक व भौगोलिक स्वरूपाविषयी समजून घ्यावे लागेल. भारत उपखंडाला जंबुद्वीप म्हणत असत. जंबूद्वीपात अनेकांचे राज्य चालत असे. एका विशिष्ट प्रकारच्या सांस्कृतिक आणि आध्यात्मिक बंधनामुळें ही सर्व एकत्रित व सुरक्षित होती. त्यावेळची प्रजा हे सर्व एक राज्य आहे, अविभाज्य आहे असेच मानत होती. या कारणामुळेच ज्यावेळी कौरव-पांडवामध्ये युद्ध झाले, त्यावेली कांहीजणांनी कौरवांचा पक्ष घेतला तर कांहीनी पांडवांचा पक्ष घेतला. आणि अशा रीतीने उपखंडातल्या सर्व राज्यांनी या युद्धांत भाग घेतला. पेशावर, काबूल, बामियन येथे बौद्ध विद्या केंद्र असे. बामियनमधे बुद्धाच्या मोठमोठ्या मूर्ती स्थापित केल्या होत्या. परंतु चंगिझखानासारख्या कांही राजांनी त्यांतल्या बऱ्याच मूर्तींची तोडफोड केली. या साऱ्या गोष्टी इतिहासाची संबंधित आहेत. आता तुम्हा सर्वांना सावित्रीची कथा ऐकायची उत्सुकता लागली असेल. मार्कंडेय मुनींनी सर्वात प्रथम ही कथा वनवासी पांडवांना सांगितली होती." मग त्यांनी सावित्रीची कथा सांगायला सुरुवात केली.

विश्वावसु

सावित्री मद्र देशाचा राजा अश्वपतिची एकुलती एक मुलगी होती. देवी सावित्रीच्या वरदानामुळे जन्मलेली ही सावित्री अतिशय सुंदर होती. तसेंच सर्व कलागुणात निपुण असून जणूं सर्व गुणांची खाणच होती. तिच्या चेहऱ्यावर एक प्रकारचे दिव्य तेज होते.

ती विवाहयोग्य वयाची झाल्यावर तिचे वडील तिला योग्य वर शोधू लागले. अनेक राजकुमार तिला पाहायला आले पण एकही तिच्या योग्य आढळला नाही, तिच्याइतके नैपुण्य, तेज कुणामध्येही नव्हते. त्यामुळे तिच्या वडिलांनी तिलाच वर शोधून काढण्यास सांगितले.

बुद्धिमान मंत्री लोकांना घेऊन सावित्री एका सुंदर रथांत बसून अनेक राज्यांत गेली. शेवटी ती साल्वराज्याच्या सरहद्दीवर म्हणजे आजकाल राजपुताना या नांवाने ओळखल्या जाणाऱ्या राज्याच्या सरहद्दीवर येऊन पोहोचली. तिथे तिने साल्वराजा



द्युमत्सेनाचा मुलगा सत्यवान याला पाहिले. द्युमत्सेन अचानक आंधळा झाल्यामुळे त्याच्या शत्रूंनी त्याचा फायदा घेऊन ते राज्य बळकावले होते. त्यामुळे तो आता ऋषीमुनींबरोबर जंगलात राहत असे. सत्यवान आपल्या आईवडीलांसह त्यांची सेवा करत तिथेच राहत असे.

सावित्रीने सत्यवानाशीच विवाह करण्याचा निश्चय केला. ही शुभवार्ता आपल्या आईवडिलांना सांगण्यासाठी ती मद्रदेशी परतली. राजमहालात तिची नारदाशी भेट झाली. सर्व सविस्तर ऐकताच नारद म्हणाले की सत्यवान एका वर्षाच्या आंत मरण पावेल व त्याचा हा मृत्यू अटळ आहे. ते ऐकताच सावित्री व तिचे आई-वडील खूप काळजीत पडले.

अश्वपतिने मुलीला खूप समजावले की सत्यवानाशी लग्न करण्याच विचार सोडून दे. परंतु सावित्री तिच्या निश्चयापासून ढळली नाही. ती हट्ट धरून बसली की कांही झाले तरी ती सत्यवानाशीच लग्न करेल व तिने आपल्या आईवडिलांना ठामपणे



सांगितले की सत्यवानाशिवाय ती कुणाशीही लग्न करणारच नाही.

अश्वपतिंना माहित होते की त्यांची मुलगी असाधारण स्त्री आहे व नशिबाशी कसा सामना द्यायचा असतो हे तिला बरोबर माहित आहे. त्यामुळे त्यांनी तिचा विवाह तिच्या इच्छेनुसार सत्यवानाशी करून दिला.

सावित्री आपल्या पतीबरोबर अरण्यांत बांधलेल्या छोट्याशा कुटीत राहू लागली. तिचे सासू सासरे तिच्यावर खूष होते. ती त्यांची प्रेमाने व श्रद्धेने सेवा करंत असे. मोठ्याबरोबर ती अतिशय नम्रपणे बोलायची, त्यामुळे सर्वजण तिला आदर देऊं लागले. त्यांना ती एक अपूर्व व आदर्श स्त्री वाटत असे.

परंतु आंतल्या आंत सावित्री अस्वस्थ असे, तिला दिवसरात्र आपल्या पतीची चिंता लागून राही. व मनांतून ती दुःखी असायची. तिला तिचा नवरा सत्यवान प्राणाहून अधिक प्रिय होता. त्याच्याशिवाय तिचे जीवन निरर्थक होते. व कुठल्याही क्षणीं मृत्यू त्याला घेऊन जाईल हे कठोर सत्य ती विसरूं शकत नव्हती. तिने मनोमन निश्चय केला की - "कांहीही होऊ दे, कितीही कष्ट आले तरी त्यांच्याशी सामना करून मी माझ्या पतीचे प्राण वांचवेन." ती भक्तीपूर्वक ध्यान करत बसायची व आपला आत्मविश्वास तशा प्रकारें ती वाढवत जाऊ लागली. अखेर नारदाने सांगितलेला तो मृत्यू दिन आलाच.

त्या दिवशी सकाळींच उदरनिर्वाहासाठी सामग्री आणण्यासाठी जंगलात निघालेल्या आपल्या पतीबरोबर तीही गेली. दुपार होत असतानाच सत्यवानला चक्कर आल्यासारखे वाटले व तो सावित्रीच्या मांडीवर डोके ठेवून झोपला. सावित्रीला माहिती होते की काय होणार आहे. मनांतल्या मनांत देवाचे स्मरण करत ती तशीच निश्चल बसून राहिली.

थोड्या वेळाने एक दिव्य आकृती समोर आल्यासारखे तिला दिसले व त्याचे डोळे लाल लाल असल्याचा तिला भास झाला. ती समजून चुकली की हे दुसरे तिसेर कोणी नसून यमराजच आहेत. सत्यवानच्या आत्म्याला घेऊन यमराज पुढे निघाले.

सावित्रीने यमराजाचा पाठलाग केला. तिच्या अद्भुत शक्ती-सामर्थ्यांना पाहून यमराज थक्क झाले. त्या पतिव्रता स्त्रीला पाहून त्यांना आनंद झाला. त्यांनी तिला विचारले - "देवी, तू माझ्या मागे मागे कां येत आहेस? तुझ्या पतीच्या प्राणाशिवाय दुसरा कांही वर मागायचा असेल तर माग व परत जा." सावित्रीने अंध सासऱ्यांची दृष्टी परत करण्याची व त्यांचे गेलेले राज्य परत देण्याविषयी प्रार्थना केली. यमराजांनी तिची विनंती लगेच मान्य केली.

पण तरीही सावित्री परत न जाता प्रार्थना करत करत यमराजाच्या मागे मागे जात राहिली. यमराजांना तिची दया आली व आणखी दोन वर मागण्याची त्यांनी तिला परवानगी दिली. तेव्हा तिने जीवनभर



सत्यवानाची सहचारिणी व त्याच्या संतानाची आई बनण्याचे भाग्य प्राप्त करून द्यावे म्हणून प्रार्थना केली. यमराजाने 'हो' म्हटले.

सत्यवान जिवंत झाला तरच हे दोन्हीं वर फलदायी होऊ शकले असते. सावित्रीने मागितलेल्या या वरांचा स्वीकार केल्यामुळे यमराजांना सत्यवानाचे प्राण परत द्यावेच लागले. सावित्रीच्या कुशाग्र बुद्धीमुळेच हे शक्य झाले.

सत्यवान झोपेतून उठल्यासारखा हळूंहळूं उठला. दोघेही मिळून त्यांच्या कुटीमध्ये आली. द्युमत्सेन आपल्या मुलाला व सुनेला पाहून अतिशय खुष झाला. आणि त्याने त्यांना आशिर्वाद दिला. तोपर्यंत त्यांची दृष्टीही परत आली होती. त्याच्या राजसिंहासनावर बसलेल्या दुष्ट राजाला प्रजेने हाकलून दिले. प्रजा व मंत्रीगण राजाचे स्वागत करायला तिकडे आले.

महाभारतात ही सत्यवान-सावित्रीची कथा संक्षिप्त आहे. पण तरीही ही कथा महान आहे. तुम्हाला कोणाला माहित आहे कां की ही कथा कां महान मानली जाते? या कथेत कांही महत्वाचे सत्य आहे. आपल्या आत्मशक्तिच्या बळावर सावित्रीने आपल्या पतीचे भाग्य बदलले. तिचा नवरा खरोखरच सत्यप्रेमी होता. या दोघांचा स्वभाव पवित्र आहे, त्यांचे चरित्र सर्वश्रेष्ठ आहे. श्री अरविंद यांनी जर सावित्री या महाकाव्याची रचना केली नसती तर या कथेचा गूढार्थ, सत्य घटना आपल्याला कळल्या नसत्या. एका पुरातन गाथेला त्यांनी एक उन्नत स्तराला नेऊन पोचवले आहे.

एका व्यक्तीच्या निर्मल, पवित्र प्रेमाने दुसऱ्या व्यक्तीच्या ललाट रेखांमध्ये परिवर्तन घडवून आणले. आता यांत काही शंका नाही की भविष्यांत विकसित होणारे दिव्य प्रेम मानवजातीच्या झालेल्या घटनांना बदलून सन्मार्गावर त्यांना घेऊन जाईल. मनुष्याने नेहमी सत्याच्या मार्गावर चालले पाहिजे, व त्यातून उच्च शिखरावर पोहोचून भरपूर यश मिळवण्याची योग्यता प्राप्त करून घेतली पाहिजे. हे आम्ही कधी विसरता कामा नये."

"आजोबा, सावित्री वाचून तुम्ही आम्हांला सांगाल तर खूप बरे होईल." एका मुलीने विनंती केली.

"मोठे झाल्यावर तुम्ही स्वतः हा ग्रंथ सर्वजण वाचा, त्याचं मनन करा. आता सुद्धां तो ग्रंथ तुम्ही वाचूं शकता. कदाचित् त्याचा अर्थ आपल्याला नीट कळणार नाही, पण त्याचा अद्भुत प्रभाव तुमच्यावर पडेल. एक वेगळाच अनुभव तुम्हा सर्वांना मिळेल. श्रेष्ठ कविता कशी असते हे तुम्हाला कळून चुकेल." असे म्हणून देवनाथ उठून उभे राहिले व जायला निघाले.





# बिंदुसाराची चित्रकला

बिंदुसारचा जन्म एका गरीब कुटुंबात झाला. श्रीमंत व्हावे अशी त्याची खूप इच्छा होती. त्यासाठी करून त्याने दिवसरात्र काबाडकष्ट करुन त्याने बरीच संपत्तीही जमवली. सर्व प्रकारच्या व्यसनांपासून तो दूर राही. तसेच कुठल्याही प्रकारचा अनावश्यक खर्च करत नसे. त्यामुळे व्यापार करण्याइतकी संपत्ती त्याच्याजवळ गोळा झाली. सुरवातीला त्याने लहान प्रमाणांत व्यापार सुरू केला व नंतर प्रगती करत करत मोठ्या प्रमाणात त्याचा व्यापार सुरू झाला. दहा वर्षांच्या आंत तो करोडपती झाला. बऱ्याच वर्षांचे त्याचे स्वप्न आता पूर्ण झाले होते. त्याला दोन मुलगे व एक मुलगी होती.

बिंदुसारचे जीवन सुखासमाधानाने परिपूर्ण होते व त्याला कसलीही कमरतता नव्हती. त्याने आपल्या मुलीचे लग्न केले व ती तिच्या सासरी सुखाने नांदत होती. दोन्ही मुलांचाही विवाह झाला व ते व्यापारही चांगला करत होते. हे सर्व मिळवण्यासाठी बिंदुसारने काबाडकष्ट केले होते, खूप मेहनत केली होती. पण तरीही स्वस्थ बसून आराम करणे त्याला आवडत नसे, कांही तरी करावे असे त्याचे अशांत मन त्याला सांगे. व्यापार करून तो कंटाळला होता. त्यामुळे ललित कलांचा अभ्यास करण्याचा त्याने निश्चय केला.

कविता लिहावी किंवा ऐकवावी तर भाषेचे त्याला फारसे ज्ञान नव्हते. गायला शिकावे तर त्याच्या आवाजात बिलकुल गोडवा नव्हता. त्यामुळे त्याला आत्ता एकच कला दिसू लागली की ज्यात तो नैपुण्य प्राप्त करू शकेल आणि ती म्हणजे चित्रकला.

एक दिवस त्याने आपल्या खोलीत बसून तऱ्हेतऱ्हेची चित्रे काढली. पण एकही चित्र त्याला पसंत पडले नाही. त्याला वाटले की कुठलीही कला अवगत करून घेण्यासाठी तिची साधना, मन एकाग्र करणे, तपस्या हे केलेच पाहिजे. एक आठवडाभर तो खूप प्रयत्न करत राहिला. शेवटी एक दिवस त्याच्या मनासारखे चित्र तो काढू शकला. ते चित्र एका सिंहाचे होते व ते पाहून तो अतिशय खूष झाला. त्याचे मन त्याला सांगू लागले की एक दिवस तो यशस्वी चित्रकार होणार व त्याला भरपूर प्रसिद्धी मिळणार.

ते सिंहाचे चित्र पाहात असताना त्याला वाटले - ''हे चित्र खरंच आपण फार सुंदर काढलंय. पण कुठल्याही कलाकाराला समाधान मिळतं ते त्याच्या कलेचं गुणगान जेव्हा इतर लोक करतात तेव्हां.'' त्याला खूप वाटू लागले की घरच्या सर्वांना हे चित्र कसे वाटते ते विचारून त्यांचा अभिप्राय ऐकावा. पण तो जरा संकोची स्वभावाचा होता, त्यामुळे गप्प बसला.

कित्येक दिवस तो आपल्या खोलीतच बसून राहिला. त्याने कुणालाही पत्ता लागू दिला नाही की खोलीत बसून तो काय काम करतोय! त्यामुळें तो खोलीत बसून काय करतोय हे कुणालाही कळू शकले नाही. पण बिंदुसारला पूर्ण कल्पना होती की चित्र दाखवल्यानंतर कांहीजण त्याची खोटी स्तुती करतील, तर कांहीजण त्याला नांवे ठेवतील. त्यांचा खरा अभिप्राय जाणून घ्यायचा असेल तर ते चित्र कशाचे आहे व कोणी काढले आहे हे कुणालाही कळले नाही पाहिजे असे त्याला वाटले.

विचार करून मग त्याने ते चित्र घरांत मध्यभागी ठेवलेल्या टेबलावर ठेवले. जो कोणी त्या चित्राविषयीं बरोबर सांगेल त्याला शंभर मोहरा बक्षीस मिळतील असे त्याने जाहीर केले.

प्रथम बिंदुसारची पत्नी आली व तिने ते चित्र पाहून ''आपल्या नातवाने काढलेल्या वेड्या-वाकड्या रेघा दिसताहेत'' असे उद्गार काढले. ते ऐकून बिंदुसारला फार वाईट वाटले, पण आपले दुःख त्याने इतरांना दर्शवू दिले नाही. मग त्याचे दोन्हीं मुलगे आले व म्हणाले ''अशा निरर्थक गोष्टींसाठी वेळ वांया घालण्याऐवजी व्यापाराकडे जास्त लक्ष दिले व अधिक पैसे कमावले तर बरे होईल,'' बिंदुसारला ते ऐकून खूप दुःख झाले.

तेवढ्यांत त्याच्या दोन्ही सुना तिथे येऊन पोहोचल्या. मोठी सून टेबलावरचा कागद पाहून म्हणाली - ''मला वाटतं की कुणीतरी यांत कांहीतरी



रघुवंश

संदेश लिहीला आहे. पण अक्षर खराब आहे, अस्पष्ट आहे व कुठल्यातरी गूढ भाषेत लिहीण्यामुळे कांही समजत नाही. धाकट्या सुनेने नकारात्मक डोके हलवत म्हटले - ''तू मोठी आहेस पण तरी तुला काय आहे हे कळले नाही. पण मला वाटले की त्याच्यावर कुठलीही भाषा नाही नि अक्षर नाही.'' तिला वाटले आपले उत्तर ऐकून सासरा आनंदित होईल. बिंदुसाराची अवस्था मोठी कठिण झाली, विचित्र झाली. धडपणे त्याला हंसता येत नव्हते की रडता येत नव्हते. तो गंभीरपणे म्हणाला, ''शंभर मोहरा मिळवण्याची योग्यता माझ्या कुटुंबातल्या कुणातही नाही असे दिसतेय.'' तितक्यात त्याचे दोन नोकर तिथे आले. त्यातला एक चित्र पाहून म्हणाला - ''मला वाटते, या कागदात बिया बांधून पुडीसाठी उपयोग केला असावा व त्यातल्या काही बिया फुटल्यामुळे त्याचा रंग या कागदाला लागला आहे.''

दुसरा नोकर हंसून म्हणाला, - ''तुझ्या मूर्खपणाचं मला हसू येतंय. जर हा कागद पुडी बांधण्यासाठी वापरला असेल तर त्याच्यावर कागद दुमडलेल्या रेषा व घड्या दिसायला हव्या ना, या कागदावर तर तसे कांहीच दिसत नाही.''

त्या दोघांचे ते बोलणे ऐकून बिंदुसार थोडा उत्तेजित झाला. त्याने आपल्या दुसऱ्या नोकराला बोलावून म्हटले - ''दोघांमध्ये तू थोडा हुशार दिसतोस. तूच सांग, हे शेवटी आहे तरी काय?''

नोकर खूष होऊन म्हणाला - ''काय मालक, मला इतके पण सांगता येत नाही का? या कागदावर थोडा वेळ बिया ठेवल्या व नंतर काढून टाकल्या, तेवढेच. त्याची पुडी बांधलेली नाही.''

नाराज झालेला बिंदुसार म्हणाला - ''राहूं दे, तुझी ही निरर्थक बडबड नको. जा, आपलं काम कर.'' दोन्हीं नोकर तिथून गेल्यावर त्याचा पांच वर्षाचा नातू तेथे आला. तो कागद पाहताच म्हणाला - ''आजोबा, आजोबा, कुणीतरी झाडाचं हे चित्र खूप छान काढलंय, मला हे चित्र पाहिजे.'' चित्र हातांत घेऊन तो हट्ट करू लागला. त्याचे ते बोलणे व हट्ट पाहून बिंदुसारला अतिशय आनंद झाला. आपल्या नातवाला प्रेमाने जवळ घेत तो म्हणाला - ''सिंहाला झाड म्हटल्याने काय फरक पडणार आहे ? पण या कागदावर एक चित्र काढलंय असं सांगणारा पहिला तूच आहेस. त्यामुळें शंभर मोहरांच्या बक्षीसाचा अधिकार तुझाच आहे.'' नातवाची पापी घेत तो म्हणाला.

तिथेच उभी असलेली त्याची बायको व सुना खळखळून हंसल्या. कारण आता त्यांना खरी गोष्ट कळली होती.







# विसाव्या शतकातला भारत

## स्वातंत्र्याकडे वाटचाल १९०१-१९२१

भारताच्या स्वातंत्र्याचा सुवर्णमहोत्सव साजरा झाला त्याला फार काळ लोटलेला नाही. त्यावेळेस चांदोबाने झांशीची राणी लक्ष्मीबाई व इतरांच्या रोमहर्षक कथा तुम्हाला पुन्हां सांगितल्या होत्या. ''१८५७ ची गाथा ''ने या मंडळींनी देशासाठी दिलेल्या प्राणाहुतीची माहिती दिली होती. नंतरच्या पाव शतकांत म्हणजे पंचवीस वर्षांत, जनतेच्या इच्छाआकांक्षांना मार्ग दाखवणारी कोणतीही सुसूत्र चळवळ अस्तित्वांत नव्हती.

नियतिचे फांसे कधीकधी विचित्र असतात. एक माजी ब्रिटिश अधिकारी, मि. अे. ओ. ह्यूम, यांच्या हातून अशा एका संस्थेचे बीज रोवले गेले, जिथें लोक आपल्या देशाच्या भवितव्याबद्दल चर्चा करुन निश्चित मार्ग देऊं शकतील ! ही संस्था म्हणजे इंडियन नॅशनल कॉंग्रेस, १८८५ मधें स्थापन झाली. भारतीय राष्ट्रीय एकात्मतेचे कार्य सुरुं झाले. हिंदुस्तानच्या जनतेच्या विचारांना वळण आणि मार्गदर्शन करणारे नेते होते बाळ गंगाधर टिळक, गोपाळ कृष्ण गोखले, लाला लजपत राय आणि बिपिनचंद्र पाल !



# हिंदी एकात्मतेचा प्रसार

विसाव्या शतकाच्या सुरवातीलाच हिंदुस्तानांत दुष्काळ पडला. पंचवीस टक्के जनतेला दुष्काळाची झळ पोंचली. शेतजमिनीचे क्षेत्र वाढवण्यासाठी एक पाहणी करणाऱ्या तज्ञांची समिती नेमण्यांत आली. धान्यपेढ्या सुरुं करण्यासाठी आणखी एक समिती नेमली गेली.

हिंदुस्तानच्या राज्यकारभारांत सुधारणा होणे ही फार दूरची गोष्ट होती. तरीदेखील सामाजिक सुधारणांच्याबाबतीत हिंदी संस्थानांनी पुढाकार घेतला. उदाहरणार्थ, बडोद्याच्या गायकवाडांनी बाल विवाह प्रतिबंधक कायदा अंमलात आणला; आणि विवाहाच्या वेळीं नवरदेवाचे वय किमान सोळा व वधूचे वय किमान बारा असावे असा कायदा लागू केला.

आठव्या शतकांत पर्शियाहून पळून आलेल्या पारशी मंडळींनी हिंदुस्तान हे आपले नवे घर मानले, आणि ते स्थानिक लोकांच्या बरोबरीने राष्ट्रीय व महत्वाकांक्षी कार्यांत मिसळले. त्यांच्या समाजांत अनेक देशभक्त निर्माण झाले.


टाटा

जमशेटजी टाटा हे एक द्रष्टे होते. हिंदुस्तानात उद्योगधंद्यांची प्रगती व्हावी हे त्यांचे स्वप्न होते. त्यांनी बिहारमधल्या साक्ची गांवात पहिला पोलाद कारखाना सुरुं केला. सहा वर्षांनंतर या कारखान्याचे नांव टाटा आयर्न अँड स्टील मिल असे पडले. साक्ची गांवाचे नांव जमशेदपूर झाले.

इंडियन नॅशनल काँग्रेसच्या वार्षिक अधिवेशनाला एक पारशी महिला मादाम भिका-ईजी कामा, नेमाने हजर राहात असत. १९०२ साली त्या जगप्रवासाला निघाल्या. भारतीय राष्ट्रीय भावनेचा प्रचार करणें हा त्यांचा हेतू होता. प्रवासांत बाई जर्मनींत स्टुटगार्ट येथें गेल्या होत्या. तिथें दुसऱ्या इंटरनॅशनल सोशालिस्ट काँग्रेसच्या अधिवेशनांत त्यांनी तिरंगी झेंडा फडकवला. हाच झेंडा नंतर आपला राष्ट्रध्वज झाला. या झेंड्याला त्यावेळेस उपस्थित असलेल्या रशियाच्या लेनिनने सलामी दिली होती. लेनिन हा नंतर झालेल्या रशियन राज्यक्रांतिचा एक महत्त्वपूर्ण नेता होता. मादाम कामा या भारतीय स्वातंत्र्यसंग्रामाच्या आदिमाता मानल्या गेल्या.


मादाम कामा

१९०१ सालीं इंग्लंडमधें सातवे एडवर्ड गादीवर आले. १९०३ साली त्यांनी प्रथम हिंदुस्तानला भेट दिली. दिल्लींत त्यांना हिंदुस्तानचे सम्राट म्हणून घोषित केले गेले. त्यांनी दुष्काळग्रस्त भागांतल्या शेतकऱ्यांना कर्जावरच्या व्याजाची माफी दिली. बिहारमधल्या पुसा या खेड्यांत इंपिरीयल ॲग्रीकल्चरल रिसर्च इन्स्टिट्यूटची स्थापना झाली. आता ही संस्था दिल्लींत असून तिचे नामकरण इंडियन काउन्सिल ऑफ ॲग्रिकल्चरल रिसर्च असे केलेले आहे.

- रविंद्रनाथ टागोर यांनी कलकत्त्याच्या उत्तरेला १३० कि.मी. अंतरावरच्या बोलपूरमधें 'शांतिनिकेतन' ची स्थापना केली.
- भारतीय वनस्पतीशास्त्रज्ञ जगदीशचंद्र बोस यांनी लंडनच्या रॉयल सोसायटीमधें केलेल्या भाषणांत प्रथमच वनस्पतींना जीव असतो, संवेदना असतात व त्याही भावनांच्या चढउतारांतून नातात हे जाहीर केले.





## जगांत इतरत्र .....



- अमेरिकेंतल्या नॉर्थकॅरोलिनामधें राईट बंधूंनी स्वतः बनवलेल्या "किटी हॉक" या विमानांतून उड्डाण केले.



- हेन्री फोर्ड हा एका शेतकऱ्याचा मुलगा. त्याने पहिला मोटारींचा कारखाना अमेरिकेतल्या डेट्रॉईट गांवात सुरुं केला. अमेरिकन यंत्रयुगाच्या क्रांतीची ही सुरवात मानली जाते.

# ब्रिटिशांविरुद्ध असंतोषाचे वारे

काँग्रेसच्या वार्षिक अधिवेशनांत एक औद्योगिक प्रदर्शन भरवले जाऊं लागले. पहिले झाले १९०२ साली अहमदाबादला आणि दुसरें १९०३ सालीं मद्रासला !

इंडियन कोऑपरेटिव्ह कायदा १९०४ साली अंमलात आला. या कायद्यामुळें जनतेमधें शेती, उद्योगधंदे व पतपेढ्या यांच्या सहकारी संस्था स्थापन करण्यास उत्तेजन मिळूं लागले. त्रावणकोर संस्थानामधे प्रथमच मोफत प्राथमिक शिक्षण मुलांना देण्यास सुरवात झाली.




१९०५ मधें बंगालची फाळणी झाली. पूर्व बंगाल (त्यांत आसाम व डाक्का ही राजधानी होती) आणि पश्चिम बंगाल (यांत बिहार व ओरिसा प्रांताचा कांही भाग आणि कलकत्ता ही राजधानी झाली) ! सरकारने ही फाळणी राज्यकारभाराच्या सोयीसाठी केली आहे, असं समर्थन केलं गेलं. पण लोकांना मात्र वाटलं की मुस्लीम लोकसंख्या जास्त असलेला भाग मुद्दामच कलकत्ता या राजधानीपासून दूर करण्यांत आला.

साहजिकच जनतेत याविरुद्ध असंतोष उसळला. ब्रिटिशविरोधी भावना चेतवल्या गेल्या. सगळीकडे हरताळाचे लोण पसरले आणि ब्रिटिश सामानावर बहिष्कार सुरुं झाला. स्वातंत्र्याच्या चळवळींत आता बंगाल आघाडीवर होता.

ब्रिटिश सरकारने पुणें, नागपूर, कानपूर व कोईमतूर इथें शेतकी कॉलेजेस सुरुं केली. व शेती उद्योगास जास्त महत्व दिले.


नौरोजी

'वंदे मातरम्' हे गीत १९०६ सालीं कलकत्त्यांत काँग्रेसच्या २२ व्या अधिवेशनांत प्रथम गायलं गेलं. त्यावर्षी दादाभाई नौरोजी काँग्रेसचे अध्यक्ष होते. महंमद अली जीना हे एक सभासद म्हणून उपस्थित होते.



अरविंद घोष यांनी 'वंदे मातरम्' या नांवाचे एक इंग्लिश वर्तमानपत्र सुरुं केले. ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या विरुद्ध लढा चालूं ठेवणे हा त्यांचा मुख्य हेतू होता.



- पहिला फिरता (टुरिंग) सिनेमा मानेक डी. सेठना यांनी सुरुं केला. 'ख्रिस्ताचे जीवन' हा चित्रपट ते दाखवीत असत.
- पहिली भारतीय सर्कस कंपनी - 'मलबार ग्रँड सर्कस' ही किलेरी कुन्हीकण्णन यांनी सुरुं केली.

## जगांत इतरत्र .....



- आईन्स्टाईनने 'सापेक्षतावाद' हा सिद्धांत जाहीर मांडला.



- जॉन स्टुअर्ट ब्लॅकटन यांनी पहिले कार्टून चित्र बनवले.

# विद्यार्थ्यांची स्वातंत्र्य संग्रामात उडी

हिंदी स्वातंत्र्यसंग्रामात १२ जानेवारी १९२१ हा दिवस फार महत्वाचा ठरला. मद्रासमधें लॉर्ड कॉनॉट यांनी पहिल्या विधानसभेचे उद्घाटन केले. कॉंग्रेसमधील मवाळ गटाचे कांही लोक या समारंभाला हजर राहिले. लॉर्ड कॉनॉट यांच्या भेटीबद्दल लोकांनी निदर्शनें केली. लोकांचा हाच नूर पुढच्या वर्षी प्रिन्स ऑफ वेल्सच्या भेटीच्या वेळेसदेखील कायम होता. इंग्लंडच्या युवराजाला काळी निशाणें दाखवण्यांत आली.

अहमदाबाद इथल्या कॉंग्रेसच्या अधिवेशनांत असहकाराची चळवळ सुरुं ठेवण्याचा निर्णय घेण्यांत आला. पंजाबमधें गुजरानवालांत भरलेल्या विद्यार्थी परिषदेंत विद्यार्थ्यांनी महाविद्यालये व विद्यापीठांवर बहिष्कार घालावा आणि स्वातंत्र्यचळवळींत भाग घ्यावा असे ठरले.

१९२२ मधें कॉंग्रेसचे स्वयंसेवक व शेतकरी यांच्या दोन हजारांच्या जमावावर, गोरखपूर जिल्ह्यांतल्या चौरीचौरा येथें, जमाव पांगवण्यासाठी पोलिसांनी गोळीबार केला. चिडून जाऊन जमावाने पोलीस चौकीवर हल्ला केला. आणि बावीस शिपायांना ठार मारले. आठवड्यानंतर कॉंग्रेस वर्किंग कमिटीची बैठक झाली. त्यांत गांधीजींच्या सल्ल्यानुसार असहकाराची चळवळ रद्द केली.

कॉंग्रेसमधें फूट पडली आणि चित्तरंजन दास आणि मोतीलाल नेहरु यांच्या नेतृत्वाखाली स्वराज्य पार्टी सुरुं केली गेली. गयेच्या अधिवेशनांत त्यांनी ठराव मांडला कीं हिंदी नागरिकांनी लेजिस्लेटिव्ह कौन्सिलमधें प्रवेश करावा आणि सरकारशी असहकार चालूंच ठेवावा. या ठरावाला राजाजींच्या गटाने विरोध केला.


चित्तरंजन दास


मोतीलाल नेहरु


राजगोपालाचारी

- शांतिनिकेतन आता एक जागतिक कीर्तिचे केंद्र बनले. तिथें विविध भाषा, धर्म, साहित्य, संगीत व कला यांचा अभ्यास होऊं लागला. त्याचे आता 'विश्वभारती विद्यापीठ' असे नामांतर झाले.

*(पुढील महिन्यांत - भारत, एक प्रजासत्ताक राष्ट्र बनले)*

१९. युद्धांत पांडवाचा विजय

# महाभारत

दहा दिवस युद्ध करुन युद्धक्षेत्रांत भीष्मपितामह धराशायी झाले. ते शिखंडीच्याबरोबर युद्ध करीत नव्हते. म्हणून अर्जुनाने शिखंडीला पुढें ठेवून त्याच्यापाठीमागून बाणांचा वर्षाव केला व भीष्मांना पाडले.

भीष्मपितामह खाली पडले, परंतु लगेच मरण पावले नाहीत. त्यांच्या साऱ्या शरीरांत बाण घुसलेले होते. म्हणून जेव्हां ते पडले तेव्हां त्यांचे शरीर जमिनीला टेकलेले नव्हते. तशा स्थितींत त्यांना तहान लागली. तेव्हां अर्जुनाने बाण मारुन पाताळगंगेला वर आणवले. उत्तरायण येईपर्यंत भीष्मपितामह आपल्या इच्छेनुसार बाणांच्या शय्येवर जिवंत पडून राहिलेले होते. भीष्मांच्या-नंतर द्रोणाचार्यांनी कौरव सैन्याचे सेनापतीपद ग्रहण केले. त्यांनी पांच दिवसांपर्यंत युद्ध केले. त्यांनी पद्मव्यूहाची रचना केली. त्यांत प्रवेश करून अर्जुनाचा पुत्र अभिमन्यू शत्रूच्या योद्ध्यां कडून मारला गेला. त्या वेळेस अर्जुन रणभूमीच्या दूरच्या भागांत लढत होता. अभिमन्यूच्या पाठोपाठ इतर पांडव पद्मव्यूहांत शिरायला लागले. परंतु सैंधव (जयद्रथ) ने त्यांना रोखले. त्यामुळें अभिमन्यूच्या मदतीला कुणीही जाऊं शकले नाही.

हे वृत्त कळल्याबरोबर अर्जुनाने प्रतिज्ञा केली की दुसऱ्या दिवशी तो जयद्रथाचा वध करील. त्याप्रमाणे अर्जुनाने दुसऱ्या दिवशी





जयद्रथाचा वध केला. त्यानंतर द्रोण व धृष्टद्युम्न यांच्यामधे अटीतटीचे युद्ध चालू होते. त्यावेळेला युधिष्ठिराच्या तोंडून अश्वत्थाम्याचा मृत्यू झाला ही खोटी बातमी द्रोणांनी ऐकली व त्यांनी शस्त्रें खाली टाकली. तेव्हां धृष्टद्युम्नाने ही संधि साधून त्यांचा वध केला.

द्रोणाच्या मृत्यूनंतर कर्णाने कौरवसेनेचे सेनापतीपद स्वीकारले. शल्याला आपला सारथी म्हणून नेमावे असे कर्णाने दुर्योधनाला सांगितले. शल्यानेही कर्णाचा सारथी बनण्याचे मान्य केले. कर्णाने दोन दिवस युद्ध केले. हे दोन्ही दिवस, शल्य कर्णाचा अपमान करत होता व सतत त्याला नाउमेद करत होता. दुसऱ्या दिवशी कर्ण अर्जुनाबरोबर युद्ध करीत होता तेव्हां त्याच्या रथाचे चाक जमिनीत रुतले. कर्ण ते वर ओढत होता तेवढ्यांत अर्जुनाने त्याला मारले.

कर्णाच्या मृत्यूनंतर शल्य कौरवसेनेचा सेनापती झाला. त्या दिवशींच तो युधिष्ठिराबरोबर युद्ध करताना मारला गेला. अठराव्या दिवशी युद्ध समाप्त झाले. या युद्धांत अठरा अक्षौहिणी सैन्य मारले गेले. दुर्योधनाखेरीज त्याचे सर्व भाऊ युद्धांत मारले गेले. दुःशासनाला भीमाने हालहाल करुन ठार मारेल, आणि सर्वांच्या देखत त्याने त्याचे रक्त प्यायले.

या युद्धांत दोन्ही दलांचे कित्येक हजार योद्धे मारले गेले. पांडवांच्या पक्षांत पांडव, उपपांडव, युयुत्सु, सात्यकी, धृष्टद्युम्न आणि शिखंडी जिवंत होते.

युयुत्सु धृतराष्ट्राचा दासीपुत्र होता म्हणून युद्ध संपताच तो हस्तिनापुरला परत गेला. कौरवांच्या पक्षांत अश्वत्थामा, कृपाचार्य, कृतवर्मा आणि दुर्योधन जिवंत राहिले.

युद्धाच्या शेवटच्या वेळेस कृपाचार्य, अश्वत्थामा आणि कृतवर्मा यांनी दुर्योधनास खूप शोधले. पण तो कुठेच दिसेना. आपल्या खांद्यावर गदा घेऊन दुर्योधन एका मोठ्या सरोवराजवळ पोंचला. कृतवर्मा, कृपाचार्य व अश्वत्थामा अजून जिवंत आहेत हे त्याला ठाऊक नव्हते.

तलावाजवळ बसलेल्या दुर्योधनाजवळ संजय येऊन पोंचला. आपल्या पराजयामुळें व आपल्या पक्षांतल्या सर्व योद्धयांच्या मृत्यूमुळें दुर्योधन दुःखांत चूर होता. त्यावेळेस संजयला पाहून तो म्हणाला, "आपल्या पक्षांतल्या लोकांपैकी तूं सोडून आणखी कुणी





वांचलेले नाहीत कां? माझ्या पिताश्रींना जाऊन सांग कीं मी या तलावांत लपून बसलो आहे." असं म्हणून त्याने तलावांत प्रवेश केला.

संजय दुर्योधनाकडून परत येत होता तेव्हां वाटेंत कृतवर्मा, कृपाचार्य आणि अश्वत्थामा यांनी त्याला पाहिले व विचारले, "संजय, दुर्योधन कुठे आहे?"

संजयने त्यांना तो तलाव दाखवून सांगितलं की दुर्योधन जलस्तंभन करुन त्या तलावांत लपला आहे.

अश्वत्थामाला दुःख अनावर झाले. तो म्हणाला, "अरे, आम्ही जिवंत आहोत हे त्याला बहुतेक माहीत नसावं. आम्ही चौघेजण मिळून पांडवांना पराजित करुं शकणार नाही कां?" त्यानंतर ते पांडवांशी युद्ध करायला गेले. पण ते रणभूमीत पोंचेपर्यंत अंधार पडला. कौरवांच्या शिबिरांतल्या स्त्रियांना सेवक हस्तिनापुरला घेऊन जात होते. युद्ध समाप्त होताच पांडव कृष्णाबरोबर दुर्योधनाला शोधूं लागले. दुर्योधनाचा वध करणे हा त्यांचा संकल्प होता. शेवटी त्यांना कळलं की दुर्योधन तलावांत लपला आहे. ते सारेजण तिथे येऊन पोंचले. युधिष्ठिराने दुर्योधनाला सांगितले, "तुझ्या वंशाचा विनाश झाल्यानंतर तूं आपले प्राण वांचवण्यासाठीं आता तलावांत लपला आहेस होय? हा तर धडधडीत अन्याय आहे. तूं बाहेर येऊन आमच्याशी युद्ध कर. तुझ्यासारख्या अहंकारी माणसाला असला भेकडपणा शोभत नाही. आम्हाला पराजित केल्याखेरीज तुझा राज्यावरचा अधिकार सिद्ध होणार नाही. ये बाहेर, आणि कर आमचा पराजय!"

"मला राज्याची आवश्यकता नाही. तुम्ही त्यावर राज्य करा." दुर्योधनाने उत्तर दिले.

"तुझ्याकडून मला राज्य दान नको आहे. आणि दान करायला तुझ्या हातांत राज्य राहिलंय तरी कुठें? आम्हाला हरवून राज्य घेऊन टाक. नाहीतर आमच्याकडून पराभव स्वीकार कर." युधिष्ठिराने म्हटलं.

पांडवांच्या या तिखट शब्दांनी दुर्योधन संतापला व तलावाच्याबाहेर आला. त्यावेळीं दुर्योधनाने भीमाच्याबरोबर गदायुद्ध केले. त्या युद्धांत भीमाने दुर्योधनाच्या जांघेवर गदेने प्रहार केले. त्यामुळें दुर्योधन घायाळ होऊन खाली पडला पण तो मेला नव्हता. तेव्हां कृपाचार्य, अश्वत्थामा आणि कृतवर्मा



त्याच्याजवळ आले. त्याची दुर्दशा पाहून त्यांना फार दुःख झाले. अश्वत्थामाने दुर्योधनासमक्ष प्रतिज्ञा केली की त्याच रात्रीं तो पांडव आणि उरलेले सारे पांचाल यांचा वध करील. यावर प्रसन्न होऊन दुर्योधनाने अश्वत्थाम्याला आपला सेनापती नियुक्त केले.

त्यानंतर ते तिघे योद्धे तिथून निघाले आणि पांडवांच्या शिबिराजवळ जाऊन एका जागी लपून राहिले. तिथें दाट जंगल होतं. त्यांत एक हजार पारंव्या असलेले वडाचे झाड होते. त्या झाडाखाली त्या तिघांनी थोडी विश्रांति घेतली. अश्वत्थामाने निजण्यापूर्वी आपल्या शत्रूंचा अन्यायाने वध करण्याचा निश्चय केला. कारण पांडवांनीदेखील या युद्धांत अनेक प्रकारे अन्याय केलेले होते. त्याने यासाठी कृपाचार्य व कृतवर्मा यांचे मन वळवले. तेव्हां त्यांना बरोबर घेऊन तो मध्यरात्रीं पांडवांच्या शिबिराजवळ येऊन पोंचला. कृपाचार्य आणि कृतवर्माला त्यांनी शिबिराच्या दारावर उभे केले. हातांत तलवार घेऊन तो आंत शिरला. प्रथम त्याने धृष्टद्युम्नाला उठवलं आणि त्याला तलवारीने ठार मारलं. तो आवाज ऐकून कांहीजण जागे झाले. व अश्वत्थामावर तुटून पडले. पण त्याने सर्वांना मारले. नंतर या तिघांनी मिळून शिबिराला आग लावली. हे वृत्त दुर्योधनाला कळवण्यासाठी ते तिथून निघाले.

त्या रात्रीं पांडव शिबिरांत नव्हते. जर असते तर ते अश्वत्थाम्याच्या हातून मेले तरी असते, किंवा अश्वत्थामाने केलेले हे भीषण हत्याकांड त्यांनी थांबवले असते.

कृपाचार्य, अश्वत्थामा आणि कृतवर्मा जेव्हां दुर्योधनाजवळ पोंचले, तेव्हां तो शेवटच्या घटका मोजत होता. या तिघांच्या तोंडून उपपांडव वगैरेंच्या मृत्यूची वार्ता ऐकल्यानंतर दुर्योधन प्रसन्न झाला आणि त्याने मान टाकली.

युद्धांत विजयी होऊनदेखील, आपले पुत्र आणि नातेवाईक अश्वत्थामाच्या हातून मरण पावले. हे ऐकून पांडव, द्रौपदी वगैरे अत्यंत दुःखी झाले. भीम संतापाने चिडला व अश्वत्थाम्याचा वध करायला निघाला. तेव्हां द्रौपदी म्हणाली, ''मी ऐकलंय की अश्वत्थामांच्या डोक्यावर एक मणी आहे.



त्याचा वध करुन तो मणी तूं मला आणून दिलास तर मला खूप आनंद वाटेल.''

हे ऐकून भीम धनुष्यबाण घेऊन रथांतून निघाला. हे पाहून कृष्णाने भीमाच्या मदतीसाठी अर्जुनालादेखील बरोबर जाण्यास सांगितले. कृष्णाच्याबरोबर युधिष्ठिर आणि अर्जुन एका दुसऱ्या रथांत चढून निघाले. ते लवकरच भीमाच्या पाठोपाठ पोचले. पण ते भीमाला परत बोलावूं शकले नाहीत.

जेव्हां ते गंगाकिनाऱ्यावर पोंचले, तेव्हां व्यासमहर्षी, त्यांचे अनुयायी असलेले कांही ऋषी व त्यांच्याबरोबर असलेला अश्वत्थामा त्यांना दिसला. अश्वत्थामाचे शरीर धुळीने भरलेले होते व त्याने वल्कलें नेसली होती. अश्वत्थामाला पाहून भीमाने भयंकर गर्जना केली. भीम आणि त्याच्यामागून येणारे कृष्ण, युधिष्ठिर व अर्जुन यांना पाहून अश्वत्थामा चकितच झाला. काय करावं ते त्याला समजेना. तेव्हां त्याने आपल्या पित्याकडून मिळालेल्या, ब्रह्मशिरो नांवाच्या अस्त्रांला आवाहन केले. त्या अस्त्राचा प्रयोग करताना तो म्हणाला, ''अपांडव होऊं दे.'' त्यावर कृष्णाच्या प्रेरणेने अर्जुनाने पण त्याच अस्त्राचा प्रयोग केला. दोन्ही अस्त्रांनी भयंकर रुपांत, आग ओकीत, एकमेकांशी टक्कर दिली.

तेव्हां व्यास व नारद पुढें आले. त्यांनी दोघांना समजावले की त्यांनी आपापली अस्त्रें परत बोलवावीत. अर्जुनाने आपले अस्त्र परत बोलावले. परंतु अश्वत्थाम्याला मात्र हे शक्य झाले नाही. त्याने व्यासमहर्षींना दीनवाणेपणाने



सांगितले, ''महात्मन, मी भीमाला पाहून घाबरुन या अस्त्राचा प्रयोग केला आहे. पण मला हे अस्त्र परत बोलावता येत नाही. तेव्हां हे आता पांडवांचा नाश करुनच सोडील.''

हे ऐकून कृष्ण म्हणाला, ''ठीक आहे. या वेळेला पांडवांचा अंकुर उत्तरेच्या गर्भांत आहे. तूं आपल्या अस्त्राचा प्रयोग त्याच्यावर कर.''

शेवटीं ऋषींनी असा समझोता केला की अश्वत्थामा आपल्या डोक्यावरचा मणी काढून अर्जुनाला देईल व अर्जुन त्याला सोडून देईल. तेव्हां अश्वत्थाम्याने आपल्या डोक्यावरचा मणी काढून अर्जुनाच्या हातांत दिला व तो जंगलात तपस्या करायला निघून गेला. भीमाने तो मणी नेऊन द्रौपदीच्या हातांत दिला, व तिला समजावले की तूं आता काळजी करुं नकोस. द्रौपदीने तो मणी युधिष्ठिराच्या मस्तकावर धारण करण्यास दिला.

तिकडे हस्तिनापुरांत आपल्या शंभर पुत्रांच्या मृत्यूमुळें धृतराष्ट्राला अपार दुःख झालेले होते. संजयने त्याला समजावले, "फक्त तुझे पुत्रच कां? अठरा अक्षौहिणी सेनेचाही विनाश झालेला आहे. जगांतले सारे राजे मरण पावले आहेत. त्या सर्वांचे अंतिम संस्कार करायला हवेत."

धृतराष्ट्राच्या पाठोपाठ गांधारी, कुंती आणि अंतःपुरांतल्या इतर स्त्रिया रडतरडत युद्धभूमी-पर्यंत येऊन पोंचल्या. ही गोष्ट समजल्यावर पांडव, कृष्ण, सात्यकी आणि युयुत्सुला बरोबर घेऊन तिथें आले.

युधिष्ठिराने धृतराष्ट्राला नमस्कार केला आणि भेटायला आलेल्या सर्व लोकांची त्याने विचारपूस केली. धृतराष्ट्र आंतल्या आंत जळफळत होता. त्याने प्रथम युधिष्ठिराला आलिंगन देऊन जवळ घेतले. नंतर भीमाला जवळ घेण्यासाठीं तो पुढें येऊं लागला. तेव्हां कृष्णाने चटकन भीमाला पाठीमागून ओढले आणि भीमाचा लोखंडी पुतळा पुढें सरकवला. धृतराष्ट्राने आपली सारी शक्ती एकवटून त्या पुतळ्यालाच भीम समजून मिठी मारली. त्या पुतळ्याचा चक्काचूर झाला. जर त्या पुतळ्या-ऐवजी प्रत्यक्ष भीम तिथे असता तर तो निश्चित मेलाच असता. कारण आंधळ्या धृतराष्ट्राची ही शक्ती हजार हत्तींच्या बळाइतकी होती. म्हणून लोखंडाच्या पुतळ्याचा चुरा करताना त्याच्या नाकातोंडातून रक्त आले व तो खाली पडला. त्यानंतर तो नाटकीपणाने रडूं लागला व म्हणाला,

"अरे भीमा, काय रे झालं तुला?"

त्यावर कृष्णाने धृतराष्ट्राला समजावलं, "राजन्, काळजी करुं नका. तुम्ही भीमाला नव्हे. परंतु लोखंडी पुतळ्याला मिठी मारली होतीत, नि त्याचा भुगा झाला."

ही मूर्ती दुर्योधनाने आपल्या गदायुद्धाच्या सरावासाठीं बनवलेली होती.

त्यानंतर कृष्णाने धृतराष्ट्राचे सांत्वन केले. "आता पांडवांच्याखेरीज मला आणखी कोण पुत्र उरले आहेत रे?" असं म्हणून धृतराष्ट्र भीम, अर्जुन, नकुल व सहदेवाच्या शरीरावरुन हात फिरवूं लागला.





# अष्टावधान

अवधानी पांडित्यामध्ये आपल्या वडिलांपेक्षा दोन पावलें पुढेच होता. त्याच्या वडिलांनी खरे तर त्याचे नाव सदानंद ठेवले होते, पण अवधान विद्येमध्यें असाधारण प्राविण्य दाखवल्यामुळे सर्वजण त्याला अवधानी म्हणूनच हांक मारीत.

अवधान विद्येंत अष्टावधान अतिशय कठीण व गंभीर आहे. शतावधानांत त्याच्या चारी बाजूंना शंभर विद्वान बसतात. एकेकजण एकेक प्रश्न विचारतो, व त्याचे उत्तर पद्यांत द्यावे लागते. साधारणपणे एका पद्यांत चार ओळी असतात. व ती अवधानीला एकाचवेळीं सांगायची नसतात. प्रथम प्रत्येक पद्यातून एक पद सांगायचे असते. तसेच कोणी कोणता प्रश्न विचारला आहे हेही लक्षांत ठेवावे लागते, व प्रत्येकाला दोन पदे ऐकवायची असतात. याप्रमाणे तिसरे व चौथे पद ऐकवल्यानंतर शेवटी बरोबर बसलेल्या सर्व विद्वानांना चारी पदे ऐकवायची असतात. या सर्वांसाठी स्मरणशक्ती, बुद्धिमत्ता व पांडित्य यांची अत्यंत गरज असते.

शतावधानाहून अष्टावधान आणखी कठीण व क्लिष्ट आहे. यांत अवधानीच्या चारी बाजूंना विविध प्रकारचे प्रश्नावर प्रश्न विचारणारे आठ पंडित असतात, त्यांना पृच्छक म्हणतात. हे पृच्छक त्याला वाटेल ते प्रश्न विचारून त्याच्या बुद्धिमत्तेची परीक्षा घेतात. एकजण कांहीतरी कठीण प्रसंगातून वाट कशी काढायची ते विचारतो तर दुसरा फुलाने अवधानीला हळूवार स्पर्श करत राहतो. तिसरा काहीतरी फालतू प्रश्न विचारून त्याचा वेळ दवडू पाहतो, तर चौथा त्याच्यासमोर बुद्धीबळ खेळून त्याचे लक्ष आपल्याकडे वेधायला बघतो. पांचवा विद्वान चौसष्ट अक्षरें असलेला श्लोक वाचत राहतो. परंतु हा श्लोक क्रमाने वाचला जात नाही. त्याच्या मनांत असेल तसे तो वाचत जातो. म्हणजे प्रथम पंचविसावे अक्षर, मग अटरावे, मग पहिले, असे त्याला कसे वाटेल तसे तो बोलत जातो. सहावा पंडित मध्येच काव्य वाचायचे थांबवतो व त्याठिकाणी अवधानी कुठल्या पद्याचा उपयोग करतो इकडे लक्ष ठेवतो. त्यामुळे त्याचे पद योग्य नाही, त्याला दुसरे पद कसे पूरक असेल याचा अंदाज बांधतो. सातवा विद्वान अधून मधून घंटा वाजवत राहतो. आठवी व्यक्ती व्याकरणासंबंधी प्रश्न विचारत राहतो. अशा रितीने ते सर्वजण त्याची एकाग्रता भंग करत राहतात. शेवटी अवधानीने या सर्वांना चातुर्याने, कौशल्यपूर्ण उत्तरे द्यायची असतात. फुलाचा स्पर्श अंगाला किती वेळां झाला हे त्याला बरोबर सांगावे लागते, फालतू प्रश्नांना युक्तीने उत्तर द्यावे लागते, बुद्धीबळें खेळणाऱ्या प्रतिस्पर्ध्याचे डाव उलटून पडतील अशी चाल खेळावी लागते, श्लोकांतल्या सर्व अक्षरांची आठवण ठेवून तो योग्य क्रमांत लावून बरोबर श्लोक सांगावा लागतो, तसेच घंटा कितीवेळां वाजवली व व्याकरणाविषयी विचारलेल्या प्रश्नांना योग्य उत्तर द्यावे लागते. एकाच वेळीं आठ भिन्न कार्यांना योग्य रीतीने संभाळण्याची क्षमता असली पाहिजे. असे अतिशय कठीण व क्लिष्ट अष्टावधान सहजपणे करण्याची क्षमता अवधानीमध्ये होती. त्याच्या ह्या प्रतिभेचे, सर्वांना आश्चर्य व कौतुक वाटत असे.

त्याच्या वडिलांनी पांडित्यात परिपूर्ण असलेल्या अवधानीचा विवाह करण्याची इच्छा प्रगट केली. श्रीधाम येथे राहणारी सुमती, अवधानीची पत्नी व्हायला योग्य मुलगी आहे असे त्यांना वाटत होते. परंतु अवधानीला इतक्या लवकर विवाह करायची इच्छा नव्हती. त्याला वाटे की एखादा विद्वान



मनोहर शुक्ला



मुलाशी आपला विवाह झाल्यास रोज तिच्याबरोबर साहित्यिक विषयांवर चर्चा करता येईल व अधिकाधिक ज्ञान प्राप्ती होऊ शकेल. घरची कामे व स्वयंपाक करायला कुणी बाई ठेवता येईल.''

एक दिवस अवधानीचे वडील त्याला म्हणाले, ''हे बघ बाळा, घरच्या कामाला नोकर ठेवला किंवा स्वयंपाकाला बाई ठेवली तर ते घर, घर राहत नाही, एक खानावळ होईल. ज्याने त्याने आपले काम केले तरच ते घर होऊ शकते. विवाह झाल्यानंतर पती-पत्नीने एक दुसऱ्यांच्या मदतीने घरचे काम प्रेमाने केले पाहिजे. साहित्यिक चर्चा हे जीवनाचे एकमात्र लक्ष्य असे समजण्याची चूक करू नकोस. तसे असते तर फुलांनी बाग बहरल्या नसत्या व फळांनी वृक्ष फोफावले नसते.''

अवधानी म्हणाला - ''आपण म्हणता ते बरोबर आहे पण ते सामान्य लोकांना योग्य वाटेल, माझ्यासारख्या पंडिताला नाही. मी अष्टावधानी आहे. माझी पत्नीही माझ्यासारखी विद्वान, सर्व विद्येंत निपुण असावी अशी मी अपेक्षा केल्यास त्यात काय चुकलं?'' अवधानीच्या वडिलांना माहित होते की त्यांचा मुलगा केवळ शास्त्रांत पंडित आहे पण व्यावहारिक ज्ञानात तो अजाण आहे. ते हंसत म्हणाले - ''एकदा तू सुमतीला पाहून ये. तुला ती मुलगी पसंत पडली नाही तर मग दुसरी मुलगी पाहू या.'' सुमती दिसायला अतिशय सुंदर होती. अवधानीने तिला पाहिल्यास त्याला ती नक्कीच आवडेल असे त्याच्या वडिलांना वाटत होते.

वडिलांची आज्ञा शिरसावंद्य मानून अवधानी सुमतीला पहायला तिच्या गांवी गेला. सुमतीच्या वडिलांनी प्रेमाने त्याचे स्वागत केले. नंतर मुलीला बोलावून ते म्हणाले - ''हे बघ सुमती, हा माझ्या जवळच्या मित्राचा मुलगा अवधानी. इकडे चार पांच दिवस राहील. त्याचे चांगले आदरातिथ्य कर, कांही कमी पडता कामा नये.''

सुमतीचे सौंदर्य पाहून अवधानी आश्चर्याने थक्कच झाला. तो थोडा वेळ तिच्याकडे नुसता बघतच राहिला. त्याला समजले की सुमतीच्या वडिलांनी जाणूनबुजूनच त्याचे आदरातिथ्य करायला तिला सांगितले आहे, कारण त्यामुळे ती दोघेही एक दुसऱ्याच्या जवळ येतील. त्याच्या मनांत विचार आला - ''मला सौंदर्यात कांही रुची नाही, मला पाहिजे बुद्धिमत्ता ! ते ह्या लोकांना समजतच नाही. परत जाताना ह्या लोकांना स्पष्टपणे तसे सांगता येईल.''

पण दुसऱ्या दिवशी सुमतीच्या वागण्याने तो तिच्यावर मुग्ध झाला. त्याला वाटले की आपला अंदाज चुकीचा आहे.



सुमती भल्या पहाटेच उठते, आंगणात केर काढून सर्व स्वच्छ करते. वय झालेल्या आजीला पलंगाशी जाऊन नियमित औषध देते. पूजेचे सर्व सामान गोळा करून तयार ठेवते. स्वयंपाकात वहिनीला हवी ती मदत करते. सकाळी सर्वांना न्याहारी देऊन झाली की तळ्यावर जाऊन पाणी घेऊन येते. वडील व मोठ्या भावाला काय हवे, नको ते पाहते.

मोठ्या भावाचा मुलगा तिला नको ते प्रश्न सारखा विचारत राहतो, पण ती त्याला शांतपणे उत्तरें देते व त्याला समजावून सांगते. मोठ्या भावाच्या छोट्या मुलाला झोपवण्यासाठी अंगाई गीत म्हणते. घरीं कोणी आल्यास त्यांची विचारपूस करून त्यांची मदत करते. इतके सर्व झाल्यावर अवधानीला काय हवे नको ते पाहते. अधून मधून आरशांत पाहून आपला चेहरा, केस नीट करते. सदैव खळखळून हंसते. कोणी गंमत म्हणून तिची टिंगल केली तर योग्य म्हणीचा उपयोग करून ती त्यांचे तोंड बंद करे. तिची ही सर्वांशी वागण्याची पद्धत अवधानीला आवडली, तो तिच्यावर मुग्ध झाला व त्याला वाटले की सुमती एक योग्य मुलगी आहे.

संध्याकाळी सुमती अवधानीला गांव दाखवायला घेऊन गेली. तिने गांवाची वैशिष्ट्ये सांगितली, विष्णुमंदिर दाखवले, ऐतिहासिक स्थळांविषयी माहिती सांगितली. अवधानीने तिच्या या सार्वत्रिक ज्ञानाची स्तुती करत म्हटले - ''तू तुझ्या गांवाविषयी इतकी सगळी माहिती दिलीस पण मला माझ्या गांवाविषयी कांहीच माहिती नाही.''














सुमती हंसत म्हणाली - "तुम्ही उगीच माझी स्तुती करत आहात. तुमच्या पांडित्यापुढे आणि बुद्धीनैपुण्यापुढे माझं ज्ञान अगदी शून्य आहे. तुम्ही आता तुमच्याविषयी सांगा, मला ते जाणून घ्यायची खूप इच्छा आहे."

अवधानीने तिला आपल्या अष्टावधानाविषयी सविस्तर सांगितले. सुमती ते सर्व कान देऊन ऐकत होती. नंतर अवधानीने आपल्या हातातले कंकण तिला दाखवत म्हटले - "हे सोन्याचं कंकण मला माझ्या अष्टावधानाबद्दल मिळालं आहे."

सुमतीने एक दीर्घ श्वास सोडत म्हटले - "मला ही संधी कधी मिळणार देव जाणे!"

"सुमती, मी दिवसभर तुझी बुद्धिमत्ता पहात आहे. तू जे काही करत आहेस, ते अष्टावधानापेक्षा अवघड आहे. तुझी स्मरणशक्ती, सहनशीलता व काम करण्याची क्षमता अद्‌भुत आहे. तुझी इच्छा असेल तर एका वर्षाच्या आंत ही कला मी तुला शिकवेन आणि तुला पंडिता बनवून की तुझ्याशी लग्न करेन." अवधानी म्हणाला.

सुमती नकारात्मक डोके हलवात म्हणाली - "नाही, मला अवधानी व्हायचे नाही. लोकांना आनंद देणे ही उत्तम व श्रेष्ठ कला आहे ते मला माहित आहे. पण मला लोकांच्या गरजेच्या वेळी त्यांना मदत करण्यांतच जास्त आनंद मिळतो. त्यामुळें मी घरीच राहून घरच्या सर्व लोकांना मदत करते."

तिचे हे बोलणे ऐकून अवधानी थक्कच झाला. तो म्हणाला - "तुझे म्हणणे अगदी बरोबर आहे. माझी विद्या केवळ मनोरंजनासाठी व वेळ घालवण्यासाठीच आहे, तर तुझी विद्या दुसऱ्यांना सुख देण्यासाठी व दुसऱ्यांना विश्रांती देण्यासाठी आहे. माझ्या अष्टावधानापेक्षा तुझे अष्टावधानच श्रेष्ठ आहे. तुला माझ्यासारखे पंडिता करावे ही माझी इच्छा योग्य नाही. खरं पाहता हे सुवर्णकंकण घालून घ्यायला तूंच योग्य आहेस." असे म्हणून त्याने आपल्या हातातले कंकण काढून तिच्या हातांत घातले. नंतर कांही दिवसांतच त्या दोघांचा विवाह झाला.



चंदामामा प्रस्तुति

# परोपकारी समीर

चित्र : फणि

## भुताचे नाटक

















# मुलाचा निर्णय

आफ्रिका देशाच्या एका जंगलाजवळ डोटुन नांवाचा एक गरीब माणूस रहायचा. जंगलातली लांकडें तोडून तो आपला उदरनिर्वाह करायचा. त्याला टुंडी नांवाचा एक मुलगा होता. टुंडी दिवसेंदिवस मोठा होत होता. ते पहातांना त्याचे मन आनंदाने भरून यायचे. टुंडी बारा वर्षांचा झाला. त्याला आशा होती कीं आता टुंडी आपल्याला हातभार लावूं लागेल व आपलं आयुष्य आरामशीर जाईल. आता टुंडीसुद्धा आपल्या वडिलांबरोबर जंगलात जाऊं लागला व लांकडे तोडण्यांत वडिलांना मदत करूं लागला.

एके दिवशी डोटुन आजारी पडला. तो खाटेवरुन उठूं शकत नव्हता, म्हणून त्याने आपल्या मुलाला जंगलात जाऊन लाकडं तोड़ायला सांगितली. टुंडी आपल्या वडिलांच्या आदेशाप्रमाणे जंगलाकडे निघाला. रस्त्यांत त्याला त्याचा एक मित्र दिसला. बराच वेळ त्याने तिथेच आपल्या मित्राबरोबर खेळण्यांत घालवला, दुपारी परत जायच्या आधी त्याने थोडी लाकडं तोडली व तो घरी परतला.

ते पाहताच डोटुन अतिशय संतापला. त्याने रागीट स्वरांत म्हटले, "तूं अगदी कुचकामाचा आहेस, तू कोणत्याही कामाला लायक नाहीस, इतकी कमी लाकडं आणलीस, ह्यांनी काय होणार? आज जर लांकडे नाही विकली, तर उद्यां काय खाणार ? खरेदी कशी करणार?" तो टुंडीला रागवला व त्याला चांगला मार दिला. बिचारा टुंडी रडत रडत घराबाहेर निघून गेला. "जा, चालता हो, घरांत पाय ठेवलास तर तंगड्या मोडून टाकीन. अरे, स्वतःला समजतोस काय?" ओरडून ओरडून डोटुन दमला व पांघरूण घेऊन झोपून गेला.

टुंडीला कळत नव्हते काय करावेते ! तो जंगलाच्या दिशेने चालूं लागला. दूर गेल्यावर तो थकला. त्याला भूक लागली. भुकेने तो व्याकुळ झाला. तो एक पाऊलसुद्धां पुढे टाकू शकत नव्हता. तो! बिचारा एका झाडाखाली झोपून गेला.

**एक आफ्रिकन लोक कथा**

संध्याकाळ झाली एक व्यापारी आपल्या नोकरांसह शहरांतून आपल्या गांवी परतत होता. त्यांनी झाडाखाली झोपलेल्या त्या मुलाला पाहिले त्यांनी त्याला उठवले व विचारले "तूं कोण आहेस? या भर जंगलात असा कां झोपला आहेस? तेही अशा भलत्या वेळीं ?"

"मला घरदार नाहीं, मला फारच भूक लागली आहे." टुंडी ने दुःखी आवाजात उत्तर दिले. व्यापाऱ्याने त्याला कांही पोळ्या दिल्या. पोळ्या खाऊन त्यावर तो पाणी प्यायला. व्यापाऱ्याच्या मनांत त्या अनाथाबद्दल कणव निर्माण झाली. त्यालाही मूलबाळ नव्हतं. तो टुंडीला आपल्याबरोबर घरी घेऊन गेला.

दुपार झाली तरीही मुलगा घरी परतला नाही. आता डोटुनला काळजी वाटायला लागली. त्याला वाटलं उगाच त्याला मी फार बोललो. त्याची काळजी वाढत होती. दिवसामागून दिवस गेले, परंतु मुलाचा कांही पत्ता लागला नाही. मोठ्या बेचैनीत तो आपल्या मुलाची वाट पहात दिवस काढूं लागला.

इकडे व्यापारी टुंडीला आपल्या मुलाप्रमाणे वाढवायला लागला. त्याने आता व्यापारांतले बारकावे शिकून घेतले. त्याचे दिवस आरामात जात होते. त्याला कशाचीही काळजी नव्हती. तरीही जेव्हां त्याला त्याच्या आई वडिलांची आठवण यायची, तेव्हां तो फारच दुःखी व्हायचा. त्यांची आठवण काढत तो दूर कुठे तरी एकटा बसायचा. तो आपले आईवडिल व घर यांना विसरूं शकत नव्हता.

व्यापाऱ्याच्या बायकोला सुद्धां टुंडी फार आवडायचा. कारण तो इमानी व विश्वासू मुलगा होता. तीही आपल्या सख्ख्या मुलाप्रमाणे त्याचे सर्व करायची व सख्ख्या आईसारखे त्यावर प्रेम करायला लागली. अशीच कांही वर्षे गेली.

एके दिवशी डोटुन जंगलात सांपडलेला हत्तीचा दांत शहरांत विकून परत चालला होता, तेव्हां त्याच्या मुलासारखा दिसणाऱ्या एका तरुणाला पाहून तो ओरडला, "बेटा, थांब." घोडेस्वार थांबला. जवळ जाऊन त्यांनी त्या तरुणाला निरखून पाहिले आणि म्हणाला "तू टुंडीच आहेस ना, माझा हरवलेला मुलगाच ना?"

टुंडी घोड्यावरून उतरला आणि म्हणाला, "हो मी टुंडीच आहे." असे म्हणून त्यानी आपल्या वडिलांना नमस्कार केला आपल्या वृद्ध वडिलांची दशा पाहून टुंडीला फार दुःख झालं. तो म्हणाला "बाबा, आता मी ज्या घरांत रहातो तिथे माझ्याबरोबर चला. कांही दिवस विश्रांति घेऊन परत जा." डोटुनने मुलाचे म्हणणे ऐकले.

दोघे व्यापाऱ्याच्या घरीं पोंचले. टुंडीने व्यापाऱ्याशी आपल्या वडिलांची ओळख करून दिली. व्यापाऱ्याने त्याला फार चांगली वागणूक दिली.

सकाळीं घरी परत जातांना डोटुन व्यापाऱ्याला



म्हणाला ''मी माझ्या मुलाला माझ्याबरोबरच घरी घेऊन जाणार आहे.''

''हे कसे बरे शक्य आहे मित्रा, आता तो तुझा नाहीं, माझा मुलगा आहे. तूं तर त्याला घराबाहेर काढले होतेस. जेव्हां मी त्याला आसरा दिला, घरी आणले, त्याचे पालन पोषण केले, तेव्हां त्याला घर नव्हते. आता हेच त्याचे घर आहे.'' व्यापारी त्याला नम्रपणें म्हणाला. ''देवाच्या दयेनी मला माझा मुलगा परत मिळाला. हे खरं आहे की मी त्याच्यावर रागावलो आणि तो घर सोडून गेला, परंतु बापलेकांमधे अशी भांडणें तर होतच असतात. हे तर अगदी साहजिकच आहे.''

अशा प्रकारे त्या दोघांमधे या विषयावर बरीच चर्चा झाली. शेवटी व्यापारी म्हणाला, ''या समस्येवर तोडगा आहे, टुंडीला येथे रहायचे किंवा तुझ्याबरोबर यायचे ह्याचा निर्णय टुंडीलाच घेऊ दे. हाच ह्या समस्येवर उपाय आहे.''

''हो, हो, मला सुद्धां ही अट मान्य आहे, टुंडीच हे ठरवेल.'' डोटुन आनंदाने म्हणाला. ''ठीक आहे, उद्या सकाळीं याचा निकाल लावू या.'' व्यापारी म्हणाला.



दुसऱ्या दिवशी बापलेकाला घेऊन व्यापारी पुढेपुढे चालू लागला, त्याच्या हातांत एक लखलखीत आणि लांबलचक तलवार होती. बापलेकांना कांही समजत नव्हते कीं व्यापारी काय करतो आहे, त्यांना कुठे घेऊन जातो आहे ! ते आश्चर्यानी पहात होते.

नदी आणि जंगलामध्ये एक निर्जन प्रदेश होता, तेथे व्यापारी थांबला. त्याने तलवार टुंडीच्या हातात दिली व म्हणाला, ''बेटा, तू आता तुझं कर्तव्य पालन कर.''

टुंडी विनयाने म्हणाला, ''पण सांगा तरी मला, आता काय करायचे आहे?''

''जर तू आपल्या वडिलांबरोबर जायचे ठरविले असलेस तर माझं शिर कापून टाक. पण जर तुला आपल्या दुसऱ्या वडिलांजवळ रहायचे असेल तर त्यांचे शिर कापून टाक.''

टुंडी थोडा वेळ तसाच निमूट उभा राहिला. तो कांहीच ठरवूं शकत नव्हता. त्याने दोघांना वाकून नमस्कार केला, आणि म्हणाला, ''आता मला माहीत आहे की माझे कर्तव्य काय आहे! मी स्वतःच माझे शिर कापून टाकतो.'' असे म्हणून त्याने तलवार उचलली.

दोघांनी मोठ्या करूण स्वरात त्याला विनवीत म्हटले ''बेटा थांब, असे करू नकोस.''

तिघांच्या डोळ्यांमधे अश्रू झाले.

त्यांनी आता या समस्येवर एक दुसरा उपाय शोधला. डोटुन व त्याची बायको ही दोघे व्यापाऱ्याचे घरी राहायला आली. अशा प्रकारे टुंडीने आपल्या जन्मदात्या व पालन पोषण करून त्याला मोठा करणाऱ्या आई वडिलांबरोबर न्याय केला. दोघांना सुखी केले. आता दोघांचीही कांहीच तक्रार नाही. आता त्याच्या दोन आया व दोन वडील आहेत. ते त्याच्यावर खूप प्रेम करतात.

# खरा शेजारी

एका श्रीमंत गृहस्थाने शहरापासून दूर असलेले एक नवे घर विकत घेतले. त्याला शांतता फार प्रिय होती. आवाजाचा त्रास त्याला आवडत नसे. त्या भागांत घरें खूपच कमी होती. म्हणून तो खूष होता. त्याच्या घराच्या दोन्ही बाजूला फक्त दोन लहान झोंपड्या होत्या. त्याखेरीज आसपास दुसरी घरें नव्हती.

पण त्याचा आनंद त्या रात्रीच संपुष्टात आला. एका झोंपडीत हातोडीने ठोकण्याचा व दुसऱ्या झोंपडीत भाता चालवण्याचा आवाज सतत येत होता.

सकाळीं त्याने नोकराला पाठवले व चौकशी केली. तेव्हां त्याला समजले की पूर्व दिशेला जी झोंपडी होती त्यांत एक सुतार राहात होता, आणि पश्चिमेकडच्या झोंपडीत एक लोहार राहात होता. दोघेही खूप गरीब होते.

त्या श्रीमंत गृहस्थाने प्रथम सुताराला बोलावून विचारलं, ''जर मी तुला एक हजार रुपये दिले, तर तूं तुझी ही जागा सोडून दुसरीकडे राहायला जाशील कां?''

''आनंदाने जाईन साहेब'' सुताराने उत्तर दिले. तो पैसे घेऊन निघून गेला. त्यानंतर त्या श्रीमंताने लोहाराला बोलावले आणि तोच प्रस्ताव त्याच्यापुढें मांडला. त्यानेही लगेच मान्य केले व पैसे बक्षीस घेऊन तो निघून गेला.

त्या रात्रीं तो गृहस्थ स्वत:लाच शाबासकी देत निजायला गेला. त्याला वाटलं की आज शांत झोंप मिळेल, झोंपमोड कांही होणार नाही.

पण गाढ झोंपेतून तो घाबरूनच जागा झाला. पुन्हां दोन्ही बाजूंनी मोठ्याने आवाज येऊं लागले व रात्रभर ते मधूनमधून येतच राहिले. सकाळीं त्याने नोकराला बोलावले व याबद्दल खुलासा विचारला. 'त्या दोघांनी आपल्या झोंपड्या बदलल्या साहेब. लोहार सुताराच्या झोंपडीत राहायला गेला आहे, आणि सुतार लोहाराच्या झोंपडीत! हे लोक आपला दिलेला शब्द पाळणाऱ्यांपैकी नाही आहेत साहेब.'' नोकराने सांगितले.



वेताळ कथा

# योग्य वर

निश्चयाचा पक्का विक्रमार्क पुन्हां झाडावर चढला, त्याने प्रेत खाली उतरवले आणि आपल्या खांद्यावर घेतले. तो स्मशानाच्या दिशेला चालूं लागला. तेव्हां प्रेतांत लपलेला वेताळ त्याला म्हणाला, ''राजन्, मध्यरात्रीची वेळ आहे, त्यांत हे स्मशान आहे. इथें भुतेप्रेतें यांचा संचार असतो. कोणत्याही क्षणीं तूं संकटांच्या जाळ्यांत सांपडशील. तुझे प्राण धोक्यांत आहेत. अशी कोणती किचकट समस्या आहे की ज्याचे समस्या शोधण्यासाठी तू इतकी कठोर मेहनत करतो आहेस? स्मशान सोडण्याचे नांवसुद्धां घेत नाहीस? पण एक गोष्ट लक्षांत ठेव. कांहीजण असे असतात की ते सामान्य समस्येला असाधारण समस्या समजतात आणि चिंताग्रस्त होतात. याचं कारण आहे त्यांची



अनुभवशून्यता आणि दुर्बल विचारशक्ती! तू तर अशी चूक करत नाहीस ना ते सांग. ही केवळ माझी शंकाच आहे. पण जर हे खरं असलं तर तर मी तुला सावध करतो आहे. तुला मी मालतीची, एका गरीबाच्या मुलीची गोष्ट सांगतो ती ऐक. तिने विचार न करता आपले भाग्य ठोकरले, आणि आपल्याच हातानी आपला सर्वनाश केला. थकवा दूर होण्यासाठीं ही गोष्ट ऐक.'' असं म्हणून वेताळ मालतीची गोष्ट सांगू लागला.

विंध्याचलच्या अरण्याजवळच्या एका खेड्यांत एक लांकूडतोड्या आपली एकुलती एक मुलगी मालती हिच्याबरोबर राहात होता. मालती लहान असतानाच तिची आई वारली होती. लांकूडतोड्याला नेहमी आपल्या तरुण मुलीच्या विवाहाची काळजी वाटत असे.

जवळच्याच गांवा" राहाणारी त्याची थोरली बहीण आजारी पडली .हेर्ण ांव फार दूर नव्हतं.



दुसऱ्या दिवशी सकाळीं लाकूडतोड्या बहिणीला भेटायला निघाला. जाण्यापूर्वी त्याने मालतीला सांगितले, ''गाय गाभण आहे म्हणून तुला इथेंच एकटीला ठेवतो आहे. ताईला भेटून लगेच निघतो. कसंही करुन रात्रीं पूर्वी मी परत येतोच आहे.''

मालतीने स्नान करुन आपले ओले केंस वाळण्यासाठी मोकळे ठेवले होते. ती झोंपडीच्या आंतबाहेर करीत होती. तेवढ्यांत अचानक पावसाचे ढग आले आणि गार वारा सुटला. मालतीने चमेलीच्या फुलांचा गजरा करायला घेतला. एकीकडे आपल्या गोड आवाजांत ती एक गाणें गाऊं लागली. गाणें संपेपर्यंत तिचा गजराही पूर्ण झाला. आपल्या केंसात तो गजरा ती घालणार तेवढ्यांत एक आवाज आला.

''तुझा आवाज ऐकून कोकिळादेखील शरमून जाईल. वा, वा, किती गोड आवाज आहे ग तुझा!'' हे शब्द ऐकून मालती घाबरली. तिच्या शरीराला कंप सुटला.

आवाजाच्या दिशेला तिने वळून पाहिले तेवढ्यांत तो तरुण आपला परिचय करुन देण्यास पुढें आला. तो म्हणाला, ''माझं नांव शारंगपाणी ! मी संगीतप्रेमी आहे. तुझा गोड आवाज मला फारच आवडला. तुझं गाणं ऐकायला मिळालं हे माझं भाग्य !''

त्याला काय उत्तर द्यावं ते मालतीला समजेना. इतक्यांत मुसळधार पाऊस सुरुं झाला. मालतीने चटकन त्या तरुणाला म्हटले, ''बापरे, तुम्ही तर खूप भिजला आहात. आंत यावं.'' तिने त्या अनोळखी व्यक्तीला घरांत येण्यास निमंत्रण दिले.

शारंगपाणी पळतच झोंपडीत शिरला. ती प्रशस्त व नीटनेटकी झोंपडी पाहून तो म्हणाला, ''फारच छान कुटी आहे तुमची. पण या अरण्यांत असं एकटं राहायला तुला भिती नाही वाटत?''

''इथेंच माझा जन्म झाला नि इथेंच मी मोठी



झाले. भिती कशाची वाटणार? माझे वडील माझ्याबरोबर इथें राहातात ना?'' असं म्हणताना तिने खाटेवर एक सतरंजी अंथरली.

तितक्यांत झोंपडीच्या बाहेरून एक आवाज आला. ''आंत कुणी आहे कां? पाऊस कमी होईलसं दिसत नाही. मी आंत येऊं कां?''

मालतीने दाराजवळ जाऊन पाहिलं तर बाहेर पडवींत साक्षात मदनाचा पुतळा असावा असा एक अत्यंत सुंदर तरुण उभा होता. तिने त्याचं स्वागत करत म्हटलं, ''आपण आंत या ना! आपण तर पूर्णपणें भिजलेले दिसता.''

अरण्यांत अशी अप्सरेसारखी सुंदर मुलगी पाहून तो आश्चर्यचकितच झाला. भानावर येत तो म्हणाला, ''माझी नांव सुंदरकपिल आहे. मी मित्राच्या लग्नाला जात होतो, पण या पावसांत सांपडलो.'' असं बोलत तो आंत आला.

''तुमच्याप्रमाणें आणखी एकजण पावसांत सांपडले आहेत बघा!'' मालतीने त्या दोघांची एकमेकांशी ओळख करून दिली.

त्यांच्यापाठोपाठ एक तिसरा तरुण आंत येऊन म्हणाला, ''परवानगी शिवाय आंत येतोय त्याबद्दल माफ करा हं!'' तोही पावसांत नखशिखान्त भिजला होता.

त्याला बघून मालती कांहीतरी बोलणार होती. त्यापूर्वीच तो तिसरा तरुण म्हणाला, ''माझं नांव भीमाशंकर आहे. व्यापाराच्या कामासाठी मी शहरांत चाललो आहे. मधेंच या पावसामुळें अडकलो. केव्हां थांबणार आहे हा पाऊस कोण जाणे!''

थोड्या वेळानंतर पाऊस कमी होत गेला. शारंगपाणी जायला निघाला तेव्हां मालती त्याला निरोप द्यायला बाहेर आली. तिला तो म्हणाला,





''तुझा मधुर आवाज नि गोड गाणं माझ्या कानांत अजून गुंजतंय! तू मला फार आवडली आहेस. उद्यां मी तुझ्या वडिलांशी याबाबत बोलणीं करायला माझ्या मोठ्या भावाला पाठवीन.'' हे सारं अगदी हळूं आवाजात तिला सांगून तो तिथून निघून गेला.

सुंदरकपिलने जाण्यापूर्वी तिला दबल्या स्वरांत सांगितलं. ''तुझं सौंदर्य खरोखर अनुपम आहे. माझ्या सौंदर्याची बरोबरी करणारी वधू मिळेल की नाही ही मला एक मोठी काळजी होती. आता ती काळजी मिटली आहे. आपल्या विवाहासंबंधी बोलणीं करायला मी उद्यांच माझ्या आईवडिलांना पाठवीन.'' तिच्या कानांत हे कुजबुजत बोलून तोही तिथून निघून गेला.

भीमाशंकरने जाण्यापूर्वी सांगितलं, ''तू मला फार आवडली आहेस. मी एक मोठा व्यापारी आहे. माझा लाखोंचा व्यापार चालूं असतो. कामाचा व्याप सांभाळण्यासाठीं माझ्याकडे पुष्कळ



नोकरचाकर आहेत. जेव्हां केव्हां आपल्या कामाच्या कटकटींनी मी दमून जाईन, तेव्हां या शांत ठिकाणीं येऊन विश्रांति घेईन. तुझ्याबरोबर सुखाने दिवस कंठीन. माझी आई व इतरांना उद्यांच मी आपल्या लग्नाची बोलणीं करायला, पाठवायची व्यवस्था करतो.'' मालतीकडे एकटक पाहात पाहात तो आपल्या मार्गाने चालता झाला.

संध्याकाळीं मालती जेव्हां गाईला चारा घालत होती, तेव्हां तिचा पिता परत आला. मालतीने विचारलं, "आत्याबाई कशा आहेत?"

"जास्त दिवस काढील असं वाटत नाही आता. तिला एकाच गोष्टीचं वाईट वाटतंय. तिच्या एकुलत्या एक मुलाचं लग्न कांही ती पाहूं शकणार नाही." लांकूडतोड्या म्हणाला.

मालती म्हणाली, "यांत वाईट वाटण्यासारखं काय आहे मोठंसं? त्याला एखादी मुलगी आवडली की लगेच त्याचं लग्न तिच्याशी लावून द्यायचं !"

"मुलाच्या लग्नाच्याबाबतींत ताईचं जरा चुकलंच! तिला खूप हुंडा मिळेल असं स्थळ हवं होतं. पण आता तिची निराशा झाली आहे. तुझं लग्न तिच्या मुलाशी करावं असं माझ्या मनांत होतं. पण मी कांही ते सुचवण्याचं धाडस केलं नव्हतं. कारण आपण इतका हुंडा कुठून देणार? पण आता यावेळेला तीच म्हणाली की त्याचं लग्न एकदा झालं की ती सुखाने डोळे मिटेल. आता तिनेच आपण होऊन हा प्रस्ताव मांडला आहे. तुझ्याशी जर तिच्या मुलाचं लग्न झालं तर तिला खूपच आनंद होईल. मी देखील होकार दिला. पण रमापतीने तुझं मत काय आहे ते विचारलंय. तुला हे लग्न पसंत आहे कां?"

मालतीने हंसून म्हटलं, "आज सकाळीं इथे अचानक जोरदार पाऊस पडला. पावसांत सांपडलेल्या तीन तरुणांनी आपल्या झोंपडीत आसरा घेतला. त्यांतला एक संगीतप्रेमी आहे. दुसरा अतिशय देखणा आहे आणि तिसरा एक व्यापारी आहे. त्यांच्यापैकी प्रत्येकाने माझ्याशी लग्न करायची इच्छा प्रकट केली. आणि तुमच्याशी याबद्दल बोलणीं करायला ते आपापल्या घरच्या लोकांना उद्यां इथें पाठवणार आहेत."

'अस्सं कां? मग ते तिघेही श्रीमंत असले पाहिजेत. बा, छान, आता तूं रमापतीचं निरर्थक बोलणं विसरून जा. त्या तिघांच्यामधला कोणता तरुण तुला आवडला आहे?" लाकूडतोड्याने खुषीने मुलीला विचारले.

मालतीने वडिलांना लगेच स्पष्ट उत्तर दिलं, "मी रमापतीशीच लग्न करीन."

ही गोष्ट सांगून वेताळने राजाला विचारलं, "राजन्, आपल्या विवाहासंबंधी असा निर्णय घेऊन मालतीने फार मोठी चूक केली आहे, हे तर उघडच आहे. ते तिघेही धनवान आहेत, गुणी आहेत. मालतीला या तिघांपैकी कुणालाही एकाला पसंत करता आलं असते. तिने त्यांच्यातलाच वर निवडायला हवा होता. असं जर तिने केलं असतं तर तिचं आयुष्य तिला आरामांत घालवता आलं असतं. परंतु असं न करता तिने अशिक्षित रमापतीशी विवाह करायचा निर्णय घेतला. जीवनसाथीची निवड ही एक गंभीर व गुंतागुंतीची समस्या आहे. कारण मुलीचे सारे भविष्य या एकाच निवडीवर अवलंबून असते. परंतु अशा गंभीर समस्येला तिने अगदी सामान्य, साधी समस्या आहे असे मानले आणि आपला निर्णय सांगितला. तिने भाग्य लाथाडलं, भविष्य उजळण्याची संधी गमावली आणि आपल्याच हातांनी स्वतःचा सर्वनाश केला. माझ्या या शंकांची उत्तरें माहीत असूनही तूं गप्प बसलास तर तुझ्या मस्तकाचे तुकडेतुकडे होतील."

विक्रमार्कानें उत्तर दिलें, "कोणती समस्या क्लिष्ट आहे, गुंतागुंतीची आहे नि गंभीर आहे, आणि कोणती समस्या साधारण आहे, सरळ आहे हे प्रत्येक व्यक्तीच्या स्वभावावर आणि त्यावेळच्या परिस्थितीवर अवलंबून असतं. आपल्या अनुभवांच्या आधारावर त्या व्यक्ती विचार करतात नि निर्णय घेतात. पित्याच्या प्रश्नाचे उत्तर देताना मालतीने कोणतीही घाई केली नाही. तिने रमापतीशी विवाह करायचा आपला निर्णय क्षणभरांतच सांगून टाकला. कारण तिच्या दृष्टीकोनांतून ही कांही असाधारण समस्या नसून एक साधी समस्या होती. त्याच्या पाठीमागे एक महत्वाचे कारण आहे. ते तिघेही तरुण तिच्याशी विवाह करायला उत्सुक होते पण त्या तिघांपैकी एकानेही असा विचार केला नाही की मालतीच्या मनांत काय इच्छा आहे. तिची पसंती काय आहे? रमापती हा एकटाच निघाला की ज्याला विवाहाच्या बाबतीत मालतीची इच्छा काय आहे ते जाणून घेण्याचे महत्व होते. बाकीच्या तरुणांना लग्नापूर्वी तिचे मत विचारण्याची आवश्यकता भासली नाही. असे तरुण लग्नानंतर तिच्याशी कसे वागले असते. ते कसं सांगता येईल? कदाचित त्यांनी तिला पत्नीचा दर्जा दिला नसता आणि तिला साध्या मोलकरणीसारखं देखील वागवलं असतं! म्हणून तिने भाग्य लाथाडलं आणि आपल्याच हातानी आपला सर्वनाश केला हे म्हणणे अगदी निराधार आहे."

राजाचे मौन भंग झाल्यामुळें वेताळ शवासहित अदृश्य झाला आणि झाडावर जाऊन बसला.



## या महिन्यात जन्मलेली विशेष व्यक्ती



## सरोजिनी नायडू

सरोजिनी नायडूंचा जन्म १३ फेब्रुवारी १८७९ ला हैद्राबादमधें झाला. त्या एक जन्मजात कवयित्री होत्या. अकराव्या वर्षी त्यांनी कविता लिहायला सुरवात केली. शाळेंतल्या गणिताच्या तासाला छोट्या सरोजिनीचे कांही वर्गात लक्ष लागत नव्हते. तिने कविता लिहायला सुरवात केली आणि तिला कविता झरझर सुचत गेली असं ती म्हणाली.

तिचे वडील अघोरनाथ चट्टोपाध्याय हे सरोजिनी व तिची भांवडे यांचे स्फूर्तिस्थान होते. ते मुलांना हर प्रकारें उत्तेजन देत असत. ते ही कवी होते. त्यांनी उर्दू व बंगालीत कविता रचल्या होत्या. सरोजिनीची आई वरदासुंदरी देवी यांनी बंगाली गीते लिहीली होती आणि त्या चांगल्या गात असत.

त्याकाळांतल्या आर्थर सिमन्स व एडमंड गॉससारख्या श्रेष्ठ लेखकांनी सरोजिनीच्या कविता वाखाणल्या होत्या. 'सोन्याचा उंबरठा' हा तिचा पहिला कवितासंग्रह समीक्षकांना खूप आवडला होता.

असं सांगतात की तेराव्या वर्षी ती खूप आजारी पडली. डॉक्टरांनी पुस्तकें वाचायला देखील मनाई केली. पण तिने त्यांचं न ऐकता दोन हजार ओळींचे एक नाटक लिहीले.

१८९८ मधें परप्रांतीय डॉ. नायडू यांच्याशी घरांतल्या मंडळींच्या मनाविरुद्ध तिने विवाह केला. हैद्राबादमधल्या वास्तव्यामुळें तिला मुस्लिम समाजांत मिसळण्याची संधी वारंवार मिळत गेली. नंतर, जेव्हां भारतीय भाषांच्या यादीत उर्दू गाळावी असा प्रस्ताव आला, तेव्हां सरोजिनीने त्याविरुद्ध जोरदार लढा दिला. लोकांच्या भावना ती कधीं दुखवीत नसे.

स्त्रियांना योग्य हक्क मिळावेत या कामांत सरोजिनींनी स्वत:ला झोकून दिले. स्त्रियांना शिक्षण मिळालेच पाहिजे, म्हणजे त्यांच्या आयुष्याला निराळे वळण मिळेल असा त्यांना ठाम विश्वास होता. स्त्रियांना मताधिकार असावेत याबद्दल त्यांचा आग्रह होता.

राजकारणांत प्रवेश करण्यापूर्वी त्यांनी गांधीजींच्या बरोबर दक्षिण आफ्रिकेंत तिथल्या सरकारविरुद्ध काम केले. हिंदुस्तानच्या राजकीय मंचावर त्यांना गोपाळ कृष्ण गोखले यांनी आणले. १९१९मधें त्या ऑल इंडिया होमरूल लीगच्या सभासद म्हणून लंडनला गेल्या. तिथें त्यांनी स्त्रियांच्या हक्कावर भाषण केले. सरोजिनींच्या समाजकार्यांबद्दल ब्रिटिश सरकारने त्यांना कैसर-अे-हिंद हा किताब १९०८ सालीं दिलेला होता. परंतु जालियनवाला बागेच्या त्या भीषण हत्याकांडानंतर संतापलेल्या सरोजिनींनी तो किताब परत केला.

१९२५ सालच्या कानपूर कॉंग्रेसच्या त्या अध्यक्ष होत्या. त्यांच्या अध्यक्षीय भाषणाने स्वातंत्र्य मिळवण्याची भावना जनमनांत पुन्हां चेतवली गेली.

१९३० सालीं मिठाच्या सत्याग्रहाच्यावेळीं त्यांचा निर्भयपणा व विनोदबुद्धी यांची स्वयंसेवकांना धीर देण्यास फार उपयोगी पडली. ते परिस्थितीला मोठ्या बेडरपणें सामोरे गेले.

१९४२ च्या 'चलेजाव' चळवळींत गांधीजींना जेव्हां पुण्यांतल्या आगाखान पॅलेसमधें ठेवण्यांत आलं होते, तेव्हां सरोजिनी नायडूही तिथें होत्या. त्या गंभीर वातावरणांत आपल्या विनोदी हजरजबाबीपणामुळें त्या प्रसन्नपणा आणीत. रॉबर्ट बर्न यांच्या ''एक नंगा फकीर'' या पुस्तकांत त्यांनी सरोजिनींचा उल्लेख ''गांधीजींच्या छोट्या दरबारांतली विदूषक'' असा केलेला आहे. गांधीजी मात्र त्यांना ''भारताची कोकिळा'' म्हणत.

भारत स्वतंत्र झाल्यानंतर सरोजिनींनी उत्तर प्रांताचे राज्यपालपद मोठ्या नाराजीने स्वीकारले. त्यांना बांधील जीवनक्रम आवडत नसे. तरीदेखील ही जबाबदारी त्यांनी निष्ठेने, दक्षतेने व सहजपणें पार पाडली. २ मार्च १९४९ रोजीं सरोजिनी नायडूंचे निधन झाले.





# यक्ष पर्वत

जवळ जवळ शंभर वर्षांपूर्वी नर्मदा नदीच्या काठाजवळील जंगलात आदिवासी लोक राहात होते. या जंगली जमातींमध्ये गण्डकमृग नांवाची एक जमात होती. त्यांनी जंगलात आपले वेगळे गांव वसविले होते. त्याचे अरण्यापूर नांव होते. हे आदिवासी गण्डकमृगांना पाळून, त्यांच्या कडून, शेतीची कामे करुन घेत असत. म्हणून त्या जमातीचे 'गण्डकमृग' असे नाव पडले.

अरण्यमल हा या जमातीचा नवा राजा झाला. ह्याच जमातीतील गणाचारी नांवाचा माणूस राजाला पदच्युत करण्याचा प्रयत्न करीत होता. दोन तरुण लढवय्यांच्या मदतीने अरण्यमलने गणाचारीचे कपट उघडे करुन, त्याला वाघांपुढे मरण्यास टाकले.

अरण्यमल गादीवर बसून एक वर्ष झाले. गण्डक जमातीने हा दिवस वार्षिकोत्सव म्हणून साजरा करायचे असे ठरवून आवश्यक ती तयारी केली. एक चौथऱ्यावर एक सुशोभित सिंहासनावर त्याला बसवून ते उत्सव साजरा करुं लागले. अरण्यमलाच्या आनंदास पारावार उरला नाही. इतका मान मिळाल्याने मनातल्यामनात त्याला गर्व झाला.

ह्यावेळीं गण्डगमृग जातीचे दोन तरुण वाघांवर बसून वेगाने तिथे आले. वाघांवरुन उतरुन ते सरळ अरण्यमलाकडे येउं लागले. अरण्यमलाच्या शिलामुखी नावाच्या मंत्र्याने त्यांना थांबवून म्हटले ''काय विसरलात की



काय? इथे एक मंत्री बसलाय. माझ्या परवानगी शिवायच राजाला भेटू पहाताय? हे कधीच शक्य होणार नाही.'' त्यांच्यातील एकजण म्हणाला ''मंत्रीजी, डोंगराजवळील आमच्या ज्वारीच्या शेतातील कणसें कांही नवीन लोक तोडून नेत आहेत. ते ज्या प्राण्यांवर स्वार होऊन आले आहेत तसे प्राणी या जन्मांत आम्ही बघितले नाहीत.''

मंत्री शिलामुखीने विचारले ''हे प्राणी दिसतात तरी कसे? त्यांचे वैशिष्ट्य काय आहे?''

''ते हत्तीसारखे उंच आहेत. वाघासारखे त्यांचे पाय आहेत आणि त्यांची मान बगळ्या सारखी उंच व बांकडी आहे.'' त्या दोघा वीरांनी नवलाईने भरलेल्या आवाजात पाहिलेल्या विचित्र प्राण्यांचे वर्णन केले.

शिलामुखी त्या दोघांना राजाकडे घेऊन गेला. आणि त्या विचित्र प्राण्याच्याबद्दल सविस्तर माहिती सांगितली.

''आमच्या लोकांनी इतकी मेहनत करुन धान्य पिकविले आणि त्या चोरांची ही हिम्मत की आमचे धान्यच चोरुन नेतात. तुम्ही त्या लोकांना चांगला धडा शिकवायला हवा होता. उलट त्या प्राण्याच्याबद्दल आश्चर्य करीत बसला आहात.'' अरण्यमल रागावून म्हणाला.

अरण्यमलाच्या ह्या बोलण्यावर जनतेला उद्देशून मंत्री मोठ्यांदा म्हणाला, ''ऐका, ऐका, आपल्याला आता हा उत्सव थांबविला पाहिजे. चोर आपले पीक लुटून नेत आहेत. तेव्हां त्यांचा नाश करुन पिकांचे रक्षण करणे हे आपले प्रथम कर्तव्य आहे. मंत्र्याचे हे बोलणे ऐकल्या बरोबर गण्डकमृग जमातीचे तरुण खवळून उठले. ते भाले, तलवारी आणि धनुष्यबाण घेऊन आपापल्या गण्डकमृगावर बसून निघाले. मंत्री शिलामुख देखील त्यांच्या बरोबर निघाला.

ते सगळे जेव्हा त्यांच्या शेताजवळ पोहोचले तेव्हा समोरील दृष्ट बघून घाबरले. भीतीने जागच्याजागीखिळून राहिले. सगळे मिळून पंचवीस, तीस चोर होते. ते शेतांतली कणसें तोडून विचित्र दिसणाऱ्या प्राण्यांच्या पाठीवरील पोत्यांत भरत होते.





चोरांनी बघितले की गण्डकमृग जमातीचे लोक भाले, तलवारी, धनुष्य घेऊन आले आहेत व कोणत्याही क्षणीं आपल्यावर हल्ला करतील. त्यामुळे चोर घाबरले. मनांतल्या मनांत दोन्ही पक्ष एकमेकांना घाबरायला लागले. चोरांमधील एकाने शत्रूकडे भाला दाखवित म्हटले ''पहा, तिकडे पहा ! न घाबरता हे लोक गण्डक सारख्या जनावरावर स्वार होऊन बेधडक ये जा करतात तर आपण अंदाज करु शकतो की ते किती शूर आहेत. त्यांना आपण कसे पुरे पडणार ?''

चोरांच्या सरदाराने गण्डकमृग जमातीच्या लोकांकडे नीट लक्ष देऊन बघितले. त्याला वाटले हे लोक आपल्याला टाळत आहेत. कदाचित आपल्यावर हल्ला करण्याचे त्यांचे धाडस होत नसावे. त्यांच्या या गोंधळलेल्या स्थितीचा फायदा उठविण्यासाठी चोरांचा सरदार आपल्या साथीदारांस म्हणाला, ''हे उंटस्वारांनो, गण्डकमृग जमातवाले आपल्याला घाबरत आहेत. आपल्यावर हल्ला करण्यास कचरत आहेत. बघातर! एकालाही पुढे यायचे धाडस होत नाही आहे. ही चांगली संधी आहे. त्यांना सगळीकडून घेरुन त्यांची दाणादाण उडवा.''

चालून येणाऱ्या त्या शत्रूला बघून शिलामुखी थरथर कांपू लागला. तो आपल्या लोकांना म्हणाला ''इतक्या उंच प्राण्यांवर बसलेले हे लोक आपल्याला सहज मारुन टाकतील. मागे फिरा आणि लांब त्या झाडांच्या मागे लपा.'' शिलामुखी आपले गण्डकमृग मागे परतविण्या अगोदरच चोर तिथे आले आणि त्यांनी गराडा घातला. शिलामुखी धाडसाने लढू लागला. शत्रूला तोंड देताना अरण्यमातेचे स्मरण करुन ओरडून आपल्या साथीदारांना म्हणाला ''ह्या चोरांना आपल्याला तोंड देणे शक्य नाही. अरण्यपूरला पळून जाऊं या.''

येवढ्यांत जवळून एक आवाज आला ''महामंत्री शिलामुखी घाबरुं नका. चोर ज्या प्राण्यांवर स्वार झाले आहेत, त्यांना उंट म्हणतात. आपल्या गण्डकांना मागे फिरवून तुमच्या मागून येणाऱ्या उंटावर घाला. गण्डक आपल्या शिंगांनी त्यांना घायाळ करतील.



त्यांची शिंगे वज्रासारखी टणक आहेत.''

शिलामुखीच्या लगेच लक्षांत आले की हा आवाज सैनिकांच्या जवळच असलेल्या झोंपडीत रहाणाऱ्या स्वर्णाचारीचा आहे. परन्तु आता त्याच्यात चोरांबरोबर लढाई करायचे बळ शिल्लक राहिले नव्हते. तो आपल्या साथीदारांच्या बरोबर अरण्यपूरकडे पळू लागला.

स्वर्णाचारीचे बोलणे चोरांच्या सरदाराने ऐकले होते. तो स्वर्णाचारी लपला होता तिथे जाऊन ओरडला ''तू कोण आहेस? आमच्याच शत्रुला मदत करतोस? फारच शहाणा आहेस की!'' असे म्हणत त्याने उंटावर चढून स्वर्णाचारीवर भाला रोखला.

स्वर्णाचारी भितीने चळचळा कांपत म्हणाला ''बाबारे! मला मारुन पाप करु नका. सगळी शास्त्रे म्हणतात स्थापत्यकाराला मारुन नरकात जाल.''

सरदार जोरांत हसून म्हणाला ''येवढा मोठा स्थापत्यकार आहेस तर शहरात रहायचे होते. इथे या जंगलात दगडधोंड्यात फिरायची तुला काय गरज?''

''साहेब घरे बांधून माझे व कुटुंबाचे पोटभरत नाही. या धंद्यात फारसे पैसे देखील मिळत नाहीत. यंत्र बनविण्याचे काम देखील मला येते. विघ्नेश्वर पुजाऱ्याच्या मदतीने मी मायावी हत्तींची सृष्टी बनविली होती, पण दोन योद्धयांनी माझा हा प्रयत्न विफल केला. त्यामुळे माझ्या धंद्याचे फार मोठे नुकसान झाले. म्हणून मी पद्मपुरी सोडून या जंगलात आलो. जवळ एका झोपडीत दोन तरुण योद्धे रहात आहेत. तिथून थोड्या अंतरावर मी व विघ्नेश्वर पुजारीने एक घर बांधले, व तिथे रहात आहोत.

''ते सैनिक इथे काय करताहेत ते काही तपश्चर्या तर करत नाहीत ?'' सरदार म्हणाला. ''त्यांना तपश्चर्या करण्याची काय गरज? ते तर शस्त्र विद्येत पारंगत आहेत. मोठ्यांचे रक्षण करणे हेच त्यांचे काम आहे.'' स्वर्णाचारी म्हणाला.

सरदाराने कुत्सितपणे विचारले की ''गण्डकमृग जमातीचे धान्य पळविणे हे तर कांही पाप समजले जात नाही ना?''



ह्याला उत्तर देताना स्वर्णाचारी चाचरत म्हणाला ''आपण तर फार कठीण प्रश्न विचारला. मला कळत नाही की अशा प्रश्नाचे काय उत्तर देऊ?''

''बरं, मला त्या दोघां योद्धयांच्या घरी घेऊन चल.'' सरदाराने आज्ञा केली. स्वर्णाचारीला कळून चुकले की सरदार त्या तरुण योद्धयांना मारणार आहे. परन्तु निरुपायाने तो त्या योद्धयांच्या झोपडीकडे जाऊ लागला. झोपडीशी पोहोचण्या अगोदर स्वर्णाचारीला त्या योद्धांना सावध करायचे होते, सावध होऊन ते आपला जीव वाचवू शकले असते. तो सरदाराला म्हणाला ''आपण इथेच थांबा. ते दोघे झोपडीत आहेत का ते मी बघून येतो.''

चोरांचा सरदार हसत म्हणाला, ''ओहो! तुझी ही हुशारी माझ्यापाशी नाही चालणार. मी सिंधच्या वाळवंटातून ह्या डोंगरदऱ्यात आलो आहे. तुझ्या सारखे खूप लोक बघितले आहेत. तुझ्या बोलण्यावर विश्वास ठेवण्या-इतका मी मूर्ख नाही.''

दोघेजण झोपडीजवळ आले. बांबूच्या तट्टयांनी बनलेला झोपडीचा दरवाजा बंद होता. सरदार आपल्या एका साथीदाराबरोबर दरवाजा उघडून आंत गेला. तिथे वाघ, अस्वले ह्यांची कातडी भिंतीवर लटकत होती. एका कोपऱ्यांत कांही धनुष्यबाण पण पडलेले होते. सरदाराने आपल्या साथीदाराला



सर्व सामान बरोबर घेण्याची आज्ञा केली. बाहेर येऊन त्याने स्वर्णाचारीला उंटावर बसण्यास सांगितले.

स्वर्णाचारीला कळले की आता आपला जीव धोक्यांत आहे. सरदाराने त्याला जेव्हां जबरदस्तीने उंटावर बसवले तेव्हां स्वर्णाचारी ''मला कुणीतरी वांचवा हो वांचवा'' असे ओरडू लागला.

हा ओरडा ऐकून विघ्नेश्वर पुजाऱ्याच्या मनात शंका आली, ''स्वर्णाचारी सारखा बुद्धिमान आपल्या रक्षणासाठी असे ओरडेल? नक्कीच तो मोठ्या संकटात सापडला आहे. मला ताबडतोब जाऊन त्याची सुटका केली पाहिजे.'' असा विचार करत तो तरुण योद्धयांच्या झोंपडीकडे निघाला. तिकडे

गेल्यावर त्याला असे दिसले की स्वर्णाचारी उंटावर बसला आहे व चोरांचा सरदार त्याला भाला दाखवून धमकावत आहे.

विघ्नेश्वर पुजाऱ्याच्या मनात लख्खकन् एक कल्पना चमकली. झोंपडीत रहाणारे योद्धे एका सिंहाच्या छाव्याला लहान असतानाच घेऊन आले होते व प्रेमाने पाळत होते. त्यांनी त्याचे नांव परशुराम असे ठेवले होते. सिंहाचा छावा तरुण सैनिकांबरोबरच नव्हे तर स्वर्णाचारी व विघ्नेश्वर पुजाऱ्यांच्या बरोबर पण चांगला रुळला होता. जेव्हां सैनिक झोपडीत असत, तेव्हां तो आसपास निर्भयपणे हिंडायचा. जेव्हा ते झोपडीत नसतील तेव्हा त्याला ते झोपडी मागील लांकडी पिंजऱ्यात बंद करत असत. विघ्नेश्वरला वाटले सिंहाला मोकळे सोडले तर मी स्वर्णाचारीला वाचवू शकतो आणि चोरांना पण पळवू शकेन. स्वर्णाचारीच्या किंकाळ्यांनी सिंहाला राग येईल व तो चोरांवर तुटून पडेल. त्याला आम्हा दोघांचा चांगला लळा आहे त्यामुळे तो स्वर्णाचारीचे नक्की रक्षण करेल. विघ्नेश्वर पुजाऱ्याने पळत जाउन पिंजऱ्याचे दार उघडले. सिंह डरकाळ्या फोडत बाहेर आला. बाहेर येताच त्याची नजर उंटांवर पडली. गुरगुरत तो विघ्नेश्वर पुजाऱ्याकडे बघू लागला ह्या संधीचा फायदा घेऊन विघ्नेश्वर पुजाऱ्याने टाळ्या वाजवून त्याला आणखी डिंवचले की तो चोरांवर हल्ला करेल. स्वर्णाचारीने हे सगळे बघितले व मुद्दाम जोरजोरात "परशुराम! मला वांचव, वांचव" म्हणून ओरडू लागला. सिंहाने स्वर्णाचारीला ओळखले. आपल्या मागल्या पायावर उभे राहून. आयाळ फुलवून अक्राळविक्राळ गर्जना करीत तो उंटांच्या बाजूला वेगाने झेपावला. सिंहाला बघून उंट घाबरुन मागे न जाता सैराबैरा पळत सुटले. एक चोर उंटावरुन धाडकन् खाली पडला. सिंह त्याच्यावर झेपावला व त्याने त्याचा गळा पकडला.

(क्रमशः)





# आत्म स्तुती

एक दिवस अनंत आपल्या बायको व मुलीबरोबर जेवायला बसणार, येवढ्यांत दारातून आवाज आला. "या भुकेल्या बैराग्याची भूक भागवून पुण्य मिळव बाबा."

अनंताला बैराग्यांच्या रागाची भिती वाटायची. पण त्यांच्यावर त्याची श्रद्धा पण होती. तो लगेच बाहेर आला आणि मोठ्या आदराने त्या बैराग्याला तो घरांत घेऊन आला. त्याला आपल्या बरोबर जेवायला बसविले. जेवताना बैरागी अनंताला म्हणाला, "पूर्वजन्मी तुम्ही विदर्भाचा राजा अमरसिंहाचे मंत्री होता. राजा व प्रजा आपल्या हुशारीचे कौतुक करत असत."

बैराग्याच्या बोलण्यावर खूष होऊन अनंताने आपल्या मुलीस बैराग्याच्या पानात तूप वाढायला सांगितले. बैराग्याने डोळे मिटून ध्यान केल्याचे नाटक केले. जसे कांही अनंताच्या पूर्वजन्मा विषयी तो माहिती शोधीत आहे. मग एकदम तो म्हणाला "चमत्कार ! महाचमत्कार! तुझी मुलगी पूर्वजन्मी राजा अमरसिंहाची राणी होती." अनंताने मुलीला बैराग्याच्या पत्रावळीवर अजून तूप वाढण्यास सांगितले. व म्हणाला, "बाबा, आता हे सांगा की अमरसिंह राजा ह्या जन्मी कुठे असतील? आणि काय करीत आहेत?" अनंत व त्याच्या बायकोकडे बघत हंसत हंसत बैरागी म्हणाला "ह्या जन्मी अमरसिंह तर मीच आहे."

हे ऐकून अनंत खूप रागावला व कोपऱ्यांतली काठी उचलून बैराग्याला मारायला धावला. बैरागी जेवण टाकून उठला आणि पळता पळता म्हणाला "हे अगदी खरे आहे की कलियुगात सत्य बोलल्यास मारच खायला लागतो."



# एका सार्वभौम प्रजासत्ताकाची स्थापना

१४ ऑगस्टला पाकिस्तानची निर्मिती झाली. जिना हे गव्हर्नर-जनरल झाले आणि लियाकतअली खान हे पंतप्रधान झाले. १४-१५ च्या रात्रीं मध्यरात्रींच्या ठोक्याला जवाहरलाल नेहरूंचे "tryst with destiny" नियतीशी ठरवलेली भेट'' हे गाजलेले भाषण झाले. लॉर्ड माऊंटबॅटन हे पहिले गव्हर्नर-जनरल झाले आणि नेहरू पहिले पंतप्रधान बनले.



जवाहरलाल नेहरू

४ सप्टेंबरला दिल्लींत जातीय दंगलींना सुरवात झाली आणि गांधीजी तांतडीने नोआखालीहून दिल्लीला परतले. पाकिस्तानांत जाणाऱ्या मुसलमानांचा आणि तिथून बेघर होऊन भारतांत येणाऱ्या हिंदूंचा प्रचंड लोंढा, यांच्यात मारामारी व रक्तपात होत राहिला. दिल्लींत शांतता प्रस्थापित झाली होती तरी पुन्हां १९४८च्या जानेवारींत दंगल उसळली. गांधीजींनी पुन्हां उपवासाचे शस्त्र परजले. त्यांनी उपवास सुरुं केला. परंतु हिंदू व मुस्लिम नेत्यांकडून शांततेचे आश्वासन मिळाल्यानंतर, पांच दिवसांचा उपवास त्यांनी सोडला. दुर्दैवाने ३० जानेवारीला एका हिंदू माथेफिरूने गोळ्या झाडून त्यांची हत्या केली.



६ नोव्हेंबर १९४९ला विधानसभेचे काम पूर्ण झाले. लोकसभेने राज्यघटनेचा मसुदा स्वीकारला. २६ जानेवारी १९५० ला या राज्यघटनेचा अंमल सुरुं झाला आणि भारत हे अधिकृतरित्या न्याय, स्वातंत्र्य, समता, आणि बंधुभाव यावर आधारलेले एक सार्वभौम लोकशाही प्रजातंत्र बनले.

काश्मीर संस्थानात अशांतता निर्माण झाली. तिथें बहुसंख्य प्रजा मुस्लिम होती पण महाराज हिंदू होते. भारतांत काश्मीर विलीन व्हावे याबद्दल प्रजेंत नाराजी होती. महाराजांनी भारतांत सामील होण्यासाठी संमती दिली. तेव्हां पाकिस्तानांतून भाडोत्री पठाण शिपाई काश्मीरमधें घुसले आणि त्यांनी आक्रमण केले. यांतून पहिल्या भारत-पाक युद्धाची ठिणगी पेटली.

१ जानेवारी १९४८ ला भारत व पाकिस्तान, या दोन्ही देशांनी काश्मीरमधली लढाई थांबवण्याचे ठरवले. काश्मीरचे भवितव्य ठरवण्यासाठीं त्या राज्यांत सार्वमत घेण्याचे ठरले.

**(पुढील महिन्यांत : भारताची प्रगतीकडे वाटचाल १९५१-२०००)**





# राजमार्ग

आसपासच्या देशांशी तुलना केली तर चंपक हा मागासलेल्या देशांपैकी एक देश आहे. असे चंपकसेनला वाटले ह्याचे काय कारण असेल? ह्यासाठी आपला पुत्र विवेकसेन ह्याला त्याने पुढारलेल्या देशांत जाउन तिथले लोक कशा तऱ्हेने कामे करतात हे समजावून घेण्यास सांगितले. त्या देशांतील लोकांची कामाची पद्धत बघून विवेक-सेन थक्क झाला. त्याला मनापासून वाटले की आपल्या देशांतील लोकांनी ह्यांच्यासारखे काम करुन स्वतःची उन्नती करावी. ह्यासंबंधी माहिती गोळा करत असतानाच, त्याच्या वडिलांच्या निधनाची बातमी त्याला अचानक कळली. तो ताबडतोब आपल्या देशांत परतला आणि वयाच्या पंचविसाव्या वर्षीच देशाचा राजा बनला.

विवेकसेनच्या मनांत देशाच्या प्रगती विषयी अनेक विचार व योजना घोळत होत्या. परन्तु खजिन्यातील पैशाच्या कमतरतेमुळें तो आपल्या योजना अंमलात आणूं शकत नव्हता. लोकांवर नवीन कर लागू करण्याचा त्याचा विचार होता. परन्तु तो हे देखील करुं शकला नाही कारण प्रजेचा ह्या गोष्टीस विरोध होता. त्यांची अशी तक्रार होती की जुने कर देता देताच आमच्या नाकी नऊ आले आहेत, तर नवे कर आम्ही कुठून देणार?

चंपक देशात पुष्कळ नद्या आहेत, पाण्याची कुठेही कमतरता नाही. पिके चांगली येत आहेत. तेव्हां असे असतानादेखील देशाची प्रगती कां होत नाही असा त्याला प्रश्न पडला. त्याला असे वाटले की जनताच हा प्रश्न सोडवू शकेल. ह्या कामास जनताच योग्य आहे. ह्या समस्येच्या अगदी मुळापर्यन्त जाण्यासाठी, तो कांही दिवस वेष बदलून साऱ्या देशभर फिरला.

विवेकसेनाने एक दिवस एका तरुणास झाडाखाली झोपलेले बघितले. त्याला उठवून तो म्हणाला, ''अरे दिवसाढवळ्या खुशाल झोपा काढतोस, तुला दुसरा काही उद्योगधंदा नाही?''

तरुण म्हणाला ''काम करायची मला काय गरज? केव्हांही खायला मागितले तरी पोटभर

सुमंतवर्मा

खायला घालणारे दयाळू ह्या गांवात आहेत."

त्याच्या उत्तरावर चकित झालेला विवेकसेन म्हणाला "कुठल्याही एका माणसाचे नांव सांग, जो मागितल्याबरोबर तुला खायला देतो."

त्या तरुणाने गौरव पाटलाचे नाव सांगितले. विवेकसेन त्यांच्या घरी गेला. पाटीलांनी त्याचा चांगला आदर सत्कार केला. जेवण झाल्यावर विवेकसेन म्हणाला "पोटभर खाऊन मी आपल्यावर आरोप करीत आहे असे समजू नका. पण आपल्याला असे नाही कां वाटत की घरीं आलेल्या प्रत्येकाला पोटभर खायला घालून, आळशांना तुम्ही आणखी आळशी बनवत आहात ! आळशांची संख्या वाढवीत आहात."

क्षणभर विचार करुन गौरव पाटील म्हणाले "खरे आहे. पण मी तरी काय करुं ? पीक चांगले येत आहे, त्याचा वापर करायलाच पाहिजे. धान्य वांया गेले तर तेही बरोबर नाही."

"धान्य विकत घेण्यास कितीतरी देश तयार आहेत. त्यामुळें तुमचे उत्पन्न देखील दुप्पट होईल." विवेकसेन म्हणाला.

पाटील हसत म्हणाले "अहो देशांत चांगले रस्तेच नाहीत तर इतर देशांत धान्य कसे पाठविणार? त्यासाठी लागणाऱ्यां इतर सोयी तर नसल्यातच जमा आहेत. साधे एका गांवाहून दुसऱ्या गांवाला जाणे देखील मुश्किल, तर इतर देशांची बातच सोडा. ह्या सोयी नसल्यामुळे लोकांच्या ज्ञानाच्या आवाक्याला देखील मर्यादा येते. त्यांची स्थिती एखाद्या डबक्यांतल्या बेडकांसारखी आहे.








तुम्ही म्हणता तरुण आळशी होत आहेत. कां नाही होणार ? गरजेपेक्षा जास्त पीक येत आहे. धान्य विकायचा दुसरा कुठला मार्गपण नाही. मला तर वाटते उत्पादनच कमी केले पाहिजे. अशा परिस्थितीत दुसऱ्या देशास धान्य विकणे हे एक स्वप्नच आहे."

"उत्पादन आणखी वाढवा. तरुणांना प्रोत्साहन देऊन आजूबाजूच्या राजमार्गांचा उपयोग करण्यास सांगा." विवेकसेनने सुचविले.

पाटील घाबरुन म्हणाले, "अरे बापरे! हे तर मी नाही करुं शकणार. मी एक मामुली पाटील आहे. मी केवळ छोटी छोटीच कामें करुं शकतो."

"म्हणजे तुमचे म्हणणे असे आहे की सगळा दोष राजाचाच आहे." असे म्हणून विवेकसेनने राजास मुद्दाम दूषणें दिली.

हे बोलणें ऐकून पाटील रागावून म्हणाले "तुम्ही कोणी परदेशी दिसता म्हणून तुम्हाला ह्यावेळेस माफ करतो. आम्ही आमच्या देशाच्या राजाला खूप मान देतो. त्याच्या बद्दल आमच्या मनात अपरंपार भक्ती आणि श्रद्धा आहे. त्याचे सर्व वंशज आम्हाला पूजनीय आहेत. त्यांच्या विरुद्ध एक शब्द देखील बोलाल तर तुमची धडगत नाही."

हे बोलणे ऐकून विवेकसेन मनांतल्या मनांत खूष झाला. त्याला जी माहिती हवी होती ती मिळाल्यावर मजल दर मजल करीत तो राजधानीत परतला. दुसऱ्याच दिवशी तो आपल्या मंत्र्यांना बोलावून म्हणाला "आपल्या देशाच्या अधोगतीचे कारण मला कळले आहे, परंतु हे समजत नाही की हे सुधारण्यास उपाय काय करावा?" नंतर त्याने आपल्या प्रवासातील अनुभव सांगितले.

"महाराज आपल्या असमर्थतेची आपण काळजी करुं नका. राजधानीत चंद्रभानू नावाचे एक महाकवी आहेत. त्यांच्या बरोबर काव्य गायनात

वेळ घालविल्यास आपल्या सर्व काळज्या मिटतील व मन आनंदित होईल." एका मंत्र्याने सल्ला दिला.

"ज्या कवी चंद्रभानूंबद्दल आपण बोलत आहात, ते मला माहिती नाहीत. परंतु शिवपुरी गावात वसुनाथ नावाचे एक कवी आहेत. माझ्या मते ते श्रेष्ठ कवी आहेत. मी स्वतः तिथे जाऊन त्यांचा सत्कार करु इच्छितो. कवींना इथे बोलावून त्यांचा सत्कार करावा असे मला वाटते म्हणून आवश्यक ती तयारी आधीपासूनच सुरुं केल्यास बरे" विवेकसेन म्हणाला.

राज्याच्या आज्ञेप्रमाणे दवंडी पिटली की विवेकसेन संक्रांतीस शिवपुरीला जातील. आणि कवी वसुनाथांचा सत्कार करतील. ह्या आधी अनेक कवी वसुनाथांना भेटले. पण त्यांना वसुनाथांच्यात कांहीच वेगळेपण आढळले नाही. ठरल्याप्रमाणे विवेकसेन शिवपुरीस जाण्यास निघाले. चकचकीत राजमार्गावरुन घोडागाडी विनासायास शिवपुरीस पोहोचली.

शिवपुरीस गेल्यावर राजा कवी वसुनाथांना म्हणाला, "आपण केवढे महान कवी आहात हे मला माहिती नाही. परंतु जेव्हां मी आपल्या सत्कारास शिवपुरीला येण्याची घोषणा केली तेव्हां राजधानी ते शिवपुरी राजमार्ग बनला. जनतेने स्वतः ह्याची जबाबदारी घेतली आणि असे सिद्ध केले की ते अशी कामे सगळे एकत्र येवून चांगल्या तऱ्हेने करं शकतात. माझी अशी इच्छा आहे की दुसऱ्या गावांत पण ह्याचे अनुकरण करावे म्हणजे देशभर राजमार्ग बनतील व कुठेही प्रवास करणे सुखकर होईल. ज्या उद्देशाने मी आपला सत्कार आयोजीत केला होता तो पूर्ण झाला आहे. अशावेळी मी आपले अभिनंदन करतो."

तेव्हां पासून शिवपुरीची प्रगती झाली. लोकांना पण समजले की राजमार्ग केवळ राजासाठीच नाहीत. तर प्रजापण त्यांचा उपयोग करु शकते. म्हणून प्रजेने जीव ओतून काम करुन रस्ते बांधले. आता लोक त्यावरुन व्यापार करु लागले. सर्व स्वच्छ आणि सुंदर रस्ते आता राजमार्ग समजले जाऊं लागले.



## ६०. चार्वाक बध

# महाभारत

युद्धसमाप्तीनंतर पांडव गंगेच्या किनारी पोंचले. आपल्या मृत नातेवाईकांना तिलांजली व पिंडदान केल्यानंतर त्यांनी महिनाभर सुतक पाळले. धृतराष्ट्र, विदुर व स्त्रीजनांच्या बरोबर ते नगराबाहेर एका पर्णकुटींत राहिले.

यानंतर युधिष्ठिराला भेटायला व्यास वगैरे ऋषी, त्यांचे शिष्य, ब्राह्मण व इतर नागरिक आले. युधिष्ठिराने त्या सर्वांचे यथोचित आदरातिथ्य केले. त्यांना योग्य आसनांवर बसवल्यानंतर तो आपल्या आसनावर बसला.

युधिष्ठिर त्या सर्वांना म्हणाला, "कृष्ण, भीम, अर्जुन व इतरांनी हा विजय मला मिळवून दिला आहे खरा, पण मला हा माझा विजय आहे असं वाटतच नाही. आपल्या जातभाईंचा वध केला आहे, अभिमन्यू व द्रौपदीचे पुत्र मारले गेले आहेत ! अशा परिस्थितींत राज्याच्या उपभोग घेताना मला आनंद कसा होईल? त्याशिवाय तिलांजली द्यायच्यावेळीं माझ्या मातेने हे रहस्य प्रगट केलं की महादानी आणि महावीर कर्ण माझा ज्येष्ठ बंधू आहे ! अशा महारथीचा असा मृत्यू कां व्हावा हे कांही मला समजत नाही."

हे बोलणें ऐकून नारदाने कर्णाच्या शापांची माहिती युधिष्ठिराला सांगितली. कर्ण जेव्हां द्रोणाकडे धनुर्विद्या शिकत होता, त्याच वेळेला अर्जुनाची धनुर्विद्या पाहून कर्णाला





त्याचा हेवा वाटूं लागला. युधिष्ठिराची बुद्धिमत्ता, भीमाचे बाहुबल, नकुल व सहदेवाचे सौजन्य आणि कृष्णार्जुनाची मैत्री याबद्दल तो या सर्वांचा मत्सर करुं लागला. म्हणून त्याची दुर्योधनाशी मैत्री चांगली जुळली.

द्रोणाचार्यांकडे धनुर्विद्या शिकत असताना एक दिवस कर्ण एकटाच द्रोणाजवळ जाऊन म्हणाला, ''गुरुजी! आपल्या मनांत आपल्या शिष्यांबद्दल कांही भेदभाव तर नाही ना? अर्जुनाशी युद्धांत जिंकावे अशी माझी तीव्र इच्छा आहे. म्हणून आपण मला ब्रम्हास्त्राचा उपयोग व ते परत बोलावण्याची विद्या शिकवावी.''

अर्जुन द्रोणाचा आवडता शिष्य होता. म्हणून द्रोण कर्णाला म्हणाला, ''तूं सूतपुत्र आहेस. ब्रह्मास्त्र फक्त ब्राह्मण व क्षत्रियांनाच देता येते. इतरांना नाही.''

ही गोष्ट ऐकून कर्ण महेंद्रगिरीजवळ तपस्या करणाऱ्या परशुरामाजवळ गेला, व त्यांना साष्टांग नमस्कार करुन म्हणाला, ''महात्मन, मी भृगुवंशी ब्राह्मण आहे. आपण मला आपला शिष्य म्हणून स्वीकारावं.'' हे परशुरामाने मान्य केलं. परशुरामाने कर्णाला अनेक अस्त्र-शस्त्रांचे प्रयोग, त्यांचे परत बोलावण्याचे मंत्र शिकवले. त्या प्रदेशांतल्या यक्ष व गंधर्वांबरोबर कर्णाची मैत्री जमली. आपल्या अस्त्रविद्येच्या प्रयोगांमुळें कर्ण त्यांनाही आश्चर्यचकित करीत होता.

त्या काळांत एक दिवस कर्ण आपल्या गुरूच्या आश्रमाजवळ समुद्रकिनाऱ्यावर धनुष्यबाण घेऊन फिरत होता. तिथें त्याने एका गाईला पाहून बाण मारला व गाय मेली. ती एका ब्राह्मणाची होमाची गाय होती हे जेव्हां कर्णाला समजलं तेव्हां कर्णाने लागलीच त्या ब्राह्मणाकडे जाऊन त्याची क्षमा मागितली. पण तो ब्राह्मण संतापलेला होता. त्याने कर्णाला शाप दिला, ''तूं जेव्हां युद्धभूमीत युद्ध करीत राहाशील, तेव्हां तुझ्या रथाचे चाक जमिनीत रुतेल. त्यावेळेस माझ्या गाईप्रमाणेंच तूही शत्रूकडून मारला जाशील.''

यानंतर कर्णाने गुरुची निरंतर सेवा करुन, आपले शस्त्रविद्येतले कौशल्य दाखवून परशुरामाला प्रसन्न केले. परशुरामाने त्याला सारा धनुर्वेद शिकवला व ब्रह्मास्त्राची विद्याही दिली. परंतु त्या वेळेस एक घटना घडली. परशुराम कर्णाच्या मांडीवर डोके ठेवून झोंपला होता. त्यावेळेस एक किडा कर्णाच्या मांडीला चावायला लागला, व मांडी कुरतडूं लागला.



कर्ण ती वेदना नाईलाजाने सहन करत होता. परंतु गुरुची झोंपमोड होईल म्हणून कर्णाने मांडी जरादेखील हालवली नाही. त्या जखमेंतून रक्त वाहूं लागले.

थोड्या वेळानंतर परशुराम उठून बसला. मांडीवरचे रक्त आणि कर्णाची मांडी कुरतडणारा तो किडा पाहून परशुराम कर्णाला म्हणाला, ''हे बघ, एका ब्राह्मणामधे इतकी सहनशीलता असूं शकणार नाही. तूं मला खरं काय ते सांग. कोण आहेस तूं?''

खरं सांगितलं नाही तर परशुराम शाप देईल या विचाराने कर्ण घाबरला व त्याने आपण सूतवंशी असल्याचे सांगितले. तेव्हां परशुरामांनी त्याला शाप दिला की युद्धाच्यावेळी त्याचा ब्रम्हास्त्र आठवणार नाही.

इतक्या सगळ्या शापांचा धनी होऊन देखील कर्ण एक महान योद्धा मानला जात होता. कलिंग देशांतल्या राजपुरच्या चित्रांगद राजाच्या मुलीचे स्वयंवर होते. त्यावेळीं दुर्योधनाने तिला जबरदस्तीने उठवले व तिला नेऊं लागला. तेव्हां अनेक राजांनी त्याच्यावर हल्ला केला, तरीदेखील कर्णाने दुर्योधनाला विजय मिळवून दिला.

एकदा कर्णाने अजेय जरासंधाला हरवलं आणि त्याच्याकडून मालिनी नांवाचे एक मोठे नगर भेट म्हणून स्वीकारलं होतं. कर्णाचा पराक्रम पाहून इंद्राने अर्जुनासाठी कर्णाची कवच व कुंडले दान मागितली होती. या साऱ्या कारणांमुळें कर्णाचा मृत्यू तशा प्रकारे झाला.

युधिष्ठिराला नारदाकडून कर्णाबद्दलच्या या साऱ्या घटना जेव्हां समजल्या, त्यावर युधिष्ठिर म्हणाला, ''आपल्या मुलांसाठी आईवडील असंख्य कष्ट झेलतात, यातना सहन करतात. अपत्यसुखासाठी स्त्रिया नऊ महिने गर्भ धारण करुन प्रसववेदना सोसतात. परंतु या युद्धांत कितीतरी तरुणांना कष्टप्रद मृत्यू आला आहे ! त्यांना आयुष्यांत सुख उपभोगायला मिळाले नाही ! क्षत्रिय धर्माचा धिक्कार असो - राज्य मिळवण्यासाठी माझ्या हातून ही किती पापें घडली आहेत. मला हे राज्य मुळीच नको. अर्जुना, तू हे राज्य घेऊन टाक. मी जपतप व तीर्थयात्रा करीत राहीन.''

अर्जुनाला हे बोलणें अपमानास्पद वाटले. त्याला फार राग आला. त्याने युधिष्ठिराला सांगितले, ''महाराज, आपलं राज्य परत



मिळवण्यासाठीं आपण क्षत्रिय धर्माचं पालन केलं आहे. राज्य मिळवल्यानंतर आता भिक्षा मागण्याची गोष्ट अगदी विसंगत आहे. जर, भिक्षाच मागायची होती. तर इतक्या साऱ्या माणसांचा वध करायची काय आवश्यकता होती? यावेळेला जर आपण भिक्षा मागण्याची इच्छा दाखवलीत, तर सगळे लोक आपल्याला हंसणार नाहीत कां? नहुषाने सांगितलं होतं की दारिद्र्याची इच्छा कधीही धरूं नये. साऱ्या धर्माचं मूळ धन आहे. म्हणून आपण राज्याचा स्वीकार करावा. अश्वमेध यज्ञ करावा म्हणजे सर्व पापांतून आपण मुक्त होऊं शकाल.''

अर्जुनाला दुजोरा देत भीम म्हणाला, ''राज्यधर्माला नांवे ठेवण्यांत काय अर्थ आहे? शत्रूचा वध करण्याबाबतीत दयामाया कशासाठीं दाखवायची? हिंसा म्हणजे तरी काय? दुर्योधन वगैरेंचा प्रयत्नपूर्वक वध केला तो काय नंतर भिक्षा मागायची म्हणून केला होता कां? ही गोष्ट जर आम्हाला अगोदर माहीत असती, तर आम्ही तरी शस्त्रें कां उचलली असती? एवढ्या जणांचा वध आम्ही कशासाठी केला? आम्हीही जमेल तशी भिक्षा मागितली असती ! आपण तर असं बोलता आहात की आधी विहीर खणायची, आणि नंतर ते पाणी प्यायचं नाकारायचं ! आपल्याला आम्ही दोष देणे ठीक नाही. चूक आमचीच आहे. तुमचं ऐकून आम्ही बलशाली असूनही निर्बलांसारखंच वागलो. आपण आता हे सारं विसरुन जावं आणि राज्यकारभार सुरुं करावा.''



नकुल व सहदेवानेही याप्रकारें युधिष्ठिराला हितोपदेश केला. महर्षी व्यासांनी युधिष्ठिराला सांगितलं, ''जरी आमचा वध करायला एखादा वेदविद्यापारंगत आला तरी त्याचाही वध करता येतो. त्यामुळें आम्हाला ब्रम्हहत्येचा दोष लागत नाही!''

आपल्या भावांच्याबरोबर महर्षी व्यास आणि कृष्णाने युधिष्ठिराची समजूत घातली. तेव्हां युधिष्ठिराने आपली शंका व चिंता सोडून दिली, व तो राज्य करण्यास तयार झाला.

युधिष्ठिरासाठी रथ तयार झाला. त्याला सोळा शुभ्र घोडे जोडले गेले. पांढरे स्तंभ जोडले गेले. भीमाने लगाम हातांत घेतले व तो सारथ्याच्या जागी बसला. अर्जुनाने युधिष्ठिरासाठीं शुभ्र छत्र धरले. नकुल व सहदेवाने त्याच्यासाठी चामर हातात घेतले.



युधिष्ठिराच्या रथाच्या पाठोपाठ युयुत्सुचा रथ जाऊं लागला. त्यांच्यामागून कृष्ण आणि सात्यकी हे दोन घोडे जुंपलेल्या रथावर आरूढ झाले. या मिरवणुकीच्या पुढें गांधारी, धृतराष्ट्र, कौरव स्त्रिया, कुंती, द्रौपदी वेगवेगळ्या वाहनांत बसून विदुराबरोबर निघाले. त्यांच्यामागे चतुरंग सेना चालूं लागली. युद्धकैद्यांच्या स्तोतपठणाच्या घोषांत युधिष्ठिर हस्तिनापुरांत पोंचले. सारे नगर शृंगारले होते. पांढऱ्या शुभ्र फुलांची तोरणें आणि शुभ्र पताकांनी मार्ग सजवले होते.

जेव्हां युधिष्ठिराने मोठ्या थाटांत नगरांत प्रवेश केला, तेव्हां त्याला पाहायला हजारो स्त्रीपुरुष उभे होते. मार्गावरून युधिष्ठिर जाताना त्यांनी त्याचे मनःपूर्वक स्वागत केले. मंत्री व इतर प्रमुख नगरजनांनी येऊन सांगितलं, "राजेंद्रन ! आपण शत्रूला पराजित करुन, धर्मपूर्वक राज्य पुन्हां मिळवलंत हे आमचं सौभाग्य आहे." ब्राम्हणांनी युधिष्ठिराला आशिर्वाद दिला.

युधिष्ठिराने राजवाड्यांत प्रवेश करुन धौम्य आणि धृतराष्ट्र यांना वंदन केले, व देवतांची प्रार्थना केली. इतक्यांत कांहीतरी गडबड निर्माण झाली. दुर्योधनाचा मित्र चार्वाक युधिष्ठिराजवळ आला आणि म्हणाला, "तुझ्याच ज्ञातिबांधवांचा वध करून तू कशाचा उपभोग ध्यायला जातो आहेस? तूं असलं निकृष्ट जीवन जगला नाहीस तर काय होईल?"

चार्वाकाचे हे शब्द ऐकून युधिष्ठिराला वाईट वाटलं. ब्राम्हणांच्याकडे वळून तो म्हणाला, "माझ्यावर कृपा करा. आधीच मी चिंतेत बुडालो आहे. कृपा करून माझा धिक्कार करुं नका."

त्यावर ब्राम्हणांनी उत्तर दिलं, "राजन, चार्वाकाचा हा विचार म्हणजे आमचा विचार नव्हे. तो दुर्योधनाचा मित्र आहे. म्हणून असलं कांही तरी बरळतो आहे. आपण व आपले बंधू यांचे कांहीही अनिष्ट आत्ता होणार नाही." असं म्हणून त्या सर्व ब्राम्हणांनी मिळून चार्वाकाला ठार मारलं. युधिष्ठिराच्या मनाला शांतता मिळावी म्हणून कृष्णाने त्याला चार्वाकची कथा सांगितली. चार्वाक हा कृतयुगांत एक राक्षस होता. त्याने बदरीवनांत तपश्चर्या करून प्रत्यक्ष ब्रम्हदेवाला प्रसन्न करून घेतलं आणि ब्राम्हणाखेरीज इतर कुणाच्याही हातून मृत्यू येणार नाही असं वरदान ब्रम्हाकडून मागून घेतलं.



यानंतर युधिष्ठिराला विधिपूर्वक राज्याभिषेक झाला. धौम्य यांनी एक वेदिका तयार केली. त्यावर व्याघ्रचर्म (वाघाचे कातडें) पसरले. त्याच्यावर युधिष्ठिर आणि द्रौपदीला बसवले. नंतर धौम्य यांनी अग्नि प्रज्वलित केला व युधिष्ठिराकडून होम करवला. तेव्हां कृष्णाने एका शंखामार्फत युधिष्ठिरावर अभिषेक केला व त्याला 'तूं साऱ्या पृथ्वीवर राज्य कर' असा आशिर्वाद दिला. त्याला धृतराष्ट्र आणि जनतेने आपली संमती प्रकट केली. मंगल वाद्ये वाजूं लागली. प्रजाजनांनी आणलेले नजराणे व भेटी युधिष्ठिराने स्वीकारल्या आणि ब्राम्हणांचा सत्कार केला.

नंतर युधिष्ठिराने प्रजाजनांना सांगितलं, "महाराज धृतराष्ट्र आम्हाला देवतासमान पूज्य आहेत. आमच्याबद्दल ज्यांच्या मनांत विश्वास आहे, त्या सर्वांनी हे राज्य धृतराष्ट्र महाराजांचेच राज्य आहे असे समजावे. आम्ही केवळ त्यांची सेवा करण्यासाठी जिवंत आहोत. माझे आणि आपणा सर्वांचेदेखील तेच महाराज आहेत."

हे बोलून युधिष्ठिराने भीमाला युवराज म्हणून घोषित केले आणि विदुराला मंत्रीपद दिले. संजयची कोषाध्यक्ष व सल्लागार म्हणून नेमणूक झाली. नकुलवर कर्मचाऱ्यांचे वेतन ठरवणें व पाहाणें, अर्जुनावर राज्याचा योगक्षेम पाहाणे आणि धौम्य, देवता आणि ब्राम्हणांचे कार्य पाहाणें ही कामें देण्यांत आली. सहदेवावर युधिष्ठिराबरोबर सतत राहाण्याचे काम दिले गेले.

हे सगळे कार्यक्रम झाल्यानंतर युद्धांत मरण पावलेल्या लोकांची श्राद्धकर्मे केली गेली. भूदान दिले गेले. धृतराष्ट्रने आपल्या पुत्रांसाठी आणि युधिष्ठिराने द्रोण, कर्ण, धृष्टद्युम्न, घटोत्कच आणि अभिमन्यूसाठीं निरनिराळी श्राद्ध कर्मे केली. मृत व्यक्तींच्या स्मरणार्थ धर्मशाळा, तलाव, इ. बनवले गेले. त्यानंतर जनतेचं क्षेमकुशल लक्षांत घेऊन युधिष्ठिर राज्य करूं लागला.

(क्रमशः)





# जडीबुटीचे रहस्य

कांही वर्षांपूर्वी कपिशा नगरांत माधव नांवाचा एक धनिक रहात होता. त्याचे सासुरवाड पण चांगले श्रीमंत होते. त्याच्या मनांत आले असते तर जन्मभर आयते खाऊन रिकामटेकडेपणाने आयुष्य घालव शकला असता. पण माधव ऐतखाऊ बसणाऱ्यांतला नव्हता. त्याने तांब्याचे सोने कसे बनविता येईल ह्यावर संशोधन केले. आपली सगळी संपत्ती त्याने ह्यांत उधळून टाकली आणि तो गरीब झाला.

माधवची बायको शहाणी होती. तिच्या आधीच लक्षांत आले होते की आपला नवरा सोने बनविण्याच्या प्रयोगापायीं वेडा झाला आहे. आणि जे कांही पैसे शिल्लक आहेत. ते सुद्धां उधळून टाकणार आहे. तिला कळून चुकले होते की त्याचे हे वेड त्याचाच नव्हे, तर साऱ्या कुटुंबाचा नाश करेल. परिस्थिती इतकी वाईट होती की खायला प्यायला देखील पैसे शिल्लक रहाणार नाहीत. तिने ठरविले, की आपल्याकडून संसार बाचविण्यासाठी जेवढे काही करता येईल तेवढे करायचे. म्हणून ती जागरुकतेने, काटकसरीने घर चालवू लागली. पण तिचे सगळे श्रम वांया गेले. दुसऱ्यांच्या-सारखा तिचा नवरा व्यापार करत असता तर सुधारला तरी असता. पण सोन्यासाठी वेडे झालेल्या माधववर बायकोच्या समजाविण्याचा कांहीच परिणाम झाला नाही. उलट त्याची संपत्ती, कापूर जसा भराभर जळून संपतो तशी संपत होती. तो बायकोला सारखे हेच सांगायचा. ''ओरडूं नकोस. सोने कसे बनवायचे ते मला बरेचसे कळले आहे. आता थोडेच समजायचे राहिले आहे.'' माधवची अशी खात्री होती, की एकदा सोने बनवायला लागलो की खूप सोने बनवून आपण चांगले श्रीमंत होऊं. पण त्याला हे कुठे माहिती होते की सोने बनविणे हे एक मृगजळ आहे; त्याच्या मागे लागून आपला सर्वनाश होईल.

पंचवीस वर्षांपूर्वी चांदोबात प्रसिद्ध झालेली गोष्ट

माधवच्या बायकोची परिस्थिती फारच वाईट होत गेली. शेवटी आपल्या माहेरी जाऊन तिने वडिलांना आपली कर्मकहाणी सांगितली. यावर ते म्हणाले, ''मुली, घाबरुं नकोस मी जावईबापूंशी बोलतो. ते नक्की सुधारतील.''

सासऱ्यांच्या निमंत्रणावरुन माधव सासुर-वाडीसला गेला. ''काय तुमचे रसायन शास्त्राचे प्रयोग काय म्हणतात?'' सासरे म्हणाले.

माधवने उत्साहाने जे जे प्रयोग केले त्याचे वर्णन केले. ''अरेरे! तुम्ही महत्वाची गोष्ट विसरुन किती वर्षे वांया घालविलीत! तुम्ही आधीच माझा सल्ला घ्यायला हवा होता. मी पण ह्या शास्त्राचा अभ्यास केला आहे. पुष्कळशा गोष्टी जाणल्या आहेत. आता मी असे नाही म्हणणार की तुमचे काम सोपे आहे. तुम्हाला कितीतरी वर्षे चिकाटीने हे काम करावे लागेल. मी आता म्हातारा झालोय. कष्ट पण करुं शकत नाही. तेव्हां मी ह्या संबंधीचे जे गुपित जाणतो ते तुम्हाला सांगतो. मी सांगितल्याप्रमाणे केलेत तर तुमची इच्छा पूर्ण होईल.'' माधव भक्तिभावाने म्हणाला ''सासरेबुवा, तुमच्या सांगण्या प्रमाणे हे काम मी मनःपूर्वक करीन आणि यश मिळेपर्यन्त करीन.''

''तू आजपर्यन्त तांब्याचे सोने बनविण्या-च्या मागे लागला होतास ना? त्यासाठी लागणारे सर्व सामान, एक गोष्टीखेरीज माझ्याकडे आहे. ही गोष्ट आपल्या चिकाटीची परिक्षा घेऊन आणिक कष्ट देणारी आहे''



सासरे म्हणाले.

माधव म्हणाला ''सासरेबुवा, अशी कोणती गोष्ट आहे? सांगा ना !''

''तशी काही मोठी गोष्ट नाही. केळीच्या पानावर जी बारीक धूळ बसते ती बघितली आहेस? ती जवळ जवळ दीडशेर गोळा करायला लागते. ह्यांत अडचण अशी आहे की स्वतः आपल्या हातानी विशिष्ट मंत्र म्हणून लाविलेल्या झाडांवरची धूळच तुला घेता येईल. त्यासाठी म्हणायचा मंत्र मी तुला शिकवीन.''

''खूप झाडें लावायला लागतील ना?'' माधवने विचारले.

''ह्यांत काय शंका? कितीतरी एकर बाग लावावी लागेल. नाहीतर तुला दीडशेर धूळ कशी मिळणार?'' सासरे म्हणाले.

जमीन घेऊन केळीच्या बागा लावायला सासऱ्यांनी माधवला मदत केली. जमीन सखल



करुन केळीची रोपें लावण्यास खड्डे खोदले. माधवने सासऱ्यांनी सांगितल्या प्रमाणे मंत्र म्हणत रोपे लाविली. माधवच्या बायकोने देखील ह्या कामांत खूप लक्ष घातले. झाडें मोठी झाली. माधव दिवसभर बागेत हिंडत असे व पानांवरची धूळ गोळा करीत असे. दोन तीन दिवसांनी त्याचे वजन केले की त्याला सासऱ्यांचे शब्द आठवायचे, धूळ गोळा करायला खूप वेळ लागेल आणि त्यासाठी चिकाटीपण पाहिजे. माधवचे लक्ष केळ्यांच्या पानांवरील धुळीकडे असे. त्याची बायको रोज केळीची पाने, दांडे व फुले विकून पुष्कळ पैसे मिळवूं लागली. माधवचे लक्ष तिकडे अजिबात गेले नाही. तो आपला ह्याच विचारात असायचा की कधी दीड शेर धूळ जमेल व आपण तांब्याचे सोने बनवू.

तीन वर्षे उलटली पण माधवचे काम पूर्ण होत नव्हते. त्याची बायको बागेतून जो व्यापार करत होती तो भरभराटीला आला. गाड्या भरभरुन केळी आणि पानें दूरदूरच्या बाजारात विकायला जाऊं लागली त्या भागात ह्यांच्या बागेसारखी दुसरी एकही केळीची बाग नव्हती. आणखी दोन वर्षे गेली. आता माधवचे काम झाले. त्याने दीडशेरधूळ जमविली होती. ती धूळ सासऱ्यांच्या समोर ठेवून तो म्हणाला, ''ही घ्या. आपल्या सांगण्या प्रमाणे मी धूळ जमविली.''

''शाबास ! आता तुला पैशाची टंचाई



कधीच होणार नाही.'' हंसत सासरा म्हणाला. मग मुलीकडे वळून म्हणाला ''मुली! केळीच्या बागेंतून तू किती पैसे मिळवलेस?''

माधवची बायको एक थैली घेऊन आली व म्हणाली ''तुम्हीच हिशोब करा.''

माधवला हे कळेना की केळींच्या बागेंतून पैसे कसे मिळणार? तो आपला धुळीबद्दलच विचार करत होता. सासऱ्याने थैलीतले पैसे मोजले, आणि म्हणाला, ''वीस हजार रुपये आहेत.'' येवढे पैसे बघून माधव आश्चर्य चकित झाला.

''माझ्या सल्ल्याचा कसा फायदा झाला ना! तुला पाहिजे तर तू ह्या पैशांचे सोने घेऊ शकतोस. दागिने घडवूं शकतोस. जे पाहिजे ते विकत घेऊं शकतोस. हे मान्य करशील ना? की गेल्या पांच वर्षात मी तुझ्याकडून जी मेहनत करविली त्याचे हे फळ मिळाले. तूं जे प्रयोग केलेस त्यापेक्षा हा प्रयोग चांगला आहे ना?'' सासरा म्हणाला.

माधवचे डोळे उघडले. त्याला कळून चुकलें की तो जी धडपड करत होता ती फुकटची होती. तो हवेंतच वाळूचे किल्ले बांधत होता. हे असेच चालू राहिले असते तर कुटुंबाचा सर्वनाश अटळ होता. सासऱ्याने भले त्याला फसविले कां असेना, पण त्याचे चांगले डोळे उघडले, आणि त्याचा फायदाच झाला. कामधेनुसारखी केळीची बाग असल्यावर त्याला पैशाला काय कमी? त्यांनी आपल्या सासऱ्यांची क्षमा मागितली आणि त्यांचे आभार मानले. त्यानंतर तो आपल्या बागेची मशागत, देखभाल करीत सुखाने राहूं लागला.

परिश्रमाच्या मिळकतीत जी गोडी आहे, ती दुसऱ्या कशांत मिळणार ? अशक्यास शक्य करण्याच्या मागे धांवणे वेडेपणाचे नव्हे कां? मनुष्याचे ध्येय हे एक असू दे, पण ते योग्य असेल तरच ते उत्तम ध्येय समजले जाईल. संशोधन जरुर करावे पण होणारा फायदा मर्यादित नसावा. त्या संशोधनाने मानवजातीचे कल्याण व्हावे असेच ध्येय हवे. ह्यामुळे लोकांपुढे एक आदर्श निर्माण होईल.





# शूद्र

पवित्र गोदावरी नदीच्या तीरावर एका साधूमहाराजांनी एक छोटीशी झोपडी बांधली. आणि ते तिथे रहायला लागले. आजबाजूच्या गांवातील लोकांना त्यांच्या विषयी खूप आदर होता, मनामधें भक्ती होती. येवढे थोर साधुमहाराज आपल्या जवळच रहातात याचा त्यांना फार आनंद होई. त्यांच्या गरजा लोक नेहमी तत्परतेने पुऱ्या करीत असत.

साधू महाराजांना असे वाटायला लागले की लोक मला मान देतात तेव्हां मी म्हणेन तीच पूर्व दिशा. ते पहाटेच उठून रोजची सकाळची आन्हिकें संपली की नदीवर स्नानास जात असत. स्नान झाल्यावर नदी जवळच असलेल्या एका खडकावर बसून ते ध्यान करत. त्यांनी सर्व लोकांना अगोदर सांगून ठेवले होते की त्यावेळेस तिथे येऊन कोणीही त्यांच्या ध्यानांत व्यत्यय आणूं नये.

लोक त्यांचे सांगणे अमलात आणत असत. ध्यानाच्या वेळीं कोणी देखील खडकाच्या आसपास फिरकत नसत. आंघोळ करायचीच असेल तर ते खडकापासून दूर जाऊन आंघोळ करत.

एक दिवस साधूमहाराज यथासांग अंघोळ करुन. खडकावर ध्यानस्थ जाले. तेवढ्यांत त्यांना वाटले की जवळच कोणीतरी नदीत उडी मारली. म्हणून पटकन डोळे उघडले. तर असे दिसले की एक मुलगा पाण्यांत जोरांत हातपाय हलवत डुबक्या मारतो आहे. त्यामुळें साधुमहाराजांच्या अंगावर पाण्याचे थेंब उडायला लागले. ते संतापून ओरडले, ''इतका माज? दिसत नाही मी ध्यान करतोय ते?''

नदीत पोहणाऱ्या मुलाचे तिकडे लक्षच नव्हते. तो पोहण्यांत, नदीत डुबक्या मारण्यांत अगदी गर्क होता. खरं म्हटले तर डुबक्या मारण्यांत होणाऱ्या पाण्याच्या आवाजामुळे, साधुमहाराजांचे बोलणे मुलाला नीट ऐकूच आले नाही.

आंघोळ करुन मुलगा जेंव्हा कांठावर आला तेंव्हा साधूमहाराजांनी रागाने त्याला एक थोबाडीत दिली. येवढ्यांत एक माणूस पळत त्यांच्याजवळ आला व सांगू लागला की ''महाराज, क्षमा करा. हा माझ्या बायकोचा भाऊ आहे. दुसऱ्या गांवचा आहे. ह्याला आपल्या तपस्येविषयी कांही माहिती नाही. हा कुठे सांपडेना, म्हणून मी पळत इकडे आलो, कारण ह्याला नदीत डुंबायला फार आवडते. माझा अंदाज बरोबर निघाला. हा तर इथेच आहे. मनातल्या मनांत काळजीपण होती की हा आपल्या ध्यानांत व्यत्यय तर नाही ना आणणार! यायला उशीर लागला तरी कृपया क्षमा करा.''

''हा तुझा मेव्हणा आहे तर !'' असे म्हणत साधुमहाराज शांत झाले. त्यांच्या लक्षांत आले की हा माणूस शूद्र आहे, तेव्हां मुलगापण शूद्रच असणार. म्हणून महाराज नदीवर जाऊन परत एकदा आंघोळ करुन आले.

मुलगा हे सगळे लक्ष देऊन बघत होता. त्याने पुन्हां नदीत डुबी मारली व आंघोळ करुं लागला. बाहेर आल्यावर मेव्हण्याने त्याला विचारले ''तू कशाला पुन्हा आंघोळ केलीस?''

मुलाने उत्तर दिले ''स्वामीजींनी एकदा आंघोळ करुन भस्म लावल्यावर परत कशाला आंघोळ केली?'' मेव्हण्याने मुलाची समजूत काढत म्हटले ''अरे, तू विसरलास कां की आपण शूद्र आहोत. तुला थप्पड मारली तेव्हां ते तुला शिवले ना ! म्हणून त्यांनी परत आंघोळ केली.''

मुलगा म्हणाला, ''मला थप्पड मारताना हे तर अगदी राक्षसासारखेच दिसत होते. राक्षस सुद्धा शूद्रच नाही का?''

मुलाचे बोलणे ऐकून महाराजांना जणूं कांही त्यांनाच कोणीतरी थप्पड मारली आहे असे वाटले. क्षणभर ते खजिल झाले. मुलाजवळ येऊन म्हणाले ''मुला, तू बरोबर बोललास. मी फक्त राक्षसच झालो नव्हतो, तर राग व गर्वाचा पगडा पण माझ्यावर होता. शूद्र तू नाहीस, मी आहे.'' असे बोलून साधूमहाराजांनी प्रेमाने मुलाला जवळ घेतले.



# कच्छचा भूकंप

२६ जानेवारी या दिवशी सारा भारत देश प्रजासत्ताक दिन साजरा करीत असतो. देशांतले सर्व नागरिक या सोहळ्याकडे डोळे लावून असतात. यंदाही प्रत्येक राज्य, शहर, गांवं व जिल्हा कार्यालय नेहमीप्रमाणे या सोहळ्यासाठी तयार झाले. हजारों, लाखों लोकांनी आपली देशनिष्ठा, अभिमान व आनंद व्यक्त करण्यासाठीं त्यांच्या परिसरांतले समारंभ उत्साहाने साजरे केले. किंवा टीव्हीवर दिल्लीचा कार्यक्रम पाहण्यांत ते गर्क झाले. देशांतले प्रत्येक राज्य आनंदात होते गुजरातखेरीज! गुजरातेंत मात्र गेल्या पांच हजार वर्षांत कधी झाला नाही, असा दुर्दैवाचा एक प्रचंड आघात झाला!

प्रजासत्ताक दिनाच्या समारंभापूर्वी कांही तास, भूकंपामुळें अनेक शहरें व गांवे उध्वस्त झाली, असंख्य निष्पाप जीव मृत्यूमुखीं पडले - त्यांच्या संख्येची मोजदाद हा लेख लिहीत असताना पूर्ण झालेली नव्हती. लाखों लोक बेघर झाले. त्यांची घरें - लहान असोत वा मोठी - पत्त्यांच्या बंगल्याप्रमाणें क्षणार्धांत कोसळली. हजारों जीव त्यांतून निसटले किंवा जखमी अवस्थेंत वांचवले गेले. इतर हजारों बेपत्ता होते! कांही हजार बालकें अनाथ झाली आहेत, त्यांचा विचार तर मन गोठवतो!

या संकटानंतर, तीन दिवस उलटल्यावर, जेव्हां सविस्तर बातमी आली तेव्हां भुज आणि अंजार, रापार नि भाचाऊ सारखी कच्छमधली इतर गांवे, अहमदाबाद ही राजधानी आणि त्याच्या आसपासची बरीच गांवे, अहमदाबाद ही राजधानी आणि त्याच्या आसपासची बरीच गांवे यांच्यामधें सर्वांत जास्त हानी झालेली आहे. भूकंपाचा केंद्रबिंदू कच्छचे रण हा अफाट दलदलीचा प्रदेश होता. रणाच्या दक्षिणेस भूकंपाचे हादरे बसूं लागले.

द्वारकेच्या मंदिराचे खूप नुकसान झाले आहे. भुजचे ऐतिहासिक संग्रहालय उध्वस्त झाले आहे. अनेक पुरातन स्मारकांची कांहीही निशाणी राहिलेली नाही. मदतीचा प्रचंड ओघ येतो आहे, आणि पुनर्वसनाचे प्रयत्न युद्धपातळीवर सुरुं आहेत. गुजरातच्या दिशेने स्वयंसेवक, औषधें, अत्यावश्यक वस्तू व पैशाची मदत अखंड चालूं आहे.

वादळें, चक्रीवादळें, झंझावात व भूकंप हे मानवजातीचा विचार करीत नसतात. शास्त्रीय व नवी औद्योगिक उपकरणें आपल्याला वर उल्लेख केलेल्या नैसर्गिक संकटांची सूचना तरी देऊं शकतात. परंतु भूकंपाचे आगाऊ निदान करता येत नाही. म्हणून नुकसानीचे प्रमाण अफाट असते.

या दुर्दैवी संकटात सांपडलेल्या आपल्या बांधवांच्या मदतीला आपण जाऊं या, आणि आपल्याला जमेल ती जास्तीतजास्त मदत आपण त्यांना करूं या. याचा एक मार्ग म्हणजे पंतप्रधानांच्या रिलीफ फंडाला सहाय्य करावे. (C/o. P.M.'s Office, New Delhi 110 011) आपल्या राष्ट्रावर आलेल्या या मोठ्या आपत्तीच्या वेळीं आपण मदत करुन आपल्या पंतप्रधानांचे हात मजबूत करूं या !

- प्रकाशक

वेताळ कथा

# मदतीचा आनंद

निश्चयाचा पक्का विक्रमार्क राजा पुन्हां झाडाजवळ गेला. झाडावरचे शव त्याने खाली उतरवले आणि आपल्या खांद्यावर घेतले. निमूटपणे तो स्मशानाकडे जाऊं लागला. तेव्हां प्रेतांत लपलेला वेताळ त्याला म्हणाला, "राजन्, मध्यरात्र झालेली आहे. त्यांतून स्मशान जवळच आहे. इथें भुतेंप्रेतें स्वच्छंदपणे हिंडत रहातात. कोणत्याही क्षणीं ते तुझा घात करूं शकतील. आश्चर्याची गोष्ट म्हणजे तरीदेखील तू निर्भयपणें या भयंकर जागी फिरतो आहेस. जसं कांही कुणीही तुझं कांहीही बिघडवूं शकणार नाही. मला हे समजत नाही की कुणालातरी मदत करण्याच्या उद्देशाने कां तू हा धोका पत्करतो आहेस? कां आपल्या प्राणांची बाजी लावतो आहेस? तूं जरी कुणाला मदत केलीस तरी तो मनुष्य संतुष्ट होईल याची काय खात्री?



त्याला मदत करण्यास तूं जरी उत्सुक असलास तरी यामुळें समस्येचे समाधान होणार नाही, आणि तुझे श्रमदेखील वायां जाऊं शकतील. उदाहरण म्हणून मी तुला शंभूची गोष्ट सांगतो. तो फारच सुशील आणि परोपकारी होता. तुझा थकवा दूर होण्यासाठी लक्षपूर्वक ही गोष्ट एक." आणि वेताळ शंभूची गोष्ट सांगू लागला.

"शंभू श्रीमंत नव्हता पण खायची प्यायची ददात नव्हती. तो लिहावाचायला शिकलेला नव्हता; त्याला आपल्या हाताने बाहुल्या बनवण्याची इच्छा होती. गाणीं म्हणण्याची इच्छा होती. त्याची ही मनोव्यथा पाहून एकदा त्याचे आजोबा त्याला म्हणाले, "अरे शंभू, जगांत मोठमोठाली कामें करण्यापेक्षां दुसऱ्याचे भले करणें जास्त श्रेष्ठ आहे. तू फार चांगल्या स्वभावाचा आहेस. तुझं मन स्वच्छ आहे. तूं सद्गुणी आहेस, हेंच तुझे भाग्य आहे. काळजी करण्याचे सोड आणि संतुष्ट राहा !"

"मी चांगला आहे याचा काय पुरावा आहे?" शंभूने विचारले.

आजोबांनी हंसून म्हटले, "चांगुलपणाचा अर्थ आहे निःस्वार्थी असणें, द्वेष, घृणा, ईर्षा न बाळगणें! इतरांचे मोठेपण पाहून तुला मत्सर वाटत नाही, उलट तुला आनंद होतो. दुसऱ्यांचे हित करताना आपले काम बाजूला ठेवण्याची तुझी प्रवृत्ती आहे. असे कितीतरी चांगले गुण तुझ्यामधे भरलेले आहेत.

शेजारचा राम जेव्हां देवाच्या पायावर डोकें ठेवतो, तेव्हां त्याची प्रार्थना असेत की घरांतल्या सर्वांची प्रकृती ठीक राहो, ताईचे लग्न ठरो, दादाला एखादी चांगली नोकरी मिळो! तो कधी देवाजवळ स्वतःसाठी कांही मागत नाही."

आजोबांना उत्तर देत शंभू म्हणाला, "आजोबा, आपल्याच घरांतल्या लोकांचे कल्याण चिंतणें, यांत कसला आलाय मोठेपणा? माझ्या दृष्टीने तर हा निव्वळ स्वार्थच आहे. याच्यामुळें घरांतल्या लोकांखेरीज बाहेरच्या लोकांचा कोणता फायदा होतो आहे? जर एखादा कलाकार असता तर तो दुसऱ्यांना आनंद देतो, त्यांच्या हृदयांत उत्साह भरूं शकतो!"

"दुसऱ्यांना उत्साहित करण्यासाठी, त्यांनी आनंदी होण्यासाठीं तूं कलाकार असलं पाहिजेस, असंच नाही कांही ! तूं दुसऱ्यांचं भलं कर भलं!" आजोबांनी त्याला प्रत्युत्तर केलें.

शंभूच्या मनावर आजोबांची ही गोष्ट ठसली. तेव्हांपासून जमेल तसा तो दुसऱ्यांचे हित पाहूं लागला. पण त्याची काळजी कांही दूर झाली नाही.

एक दिवस त्याच्या घरीं त्याचा एक नातलग आला. शंभूच्या सालस स्वभावाबद्दल त्याने खूप ऐकलं होतं. शंभूला आपला जांवई करून घेण्याच्या हेतूने तो इथें आला होता. त्याची मुलगी पार्वती सुंदर, विनम्र व बुद्धिमान होती. अशी सुशील गुणवती मुलगी या घरची सून होणार या कल्पनेने शंभूच्या घरांतल्या सर्व मंडळींना खूप आनंद झाला. परंतु शंभूने मात्र सध्यां आपला लग्न करण्याचा विचारच नाही असं साफ सांगून टाकलं.



पार्वतीच्या पित्याला आश्चर्य वाटले. त्याने शंभूला विचारले, "तुला कां लग्न करायचं नाही हे तरी सांग!" शंभूने उत्तर दिले, "मी अगदी निरुपयोगी आहे. मला कोणतीही विद्या येत नाही. कोणत्याही कामाला मी लायक नाही असं मला नेहमी वाटतं."

"शेती करतो आहेस की ! यापेक्षां आणखी काय हवं?" पार्वतीच्या पित्याने त्याला समजावले.

"पण त्यांत मी माझी अक्कल थोडीच चालवतो? बाबा जे सांगतात, ते फक्त मी ऐकतो, त्यानुसार काम करतो! स्वतः होऊन कांही करण्याची योग्यता माझ्यांत खरंच नाही." शंभूने त्यांना सांगितले.

"असं मानणं हाच तुझा मोठेपणा आहे. शेती करणे ही गोष्ट कांही कुणी एका दिवसांत शिकत नाही कांही! अनुभव मिळत गेला की तू चांगल्यापैकी शेतकरी म्हणवला जाशील, मग त्यादिवशीं तुला खूप आनंद होईल." पार्वतीचा पिता म्हणाला "आनंद आणि मला? मला खूष होताच येत नाही. आणि जेव्हां मी स्वतः खूष होऊं शकत नाही, तेव्हां लग्न करुन आपल्या पत्नीला मी कसा खूष ठेवूं शकेन?" शंभूने विचारले.

पार्वतीचा पिता गप्प बसला. दोन दिवस तिथेंच राहून तो शंभूची दिनचर्या लक्षपूर्वक पाहात होता. त्या गांवात त्याची कांही किरकोळ कामें होती, ती पुरी करुन तो जेव्हां परत जायला निघाला, तेव्हां तो शंभूला म्हणाला, "शंभू, तू माझ्याबरोबर आमच्या गांवी चल. तिथें मी तुला संतुष्ट राहाण्याची वाट दाखवीन."

शंभूने ही कल्पना मान्य केली. त्याच्याही मनांत एकदा पार्वतीला पाहाण्याची उत्सुकता होतीच. तो पार्वतीच्या पित्याबरोबर त्यांच्या गांवी गेला. पार्वतीचा उत्साही व सदाप्रसन्न राहाण्याचा स्वभाव होता. त्यामुळें तिचे सौंदर्य जास्तच खुलून दिसते होते.

तिला पाहून शंभूच्या मनांतही आपण नेहमी



आनंदी, तृप्त असले पाहिजे अशी इच्छा निर्माण झाली. घरीं पोंचल्यानंतर जरा विश्रांति झाली. थकवा कमी झाल्यानंतर पार्वतीचा पिता गांवात जायला निघाला. तेव्हां तो शंभूला म्हणाला, "तुझ्या गांवातून मी आमच्या गांवातल्या कांहीजणांसाठी चांगल्या बातम्या घेऊन आलो आहे. या बातम्या ऐकून त्यांना जरूर आनंद होईल. इतरांनी आनंदी झालेले तुला आवडते ना? तर मग तूही चल माझ्याबरोबर."

पार्वतीनेही त्यांच्याबरोबर जाण्याचा हट्ट केला. तिघेही एकत्र बाहेर पडले. हे पाहून शंभू मनोमन फारच खूष झाला होता. पण त्याचा हा आनंद फार वेळ टिकला नाही.

ते त्यांच्या रस्त्यावरुन चळले तेवढ्यांत त्यांना एक आठ वर्षांचा मुलगा दिसला. तो फारच उदास व दुःखी दिसत होता.

पार्वतीने त्याची दीनवाणी मुद्रा पाहून विचारले, "काय रे झालं लहू? इतका कां खट्टू झाला आहेस तूं?"



"माझी रंगीबेरंगी गोटी झाडीत पडली. मी शोधायचा प्रयत्न केला तर सांपाचा फुत्कार असावा असा फुसफुस आवाज आला. मला वाटलं की तिथें खराखुरा सांप असेल." लल्लूने घाबरत सांगितलं.

"तूं अगदी भित्रा आहेस रे! अरे, वाऱ्यामुळें जेव्हां एक पान दुसऱ्या पानावर घासतं, तेव्हां तसा आवाज येतो बरं !" नंतर ती पित्याकडे वळून म्हणाली, "बाबा, आधी गोटी शोधून काढूं या नि नंतर पुढें जाऊं या !"

"तुझी ही संवय कधी सुटायची नाही" कौतुकाने म्हणत पार्वतीचा पिता पुढें चालूं लागला.

शंभू त्याच्याबरोबर एका गृहस्थाच्या घरीं गेला. पार्वतीच्या पित्याने त्या गृहस्थाला सांगितलं, "तूं तर मोठा नशीबवान आहेस. तुला सारखी तुझ्या लेकीच्या लग्नाची काळजी वाटत होती ना? चमन या लग्नाला तयार झाला आहे. जे कांही मानपान, खर्च, तूं लग्नांत करूं शकशील, ते त्याला कबूल आहे!"

त्या गृहस्थाने खुष होऊन म्हटले, "ही आनंदाची बातमी तू आणली आहेस तर! पण गणपतीचे काय म्हणणे होते?" "तो वेडा पैशाच्यामागे धावणारा आहे. मला नाही वाटत हा संबंध तो कबूल करेल म्हणून !" पार्वतीच्या पित्याने उत्तर दिलं.

"ठीक आहे, पोरीच्या नशिबांत जे लिहीलंय, तेच होणार" त्या गृहस्थाने त्यावर म्हटलं.

तिथून ते दोघे निघाले आणि आणखी एका गृहस्थाच्या घरीं गेले. तिथें एका तरुणाला पाहून पार्वतीच्या पित्याने त्याला विचारलं, "तू म्हणत होतास ना, की या जन्मांत मला कधी नोकरी मिळेल कां? या शंभूच्या गांवचे जमीनदार आहेत. त्यांच्या दुसऱ्या बायकोच्या मुलांना शिकवायचे काम आहे. त्याबद्दल ते दरमहा दोनशे रुपये द्यायला तयार आहेत. तुझी कामाची पद्धत त्यांनी नीट पारखून पाहिली कीं त्यानंतर ते तुला कचेरींत देखील चांगली नोकरी देतील."

"मी तर ऐकलं होतं की जमीनदाराच्या पहिल्या बायकोचा वरचष्मा कचेरींत बराच आहे म्हणे! तिच्या मुलांना शिकवायचं काम असतं तर नंतर जास्त चांगली नोकरी मिळण्याची शक्यता आहे. तिथें नाही कां जमायचं कांही?" त्या तरुणाने आतुरतेने विचारलं.

"त्यांना तर संस्कृत पंडित हवा आहे. तुला तर संस्कृत येत नाही, होय की नाही?" पार्वतीच्या पित्याने विचारलं.

"ठीक आहे, माझ्या कपाळावर जी रेखा लिहीली असेल, तेच मला मिळेल." तरुणाने त्यांना सांगितलं. हे दोघेजण घरीं परत जात होते तेव्हां वाटेंत त्याच जागी पार्वती त्यांना भेटली. तिने लल्लूची गोटी झुडुपांतून शोधून काढली होती. पार्वती पित्याला म्हणाली, "बाबा, मी लल्लूला गोटी काढून दिली. पण हो, त्यासाठी बराच वेळ शोधाशोध करावी लागली हं!" ती खूपच खुषींत दिसत होती.



घरीं पोंचल्यानंतर पार्वतीच्या पित्याने शंभूला विचारलं, "पार्वतीच्या खुषीचं कारण समजलं की नाही तुला?"

शंभूने उत्तर दिले, "त्यांत न समजण्यासारखं काय आहे? गोटी मिळाली म्हणून लल्लूला खूप आनंद झाला. पार्वतीने कष्ट करून, चिकाटीने गोटी शोधून काढली, त्यामुळें ती स्वतःही खूष झाली. पण तुम्ही लग्नाच्या ठरवाठरवीबद्दल ज्या गृहस्थांशी बोलत होतात, त्यांच्याबद्दल मात्र मला वाटलं की ते फारसे खूष दिसले नाहीत. त्याचप्रमाणें तो दुसरा तरुणदेखील संतुष्ट वाटला नाही. कारण जमीनदाराच्या पहिल्या पत्नीच्या मुलांना शिकवण्याची संधी त्याला मिळूं शकणार नव्हती."

एक प्रदीर्घ श्वास घेऊन पार्वतीचा पिता म्हणाला, "आपण सगळेच परोपकार करूं शकतो. पण त्याच्याबरोबर कुणाला संतुष्ट करणें हे आपल्या हातांत थोडंच असतं?"

वेताळाने ही गोष्ट राजाला सांगितली आणि पुढें म्हटलं, "राजन्, मला शंका आहे की परोपकार आणि संतुष्ट होणे याबाबतीत शंभूला सांगून पार्वतीच्या पित्याने मोठ्या चतुराईने त्याला समाधानी करण्याचा प्रयत्न केला. पण मला वाटतं की त्याला हे कांही समजलं नाही. बहुधा हे त्याच्या कुवतीच्या बाहेर असावं. माझ्या या शंकेचे उत्तर तुला माहीत असूनही तू मौन पाळलेस, तर तुझ्या डोक्याचे तुकडेतुकडे होतील.

विक्रमार्क म्हणाला, "पार्वतीच्या पित्याला त्या वेगवेगळ्या व्यक्तींचा वेगवेगळा स्वभाव माहीत होता. त्या गृहस्थाला आपल्या मुलीचे लग्न ठरेल की नाही याबद्दल शंका होती. पण जेव्हां स्थळ नक्की ठरते आहे ही बातमी कळली, तेव्हां तो म्हणूं लागला की जे दुसरे यापेक्षांही चांगले स्थळ होते, तिथें बोलणीं जमूं शकली नसती कां म्हणून ! त्याचप्रमाणे, ज्याला नोकरी मिळण्याची मुळीच शक्यता नव्हती, त्याला एक नोकरी मिळाल्यावर लगेच वाटूं लागलं की यापेक्षां जास्त चांगली चांगली नोकरी मिळायला हवी होती! केवळ दुसऱ्यांना समाधान देण्यासाठींच फक्त परोपकार केला पाहिजे असं नाही, पण त्यांना मदत करताना परोपकार करायला हवा. कुणालाही मदत करणें सहज शक्य होते, पण कुणाला समाधान देणें, संतुष्ट करणें हे सोपे काम नसते. पार्वतीच्या पित्याला हे व्यावहारिक सत्य ठाऊक होतं. त्यामुळें त्याच्या बोलण्यांत फक्त वाक्चातुर्य आहे. किंवा त्याला ही समस्या किती खोल आहे ते समजलं नसावं, असं तुझं म्हणणं संपूर्णपणें निराधार आहे."

राजाचे मौनभंग झाल्यामुळें वेताळ शवासहित अदृश्य झाला व पुन्हां झाडावर जाऊन बसला.





"माझी रंगीबेरंगी गोटी झाडीत पडली. मी शोधायचा प्रयत्न केला तर सांपाचा फुत्कार असावा असा फुसफुस आवाज आला. मला वाटलं की तिथें खराखुरा सांप असेल." लल्लूने घाबरत सांगितलं.

"तूं अगदी भित्रा आहेस रे! अरे, वाऱ्यामुळें जेव्हां एक पान दुसऱ्या पानावर घासतं, तेव्हां तसा आवाज येतो बरं !" नंतर ती पित्याकडे वळून म्हणाली, "बाबा, आधी गोटी शोधून काढूं या नि नंतर पुढें जाऊं या !"

"तुझी ही संवय कधी सुटायची नाही" कौतुकाने म्हणत पार्वतीचा पिता पुढें चालूं लागला.

शंभू त्याच्याबरोबर एका गृहस्थाच्या घरीं गेला. पार्वतीच्या पित्याने त्या गृहस्थाला सांगितलं, "तूं तर मोठा नशीबवान आहेस. तुला सारखी तुझ्या लेकीच्या लग्नाची काळजी वाटत होती ना? चमन या लग्नाला तयार झाला आहे. जे कांही मानपान, खर्च, तूं लग्नांत करूं शकशील, ते त्याला कबूल आहे !"

त्या गृहस्थाने खुष होऊन म्हटले, "ही आनंदाची बातमी तू आणली आहेस तर! पण गणपतीचे काय म्हणणे होते?" "तो वेडा पैशाच्यामागे धावणारा आहे. मला नाही वाटत हा संबंध तो कबूल करेल म्हणून !" पार्वतीच्या पित्याने उत्तर दिलं.

"ठीक आहे, पोरीच्या नशिबांत जे लिहीलंय, तेच होणार" त्या गृहस्थाने त्यावर म्हटलं.

तिथून ते दोघे निघाले आणि आणखी एका गृहस्थाच्या घरीं गेले. तिथें एका तरुणाला पाहून पार्वतीच्या पित्याने त्याला विचारलं, "तू म्हणत होतास ना, की या जन्मांत मला कधी नोकरी मिळेल कां? या शंभूच्या गांवचे जमीनदार आहेत. त्यांच्या दुसऱ्या बायकोच्या मुलांना शिकवायचे काम आहे. त्याबद्दल ते दरमहा दोनशे रुपये द्यायला तयार आहेत. तुझी कामाची पद्धत त्यांनी नीट पारखून पाहिली कीं त्यानंतर ते तुला कचेरींत देखील चांगली नोकरी देतील."

"मी तर ऐकलं होतं की जमीनदाराच्या पहिल्या बायकोचा वरचष्मा कचेरींत बराच आहे म्हणे! तिच्या मुलांना शिकवायचं काम असतं तर नंतर जास्त चांगली नोकरी मिळण्याची शक्यता आहे. तिथें नाही कां जमायचं कांही?" त्या तरुणाने आतुरतेने विचारलं.

"त्यांना तर संस्कृत पंडित हवा आहे. तुला तर संस्कृत येत नाही, होय की नाही?" पार्वतीच्या पित्याने विचारलं.

"ठीक आहे, माझ्या कपाळावर जी रेखा लिहीली असेल, तेच मला मिळेल." तरुणाने त्यांना सांगितलं. हे दोघेजण घरीं परत जात होते तेव्हां वाटेंत त्याच जागी पार्वती त्यांना भेटली. तिने लल्लूची गोटी झुडुपांतून शोधून काढली होती. पार्वती पित्याला म्हणाली, "बाबा, मी लल्लूला गोटी काढून दिली. पण हो, त्यासाठी बराच वेळ शोधाशोध करावी लागली हं!" ती खूपच खुषींत दिसत होती.



घरीं पोंचल्यानंतर पार्वतीच्या पित्याने शंभूला विचारलं, "पार्वतीच्या खुषीचं कारण समजलं की नाही तुला?"

शंभूने उत्तर दिले, "त्यांत न समजण्यासारखं काय आहे? गोटी मिळाली म्हणून लल्लूला खूप आनंद झाला. पार्वतीने कष्ट करून, चिकाटीने गोटी शोधून काढली, त्यामुळें ती स्वतःही खुष झाली. पण तुम्ही लग्नाच्या ठरवाठरवीबद्दल ज्या गृहस्थांशी बोलत होतात, त्यांच्याबद्दल मात्र मला वाटलं की ते फारसे खुष दिसले नाहीत. त्याचप्रमाणें तो दुसरा तरुणदेखील संतुष्ट वाटला नाही. कारण जमीनदाराच्या पहिल्या पत्नीच्या मुलांना शिकवण्याची संधी त्याला मिळूं शकणार नव्हती."

एक प्रदीर्घ श्वास घेऊन पार्वतीचा पिता म्हणाला, "आपण सगळेच परोपकार करूं शकतो. पण त्याच्याबरोबर कुणाला संतुष्ट करणें हे आपल्या हातांत थोडंच असतं?"

वेताळाने ही गोष्ट राजाला सांगितली आणि पुढें म्हटलं, "राजन्, मला शंका आहे की परोपकार आणि संतुष्ट होणे याबाबतीत शंभूला सांगून पार्वतीच्या पित्याने मोठ्या चतुराईने त्याला समाधानी करण्याचा प्रयत्न केला. पण मला वाटतं की त्याला हे कांही समजलं नाही. बहुधा हे त्याच्या कुवतीच्या बाहेर असावं. माझ्या या शंकेचे उत्तर तुला माहीत असूनही तू मौन पाळलेस, तर तुझ्या डोक्याचे तुकडेतुकडे होतील.

विक्रमार्क म्हणाला, "पार्वतीच्या पित्याला त्या वेगवेगळ्या व्यक्तींचा वेगवेगळा स्वभाव माहीत होता. त्या गृहस्थाला आपल्या मुलीचे लग्न ठरेल की नाही याबद्दल शंका होती. पण जेव्हां स्थळ नक्की ठरते आहे ही बातमी कळली, तेव्हां तो म्हणूं लागला की जे दुसरे यापेक्षांही चांगले स्थळ होते, तिथें बोलणीं जमूं शकली नसती कां म्हणून ! त्याचप्रमाणे, ज्याला नोकरी मिळण्याची मुळीच शक्यता नव्हती, त्याला एक नोकरी मिळाल्यावर लगेच वाटूं लागलं की यापेक्षां जास्त चांगली चांगली नोकरी मिळायला हवी होती! केवळ दुसऱ्यांना समाधान देण्यासाठींच फक्त परोपकार केला पाहिजे असं नाही, पण त्यांना मदत करताना परोपकार करायला हवा. कुणालाही मदत करणें सहज शक्य होते, पण कुणाला समाधान देणें, संतुष्ट करणें हे सोपे काम नसते. पार्वतीच्या पित्याला हे व्यावहारिक सत्य ठाऊक होतं. त्यामुळें त्याच्या बोलण्यांत फक्त वाक्चातुर्य आहे, किंवा त्याला ही समस्या किती खोल आहे ते समजलं नसावं, असं तुझं म्हणणं संपूर्णपणें निराधार आहे."

राजाचे मौनभंग झाल्यामुळें वेताळ शवासहित अदृश्य झाला व पुन्हां झाडावर जाऊन बसला.









## या महिन्यांत जन्मलेली विशेष व्यक्ती



### राममनोहर लोहिया

स्थळ-मद्रास सन १९३३. एक तरुण जर्मनीहून डॉक्टरेट मिळवून मद्रासला परतला. उच्च शिक्षणासाठी परदेशी जाण्यासाठी त्याच्या नातेवाईकांनी त्याला आर्थिक मदत केली होती. आता हिंदुस्तानांत परत आल्यानंतर आपल्या गांवी जाण्याइतके पुरेसे पैसे त्याच्याकडे नव्हते. तो अडचणींत सांपडला होता. अचानक त्याला एक कल्पना सुचली. 'द हिंदू' या सुप्रसिद्ध दैनिकाच्या कचेरींत तो गेला. 'मी जर एक लेख दिला तर मला तुम्ही पैसे द्याल?'' त्याने विचारले. संपादकांनी मान्य केले आणि लगोलग त्याने एक राजकीय लेख लिहीला. त्या लेखाचं मानधन त्याला मिळालं आणि त्याने गांवी जायचं आगगाडीचं तिकीट काढलं.

हा धडाडीचा व कल्पक तरुण म्हणजे राममनोहर लोहिया। पुढें हे एक महान समाजवादी व मानवतावादी विचारवंत, बुद्धिवंत आणि राजकारणी म्हणून प्रसिद्ध झाले.

संयुक्त प्रांतातल्या अकबरपूर या खेड्यांत लोहियाजींचा जन्म २३ मार्च १९१० रोजीं झाला. केवळ दहा वर्षांचे असतानाच त्यांच्या राजकीय कार्यास सुरवात झाली. त्यांनी स्वदेशीचा प्रचार व प्रसार करण्यास प्रारंभ केला. पुढें विदेशी कपड्यांची होळी करणें, खादी वापरणें, आणि नागरी कायद्यांचा भंग करणें, असल्या कामांत ते इतरांनाही प्रोत्साहित करूं लागले. गांधीजींच्या सत्याग्रहाच्या चळवळींत लोहियाजी सामील झाले. परंतु ते अंधानुकरण करणारे शिष्य नव्हते.

बनारस हिंदू विद्यापीठांत ते शिकत होते तेव्हां ते एक उत्तम विद्यार्थी व उत्कृष्ट तडफदार वक्ता म्हणून प्रसिद्ध होते. १९२९ मधें अखिल भारतीय विद्यार्थी परिषदेचे ते अध्यक्ष झाले.

लोहियाजींनी १९३४ मधें कॉंग्रेसमध्यें प्रवेश केला. पक्षांतल्या कांही तरुण मंडळींनी जेव्हां कॉंग्रेस समाजवादी पक्ष स्थापन केला, तेव्हां त्या पक्षाच्या मुखपत्राचे, 'कॉंग्रेस सोशलिस्ट' चे लोहियाजी संपादक झाले.

१९४२ मधें जेव्हां 'भारत छोडो' चळवळीचे लोण देशभर आगीसारखे पसरले, त्यावेळेस लोहियाजींनी देशभक्तीपर पत्रकें, जाहिराती व भित्तीपत्रके एका अज्ञात छापखान्यांत छापून घेऊन, वांटण्याची व्यवस्था पाहिली. त्याच वेळेस 'कॉंग्रेस रेडियो' नांवाचे एक गुप्त रेडियो स्टेशन त्यांनी सुरू केले व चालवले. जनतेमधे याचा फारच चांगला प्रभाव पडला. अनेक लोक या आंदोलनात सामील होऊं लागले. ब्रिटिश सरकारने लोहियाजींना पकडून तुरुंगात टाकले व त्यांचा अतोनात छळ केला, परंतु ते जरासुद्धां विचलित झाले नाहीत.

आंतरराष्ट्रीय राजकारणाच्या पटावरदेखील लोहियाजींनी आपला ठसा उमटवला. १९५८ सालीं त्यांनी पहिली आशियाई समाजवादी परिषद भरवण्यांत पुढाकार घेतला. १९५२ साली समान विचारांच्या कांही नेत्यांच्याबरोबर त्यांनी प्रजासमाजवादी पक्षाची स्थापना केली.

भारतीय भाषांना महत्व मिळावे म्हणून त्यांनी आटोकाट प्रयत्न केले. जातिभेद व वर्णभेद नसलेली समाजव्यवस्था निर्माण करण्याची त्यांची तीव्र इच्छा होती.

उत्तरप्रदेशांतल्या फरुक्काबाद मतदारसंघातून त्यांनी १९६३ सालीं पोट निवडणूक जिंकली लोकसभेंत आपले विचार व मतें ते अगदी स्पष्ट, परखड व जहाल शब्दांत मांडत असत. लोकसभेंतल्या उत्कृष्ट सभासदांमध्ये त्यांची गणना केली जाते.

''त्यांच्यासारखा निर्भय वृत्तीचा व तितकाच साधा माणूस मी अद्याप पाहिलेला नाही. त्यांनी कधीं हिंसेचा अवलंब केला नाही. जे कार्य त्यांनी हातीं घेतले त्यामुळें त्यांची प्रतिष्ठा व त्यांचा गौरव जास्त वाढला आहे.'' हे उद्गार गांधीजींनी लोहियाजींबद्दल १९४० सालीं काढले होते. त्यावेळेस 'हरिजन' मधें लोहियाजींनी सरकार विरुद्ध लेख लिहीला होता व म्हणून सरकारने त्यांना अटक केली.

लोहियाजींनी कालवे खणणें, धरणें बांधणें यासारखे अनेक लोकोपयोगी कार्यक्रम आंखले व नागरिकांनाही त्यांत गुंतवले होते.

१२ ऑक्टोबर १९६७ रोजीं दिल्लीमधें त्यांचे निधन झाले.




# यक्ष पर्वत

## 2

*(डाकूंच्या सरदाराने स्वर्णाचारी नांवाच्या एका वास्तुविशारदाला पकडले होते. त्याच्याकडून जंगलातल्या एका झोंपडीत राहाणाऱ्या दोन क्षत्रिय तरुणांबद्दलची सगळी माहिती सरदाराने काढून घेतली. जेव्हां सरदार स्वर्णाचारीला पकडून घेऊन जात होता, तेव्हां स्वर्णाचारी ओरडूं लागला. त्याचा ओरडा विघ्नेश्वर पुजाऱ्याने ऐकला. क्षत्रिय तरुणांनी एक सिंह पाळलेला होता त्या सिंहाला विघ्नेश्वरने डाकूंवरती आक्रमण करण्यासाठी पुकारले. सिंहाने एका डाकूवर झडप घातली व त्याचा गळा तोंडात पकडला, त्यानंतर...)*

गर्जना करत अचानक येणाऱ्या सिंहाला पाहून डाकूंचा सरदार घाबरला. क्षणभर तो विचारांत पडला की आता काय करायचं? लगेच त्याने आपला भाला उचलून सिंहावर फेंकला. तो भाला सिंहापासून फूटभर अंतरावर जाऊन जमिनीवर पडला. इकडे सिंहाने डाकूचा गळा तोंडात धरला होता व तो इकडेतिकडे हालवत होता. डाकूंच्या सरदाराने इकडेतिकडे पाहिले. तो असहाय, एकाकी आहे असे त्याला वाटले. उंटावर स्वारी करणारा डाकू खाली पडला होता, त्याचा उंट धाबरून क्षत्रिय तरुणांच्या झोंपडीच्या मागच्या बाजूला पळायला लागला. आणखी एका मदतनीसाच्या उंटावर बसलेला स्वर्णाचारी मदत मागण्यासाठी मोठमोठ्याने ओरडूं लागला.

डाकूंचा सरदार नाराजीने स्वर्णाचारीकडे बघत म्हणाला, ''अे वास्तुविशारदा ! आता जरा गप्प बस की! मुकाट्याने आमच्याबरोबर चल ! नाहीतर तुला उंटावरून खाली पाडीन आणि या सिंहाचेच भक्ष्य बनवीन.''



त्याच्या या बोलण्यावर स्वर्णाचारी फारच खूष झाला. कारण त्याला ठाऊक होतं की त्या सिंहाने त्याला कांहीच केलं नसतं. स्वर्णाचारीने घाबरण्याचं नाटक करत म्हटलं, ''नायकजी, मला सिंहाचा आहार बनवण्यासाठी त्याच्यापुढें फेकून द्या ! तसंच झालं तर जन्मभूमीवर प्राण देऊन पुण्य तरी मी कमावीन. जन्मभूमीपेक्षां जास्त प्रिय आणखी काय असणार?''

डाकूंच्या सरदाराला वाटलं की स्वर्णाचारीला खाली पाडणेंच उत्तम होईल. पण त्याला लागलीच पर्वताच्या कुशींत असलेली आपली राजधानी आठवली. म्हणून त्याने आपल्या एका अनुयायाला सांगितलं, ''हे बघ, याला खाली पडूंबिडूं देऊं नकोस. आपल्याला पर्वतांच्या रांगांमधें जो किल्ला बांधायचा आहे ना, त्यासाठीं ह्याची मदत आवश्यक आहे. तिथे याला घेऊन जाऊं. नंतर जर त्याने आपलं ऐकलं नाही तर तिथेंच त्याचे तुकडे तुकडे करुन टाकूं.''

सरदाराचे हे बोलणें ऐकून स्वर्णाचारी भीतीने थरथर कांपू लागला. सिंहाला ''भीम, भीम'', अशा हांका मारुन तो ''मला वांचवा, मला वांचवा'' असं जोरजोराने ओरडायला लागला.

आपल्याला मारलेली हांक ऐकून भीम सिंह गर्जना करीत स्वर्णाचारीच्या उंटाकडे धांवला. डाकूंना धोक्याचा अंदाज आला आणि त्यांनी आपल्या उंटाला जोराने लाथ मारुन हांकलले. उंट ज्वारीच्या शेतांच्या दिशेने जोरांत पळूं लागला. आपल्या उंटाला जोराने दौडवीत सरदारदेखील त्याच्यापाठोपाठ पळून गेला.

झोंपडीच्यामागें लपलेला विघ्नेश्वर पुजारी हे सारे पाहात होता. स्वर्णाचारी अशा प्रकारें डाकूंच्या कचाट्यांत सांपडलाय हे पाहून त्याला फार वाईट वाटले.

त्याचवेळीं अरण्यांत शिकार करून दोन्ही क्षत्रिय तरुण परत येत होते.

जेव्हां ते दोघे झोंपडीच्याजवळ पोंचले तेव्हां विघ्नेश्वर पुजारी पळतपळत त्यांच्याजवळ गेला आणि म्हणूं लागला, ''महावीरांनो, खड्गधारींनो, सर्वनाश झालाय ! जे व्हायला नको होतं, तेच नेमकं झालंय, आता तुम्ही त्याला वाचवलं पाहिजेत.''

त्यांच्यापैकी एका युवकाने तीक्ष्ण नजरेने बघत पुजाऱ्याला विचारले, ''कुणाचा सर्वनाश झाला? आणि हा भीम पिंजऱ्याच्याबाहेर कसा आला?'' आपल्याजवळ आलेल्या सिंहाला बघून त्याने विचारलं.



विघ्नेश्वर पुजाऱ्याने तिथें घडलेली घटना सविस्तर वर्णन करून सांगितली व तो म्हणाला, ''वीरांनो, लौकर झोंपडीजवळ चला. तिथें सिंहाच्या पंजाने मेलेला डाकू तुम्ही पाहू शकाल.'' दोन्ही तरुण पुजाऱ्याच्या पाठोपाठ गेले. पुजारी त्यांना मरून पडलेल्या डाकूजवळ घेऊन गेला आणि म्हणाला, ''शत्रू गोटांतल्या इसमाचे हे शव पहा-आपल्या भीमाच्या पंजाच्या फटकाऱ्याने त्याला जखम झाली व तो मेला आहे.'' क्षत्रिय तरुण जीवदंत्राने ते शव काळजीपूर्वक पाहिले आणि तो पुढे म्हणाला, ''हा जंगल्यांतल्या जातीपैकी माणूस दिसत नाही. कपडे आणि चेहरा पाहून असं वाटतं की हे लोक एखाद्या दूरच्या प्रांतातून या अरण्यांत आलेले असावेत.''

''जर हा जिवंत असता तर त्याच्याकडून माहिती करुन घेता आली असती की हा कुठला माणूस आहे आणि इथे कशासाठी आला होता ते !'' खड्गवर्मा बोलला. ''खड्ग..! या डाकूं बद्दल आपल्याला माहिती मिळालीच पाहिजे. आपण त्याचा पाठलाग केला पाहिजे. गंडकमृग जातीतल्या लोकांपैकी कुणी ना कुणी अवश्य पाहिले असेल कीं हे लोक कुठल्या दिशेला पळून गेले ते!''

खड्गवर्माला हे सांगून जीवदंत्र पुजाऱ्याकडे वळला. ''तुम्ही जा आणि गंडकमृग जातींमधला कुणी दिसलाच तर त्याला आपल्याबरोबर घेऊन या.''

विघ्नेश्वर पुजारी थोडया अंतरावर गेला न गेला तोंच त्याला गंडकमृग जमातीचा नेता अरण्य-



मल व त्याचे सहकारी दिसले. ते आपापसांत जोरजोरांत वादविवाद करत होते.

पुजाऱ्याने त्यांच्याजवळ जाऊन म्हटले, ''क्षत्रिय तरुण आत्ताच शिकार संपवून परत आलेले आहेत. उंटावर स्वार होऊन आलेल्या दरोडेखोरांना तुमच्यापैकी कुणीतरी पाहिलंय कां? माझा प्रिय मित्र स्वर्णाचारी याला त्यांनी पकडून नेलेलं आहे.''

''पुजारीजी, आमचं उभं पीक त्यांनी लुटून नेलं आणि उरलेलं नष्ट केलं. खड्ग आणि जीवदंत्र हे दोघेजण कुठे आहेत आत्ता?''

नंतर ते पुजाऱ्याबरोबर गेले. झोंपडीजवळ आल्यानंतर ते दोघा तरुणांस भेटले. अरण्यमलने त्यांना सांगितले, ''खड्ग आणि जीवदंत्र सरकार, लुटेऱ्यांनी आमचं सारं पीक लुटून नेलंय. आम्ही त्यांच्याशी सामना करूं शकलो नाही. आमचे वीर अरण्यपूरला परत गेले.''



''छी छी ! राजा होऊन तुम्ही डाकूंसमोर टिकूं शकला नाहीत? किती शरमेची गोष्ट आहे ही ! तुमचा भेकडपणा पाहून तुमचे अनुयायी तुमच्याबद्दल काय विचार करीत असतील?''

खड्गवर्माने नाराजीने व रागाने म्हटले. ''आपण त्यांच्यावर रागावूं नये. माझ्यावर रागवावे. कारण त्यावेळेला हे तिथें नव्हते. मीच एकटा होतो.'' असं म्हणून शिलामुखी त्या तरुणांसमोर आला.

''असं आहे कां? बरं मग, तू आता हे सांग कीं त्यांनी आपल्याला ठाऊक नाहीत अशी कांही नवी आयुधें वापरली होती कां? की त्यांच्या उंटांना पाहून तुमचे गंडकमृग बावरुन पळाले?'' जीवदंत्राने विचारले.

शिलामुखीने सर्व हकीकत सविस्तर सांगितली व नंतर तो म्हणाला, ''त्या डाकूंजवळ भाले व तलवारी यांखेरीज दुसरी कुठली हत्यारें नव्हती. पण आपण ज्यांना उंट म्हणत आहात ते प्राणी पाहून आमचे लोक घाबरुन गेले.''

''ठीक आहे ! झालं ते झालं ! आता स्वर्णाचारीला दरोडेखोरांच्या हातून वांचवून परत आणणे हे आपलं कर्तव्य आहे. तुमच्या माणसांपैकी कांहीजण आत्ता लगेच जा आणि ते कोणत्या बाजूला गेले आहेत त्याचा शोध घ्या.''

अरण्यमलने तिथेंच आपल्या अनुचरांना शत्रूच्या मागावर पाठवले.

सूर्यास्त झाला व हळूंहळूं अंधार पडूं लागला. खड्गवर्मा व जीवदंत्राने भोजन बनवले आणि जेवण झाल्यानंतर ते झोंपडीबाहेर आले. त्यावेळेला गंडकमृग जातींतला एक इसम, जो शत्रूचा शोध घ्यायला गेला होता तो परत आला. तो धापा टाकीत होता.

त्याला पाहून अरण्यमल राजाने आतुर स्वरांत त्याला विचारले, ''दिसले कां दरोडेखोर? तुझ्याबरोबर निघालेले ते तिघेजण कुठे आहेत?''

गंडकमृग जातीच्या त्या इसमाने सांगितलं



की ते डाकू पर्वतांवरच्या नदीच्या प्रवाहाच्या विरुद्ध दिशेला पुढें गेले होते. केवळ हे सांगण्यासाठीच तो त्या तिघांना सोडून परत आला होता.

जीवदंत्राने विचारले, ''इतर तिघेजण डाकूंचा पाठलाग करत आहेत कां?'' ''होय सरकार, आपण तिथें जाईपर्यंत, ते त्यांच्या मागावर राहून त्यांच्यावर लक्ष ठेवतील.'' त्याने उत्तर दिले.

जीवदंत्राने विचार करुन निर्णय घेतला व खड्गवर्माला सांगितले, ''खड्ग, आता आपण निघूं या ! अंधार पडल्यानंतरच जर आपण त्या भागांत पोंचलो तर जास्त चांगले. कांहीही झालं तरी, आज रात्रीच स्वर्णाचारीला सोडवलं पाहिजे.''

जेव्हां ते दोघे तरुण आपल्या तलवारी व धनुष्यबाण घेऊन बाहेर पडले तेव्हां विघ्नेश्वर पुजारी ओरडून म्हणाला, ''आपल्या सिंहाने, भीमने ज्या डाकूला मारुन टाकलंय, त्या डाकूचा उंट इथेंच आसपास असेल कुठेतरी ! त्याच्यावरच बसून जा. तो उंट शोधा आधी!''

हे बोलणें ऐकून गंडकमृग जातीतले चौघेजण उंटाला शोधूं लागले. आजूबाजूला खूप हिंडले व ते थकून गेले. शेवटीं एक झाडीच्या मागे तो उंट बसलेला होता तो त्यांना दिसला. थोड्याच वेळांत त्या उंटाला पकडून ते घेऊन आले. डाकूंची बातमी आणणारा गंडकमृग पुढें जाऊं लागला, आणि दोन्ही तरुण उंटावर बसून त्याच्या पाठोपाठ जाऊं लागले. जंगलात थोडे दूर गेल्यानंतर त्यांनी पाहिले की नदी किनाऱ्या-



वरच्या एका प्रशस्त कातळावर डाकू जेवण रांधण्यांत गुंतलेले होते सगळेजण खूप दमलेले दिसत होते. कांहीजण उंटांची देखभाल करण्यांत गर्क होते. त्यांच्यापैकी कांहीजण वाळलेली लांकडे, काटक्या शोधत झाडांमधे हिंडत होते.

''जीव, त्या मंडळींनी स्वर्णाचारीची काय अवस्था केली आहे ते आपण प्रथम पाहिलं पाहिजे. लांकडे गोळा करणाऱ्यांपैकी एखाद्या माणसाला जिवंत पकडलं तर याबद्दल तो माहिती देऊं शकेल.'' खड्गवर्माने सुचवले.

''हो. हे अगदी बरोबर सांगितलंस. हा उपाय चांगला आहे. तुझ्याबरोबर एकाला घेऊन जा. पण कोणत्याही परिस्थितींत आम्ही इथें लपलेलो आहोत हे मात्र त्यांना माहीती होता कामा नये.'' जीवदंत्राने त्याला सावध करीत म्हटले. खड्ग-



वर्मा गंडकमृग जमातींतल्या एका माणसाला आपल्याबरोबर घेऊन गेला. लौकरच वाळलेली लांकडे गोळा करण्यांत मग्न असलेला एक डाकू त्यांना दिसला. पण डाकूने त्यांना पाहाण्या-पूर्वीच त्याला शिताफीने कसे पकडायचे याचा विचार तो करुं लागला.

खड्गवर्माला एक कल्पना सुचली. त्याने पाहिलं की दरोडेखोर फक्त वाळलेल्या काटक्याच गोळा करतो आहे असं नाही, तर लौकर वाळतील अशा झाडाच्या फांद्याही आपली पूर्ण ताकद लावून जोराने तोडतो आहे.

खड्गवर्मनि गंडकमृगाच्या माणसाकडून एक वाळलेली फांदी तोडली. जशी ती फांदी धडाम्कन मोडून पडली, तशी हे दोघेजण एका मोठ्या झाडाच्यामागें लपले. वाळकी फांदी पडल्याचा आवाज ऐकल्यावर, ती फांदी उचलण्यासाठीं डाकू तिथें आला. तो घाईत होता त्यामुळें इतकी मोठी फांदी अशी अचानक कशी व कां तुटली असावी, हा विचार कांही त्याच्या मनांत आला नाही.

तो फांदी उचलायला म्हणून डाकू वांकला आणि खड्गवर्मनि पाठीमागून त्याच्यावर झेंप घेतली. त्याने डाकूचा गळा दोन्ही हातांनी घट्ट पकडला. गंडकमृग इसमाने लगेच आपला भाला त्याच्या छातीवर ठेवला.

त्या डाकूला खुणेनेच सांगण्यात आलं की जर तो ओरडला किंवा किंचाळला तर तो कांही जिवंत राहाणार नाही.

खड्गवर्मनि डाकूला घट्ट पकडून धरला होता. तो भितीने थरथर कांपत होता. तशा अवस्थेंत खड्गवर्मनि त्याला उभा केला व त्याला सांगितलं, "मुकाट्याने माझ्या पाठोपाठ चालत ये. तुला मी मारणार नाही.

तूं जर तुझ्या लोकांना सावध करण्याचा प्रयत्न केलास तर मात्र तुला इथेंच उभा चिरून टाकीन."

डाकू एकदम गप्प झाला आणि खड्ग-वर्माच्याबरोबर जाऊं लागला. डाकूला पाहून जीवदंत्र फारच आनंदित झाला, व त्याला म्हणाला, "तुम्ही लोकांनी डोंगराच्या खालच्या नदीजवळचं सारं पीक लुटून नेलंत आणि उध्वस्त केलंत. त्यावेळेला तुम्ही स्वर्णाचारी नांवाच्या एका माणसाला पकडून नेलं होतंत. आता तो कुठे आहे? तुम्ही त्याचं काय केलं आहेत?

डाकू भेदरलेलाच होता. तो म्हणाला, "खरं



सांगितलं तर तुम्ही मला सोडून द्याल?" जीव-दंत्राने त्याला आश्वासन देत म्हटलं, "अवश्य!"

"सरकार, तो माणूस 'वांचवा, वांचवा' असं ओरडत होता. आमचे सरदार चिडले आणि त्यांनी त्याला ज्वारीच्या ताटांत बांधून ठेवलंय. नदीच्या किनाऱ्यावर आम्ही उंटांच्या पाठीवरचं सामान उतरवलं होतं, त्या ढीगांत तो पडलेला आहे. मी जे सांगतो आहे ना, ते अगदी खरं आहे."

"तूं खरं सांगतो आहेस की नाही याचा जोपर्यंत आम्हाला विश्वास वाटत नाही, तोपर्यंत तुला या झाडाला बांधून ठेवूं. तूं ओरडूं नयेस म्हणून तुझ्या तोंडात वाळलेली पाने कोंबून ठेवतो." जीवदंत्राने सांगितलं.

नंतर जीवदंत्र व खड्गवर्मा दोघेही झाडावर चढले आणि तिथें डाकूंचा तळ पडला होता त्या जागेकडे बघूं लागले. अचानक खड्गवर्मनि पाहिलें की डाकूंच्या जवळच्या डोंगरातल्या गुहेंत मशालीचा उजेड आहे.

आश्चर्य व्यक्त करीत तो म्हणाला, "जीव, हे बघ! डोंगरातल्या गुहेमधल्या मशालीचा उजेड तुला दिसतोय ना? तो विचित्र आकाराचा इसम कोण आहे? त्याच्या साऱ्या शरीरावर केंसाच्या जटा आहेत. आणि त्याच्यामागे जास्तच विचित्र दिसणारा कुणीतरी त्याला आपल्या जादूच्या सोट्याने मारतो आहे."

जीवदंत्राने त्या गुहेकडे नीट लक्ष देऊन पाहिलें. खड्गवर्माच्या सांगण्यानुसार गुहेंत मशाल जळत होती. त्या उजेडांत त्याने एक विचित्र आकाराची व्यक्ती पाहिली. तिच्या अंगावर जटांचे जंगलच होते. मागे काळे कपडे घातलेला एक मांत्रिकही तिथें उभा होता. त्याच्या हातांत जादूचा सोटा होता.

खड्गवर्मा आणि जीवदंत्र, दोघेही आश्चर्य चकित होऊन त्या विचित्र माणसाकडे पाहूं लागले. तो अचानक जोरांत ओरडूं लागला. साऱ्या अरण्यांत त्याचा भेसूर आवाज गरजला. तो गुहेच्याबाहेर धांवत आला. आणि डाकूंच्या दिशेने जोरांत पुढें सरसावला. त्याच्या कपा-ळावर अग्निकणांसारखी एक ज्योत चमचमत होती नि विझत होती !

(क्रमशः)



# भारताच्या राजकारणांतल्या कोलांट्या

भारताने आपल्या अणुशक्ती कार्यक्रमावर जोर देण्याचा धाडसी निर्णय घेतला. १८ मे १९७४ला भारताने राजस्थानच्या वाळवंटात, पोखरणमधें भूगर्भात पहिली अणुशक्तीचांचणी केली. भूपृष्ठाच्या खाली १०७ मीटर्स खोलीवर ही चांचणी सकाळीं ८.१५ वाजता केली गेली. त्यायोगे बलाढ्य राष्ट्रांची मक्तेदारी संपुष्टात आली, व भारत अणुशक्ती संघाचा सभासद झाला. आपल्या साऱ्या चांचण्या शांततेच्या कार्यासाठींच असतील असे भारताने प्रतिपादन केले.

२४ ऑगस्टला फक्रुद्दीन अली अहमद हे भारताचे पांचवे राष्ट्रपती झाले. २७ ऑगस्टला बी.डी. जत्ती हे उपराष्ट्रपती झाले. काश्मीरमधे शेख अबदुल्ला २५ फ्रेब्रुवारी १९७५ रोजीं मुख्यमंत्री झाले. केंद्रसरकारशी त्यांनी केलेला करार विधानसभेने मंजूर केला. त्यानुसार भारत सरकारच्या अधिपत्याखेरीज इतर कोणतेही निर्णय घेण्यास विधानसभा स्वतंत्र होती. जूनमधें शेख अबदुल्लांनी लोकमत आघाडी बरखास्त केली आणि ते राष्ट्रीय परिषदेंत सामील झाले.


फक्रुद्दीन अली अहमद

१९६२ व १९६५ सालीं जेव्हां भारताचे पाकिस्तान व चीनशी युद्ध सुरुं झाले तेव्हां दोन्ही वेळां आणीबाणी लागू करण्यांत आली होती. १९७५ साली तिसऱ्या वेळेला आणीबाणी जाहीर करण्यांत आली. मात्र यावेळेला कारण अगदी वेगळे होते. याची सुरवात झाली अलाहाबाद हायकोर्टाच्या १२ जूनच्या निकालाने! त्यानुसार इंदिरा गांधी यांची १९७१ मधली निवडणूक रद्द ठरवली व त्यांना सहा वर्षे कोणतीही निवडून आलेली जागा किंवा पद घेण्यास मनाई होती. १३ जूनला बहुतेक सर्व विरोधी पक्षांनी राष्ट्रपती भवनापुढें निदर्शन केले व पंतप्रधानांच्या राजिनाम्याचा आग्रह धरला.

२४ जूनला सुप्रीम कोर्टाने अलाहाबाद हायकोर्टाचा निकाल उचलून धरला. २५ जूनला भारतीय कम्युनिस्ट पक्षाखेरीज सारे विरोधी पक्ष एकत्र आले. जयप्रकाश नारायण यांच्या नेतृत्वाखाली त्यांनी देशभर इंदिरा गांधीच्या सरकार विरुद्ध आंदोलन सुरुं करण्याचे ठरवले. त्या रात्रीं राष्ट्रपती फक्रुद्दीन अली अहमद यांनी देशाला अंतर्गत धोका असल्यामुळें आणीबाणी जारी केली. जयप्रकाश नारायण, मोरारजी देसाई, वाजपेयी, अडवानी, चरणसिंग व अशोक मेहता यांसारख्या प्रमुख नेत्यांना अटक करण्यांत आली. राष्ट्रीय स्वयंसेवक संघ, आनंदमार्ग, व इतर कांही संघटनांच्यावर बंदी घातली गेली, वृत्तपत्रांतल्या बातम्यांवर नियंत्रण व बंधने आली. ७ नोव्हेंबरला सुप्रीम कोर्टाने इंदिरा गांधींची रायबरेलीतील निवडणूक सनदशीर ठरवली. परंतु आणीबाणी मात्र १९७७ सालीं, निवडणुकांच्या अगोदरच उठवली गेली. लोकसभेंत एक नवी राजकीय आघाडी निर्माण होत होती. १९७६ मधें चार पक्षांनी एकत्र येऊन जनता पक्ष स्थापन करायचे ठरवले.

हे चार पक्ष होते कॉंग्रेस (O), जनसंघ, भारतीय लोकदल, आणि समाजवादी पक्ष. १९७७ च्या या निवडणुकीत जनता पक्षाने कॉंग्रेसकडून सत्ता काबीज केली, आणि भारतीय राजकारणाचे एकूण चित्रच पालटले.

*(पुढील महिन्यांत: जगांतल्या सर्वांत मोठ्या लोकशाहीची हालचाल)*





# कविची राजशिष्टाई

कांचनवर्मा कांचनपूरचा राजा होता. तो कोणत्याही परिस्थितीत प्रजेला त्रास होऊं देत नसे. प्रजेचा तो फार आवडता होता. राजाने विचारपूर्वक वेगवेगळ्या सुधारणा केल्या. थोडक्यांत जनता सुखी होती. तिला कुठल्याही गोष्टीची कमतरता नव्हती. धनधान्याची सुबत्ता होती.

एके दिवशी राजदरबारांत एक व्यापारी आला. तो सुगंधी द्रव्यांचा व्यापारी होता. त्याचे नाव निरंजन सावकार होते. देशविदेशांत कांहीही चढउतार न होता त्याचा व्यापार भरभराटीला आला होता. तो राजाला म्हणाला "बहुतेक अत्तरें मी विदेशांतून आणली आहेत. जावा द्वीपावरुन एक नवीन अत्तर आणले आहे. सर्वांत प्रथम ते आपल्याला अर्पण करणे हे माझे कर्तव्य आहे." मग त्याने कांचनवर्मा महाराजांना अत्तराची शिशी अर्पण केली. राजाला ते अत्तर फार आवडले. त्याने नोकराला आज्ञा केली की सर्वांना ते अत्तर लाव. नोकराने राजाच्या आज्ञेप्रमाणे सर्वांना अत्तर लावले. संपूर्ण दरबारभर अत्तराचा घमघमाट सुटला. तेव्हां राजकवी उठून म्हणाले "निरंजन सावकारांनी आणलेले हे अत्तर, अत्तर नसून जावा द्वीपांत पसरलेल्या महाराजांच्या किर्तीचा सुगंध आहे."

राजाच्या प्रशंसापर केलेल्या बोलण्याला सर्वांनी टाळ्या वाजवल्या. खूष झालेला निरंजन म्हणाला "कविवर्यांच्या म्हणण्याप्रमाणे आपल्या किर्तीचा सुगंध हाच माझ्या व्यापाराचा आधार- स्तंभ आहे. कविवर्यांचे म्हणणे शंभरटक्के सत्य आहे.

दरबारांत घडलेल्या घटनेचे वर्णन अंतःपुरापर्यंत पोहोचले. महाराणीपासून दासींपर्यन्त सर्वांनी अत्तराची खूप स्तुती केली. कांचनवर्मा अत्तर ह्या नावाने हे अत्तर कांचनपुरात मोठ्या प्रमाणावर विकले जाऊं लागले.

एक दिवस सावकाराने राजकवींना आपल्या घरीं बोलवले व म्हणाला, "मला स्वतःला माहीत

मार्कंडेय शर्मा

नाही की हे अत्तर किती प्रभावी आहे. पण तुमच्या प्रशंसेमुळे ह्याला चांगली प्रसिद्धी मिळाली. कांचनवर्मा अत्तर ह्या नांवाने हे खूप प्रसिद्ध झाले आहे. ह्याचा चांगला खप पण होतो आहे. त्यामुळे मी खूप पैसा कमविला. ह्या फायद्यांत तुम्हाला पण हिस्सा मिळाला पाहिजे."

असे म्हणून त्याने कविराजांना रेशमी वस्त्रें व दक्षिणा दिली. मग तो म्हणाला, "माझे व माझ्या व्यापाराचे कौतुक करणारे काव्य रचा. प्रत्येक माणसाच्या तोंडी माझे नांव येऊ दे. ज्याच्या त्याच्या तोंडी माझी व माझ्या व्यापाराची प्रशंसा येऊ दे. जर असे घडले तर तुम्ही मागाल ते बक्षिस मी तुम्हाला देईन."

त्याचे बोलणे ऐकून कवी चंद्रचूडांनी रागावून रेशमीवस्त्रे व दक्षिणा घेण्यास नकार दिला. ते म्हणाले "आंब्याची नवी पालवी खात कोकीळा फक्त वसंत ऋतूंतच कूजन करते. आकाशांत विजा चमकतात तेव्हांच मोर नाचतो. त्याचप्रमाणे काव्य करण्यालायक व्यक्ती किंवा घटना असली तरच कवीला काव्य करण्यास स्फूर्ती येते. तुझ्यासारख्या लोभी व स्वार्थी माणसाची प्रशंसा करणारे काव्य मी कधीही करणार नाही. अशा काव्यास कविता म्हणणे देखील योग्य होणार नाही. तुझ्या व्यापारवृद्धीसाठी केलेले काव्य कविता ह्या सदरात येतच नाही. जर कुठे चूक होत असेल, प्रजेचे अहित होत असेल, तर प्रत्यक्ष राजाची निंदा करायला देखील मी मागेपुढे पहाणार नाही. आपल्या काव्याने मी लोकांना जागृत करीन, प्रोत्साहित करीन. तेव्हां आपल्या व्यापारवृद्धी साठी मला वापरायचा व्यर्थ प्रयत्न करुं नकोस."

राजकवींच्या बोलण्याने व्यापारी अगदी सुन्न झाला. त्याचा चेहरा पांढरा फटक पडला. ही गोष्ट महाराजांच्या कानावर गेली. त्यांनी राजकवींना बोलावून म्हटले "समजा, माझ्या हातून कांही चूक





झाली तर माझीसुद्धा निंदा करण्यास तुम्ही तयार आहात? ह्या क्षणीं मी तुम्हाला तुरुंगात टाकतो. मग तुम्ही काय कराल?"

चंद्रचूड उत्तर देणार येवढ्यांत मंत्री मधे पडून म्हणाले, "महाराज शनज दुष्ट होता. दुर्योधन अहंकारी होता. त्या दोघांचे दुर्गुण कविने स्पष्ट शब्दात मांडले म्हणून राम देवस्वरूप मानले गेले. महाभारतकारांनी धर्मराजांच्या गुणांची स्तुती केली म्हणून लोकांना त्यांचे मोठेपण समजले. त्याचप्रमाणे कीचकासारख्याचा स्त्रीलंपटपणा उघडा पाडून त्याला शिक्षा दिली गेली. ह्याबद्दल देखील कवींनी लिहीले आहे. ते फक्त चांगल्या नाही तर वाईट गोष्टींबद्दलसुद्धा लिहीण्याची सचोटी दाखवतात. चंद्रचूडांच्या बोलण्यामागे कुठलाही वाईट हेतू नाही. ते कर्तव्यभावनेच्या पोटी असे बोलले."

. राजकवींनीही मंत्र्यांच्या म्हणण्याला दुजोरा दिला तेव्हां कुठे राजा जरा शांत झाला.

ह्या गोष्टीनंतर राज्यांत लागोपाठ चार वर्षे दुष्काळ पडला. निरंजन सावकाराचे नुकसान व्हायला लागले तेव्हां तो दुसऱ्या देशात जाण्याची तयारी करुं लागला. ह्याचवेळी शेजारच्या कल्याणदेशाचा राजा शक्तिसिंह कांचनपूरवर स्वारी करण्याच्या बेतांत होता. ह्यावर दुसरा कोणताच उपाय नसल्याने कांचनवर्माने शत्रुपक्षाशी तह करायचे ठरविले. मंत्र्यांच्या सांगण्यावरुन राजाने चंद्रचूड कवींना राजदूत म्हणून कल्याण देशांत पाठविले. कल्याण देशाचे राजे शक्तिसिंह यांनी चंद्रचूड कवींचा आदर सत्कार करुन म्हटले "शास्त्रानुसार राजदूतांस शिक्षा करणें योग्य नाही. तुमच्या देशाला आमच्या देशांत सामील करुन



घ्यायचे आम्ही पक्के ठरविले आहे. तुम्ही कवी आहात, पण राजदूत म्हणून आमच्याकडे आला आहात. तुम्ही आम्हाला कितीही दूषणें दिली तरी तुमचा देश आम्ही आमच्या देशास जोडणारच. ह्यावर तुम्हाला काय म्हणायचे आहे, हे मी जाणूं इच्छितो."

चंद्रचूड हंसून म्हणाला, "मी अजून आमच्या महाराजांचा निरोप देखील आपल्याला सांगितला नाही. तेवढ्यांतच आपण आपला मनसुबा जाहीर केलात. आमचा देश अत्यंत वाईट परिस्थितीतून जात आहे. रक्तपात न करता आपल्या स्वाधीन होण्याची आमची इच्छा आहे. आपले म्हणणे मी लक्षपूर्वक ऐकले आहे. आता कांचनपूरचा नागरीक म्हणून माझे म्हणणे पण ऐकून घ्या. घराचे दरवाजे उघडे असताना कुत्रें आंत घुसले तर आम्ही भले काय करणार? ठीक आहे की आमची मान झुकलेली आहे. आम्ही कडवे देशभक्त आहोत, येवढ्या

प्रमाणांत आमच्या महाराजांनी आमची देशभक्ती प्रज्वलित ठेवली आहे की एक दिवस आपल्याला आमच्या देशांतून हाकलून देण्याची शक्ती आमच्यांत आहे.'' त्यांचे बोलणे ऐकून शक्तिसिंह रागाने वेडा झाला. पण चंद्रचूड राजदूत म्हणून आलेले असल्याने त्यांना सोडून देण्यांत आले.

परत आल्यावर चंद्रचूडांनी राजाला सर्व हकीकत सांगितली. शक्तिसिंहाच्या धमक्यांनी रागावून कांचनवर्माने युद्ध करण्याचे ठरविले.'' विजय तरी मिळेल किंवा वीरगती प्राप्त होईल.'' तो म्हणाला.

कवि चंद्रचूडाने शक्तिसिंहासमोर ज्या देश-भक्तीच्या गोष्टी केल्या, त्यांनी जनतेवर जादू केली. त्यांच्या हृदयांत देशभक्ती उफाळून आली. जनतेने प्रतिज्ञा केली कीं जय अथवा पराजय, कुठल्याही परिस्थितींत ते राजाची साथ सोडणार नाहीत. युद्धात शत्रूचा जीव घेऊं किंवा देशासाठी आपला जीव देऊं. निरंजन सावकाराने देखील परदेशातून दैनंदिन आवश्यकतेच्या गोष्टी मागविल्या व जनतेला स्वस्त दरांत विकल्या.

कांचनपूरच्या जनतेची प्रतिज्ञा ऐकून व देश भक्ती बघून कल्याणदेशाची प्रजा आपापसात कुजबुजायला लागली. ''अशा परिस्थितीत आपल्या राजाने त्यांच्यावर स्वारी केली तर आपला विजय निश्चित आहे. ह्या परिस्थितीत त्यांच्यावर स्वारी न करण्यांतच शहाणपणा आहे.'' शक्तिसिंहाला पण गुप्तचरांकडून जनतेचे हे म्हणणे कळले. त्याच्या लक्षांत आले की आपली चूक होत आहे, ती सुधारली पाहिजे. त्याने कांचनवर्माला एका राजदूतांकरवी संदेश पाठविला ''मी आपल्या देशावर आक्रमण न करता, मैत्री करूं इच्छितो. आपली जनता दुष्काळग्रस्त आहे. तिच्यासाठी खाद्यपदार्थ पाठवीत आहे. जे झाले ते कृपया विसरून जावे.''

आपल्या वचनाप्रमाणे शक्तिसिंहाने कांचन-पूरच्या जनतेस मदत केली. त्याने मैत्रीचा करार पाळला. चंद्रचूडाच्या राजशिष्टाईचे खूप कौतुक झाले.

राजकवि चंद्रचूडाने आपल्या राज्याच्या गुण-वर्णन पर एक काव्य रचिले. ज्यांत त्याने निरंजन सावकाराच्या उदारतेची आवर्जून प्रशंसा केली.





## ६१. भीष्माचा मृत्यू

# महाभारत

युधिष्ठिराने सर्वांत अगोदर आपल्याला राज्यप्राप्ती करुन देण्यांत प्रमुख मदत करणाऱ्या श्रीकृष्णाबद्दल आपली कृतज्ञता व्यक्त केली. त्याची युधिष्ठिराने खूप स्तुती केली. त्यानंतर आपल्या बंधूंना उद्देशून तो म्हणाला, ''माझ्या प्रिय बंधूंनो, माझ्यामुळें तुम्हाला अरण्यांत असंख्य कष्ट झेलावे लागले आहेत. साधारण माणसें असे इतके कष्ट सोसूं शकत नाहीत, आता आपण विजय मिळवला आहे. तुम्ही सर्वजण थोडे दिवस विश्रांति घ्या. मग आपण नंतर भेटूं या.''

युधिष्ठिराने धृतराष्ट्राच्या अनुमतीने, भीमाला राहाण्यासाठी दुर्योधनाचा महाल दासदासींसकट, भीमाचे निवासस्थान म्हणून दिला. त्याचप्रमाणें दुःशासनाचा महाल अर्जुनाला, दुर्मर्षण आणि दुर्मुखांचे उंच महाल नकुल व सहदेवाला दिले. सर्वांनी आपापल्या नव्या भवनांत प्रवेश केला. कृष्ण व सात्यकी अर्जुनाच्या महालांत राहिले.

कांही दिवसांनंतर युधिष्ठिर कृष्णाला भेटायला गेला आणि म्हणाला, ''आम्हाला राज्य आणि प्रतिष्ठा तर मिळाली आहे. परंतु माझ्या मनांत सारखी शंका सतावते की आम्ही धर्माच्या विरुद्ध कांहीतरी केलेलं आहे, म्हणून माझं मन रात्रंदिवस अशांत असतं. कृपा करुन माझ्या या शंकेचं निरसन करावं.''

कृष्णाने थोडा वेळ गंभीरपणें विचार केला व तो म्हणाला, ''मी भीमांच्या बाबतीत विचार





करतो आहे. त्यांना धर्माचे सर्व प्रकारचे ज्ञान आहे. बाणांच्या शय्येवर पडलेल्या या भीष्मांच्या मृत्यूनंतर हे अपार ज्ञान नष्ट होईल. म्हणून तुम्ही लौकर त्यांच्याजवळ जा. अशा प्रकारचे, जगाच्या हिताचे हे ज्ञान सदैव उपयोगी ठरावे, ही माझी इच्छा आहे.''

त्यावर युधिष्ठिराने उत्तर दिलं, ''आपल्या मनांत जो हा त्यांच्याबद्दलचा विचार आहे, अगदी तसाच विचार माझ्याही मनांत आहे. आपणच आम्हाला त्यांच्याकडे घेऊन जावे. बहुधा त्यांनाही आपल्याला भेटायची इच्छा असेल.''

त्यावेळीं कृष्णाने सात्यकीला सांगितले, ''आम्ही आत्ताच भीष्मांना भेटायला निघतो आहोत. रथ तयार करुन घे.'' त्यानंतर कृष्ण व सात्यकी एका रथावर, युधिष्ठिर व अर्जुन दुसऱ्या रथावर, आणि भीम, नकुल व सहदेव आणखी एका रथांत बसून भीष्मांच्याजवळ गेले. कृपाचार्य, युयुत्सु आणि संजय वेगवेगळ्या रथांत बसून तिथें पोंचले.

वाटेंत त्यांना पांच कुंडे दिसली. कृष्णाने युधिष्ठिराला सांगितलं की ती परशुरामाची कुंडे आहेत. एकवीस वेळां परशुरामाचे क्षत्रियांना शोधून शोधून त्यांचा वध केला, तेव्हां ही कुंडे त्या क्षत्रियांचा रक्ताचे भरली होती. परशुरामाने तेव्हां त्याच रक्ताने आपल्या पित्याचे तर्पण केले होते. अशा प्रकारे त्यांचा क्रोधाग्नि शांत झाला होता.

युधिष्ठिराने त्याबद्दल विचारले म्हणून कृष्णाने परशुरामाबद्दलची पुढील हकीकत सांगितली.

''जन्हन नांवाच्या राजर्षींच्या वंशात गाधी जन्मला. त्याला सत्यवती नांवाची एक मुलगी झाली. पण तिला पुढें मुलगा झाला नाही. भृगुचा पुत्र ऋचीक याच्याबरोबर सत्यवतीचा विवाह झाला. ऋचीकने आपल्याला आणि आपल्या सासऱ्यांना पुत्र व्हावा, या हेतूने मोठ्या भक्ती-भावाने हविष्य बनवले. त्याचे दोन भाग करून सत्यवतीला सांगितले, ''हा अंश तू तुझ्या मातेला दे, आणि दुसरा अंश तू खा. असं केल्याने तुझ्या मातेला एक पराक्रमी पुत्र होईल. क्षत्रियांचा वध करुन तो राजा बनेल. तुला एक परमशांत स्वभावाचा मुलगा होईल.''

या घटनेनंतर एकदोन दिवसांतच तीर्थ-यात्रेला निघालेले सत्यवतीचे मातापिता ऋचीकच्या आश्रमांत आले. सत्यवतीने आपल्या आईला आपल्या पतीने सांगितलेली गोष्ट पुन्हां



सांगितली, आणि दोन भागांत विभागलेल्या हविष्यापैकी एक भाग मातेकडे दिला. सत्यवतीने घाईघाईत जो अंश मातेला खायचा होता तो स्वतः खाल्ला, आणि जो अंश तिने स्वतः खायचा होता, तो तिने मातेला खायला दिला. थोड्या वेळानंतर ऋचीक अरण्यांतून परत आला. त्याला सारी हकीकत कळल्यानंतर तो म्हणाला, ''तुझ्या हातून ही जी चूक झाली आहे, त्यामुळें तुझ्या पोटीं एक महान क्रूर क्षत्रिय जन्माला येईल आणि तुझ्या मातेच्या पोटीं एक ब्राह्मण जन्माला येईल.''

हे ऐकून सत्यवती फारच कष्टी झाली. तिने नवऱ्याची विनवणी केली. ''आपण कृपा करून असं कांहीतरी करा की आपल्या तपस्येच्या शक्तीमुळें माझ्या पोटीं क्रूर स्वभावाचा पुत्र जन्माला येऊं नये. वाटलं तर माझ्या मुलाचा मुलगा क्रूर झाला तरी चालेल. मला माझ्या आयुष्यांत असा क्रूर मुलगा पाहाण्याची मुळीच इच्छा नाही. माझ्यावर एवढी कृपा तरी करावीच...'' ऋचीकने तिला वचन दिलं की तसंच होईल. त्यानंतर सत्यवतीच्या गर्भातून शांत स्वभावाचा जमदग्नी, आणि गाधिच्या पत्नीच्या पोटीं विश्वामित्र जन्माला आले. जमदग्नीला पुढें परशुराम हा पुत्र झाला. परशुरामाने मोठा झाल्यावर गंधमादन पर्वतावर महादेवाची आराधना केली आणि त्या भगवानाकडून अनेक अस्त्रें व एक परशूही मिळवली.

त्या काळांत हैहय वंशाच्या धृतवीर्य राजाचा पुत्र अर्जुन याला दत्तात्रयाची कृपा म्हणून एक हजार हात प्राप्त झाले. त्याने सर्व राजांना पराजित करून अश्वमेध यज्ञ केला. त्याने ब्राह्मणांना अपार



दान दिले. जेव्हां अग्निदेव त्या प्रदेशांना जाळायला लागला, तेव्हां वसिष्ठांनी चिडून त्याला शाप दिला.'' अग्नीने जसा माझ्या आश्रमाचा विध्वंस केला आहे, तसाच तुझ्या हातांचा विध्वंस परशुराम करील.'' हा शाप ऐकून अर्जुन थोडासुद्धां विचलित झाला नाही.

परशुराम व कार्तवीर्यार्जुन यांच्यामधें वितुष्ट निर्माण व्हायला अर्जुनाचे पुत्र कारणीभूत होते. ते अतिशय दुष्ट व घमेंडखोर होते. हे लोक एकदां फिरत फिरत परशुरामाच्या आश्रमांत गेले. त्याच्या अनुपस्थितींत त्यांनी दांडगाईने त्याच्या होमाची गाय व तिचे वासरूं यांना हांकलत पळवून नेले. म्हणून परशुराम संतापला. त्याने कार्तवीर्यार्जुनाचे एक हजार हात कापून टाकले, आणि आपली गाय व वासरुं तो परत घेऊन आला.

यानंतर हैहय गप्प बसले नाहीत. एक दिवस परशुराम आश्रमांत नाही असं पाहून त्यांनी आश्रमावर हल्ला केला. त्याचे वडील जमदग्नी यांचे त्यांनी डोके उडवले. यावर परशुराम अतिशय क्रुद्ध झाला. त्याने प्रतिज्ञा केली, ''यांच्या वंशाचे नांवच नाहीसे करून टाकीन.''

परशुरामाने अर्जुनाचे पुत्र व नातू यांचा वध तर केलाच, पण पृथ्वीवर जिथेंजिथें क्षत्रिय दिसेल, तिथेंतिथें जाऊन त्याने त्यांना ठार मारले. हा क्रम बरीच वर्षे चालला होता.

त्यानंतर शांत होऊन परशुराम एका अरण्यांत गेला व तिथें तप करूं लागला. एकदा विश्वामित्राचा पुत्र परावसु हा परशुरामाजवळ गेला आणि म्हणाला, ''तुम्ही सर्व क्षत्रियांचा वध करण्याची प्रतिज्ञा केली आहे, पण त्याची पूर्तता केली नाहीत. प्रतर्दन वगैरे क्षत्रिय अद्याप जिवंत आहेत ! असली प्रतिज्ञा तुम्ही करायला नको होतीत, कारण ती पूर्ण करणे हे तुमच्या हातांत नव्हते.''

हे शब्द ऐकून परशुराम संतापला व आंतल्या आंत जळफळूं लागला. त्याने पुन्हां आयुधे धारण केली. या वेळेस वृद्ध, लहान मुलें आणि गर्भातल्या जीवांचादेखील त्याने वध करण्यास सुरवात केली. अशा प्रकारें एकवीस वेळां जगांतल्या सर्व क्षत्रियांचा वध परशुरामाने केला. नंतर अश्वमेध यज्ञ करून साऱ्या पृथ्वीवर त्याने अधिकार गाजवला आणि कश्यप ऋषींच्या हातावर त्याने पृथ्वीचे दान दिले.

कश्यपनाने पृथ्वीचे दान स्वीकारताना म्हटले, ''हे परशुरामा, मी तुला फक्त बसण्यापुरती जागा



देतो आहे. तिथें बसून तूं तपस्या कर.''

कश्यपाच्या ब्राह्मणांनी केलेल्या शासन-काळांत सगळीकडे अराजकता पसरली. बलवान व्यक्ती दुर्बलांना त्रास देऊं लागल्या.

कश्यपाला जेव्हां ही गोष्ट समजली तेव्हां त्यांनी पृथ्वीवर राज्य करण्यासाठीं क्षत्रियांचा शोध घेतला, त्यावेळेला अनेक क्षत्रिय त्याच्या नजरेस दिसून आले. कांही हैहयांस त्यांच्या मातांनी गुप्तपणें वांचवले होते. पुरुवंशी विदुरथाचे ऋक्ष पर्वतावर पालनपोषण झाले. पराशरने सौदास नांवाच्या क्षत्रियाला वांचवले होते. शिबीच्या पुत्रांचे गायींनी रक्षण केले होते. म्हणून त्याचे नांव गोपति पडले. प्रतर्दनचा पुत्र वत्स हादेखील जिवंत होता. गुप्त नांवाच्या क्षत्रियाला गौतमाने आश्रय दिलेला होता. बृहद्रथाची वानरांनी राखण केली होती. मरुत्त वंशातल्या क्षत्रिय पुत्रांना



समुद्राने वाचवले होते. अशा तऱ्हेने जे लोक अनेक प्रकारांनी जिवंत राहिले, ते शिल्पकार आणि सुवर्णकारांच्या ज्ञातींत वाढले व मोठे झाले.

कश्यपाने त्या सर्व क्षत्रियांना बोलावणे पाठवले. त्यांना भूमी देऊन राज्य करण्यास सांगितले. लौकरच सर्वत्र नवेनवे राजवंश उदयाला आले.''

अशा तऱ्हेने युधिष्ठिराने कृष्णाच्या तोंडून परशुरामाची ही कहाणी ऐकली, व नंतर ते भीष्मांना भेटायला गेले. तोपर्यंत उत्तरायणाचे आणखी छपन्न दिवस बाकी होते. भीष्मांनी युधिष्ठिराला धीर देत समजावले, ''हे बघ, युद्धांत शत्रूंचा वध करणें हे राजधर्माविरुद्ध नाही. किंबहुना, तोच क्षत्रियधर्म समजला पाहिजे. जोपर्यंत भीष्म जिवंत होते, तोपर्यंत ते युधिष्ठिराला अनेक धर्म, सूक्ष्मधर्म, नीती व उपदेश सांगत होते. शेवटी भीष्मांनी ठरवलेल्या वेळीं आपले प्राण त्यागले. त्यावेळेस एक विचित्र घटना घडली. भीष्मांच्या शरीरांतून जसे प्राण बाहेर पडत गेले, तसतसे त्यांच्या अंगातले बाण आपोआप सुटून खाली पडले. पाहाता पाहाता त्यांच्या शरीरांतले सर्व बाण निघून खाली पडले. हे दृश्य पाहून सर्व लोकांना फारच आश्चर्य वाटले.

तूप व सुवासिक द्रव्यें आणून पांडव आणि विदुराने चिता तयार केली. भीष्मांच्या शवावर पांढरेशुभ्र वस्त्र पांघरले गेले, आणि त्याच्यावर फुलें पसरली गेली. भीष्मांचे पांढरे छत्र युयुत्सुने, त्यांची चामरें भीम व अर्जुनाने, आणि त्यांची पगडी नकुल व सहदेवाने सांभाळली. युधिष्ठिर आणि धृतराष्ट्राने त्यांचे चरण हातांत धरून त्यांना अखेरचे वंदन केले. नंतर भीष्मांचा दहनसंस्कार झाला. त्यानंतर सर्वजण गंगेच्या किनारी पोंचले. युधिष्ठिराने जलतर्पण केले. त्याप्रसंगी युधिष्ठिर एखाद्या लहान मुलासारखा रडूं लागला. तेव्हां कृष्णाने खूण केली आणि भीमाने त्याचे सांत्वन केले. परंतु थोरल्या भावाचा शोक पाहून इतर पांडवांनाही अश्रू अनावर झाले. त्यावेळेस धृतराष्ट्राने युधिष्ठिराला समजावताना सांगितलं, ''माझे शंभर पुत्र होते, आणि ते सगळे गेले; तेव्हां मला आणि गांधारीला रडायला हवं! तूं आता कशासाठी रडतो आहेस? तूं तर राज्य जिंकलेलं आहेस. तुझ्या खांद्यावर आता फार मोठी जबाबदारी आहे. तूं असा रडत बसूं नकोस. यामुळें तुला आपल्या कर्तव्याचे पालन करता येणार नाही.''



व्यासमहर्षींनी युधिष्ठिरास यज्ञ करण्यास सांगितले. त्यावर युधिष्ठिराने उत्तर दिले, ''महात्मन्, अश्वमेध यज्ञांत दान द्यावे लागेल. लहानसहान देणग्या योग्य ठरणार नाहीत. मोठमोठाली दानें देण्यास आत्ता माझ्याजवळ धनसंपत्ती नाही. आपल्याला हे ठाऊकच आहे, कीं जनतेकडूनही हे वसूल करणें ठीक नाही. प्रजा बिचारी दीन आहे. त्यांची मुलेंबाळें अद्याप लहान आहेत. त्यांच्याकडे मागण्याची माझी इच्छा नाही. शोकाकुल असणारांकडून मी कर कसा वसूल करूं?''

त्यावर व्यासमहर्षींनी युधिष्ठिराला अपार धन मिळवण्याचा उपाय सांगितला. प्राचीन काळीं महाराजा मरुत्तने यज्ञ करुन ब्राह्मणांना मुक्त हस्ताने दानदक्षिणा देण्यासाठीं बरेच धन हिमालयावर तसेच ठेवलेले आहे. ते आणता आले तर ते धन यज्ञ करण्यासाठीं उपयोगी पडेल असं ते म्हणाले.

युधिष्ठिराने मरुत्त महाराजांची कथा ऐकण्याची इच्छा दर्शवली. तेव्हां व्यासांनी गोष्ट सांगितली.

''त्रेतायुगाच्या प्रारंभी मनूच्या वंशामधें करंध नांवाचा एक राजा झाला. त्याने बृहस्पतीला याजक बनवून शंभर अश्वमेध यज्ञ केले आणि नंतर जाऊन आपण इंद्राच्याच दर्जाचे आहोत असे सांगितले. त्याचा पुत्र मरुत्त हा पित्यापेक्षांही जास्त चांगला होता. त्याने यज्ञ करण्याचे ठरवले व हजारों सुवर्णपात्रें बनवून घेतली. त्या यज्ञासाठीं पात्रांबरोबरच यज्ञाची सारी उपकरणेंही सोन्याची होती. मरुत्त राजाने अनेक राजांच्याबरोबर जाऊन हिमालयाच्या उत्तर दिशेला, मेरुपर्वताजवळच्या एका लहान पर्वतावर हे यज्ञ केले. या यज्ञांसाठी बृहस्पती याजक होणार होता.

पण इंद्राला मरुत्त राजाबद्दल असूया होती. म्हणून त्याने बृहस्पतीला याजक होण्यास रोखले. म्हणून मरुत्तने बृहस्पतीचा धाकटा भाऊ संवर्त याला याजक नेमले. यज्ञ अत्यंत वैभवसंपन्न रितीने पार पडला. तेव्हां मरुत्तने सोन्याचे ढीग ठेवून ब्राह्मणांना दानधर्म केले. त्यावेळीं बरेच सोने शिलक राहिले होते. ते सोने तू घेऊन ये.'' हा सल्ला व्यासांनी युधिष्ठिराला दिला.



# भारताची ओळख

## प्रश्नावली

चांदोबामधें आपण आपल्या संत, ऋषीमहर्षींबद्दल यापूर्वी वाचले असेल. किंवा त्यांच्या जीवनावरचे चित्रपट आपण पाहिले असतील. तुम्हाला त्यांची नावे आठवतात कां? त्यांचे चरित्र व योगदान याबद्दल तुम्हाला कितपत माहिती आहे? खालील प्रश्नांची उत्तरें शोधा.

१. एका हिंदू राजकन्येने आपल्या राजेशाही जीवनाचा त्याग केला, व ती कृष्णाची परमभक्त बनली. तिचे नांव काय?

२. भगवान कृष्णाचा आणखी एक भक्त कवी होता. तो नेहमी भगवानाचे गुणवर्णन करणारी कवने रचून गात असे. तो अंध होता. त्याचे नांव माहीत आहे कां?

३. बंगालमधें भक्तीमार्गाचा प्रसार कोणत्या संताने केला?

४. आद्य शंकराचार्यांनी पांच ठिकाणी आपले मठ स्थापन केले. त्या गांवांची नांव सांगा.

५. एक तमीळ कवयित्री सुब्रह्मण्यम किंवा मुरुगन या दैवताची कट्टर भक्त होती. तिचे नांव काय?

६. सर्वधर्मसमभाव मानणारा एक महान मुस्लिम संत होता. त्याचे नांव सांगता येईल कां?

७. एका श्रेष्ठ संताला हिंदू व मुसलमान, सारख्याच श्रद्धेने मानतात. हा संत अहमदनगरजवळच्या एका गांवात राहात होता. त्याचे नांव काय? तो कोण होता?

८. भूतपूर्व पंतप्रधाव कै. राजीव गांधी यांची हत्या झाल्यानंतर श्रीपेरुंबुदूर हे लहान गांव प्रसिद्ध झाले. परंतु हे गांव एका सुप्रसिद्ध संताचे जन्मस्थान आहे. हा संत कोण?

(उत्तरें पुढील अंकी)

## फेब्रुवारीमधल्या प्रश्नोत्तरीची उत्तरें

१. रझिया सुलताना. हिने चार वर्षे राज्य केले.
२. मदर तेरेसा
३. पंतप्रधान इंदिरा गांधी
४. राजकुमारी अमृतकौर, यांनी आरोग्यखाते सांभाळले.
५. कॅप्टन लक्ष्मी

९. अरुंधती रॉय. 'गॉड ऑफ स्मॉल थिंग्ज' या कादंबरीच्या लेखनासाठी तिला पारितोषिक मिळाले.
१०. आशापूर्णादेवी. ''प्रथम प्रतिश्रुती'' या त्यांच्या कादंबरीसाठीत्यांना पारितोषिक मिळाले.








































# सावधान

सोमनाथचे कुटुंब छोटे होते. सोमनाथ, त्याची बायको, मुलगा व मुलगी. पत्नी कुसुम ही मृदु स्वभावाची होती. पतीचे सांगणे कधीही टाळत नसे. मुलगा राजपुरमध्ये शिकत होता. मुलगी मालती लग्नायोग्य झाली होती.

एक दिवशी नवराबायको सुखदुःखाच्या गोष्टी करत बसलेले असताना कुसुम आपल्या पतीला म्हणाली "मुलाला मोठ्या शहरात शिक्षणास पाठवायचे असेल तर पैसे साठवले पाहिजेत. घरखर्चात काटकसर करायला हवी."

"तुझ्यासारखी काटकसरी बायको असली तर बचतच बचत." सोमनाथाने पत्नीचे कौतुक केले.

येवढ्यात लालू त्यांना भेटायला आला. तो गोविंदपूरला रहात असे. तिथे सोमनाथची दहा एकर शेती होती. लालूच ती शेती करत असे. दरवर्षी जे पीक येत असे ते बिकून तो त्यांना पैसे देत असे. पण त्यांतील एक हिस्सा स्वतःसाठी ठेवत असे.

लालू सोमनाथला म्हणाला "मालक, आपले नशीब चांगले आहे असे दिसते. ह्या वर्षी फार चांगले पीक आले आहे. कर्जदारांकडून मिळणारी रक्कम देखील मिळाली. एक महिन्याच्या आंत आणखी पांच हजार रुपये मी आपल्याला आणून देईन."

"लालू तू आज फारच चांगली बातमी आणलीस. आज तुला आमच्या घरीच जेवायला थांबले पाहिजे." कुसुम प्रेमाने म्हणाली.

"नाही मालकीण! आज एका महत्वाच्या कामासाठी इथे आलो आहे. माझ्या मुलीचे लग्न ठरले आहे. दोन हजार रुपयांचे गळ्यांतले करायचे आहे. एका महिन्याच्या आंत मी तुमचे

रमण कथ्याल



पैसे परत करीन. आणि त्याचबरोबर आपले पैसे पण आणून देईन.''

लालू अगदी विश्वासू माणूस होता. जीव गेला तरी दिलेले वचन पूर्ण करेल असा! त्यामुळे त्याला कर्ज देण्यास ही नवरा बायको कधीही मागेपुढे पहात नसत. परन्तु ह्यावेळेस घरखर्चाचे फक्त दोनशे रुपये त्यांच्याकडे होते. कुसुमने आपल्या नवऱ्याची चलबिचल बघितली, खुणेने तिने त्याला आंत घरांत बोलावले व म्हणाली, ''लालूला पैशाची आज खरी गरज आहे. कुठून-तरी कर्ज काढून कां होईना, आपण त्याची नड भागवली पाहिजे. अशा अडचणीच्या वेळी त्याला मदत करणे आपले कर्तव्य आहे.''

दोघे विचारांत पडले की आता कर्ज कुणाकडे मागावे? तेव्हां कुसुमला एकदम विष्णूची आठवण झाली. अशी बातमी सगळीकडे पसरली होती की कुणाकडूनतरी त्याला पंधरा हजार रुपये मिळाले होते.

''आपल्याला पांच हजार रुपयांची गरज आहे. मुलीचा रेशमी साडीसाठी हट्ट चालू आहे. मुलगा कितीवेळां म्हणाला कीं त्याला चांदीची अंगठी हवी आहे. त्यांच्या मागण्या आपल्याला कांहीतरी करून पूर्ण करायला हव्यात. विष्णू-कडे आपण कर्ज मागितले तर तो कांही नाही म्हणणार नाही. मग जर कर्ज घ्यायचेच आहे तर पांच हजारच कां नाही घेऊं?'' कुसुम म्हणाली.

सोमनाथला बायकोचे म्हणणे पटले. तेवढ्यांत लालूपण सोनाराकडे गेला होता.

सोमनाथ विष्णूच्या घरी गेला. विष्णूने बाहेर येऊन बघितले तर घरासमोर खूपच लोक उभे होते. त्याला कळले की हे लोक कर्ज मागायला



आले आहेत. अचानक मिळालेल्या धनासाठी लोक त्याचे अभिनंदन करायला लागले. परन्तु मनांतल्या मनांत सगळ्यांना ह्याच गोष्टीची काळजी वाटत होती की त्याच्याकडे कर्ज मागायचे कसे?

विष्णूला येवढे लोक इथे कशाला आले आहेत हे बरोबर समजले होते. तो सगळ्यांना म्हणाला, ''पैसे मिळवणे अवघड आहे, पण खर्च करणे अगदी सोपे काम आहे. ही गोष्ट त्याच्याकडे पैसे असतात तेव्हां तो साफ विसरून जातो. म्हणून त्यांतून वाचण्यासाठी (खर्चकरण्यापासून) मी माझे सारे पैसे सावकारी करणारे शेठ सुंदर ह्यांच्याकडे देणार आहे. त्यावर ते दर महिन्याला मला व्याजदेतील. ह्यासाठी मला त्यांना कांही तारण द्यायची पण गरज नाही. जर मला केव्हां पैशांची गरज पडली तर मी ते कर्जाऊ घेईन. ते मला जे व्याज लावतील ते दुसऱ्यांपेक्षा थोडे कमी असेल. अनावश्यक खर्चापासून वांचण्यासाठी मी ही व्यवस्था करीत आहे.''

आपलेच धन दुसऱ्याकडे सोपवून स्वत: कर्ज घेणाऱ्याकडे कोण काय मागणार? त्यामुळे हळूहळू तेथून लोक पसार झाले. विष्णूची सोमनाथशी चांगली ओळख होती. त्या दोघांची चांगली मैत्री होती. विष्णूने सोमनाथची चलबिचल ओळखली. तो म्हणाला'' आपण दोघे जाऊं मित्र आहोत. चल, सुंदरकडे जाउ. पंधरा हजार रुपयांपर्यन्त कितीही रुपये मी तुला कर्जाऊ देऊं शकतो. पंधरा टक्के व्याज पडेल. माझ्यावर विश्वास ठेव. तुला किती रुपये हवेत?''

प्रत्येक शंभर रुपयांवर पंधरा रुपये व्याज म्हटल्यावर सोमनाथ सुन्नच झाला. त्याच्या तोंडून शब्दच फुटेना. विचार करुन तो कसेबसे



येवढंचम्हणाला," मला फक्त दोन हजार रुपये हवेत".

दोघेजण सुंदरकडे गेले. विष्णूने सोमनाथाच्या समोरच सुंदरला पैसे दिले. त्याच्या हातात पावती देत सुंदर म्हणाला "प्रत्येक शंभरावर दर वर्षी तेरा रुपये व्याज मी तुला देईन".

सोमनाथने सुंदरच्या अटी मानून दोन हजार रुपये कर्ज घेतले. त्याला पैसे देताना सुंदर म्हणाला". साधारण शंभर रुपयावर मी वीस रुपये व्याज वसूल करतो. पण जे लोक आपले पैसे माझ्याकडे ठेवतात त्यांच्याकडून शंभरावर तेरा रुपये ह्या हिशोबानेच मी व्याज वसूल करतो." त्याने कागदांवर सोमनाथच्या सह्या घेउन त्याला दोन हजार रुपये दिले.

सोमनाथ मनांतल्या मनांत दुःखी झाला होता. एकीकडे विष्णू त्याला जवळचा मित्र म्हणवत होता आणि दुसरीकडे स्वतः चेच पैसे व्याजी कर्जाऊ देत होता. स्वतःत्या लाचारीची त्याला अगदी घृणा आली. त्याने गरजू लालूस दोन हजार रुपये दिले. एक महिन्याच्या आंतच लालूने ते पैसे परत केले. जेव्हां व्याजासकट दोन हजार रुपये घेउन सोमनाथ विष्णूकडे गेला, तेव्हां विष्णु स्पष्टपणे म्हणाला" मी थोडाच सावकार आहे? मी काय मित्राकडून व्याज घेऊं?" असे म्हणून त्याने फक्त मुद्दलाचे दोन हजार रुपये घेतले.

सोमनाथ गडबडून गेला. आता त्याच्या लक्षांत आले की उगाचच कर्ज घेण्याच्या दुष्परिणामांची त्याला जाणीव व्हावी ह्या हेतूनेच विष्णू त्याला सुंदरकडे घेऊन गेला. जर तो असा वागला नसता तर बायकोच्या सांगण्याप्रमाणे सोमनाथने पांच हजार रुपये उधार घेऊन सगळेच्या सगळे खर्च केले असते.

हा त्याला सावध करण्यासाठी दिलेला धडा होता. लालूने दोन हजारा खेरीज धान्य विकून आलेले पांच हजार पण त्याला दिले होते. त्याने ते पैसे सुंदरकडे ठेवायला दिले व सांगितले, "दरमहा व्याज मात्र देत रहा!"







# राजाची समस्या

एका नगराचा एक राजा होता. तो चांगला होता, पण जरा जास्तच शहाणा होता. एक दिवस एक ब्राह्मण राजाला पुराण सांगत होता. वाचता वाचता यमलोकाबद्दल बोलताना, ब्राह्मणाने तिथे वेगवेगळी पापे करणाऱ्यांना कशा शिक्षा होतात ते सांगितले.

पुराणाचे वाचन संपल्याबरोबर राजाने ब्राह्मणाला विचारले, "गुरुवर्य, आपल्याला स्वर्ग व नरकाबद्दल चांगली माहिती आहे. तेव्हां कृपा करुन माझ्या शंकेचे निरसन करा. जे ज्ञान मला आहे, त्याप्रमाणे आपल्या डोक्यावर आकाश व पायाखाली जमीन आहे.

ह्या पृथ्वीवर वेगवेगळे प्राणी आहेत. त्यांतले काही लोक स्वर्गात व कांही लोक नरकांत का जातात? हे आपण मला विस्ताराने समजावून सांगा."

ह्या प्रश्नाचे ब्राह्मणाला नवल वाटले आणि भिती पण वाटली. की प्रश्नाचे उत्तर दिले नाही तर राजा आपल्याला काय करेल कोण जाणे! "महाराज आपल्या प्रश्नाला उत्तर देण्यास सर्व शास्त्रांचा उहापोह करायला लागेल. तेव्हां आपण मला थोडा वेळ द्या." असे राजाला सांगून ब्राह्मण दुसऱ्या दिवशी गांवी पळून गेला.

जेव्हां राजाला ब्राह्मण पळून गेल्याचे समजले, तेव्हां त्याला असेच वाटले की आपण विचारलेल्या प्रश्नाचे उत्तर येत नाही, म्हणूनच तो पळून गेला. त्यामुळे राजाने असा विचार केला की एवढा विद्वान माणूस देखील आपल्या प्रश्नाचे उत्तर देऊ शकत नाही, तेव्हां आपला प्रश्न फारच अवघड आहे. म्हणून जो कोणी भेटेल त्याला त्याने हाच प्रश्न विचारायला सुरवात केली.

लौकरच संपूर्ण राज्यभर सगळ्यांना राजाचा प्रश्न माहीती झाला. पुराण सांगणाऱ्या



ब्राह्मणाचा एक मुलगा होता. तो अगदी उनाड होता. सारखा आपल्या आईला त्रास देत असे. एक दिवस त्याची आई गहूं दळत होती तेव्हां तो तिच्या खोड्या काढायला लागला. चिडून जाऊन ती म्हणाली, ''नुसत्या उनाडपणापेक्षा राजाचा प्रश्न तूं सोडविलास तर किती बरे होईल?'' ''प्रश्न, समस्या तर गरिबांच्या असतात. राजाला पण प्रश्न पडतात? असा काय प्रश्न पडला आहे?'' मुलाने आईबरोबर दळण दळता दळता विचारले.

''आपल्याला वर आकाश दिसते, खाली जमीन. ह्या जमिनीवर शेकडो प्राणी आहेत. त्यांतले कांहीजण स्वर्गात व कांही नरकात कां व कसे जातात? हा राजाचा प्रश्न आहे.'' असे बोलत आईने जात्याचे वरचे चाक उचलले, तेव्हां मुलाला दिसले की आंत कांही गहूं मोडलेले आहेत, तर कांही दाणे जसेच्या तसे आहेत. त्याच्या डोक्यांत एकदम लख्ख प्रकाश पडला. तो सरळ राजवाड्यांत गेला. व पहारेकऱ्याला म्हणाला ''मला राजाला आत्ता-च्या आत्ता भेटायचे आहे.''

त्याचा वेष बघून द्वारपाल म्हणाला ''राजा तुझ्यासारख्या लोकांना थोडाच भेटेल? जा पळ.'' ''मी राजाच्या प्रश्नाचे निराकरण करण्यासाठी आलो आहे, असे राजाला सांग.'' ब्राह्मणाचा मुलगा म्हणाला.

जेव्हां राजाच्या कानावर ही गोष्ट गेली तेव्हां त्याला आंत येण्यास परवानगी मिळाली. पण



जेव्हां त्या मुलाला बघितले तेव्हां राजाला वाटले की हा कांही आपल्या प्रश्नाचे उत्तर देऊं शकणार नाही. ''माझा प्रश्न तुला कळला कां? तू खरोखरच माझ्या प्रश्नाचे उत्तर देऊं शकशील का?'' राजाने मुलाला विचारले.

''मी केवळ तोंडानेच उत्तर देणार नाही, तर आपल्याला प्रत्यक्ष कृतीने दाखवीन.'' मुलगा म्हणाला.

जाते व गहूं आणले गेले. एक मूठभर गहूं जात्यांत टाकून ते दळत मुलगा म्हणाला ''महाराज बघा! वरचे चाक आकाश आहे व खालचा स्थिर भाग जमीन आहे. त्यांत घातलेले गहूं म्हणजे सर्व प्राणीमात्र. गहूं घालणारा ईश्वर आहे. हाताची पांच बोटे पंचमहाभुते असून यमराज जात्याचा दांडा आहे. तो पाप्यांना जात्यांत भरडत असतो.''

असे म्हणत मुलाने जात्याचे वरचे चाक उचलले. आणि म्हणाला, ''पाहिलेत महाराज? कित्येक दाणे भरडले जाऊन यमयातना भोगीत आहेत. म्हणजे नरकांत गेले. पण कांही दाणे जसेच्या तसे आहेत. हे यमलोकापासून वांचलेले प्राणी आहेत. त्यांना नरकाचे भय नाही. ते स्वर्गसुख भोगत आहेत.''

राजा खूष होऊन म्हणाला, ''वा! तू तर मोठा ज्ञानी आहेस. लवकर सांग. तू कुणाचा मुलगा आहेस?''

मुलगा म्हणाला, ''महाराज मी आपल्याला पुराण सांगणाऱ्या ब्राह्मणाचा मुलगा आहे.''

''तू आपल्या वडिलांपेक्षाही ज्ञानी आहेस'' असे म्हणून राजाने त्याचा सत्कार केला. शालजोडी, धन, भेटवस्तू देऊन त्याला परत पाठविले. तेव्हांपासून ब्राह्मणाच्या मुलाने उनाडपणा सोडून दिला आणि तो चांगल्या तऱ्हेने आपले आयुष्य घालवू लागला.



१. तुम्ही 'चांदोबा' उर्फ 'चंदामामा'चे वर्गणीदार आहात कां? असल्यास कोणत्या भाषेतले हे मासिक वाचता ते लिहा.

..........................................................................

२. तुम्ही वर्गणीदार नसलात तर तुम्ही वाचण्यासाठी हे मासिक कुठून मिळवता? ( ✓ ही खूण करा)

विक्रेता : ..........................................................................

वाचनालय : ..........................................................................

मित्र : ..........................................................................

३. तुमची प्रत कितीजण वाचतात?

..........................................................................

४. तुम्हाला त्यांतली कोणती सदरें आवडतात? आवडीनुसार क्रम लावा.

१. ..........................................................................

२. ..........................................................................

३. ..........................................................................

४. ..........................................................................

५. ..........................................................................

६. ..........................................................................

५. चांदोबांत तुम्हाला आवडणाऱ्या कोणत्या गोष्टी व सदरें वाचायला मिळत नाहीत? तुम्हाला ती हवी आहेत त्यांची नावे लिहा.

१. ..........................................................................

२. ..........................................................................

३. ..........................................................................

४. ..........................................................................

६. तुम्हाला कोणत्या प्रकारची चित्रे आवडली आहेत? (कथेचे या सदराचे शीर्षक आणि कोणत्या महिन्याचा अंक ते कळवा.)

..........................................................................

..........................................................................

..........................................................................

..........................................................................

..........................................................................



७. [illegible] वाटले? [illegible]

..........................................................................

८. (अ). व्यावसायिक माहिती

तुमचे वडील : ..........................................................................

तुमची आई : ..........................................................................

(ब) कुटुंबाचे मासिक उत्पन्न : ( ✓ अशी खूण करा)

रु.५००० - ..........................................................................

रु. ५,००० - १०,००० - ..........................................................................

रु. १०,००० पेक्षां जास्त - ..........................................................................

९. तुम्ही टेलिव्हिजन पाहता कां?

दूरदर्शन: ..........................................................................

सॅटेलाईट चॅनेल: ..........................................................................

१०. तुमचा टीव्ही कसला आहे? (काळा/पांढरा) ..........................................................................

रंगीत ..........................................................................?

११. तुम्ही शाळेत कसे जाता?

पायी चालत: ..........................................................................

शाळेच्या बसने: ..........................................................................

सार्वजनिक बसने: ..........................................................................

स्वतःच्या वाहनाने

दोन चाकी : ..........................................................................

चार चाकी : ..........................................................................

तुम्हाला शाळेत सोडायला कोण येतात?

पालक: ..........................................................................

ड्रायव्हर: ..........................................................................

१२. खास मुलांसाठीं असलेल्या इतर एखाद्या मासिकाचे तुम्ही वर्गणीदार आहात कां?

नांव: ..........................................................................

१३. तुम्ही रोजचे वर्तमानपत्र वाचता कां?

नांव : ..........................................................................




# दैव सान्निध्य

वचनाचा पक्का विक्रमार्क पुन्हा झाडाजवळ गेला. त्याने झाडावरुन प्रेत काढून आपल्या खांद्यावर घेतले. आणि स्मशानाकडे जाऊं लागला. तेव्हां प्रेतांतील वेताळ म्हणाला "राजा, मला अजून हे समजलेले नाही, की तूं असे कोणते महान कार्य करण्यासाठी मध्यरात्रीं या भयाण-स्मशानांत फिरतो आहेस, एवढे कष्ट करीत आहेस? केवळ परिश्रम केल्याने आणि सहनशील असण्यानेच कार्यात यश मिळते, असा तुला कांही पुरावा मिळाला आहे कां? ज्याने तुझे ध्येय साध्य होईल. ज्या ध्येयासाठी तू इतके परिश्रम करतो आहेस, ते पूर्ण होणार आहे कां? कमीत कमी तुला थोडीशी तरी आशा वाटते



कां? जर असे नसेल तर तुझे सारे परिश्रम वाया जातील. तुला सावध करण्यासाठी रामाचारी नांवाच्या पुजाऱ्याची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक. आणि स्वतःला सुधार.'' असे म्हणून वेताळ गोष्ट सांगू लागला.

चक्रपुरीचा राजा चंद्रसेन आजारी पडला. वैद्यांनी आपल्या कडून सर्वतोपरीने प्रयत्न केले. पण त्याची तब्येत सुधारली नाही. राजाने एक दिवस एक स्वप्न पाहिले. त्याच्या स्वप्नांत एक दिव्यपुरुष अवतरला. आणि म्हणाला ''तुझ्या राजवटीत, लोकांचा स्वार्थ पराकोटीला जाऊन पोचला आहे. लोक दिवसाउजेडी पापें करत आहेत. कुल, मत, जात, ह्यावरून आपल्या सहनागरिकाचा अपमान केला जातो आहे, द्वेष वाढतो आहे. प्रजेच्या चुकांची जबाबदारी राजाचीच असते. ह्याच कारणांमुळे तूं, ज्याचे निदान सुद्धा करता येत नाही, इतक्या भयंकर आजाराचा बळी झाला आहेस.''

चंद्रसेनाने त्या दिव्य पुरुषास वंदन करुन विचारले, ''मी माझी चूक स्वतः सुधारीन. पण त्याआधी हा आजार तर बरा व्हायला पाहिजे ना? म्हणून आपण कृपा करुन कांहीतरी उपाय सांगा.''

तो दिव्यपुरुष म्हणाला, ''केवळ तीन तुळशीची पानें खा. तुझा आजार बरा होईल. पण जी व्यक्ती ही पाने तुझ्या तोंडात घालेल, तिने दहा वर्षे देवाजवळून एक क्षण सुद्धा न हलता अतिशय भक्तीभावाने देवाची पूजा केली असली पाहिजे.'' असे म्हणून तो दिव्य पुरुष अदृश्य झाला.

सकाळ झाल्याबरोबर चंद्रसेनाने मंत्र्यांना बोलावून आपल्या स्वप्नाविषयी सांगितले. सगळ्यांना ते स्वप्न खरे आहे असे वाटले. म्हणून महाराजांना जो बरा करुं शकेल अशा व्यक्तीचा शोध घेण्यास ते निघाले.

सीतापूर नांवाच्या गांवात रामाचे एक प्रसिद्ध देऊळ होते. त्या देवळाचा पुजारी रामाचारी उच्च कोटीतला भक्त होता. तो अत्यंत सत्शील होता. बारा वर्षांपूर्वी त्याला एका पंडिताबरोबर वाद करायला लागला होता. तो पंडित दूरच्या देशांत जाऊन ज्वालामाली देवाची भक्ती करुं लागला. या देवाचा उल्लेख पुराणांत देखील नाही. त्याचा असा दावा होता की हा ज्वालामाली, शंकर आणि केशवांपेक्षां श्रेष्ठ आहे. रामाचारीला त्याचा हा प्रचार व म्हणणे पटले नाही. तो ह्या पंडिताशी वादविवाद करत राहिला, तरी त्याचा कांही उपयोग झाला





नाही. शेवटी कंटाळून तो पंडितास म्हणाला ''तुझ्याशी बोलून कांही फायदा नाही. तुझ्या-सारख्या माणसाला शिवणें देखील पाप आहे.'' असे म्हणून तो तिथून निघून जाऊं लागला.'' ज्वालामालीवर विश्वास ठेवणाऱ्यांना कुठलेही पाप शिवूं शकत नाही. म्हणून तुला शिवण्यास मी जरासुद्धां घाबरत नाही. तुला शिवून थोडेसे पाप मी तुला फांसतो. जोपर्यन्त तू ज्वाला-मालीवर विश्वास ठेवणार नाहीस, तोपर्यन्त हे पाप तुला सोडणार नाही. तुलाच चिकटून राहील.'' असे म्हणत पंडिताने रामाचारीचा हात पकडून त्याला थांबविले.

रामाचारीने आपला हात ताबडतोब सोडवला, आणि सरळ राममंदिरात जाऊन रामाला म्हणूं लागला. ''हे प्रभुरामचंद्रा, एक पापी मला शिवला आहे. जोपर्यन्त मी पापमुक्त झालो आहे असा कौल तू देत नाहीस, तोपर्यन्त मी येथून हलणार नाही.''

त्या क्षणांपासून रामाचारी मंदिरात राहू लागला. त्याच्या बायको, मुलांनी त्याची खूप मनधरणी केली. तरी तो घरी यायला तयार झाला नाही. अशा तऱ्हेने बारा वर्षे गेली. लोक त्याला महाभक्त म्हणूं लागले. रामाचेच नाही तर त्याचे देखील दर्शन घ्यायला लोक येऊं लागले.

चंद्रसेनाच्या मंत्र्यांना रामाचारी विषयीं खबर मिळाली. राजधानीत येण्यास त्याला बोलावणे पाठवले. परन्तु त्याला नेण्यास आलेल्या दूतांना त्याने साफ सांगितले ''मी प्रतिज्ञा-बद्ध आहे. कुठल्याही परिस्थितींत राममंदिर सोडून येऊं शकत नाही.''

तेव्हां एका मंत्र्याने त्याला स्वतः भेटून सांगितले की महाराजांकडे आलात तर एक लाख मोहोरा मिळतील. त्याने रामाचारीला धमकी पण दिली की जर तो आला नाही तर त्याला कठोर शिक्षा मिळेल. रामाचारीने आपले म्हणणे सोडले नाही. त्याचा विश्वास होता की रामच त्याचे रक्षण करेल.

रामाचारीच्या भक्तीवर खूष होऊन मंत्री म्हणाले, ''स्वामी, देव तुम्हाला कौल देईल म्हणून तुम्ही वाट पहात आहात ना? महाराजांना जर आपण बरे करुं शकलात तर असे सिद्ध होईल, की ज्वालामालीच्या भक्ताच्या स्पर्शाने लागलेल्या पापांतून आपण मुक्त झाला आहात. म्हणून आपण महाराजांना बरे करा म्हणजे आपल्याला कौल मिळेल व महाराज पण बरे होतील. एका दगडांत दोन पक्षी.''



रामाचारी आपले डोके हलवत म्हणाला, ''चंद्रसेन महाराजांचे वडील उग्रसेन महाराज दरवर्षी या देवळांत येत असत. महाराज चंद्रसेन एकदा सुद्धां येथे आले नाहीत. त्यामुळेच प्रभु रामचंद्र त्यांना येथे बोलवत आहेत. जोपर्यन्त कौल मिळत नाही, तोपर्यन्त मंदिर सोडण्याचा प्रश्नच येत नाही. महाराजांनाच येथे घेऊन या.'' त्याने आपला हट्ट सोडला नाही.

अशा स्थितीत मंत्री बिचारा काय करणार? राजधानीस जाऊन त्यांनी सर्व हकीगत सविस्तरपणे महाराजांना सांगितली. हे सर्व ऐकून महाराज म्हणाले, ''रामाचारी एक महान भक्त आहे. अशा महान भक्ताच्या दर्शनाने माझी सगळी पापें धुऊन निघतील. माझे स्वप्न पुरे व्हायचे दिवस जवळ येत आहेत. मला सीतापूरच्या राममंदिरांत घेऊन जाण्याची व्यवस्था करा.''

राजाला सीतापूरला नेण्याची व्यवस्था ताबडतोब केली गेली. मोत्यांनी सजविलेल्या पालखीत त्यांना झोपवले. भोयांनी सावधपणे अशी पालखी वाहून नेली, की राजाला कुठल्याही प्रकारे त्रास होऊं नये. पालखीच्या पुढे सैनिक, मागे राजाचा परिवार; त्यामागे परत सैनिक होते.

सीतापूरच्या वेशीशी पोचत असतानाच जोराचे वादळ आले. वादळापासून बचावण्यासाठी भोयांनी एका वृक्षाखाली पालखी उतरविली. सैनिक व बाकी सगळे लोक झाडाच्या चारीबाजूला उभे राहिले.

त्याच वेळीं तिथे एक साधू आला. सरळ राजाजवळ येऊन त्याने विचारले ''मुला, तुझा प्रवास कुठपर्यन्त?''

राजा बसण्याचा प्रयत्न करूं लागला, तेव्हां साधूने त्याला उठूं दिले नाही. राजाने पडल्या पडल्याच त्याला आपली कहाणी ऐकविली. साधू राजाचे म्हणणे ऐकल्यानंतर म्हणाला ''माझ्याकडे तुळशीची अशी पाने आहेत ज्यामुळें कुठल्याही रोगावर इलाज होऊं शकतो. तू तीन पाने खाल्लीस तर तुझा आजार बरा होईल.''

''साधूमहाराज, माझा आजार फार विचित्र आहे. दहा वर्षे एक क्षणही मंदिर न सोडता आपण राहिला आहात कां?'' चंद्रसेनाने साधूला विचारले.

साधू हंसत म्हणाला ''मी तर रोज फिरणारा आहे.'' दुसऱ्या क्षणीं राजा म्हणाला, ''मी रामाचारीच्या हातचीच पाने खाईन.''

''मुला तू ज्ञानी आहेस. पण थोडेफार अज्ञान



तुझ्यामध्ये अजूनही आहे. म्हणून तू रामाचारी-कडे जाण्याचा हट्ट करत आहेस. तिथे तुला काही यश मिळणार नाही. तू येथूनच परत जाऊं शकतोस. मी दिलेली तुळशीची पाने खाऊन बरा होऊन येथूनच परत जा.'' साधूने राजाला समजावत म्हटले.

मंत्री हे सर्व बोलणे ऐकत होता. तो पुढे येऊन महाराजांना म्हणाला ''महाराज, हे स्वतः-ला फिरणारे मानतात. ह्याचा अर्थ हे कुठल्याही मंदिरांत थोडा वेळ देखील थांबत नाहीत. आणि वर ह्यांचे म्हणणे आहे की रामाचारीकडे जाऊन कांही फायदा नाही. असे दिसते आहे की आपली परिक्षा घेण्यास ह्यांना श्रीरामचंद्रांनी आपले दूत म्हणून पाठविले आहे. किंवा हे शत्रुचे गुप्तहेर असतील, ज्यांना आपण बरे झालेले बघवणार नाही. आपण इतक्या दूरवर आलोच आहोत तर ह्याच्यावर विश्वास ठेवून रामाचारीकडे कां बरे जायचे नाही?''

थोडा वेळ विचार करुन चंद्रसेन म्हणाला, ''साधूमहाराज आपल्या बोलण्यामुळे मला तर ज्ञान झाले आहे. पण कांही लोकांना एखादी गोष्ट सिद्ध झाल्यावरच कळते. मी रामाचारीकडे जाऊन येतो. तोपर्यन्त आपण इथेच रहाल का?''

साधूने तिथे थांबण्यास होकार दिला.

थोड्यावेळाने वादळाचा जोर आणखी वाढला. चंद्रसेन राममंदिरात गेला व त्याने रामाचारीने दिलेली तीन तुळशीची पाने खाल्ली. पण त्याचा काही प्रभाव पडला नाही. खिन्न व निराश रामाचारीला राजा म्हणाला, ''माझ्या-



बरोबर साधूचे दर्शन करण्यास चला.''

चंद्रसेन, त्याचा परिवार, रामाचारी, सगळे साधूकडे आले. साधूने दिलेली तीन तुळशीची पाने खाऊन राजा बरा झाला. त्याच्या अंगात चांगली ताकद आली. पालखीतून उतरून तो इकडे तिकडे फिरूं लागला. मग साधूचा निरोप घेऊन तो राजधानीस परतला. खिन्न, निराश रामाचारी देवळाकडे न जाता सरळ आपल्या घराकडे गेला.

वेताळ राजाला गोष्ट सांगून म्हणाला, ''बारा वर्षें रामाचारी घरी गेला नाही, कीं आपल्या बायकोमुलांबरोबर राहिला नाही. अशा महाभक्ताने दिलेली तुळशीची पाने चंद्रसेनाला बरी करूं शकली नाहीत. हे विचित्र वाटत नाही का? बारा वर्षांपर्यन्त प्रतिज्ञाभंग न करता, त्याने दृढ निश्चयाने आपले आयुष्य देवळांत घालविले.

त्याची निष्ठा, पूजा, असामान्य आहे. पण शेवटीं तो देवळांत न जाता सरळ घरीं गेला. तो नास्तिक तर नाही झाला? देवावरचा त्याचा विश्वास उडाला तर नाही? दुसऱ्या बाजूला त्या साधूकडे बघ.

तो कोणत्याही मंदिरात थोडावेळ देखील थांबत नाही. त्याच्या हातची तुळशीची पाने खाऊन राजा बरा झाला. हे तुला अशक्य आणि विचित्र वाटत नाही का? माझ्या ह्या शंकेचे उत्तर माहित असूनही तू जर मौन पाळलेस तर तुझ्या डोक्याची शकले होतील.''

राजा विक्रमार्कने त्याची शंका दूर करत म्हटले ''जिथपर्यन्त देव आणि देवाचा सहवास ह्यावरील विश्वासाची गोष्ट आहे, तिथपर्यंत रामाचारी आणि साधूचे विचार, मार्ग, वेगवेगळे आहेत. रामाचारी दुरहंकारी आहे, कारण त्याला असे वाटते की ज्या देवावर त्याचा विश्वास आहे तो फक्त मंदिरातच आहे. बाकी सगळे खोटे आहेत. ह्याचमुळे दूरच्या प्रांतातून आलेल्या पंडिताला त्याने पापी ठरवले. आणि ज्वालामालीस देव मानण्यास नकार दिला. इतकेच काय तर त्याला शिवणेंदेखील पाप आहे असे मानले. पण जेव्हां त्याने दिलेल्या तीन तुळशीच्या पानांचा राजावर परिणाम झाला नाही, त्याचा आजार बरा झाला नाही, तेव्हां त्याचा अहंकार मावळला. त्याला कळले की खरे तर त्याला आताच ईश्वराचे सान्निध्य मिळाले आहे. त्याला हे सत्य कळले की सारावेळ देवळांत बसून ईश्वराचा सहवास मिळत नाही.

आता योग्याची गोष्ट घेऊं. तो सदाभ्रमण करणारा, सगळीकडे फिरत असतो. कारण त्याच्या मताने हे जग म्हणजेच एक मंदिर आहे. प्रत्येक माणसांत देवत्व शोधणारा तो पुण्यवान पुरुष आहे. म्हणून त्याने दिलेल्या तुळशीच्या पानांनी राजा बरा झाला.

देवाबद्दल रामाचारी व साधूच्या विचारांत जो फरक आहे, तो समजून घेतल्यास राजाच्या बरा होण्यांत कांही वैचित्र्य किंवा अशक्यता वाटणार नाही.''

अशा तऱ्हेने राजाचा मौनभंग झाल्यामुळे वेताळ प्रेतासहित अदृश्य होऊन पुन्हां झाडावर जाऊन बसला.







# यक्ष पर्वत

## 3

(गण्डकमृग जमातीवाल्यांच्याबरोबर जाऊन खड्ग, जीवदत्त एका नदीच्या कांठावर चोरांना भेटले. मध्यरात्री जेव्हां खड्ग व जीवदत्त त्यांच्यावर हल्ला करणार होते तेवढ्यांत जवळच्या डोंगरातल्या गुहेंतून मांत्रिकाने पाठवलेली एक हिडीस राक्षसी, जोरजोरांत ओरडत चोरांच्या दिशेने येऊं लागली....

पुढें चालू)

जळणाऱ्या लाल निखाऱ्यांसमोर बसून चोरांचा सरदार आपल्या साथीदारांशी बोलत होता. गुहेंतून आलेल्या त्या राक्षसीच्या किंकाळ्या ऐकून तो तिकडे वळला. त्याला दिसले की एक काळी, कभिन्न, हिडीस राक्षसी त्यांच्याकडे धावत येते आहे. त्या काळ्या हडळीच्या हातात एक जळती मशाल पण आहे.

''काय भयानक रुप आहे. ही कोणी राक्षसी किंवा डोंगरी लावसट आहे की काय?'' असे म्हणत सरदार उठला. ''सरदार असे दिसते आहे की ही आपल्यालाच खायला येते आहे. हिच्या पासून आपले रक्षण केले पाहिजे.'' असे म्हणून चार चोर नदीच्या बाजूला पळायला लागले. ''डरपोक लेकाचे, पळूं नका. आपण भा[illegible]ी तिच्या चिंध्या करु.'' चोरांचा सरदार ओरडूं लागला.

पण त्याच्या साथीदारांनी त्याचे बोलणे अजिबात ऐकले नाही. कोणी झाडांमागे, तर कोणी नदीकडे पळूं लागले. येवढ्यांत ती भयानक राक्षसीण झोपलेल्या चोरांवर तुटून



पडली. आणि त्यांना लाथा मारुं लागली. तिने आपल्या मशालीने त्यांच्या कपडयांना आग लावली. सगळीकडे भयानक दृश्य दिसू लागले.

झाडावर बसलेल्या खड्ग व जीवदत्ताने हे दृश्य पाहिले. एक क्षणभर ते अवाक झाले. त्याच झाडाखाली गण्डकमृग जमातीचे चार लोक होते, ते तर भीतीने थरथर कापूं लागले.

''खड्ग, ही बाई ना कुणी राक्षसी ना कुणी पिशाचीण आहे. मांत्रिकाने आपल्या मंत्रसामर्थ्याने कुणाला तरी वश करुन घेउन, ह्या रुपांत पाठविले आहे.'' जीवदत्ताने आपली शंका बोलून दाखवली.

''कोणी कां असेना, जे काम आपण करणार होतो, ते काम हा मांत्रिकच करतो आहे. चोर जेव्हां पळून जातील तेव्हां कणसाच्या पोत्यात बांधलेल्या स्वर्णाचारीला सोडवून घेऊन, आपण इथून निघून जाऊ.'' खड्गवर्मा म्हणाला.

नदीच्या तीरावर त्या राक्षसीचे चाललेले भयानक कृत्य बघून जीवदत्त म्हणाला ''असे दिसते आहे की चोरांचा सरदार धाडसी आहे. त्याच्या बरोबर त्याचे कांही साथीदार पण आहेत. त्यांच्या मदतीने कुठल्याही क्षणी तो मागून तिच्यावर हल्ला करु शकेल. बघू, काय होईल ते.'' खड्गवर्मा म्हणाला ''जीवदत्ता, ह्या गडबडीत, स्वर्णाचारी उंटांच्या पायदळीं तुडवला तर जाणार नाही ना?''

तेवढ्यांत ज्या गुहेत मांत्रिक होता, तिथून एका मोठी ज्योत प्रज्वलित झाली. मांत्रिक तिच्यावर तेलांत भिजवलेल्या मशाली पेटवूं लागला, व ''शांभवी भैरवी'' असे म्हणत चोरांवर फेकूं लागला.

ह्या नवीन हल्ल्याने भांबावलेला सरदार आपल्या साथीदारांना म्हणाला, ''हे उंटवीरांनो, ही हिडीस बाई कुणीतरी पिशाचीण आहे, आणि वरच्या गुहेत तिचा कोणी साथीदार पण आहे. सर्वजण नदीत उतरण्यास तयार व्हा. कणसांची पोती पण नदीत फेका. पाण्याबरोबर ती वहात येतील. मग कुठेतरी त्यांना परत गोळा करुं.''

तेवढ्यांत मांत्रिक हातातली मशाल इकडे तिकडे फिरवत ओरडूं लागला, ''ए जटाधारी भुता, तूं अजून पर्यन्त ह्या चोरांना यमलोकाला नाही पाठवलंस? कणसांची पोती नदींत



फेकणाऱ्या त्या चोरांना पकड आणि नदीतल्या भुताचे भक्ष्य बनवून टाक.''

मांत्रिकाची आज्ञा ऐकताच जटाधारीभुताने, खांद्यावर कणसांची पोतीं घेऊन जाणाऱ्या चोरांना पकडून नदींत फेकायला सुरवातकेली.

तेवढ्यांत एक मानवी आवाज आला, ''वांचवा, मला वांचवा. मला नदींत फेकूं नका.'' पण ज्या पोत्यांत स्वर्णाचारी होता ते देखील नदींत फेकले गेले.

जीवदत्ताने तो आवाज ओळखला. जो ओरडतो आहे तो स्वर्णाचारीच आहे. कणसें भरलेले पोते बुडत नाही, त्यामुळे ते वहात किनाऱ्याला लागले. गण्डकमृग जमातीवाल्यांना सांगीत की ''नदीच्या किनाऱ्याने पुढे जा व ते पोते किनाऱ्याला लागले की पकडा.'' असे म्हणून जीवदत्त खाली उतरला.

''तुला गण्डकमृग जमातीवाल्यांना जे काय सांगायचे ते सांगून परत ये. मी ह्याच झाडावर बसून तुझी वाट पाहीन ''असे म्हणत खड्गवर्माने आपले धनुष्यबाण आपल्या हातांत घेतले.

जटाधारी भुताच्या आक्रमणाने घाबरलेल्या चोरांचा सरदार आपल्या साथीदारांना म्हणाला, ''नदीच्या कांठाने पळा. कसेही करुन कणसांची पोतीं आपण मिळवली पाहिजेत.'' असे म्हणत तो पण पळूं लागला.

''मी उशीर करुन अनर्थ केला. बदमाष जीव



वांचवून पळत आहेत'' असे म्हणत खड्गवर्माने सरदारावर एक बाण सोडला. पण तोपर्यन्त सरदार खूप दूर गेला होता. त्यामुले त्याच्यावर बाणाचा कांही परिणाम झाला नाही.

आता सगळीकडे एकदम शांतता पसरली. जसा काही जोराने पडणारा पाऊस थांबला आहे. तेवढ्यांत मांत्रिक गुहेबाहेर येउन ओरडायला लागला, ''अरे जटाभूत, कुठे आहेस तू? कणसांची पोती थोडीतरी मिळाली की नाही?'' जटाभूत लांब लांब टांगा टाकत गुहेकडे येणार, येवढ्यांत त्याला गण्डकमृग जमातवाले दिसले. तो ताबडतोब भयानक कर्कश आवाजात किंचाळायला लागला.

''यमदूत एक शिंगवाल्या बैलावर चढून बर्छा-भाले घेऊन येत आहेत.'' जटाभुताच्या



किंकाळ्या ऐकून मांत्रिक थोडा पुढे आला. मशालीच्या उजेडांत त्याने गण्डकमृग व त्यावर स्वार झालेल्या लोकांना बघितले. तो मग जोरजोरांत ओरडून सांगू लागला की ''अरे जटाभूत, हे कोणी यमदूत नाहीत, कीं एक शिंगवाले बैल! हे गण्डकमृग जमातीचे लोक व हे त्यांचे गण्डकमृग आहेत. अगोदर या माणसांना पकडून खा, नंतर त्या मृगांना खाऊं शकतोस.''

खड्गवर्मा व जीवदत्ताच्या लक्षांत आले की गण्डकमृग जमातवाले संकटात सापडणार आहेत. तेव्हां ते त्वरेने त्यांच्याडे जाऊं लागले. खड्गवर्माने जटाभुतावर एक बाण मारला. पण त्याच्या शरीरावर दाट केस असल्यामुळें त्याच्यावर बाणाचा कांहीही परिणाम झाला नाही.

''गुरु, माझ्यावर कोणीतरी बाण मारत आहे.'' जटाभूत ओरडला. मांत्रिक पळत येणाऱ्या खड्ग व जीवदत्ताला बघून ओरडला. ''अरे ए जटाभूत, बाण मारणारा क्षत्रिय दिसतो आहे. दुसरा अर्धा क्षत्रिय व अर्धा मांत्रिक दिसतो आहे. माझ्या मंत्रदंडाच्या सहाय्याने त्यांचे भस्म करुन हवेंत फुंकून टाकीन.'' तो उडी मारुन गुहेच्या आंत गेला.

गुहेकडे संशयाने बघत खड्गवर्मा जीवदत्ताला म्हणाला, ''जीव, तुझ्या ह्या पोषाखाने मांत्रिकाला घाबरवलेले दिसते. त्याला कळलेले आहे की तुला पण मंत्रतंत्र येतात. म्हणून बडबडत तो गुहेत पळाला. आता आपण काय करायचे?''

''प्रथम आपण त्या मांत्रिकाची व जटाभुताची खबर घेतली पाहिजे. हेच ठीक होईल ना?'' जीवदत्त म्हणाला.

''मग उशीर कशाला? चल, गुहेतच घुसूया.'' असे म्हणत खड्गवर्मा पुढे झाला. दोघांनी आंत जाण्यापूर्वी सभोवार बघितले. गण्डकमृग जमातीचे तीन जण जटाभुताला भाल्यांनी भोसकायचा प्रयत्न करत होते. पण भूत त्यांच्या वारांपासून बचाव करत ''गुरु गुरु'' ओरडत गुहेकडे पळत येऊं लागले.

गण्डकमृग जमातीचा एकजण मृगावरुन



खाली उतरुन जीवदत्ताजवळ येउन सांगू लागला ''सरकार, मोठी चूक झाली. आमच्याकडे अशी कुठली शक्ती असती तर त्या भुताला सहज पकडले असते. असं वाटतंय की आमच्या हल्ल्याचा त्याच्यावर कांहीच परिणाम झाला नाही. आम्ही त्याला जखमी करुं शकलो नाही, कारण त्याचे पूर्ण शरीर जटांनी झाकलेले आहे.''

''ह्यावेळीं तुमच्या म्हणण्या प्रमाणे भुताला दोराचा फांस फेकून पकडूं. तुम्ही लोक इथेच थांबा. आम्ही गुहेत जाऊन त्या भुताला आणि त्याच्या मालकाला पण पकडून आणूं.'' जीवदत्त म्हणाला.

खड्ग आणि जीवदत्त खडकांवरुन चढत गुहेच्या दाराशी पोहोचले. त्याआधीच जटाभूत गुहेच्या आंत घुसला. आणि मांत्रिकाला सांगू लागला ''गुरु, एकशिंगवाल्या बैलांवर बसलेल्या त्या दूतांना दोन मानव मदत करत आहेत. सगळे गुहेकडे येत आहेत. लवकरच त्यांचे भस्म करुन हवेंत उधळा.''

थोड्या वेळानंतर खड्गवर्मा व जीवदत्त गुहेंत आले. पण तिथे जटाभूत नव्हता, की मांत्रिक नव्हता. ''जीव, त्या दोघांकडे मायावी शक्ती आहे की काय?'' आश्चर्यचकित होत खड्गवर्मा म्हणाला.

''जर अशी शक्ती ह्यांच्याकडे असेल तर चोरांनी चोरलेला माल लुटायचा प्रयत्न ते कशाला करतील?'' जीवदत्त म्हणाला. तेव्हां



त्यांना दिसले की एक दगड थोडासा सरकलेला आहे. जोर लावून त्यांनी तो दगड पूर्ण सरकवला. झालेल्या फटींतून त्या दोघांनी बघितले तेव्हां त्यांना कोणीही माणसे दिसली नाहीत.

''जीव, ते दोघे बदमाष मोठ्या चलाखीने पळून गेले आहेत. आणि आपल्याला पण मूर्ख बनवले. त्यांना पळून जायला त्या बाजूने गुहेंतून वाट असेल.'' खड्गवर्मा म्हणाला.

''आता काय करायचे? सकाळ व्हायला आली आहे.'' असे म्हणत जीवदत्ताने गुहेंतली एक मशाल घेऊन भोकांतून बाहेर फेकली. तिच्या उजेडांत त्यांना एक भुयारी वाट दिसली.

खड्ग आणि जीवदत्त भोकांतून निसटून त्या



भुयारांत उतरले. तिथे त्यांना आणखी दगडांशिवाय कांही दिसले नाही. खड्गवर्माने म्यानांतून तलवार बाहेर काढली, व दुसऱ्या हातांत खाली पडलेली मशाल घेउन तो भुयारातील वाटेने पुढे निघाला. जीवदत्त आपला मंत्रदंड भिंतीवर आपटून कुठे गुप्त दरवाजा आहे कां, ते पहात होता.

अशा तऱ्हेने ते थोडा वेळ पुढे चालत राहिले. शेवटी गुहेच्या तोंडाशी आले. त्यांना समोर असे दिसले की पुढे मोठे पठार आहे. व छोट्या मोठ्या पडक्या इमारती व जुना बुरुज आहे. त्या जुन्या इमारती बघून जीवदत्त आश्चर्यचकित झाला. तो म्हणाला 'खड्ग, सूर्योदय व्हायला आला आहे. आणि भुयारामार्गे आपण कुठल्या पडक्या गांवात् पोहोचलो आहोत?''

"हे कुठले जुनाट गांव आहे? इथें आहे तरी काय? बस, थोड्याफार इमारती." खड्गवर्मा निराशेने म्हणाला.

"खूप पूर्वी हा गांवाचा मुख्य भाग सुद्धा असूं शकेल. मांत्रिक व जटाभूत इथेंच कुठेतरी बिळांतल्या सांपासारखे लपून बसले असतील. त्यांना बाहेर कसे हुसकणार?" जीवदत्त म्हणाला.

पण मांत्रिक आणि जटाभूत जीवदत्ताला वाटत होते तसे कुठेही लपले नव्हते. ते त्याच जागेच्या तळांत असलेल्या उंच मांडवात उच्च आसनावर बसलेल्या पुजारीणीच्या समोर गुडघे टेकून बसलेले होते. त्या पुजारीणीच्या दोन्ही बाजूला भयंकर आकाराचे दोन खड्गधारी सैनिक उभे होते.

पुजारीण डोळ्यांतून आग पाखडत दांतओठ खात म्हणाली, "अधम मांत्रिका, मूर्ख भुता, उठून उभे रहा. तुमच्या मूर्खपणामुळे ह्या पवित्र स्थानाचे रहस्य आता मनुष्याला माहित झाले आहे."

"महाशक्ती, आपली आज्ञा असेल तर त्या दोन्ही मानवांना बंदी बनवून महाभुताला बळी देतो." थरथर कांपत मांत्रिक म्हणाला.

पुजारीण विकट हास्य करत म्हणाली, 'तोंडापर्यन्त खाणें आणल्यावरच तुझा जटाभूत खाऊं शकतो. महाभुताच्या दयेने प्रयत्ना-शिवायच हे दोन्ही मानव इथे आले आहेत. ते कुठून आले आहेत हे जाणून घेतल्या शिवाय त्यांचा बळी देणे धोक्याचे आहे." "कळले महाशक्ती, आम्हाला समजले महाशक्ती" असे सर्वजण ओरडून म्हणाले.

पुजारीणीने नजर फिरवुन सगळ्यांकडे बघत सांगितले, "जे सांगणार आहे ते नीट लक्ष देउन ऐका.

मूर्खांनो, त्या दोन्ही तरुणांना पकडा. पण त्यांना काही इजा होउन देऊं नका. आणि माझ्याकडे घेऊन या. सूर्योदय झाला आहे. तेव्हां ते आपल्या पवित्र घरांमध्ये काय आहे ते बघायला गेले असतील. तुम्ही लपत छपत त्यांच्या पाठलाग करा. ऐका कीं ते आपापसांत काय बोलतात. दुपारच्या शुभ वेळेला त्यांना पकडून माझ्याकडे घेउन या. तोपर्यन्त त्यांना मोकळे फिरुं दे.

"जशी आपली आज्ञा." असे म्हणून पुजारीणीचे चार सेवक, मांत्रिक व जटाभूत मंडपातून बाहेर आले.

जटाभुताच्या नाराजीला पारावार उरला नाही. तो थयथयाट करत म्हणाला "गुरु, मागून जाऊन त्यांच्यावर तुटून पडीन आणि त्या दोन्ही मानवांना खाऊन टाकीन. त्यांच्यामुळेच महाशक्ती पुजारीणीच्या रागाला मी बळी पडलो, आणि शिव्या खाव्या लागल्या."

"माझा पण घोर अपमान झाला" असे म्हणत मांत्रिकाने एक छोटा चाकू आपल्या हातांत घट्ट धरत म्हटले "बघ, ते दोघे भुयाराच्या दारा समोर बसले आहेत.

आपण दोघे त्यांना मारुन टाकून जंगलात पळून जाऊंया. पुजारीण कितीही मंत्रशक्ती जाणत असेल, पण आपल्याला त्यांच्या शिव्या आत्ता खायच्या नाहीत. आणि नंतर पण नाहीत." असे म्हणत वाघासारखां दबा धरुन चालत, तो खड्गवर्मा आणि जीवदत्ताच्या दिशेने निघाला.

**(क्रमशः)**



# भारताच्या भूमिकेला अमेरिका व रशियाचा दुजोरा

विसाव्या शतकाच्या शेवटच्या वर्षात जगांतल्या दोन मोठ्या राष्ट्रांच्या नेत्यांनी भारताला भेट दिली - अमेरिकेचे राष्ट्राध्यक्ष बिल क्लिंटन व रशियाचे अध्यक्ष व्लादिमिर पुतीन ! बिल क्लिंटन १९ व २० मार्चला भारतांत आले होते. अमेरिकेचे अध्यक्ष वीस वर्षांनंतर भारतभेटीस आले. पाकिस्तानने भारताच्या सीमेवर चालूं ठेवलेल्या आक्रमक दहशतीच्या कृत्यांबद्दल क्लिंटननी खरमरीत टीका केली. त्यांनी पुढे सांगितले की सीमारेषेचा नियंत्रणनियम जर पाळला, तरच भारत-पाक तणाव कमी होण्यासाठी वाटाघाटी होऊं शकतील.


बिल क्लिन्टन

रशियाचे अध्यक्ष पुतिन हे २ ऑक्टोबरला चार दिवसांच्या भेटीसाठी आले. भारत-पाक संघर्षात परकीय हस्तक्षेप होतो आहे त्याबद्दल त्यांनी नाराजी व्यक्त केली. अणुशक्तीचा शांततापूर्ण कार्यासाठी उपयोग करण्याबाबत भारताने रशियाबरोबर सहकार्य करण्याच्या करारावर भारताने सह्या केल्या.

२००० सालीं तीन नव्या राज्यांची निर्मिती झाली. ही या वर्षांतली एक ठळक घटना आहे. मध्यप्रदेशांतून छत्तीसगड हे राज्य ३१ ऑक्टोबरला अस्तित्वांत आले. उत्तर प्रदेशांतले कांही जिल्हे एकत्र करुन त्यांचे उत्तरांचल राज्य ८ नोव्हेंबरला स्थापन आले. बिहारपासून अलग झालेले झारखंड हे भारतीय प्रजासत्ताकाचे २८ वे राज्य १४ नोव्हेंबरला बनले.


व्लादिमिर पुतीन

अर्धशतकापूर्वी केलेली भारताची राज्यघटना पुन्हां एकदा तज्ञ सल्लागारांकडून पाहिली जावी अशी निकडीची गरज वाजपेयी सरकारला वाटायला लागली. म्हणून अकरा सदस्यांचे एक राष्ट्रीय कमिशन (मंडळ) नेमण्यांत आले. १५ फेब्रुवारीला सरकारने निर्णय घेतला की पुढली २५ वर्षे लोकसभेच्या सदस्यांची संख्या आहे तीच (५४५ सभासद) राहील.

काश्मीरमधें अतिरेक्यांच्या कारवाया चालूंच होत्या. भारत व पाकिस्तान यांच्यामधे वाटाघाटी सुरुं होण्याचे चिन्ह वर्षभर कांही दिसेना. सीमापार गोळीबार दोन्ही देशांकडून होत राहिले. प्रधानमंत्री वाजपेयी यांनी एक ठाम निर्णय घेतला व १९ नोव्हेंबरला रमजानच्या पवित्र महिन्यांत जम्मू व काश्मीरमधें भारतापुरती युद्धबंदीची घोषणा केली.

२० डिसेंबरला त्यांनी हा निर्णय २६ जानेवारी २००१ पर्यंत वाढवल्याने जाहीर केले. त्याचप्रमाणें संयुक्त राष्ट्रसंघाच्या ठरावानुसार, काश्मीरच्या बाबतीत जनतेचे सार्वमत घेण्याचा निर्णय आता कालबाह्य झाला असल्यामुळें त्याचे समर्थन आता करता येणार नाही असे ही त्यांनी सांगितले.

विसाव्या शतकांतल्या भारताच्या राजकीय व सामाजिक इतिहासाची ही झलक जानेवारीपासून आम्ही तुमच्यापुढें ठेवली आहे. तुमचे मत अगत्य कळवावे.

\- संपादक





# मुलगी पसन्त आहे

करा़ट गांवात गोपू नांवाचा एक शेतकरी रहात असे. तो आपली शेती स्वतः करत असे. व गरज पडल्यास दुसऱ्या शेतकऱ्यांना पण मदत करत असे. गांवामध्ये त्याला चांगला मान होता.

त्याला दोन मुली होत्या. मोठ्या मुलीचे लग्न होऊन ती सासरी गेली होती. दुसरी मुलगी पण आता लग्नाची झाली होती. त्याची बायको त्याच्यामागे रोज कटकट करत असे, कीं दुसरीचे पण लवकरांत लवकर लग्न करुंया !

एक दिवस गोपू शंकराच्या देवळांत शंकराला अभिषेक करत होता. मंडपात बसलेल्या दुसऱ्या माणसाला तो म्हणूं लागला, ''हा आमचा देव सर्वांना पावतो. असं म्हणतात की आमचे एक पूर्वज शेतात नांगरत असताना त्यांना हे शिवलिंग मिळाले. ही गोष्ट गावांतल्या सर्व लोकांना जेव्हां कळली तेव्हां सर्वांनी मिळून हे मंदिर बांधले. रोज शेतांत जाण्यापूर्वी शेतकरी इथें येऊन देवाला नमस्कार करुन देवाचा आशिर्वाद घेऊन कामाला जात असत. तूं पण अभिषेक कर. तुझी इच्छा ते पुरी करतील.''

अभिषेकचा विधी पूर्ण झाल्याबरोबर पुजारी त्याच्याजवळ आला. आणि त्याने देवाचा प्रसाद त्यांना खायला दिला. त्याच वेळीं एक घोडागाडी देवळासमोर थांबली. गाडीवान एका माणसाला विचारत होता ''गोपूजींचे घर कुठे आहे?''

देवळाच्या बाहेर येणाऱ्या गोपूने तो प्रश्न ऐकला. तो गाडीवानाजवळ जाऊन म्हणाला ''मीच गोपू आहे. तुला काय हवे आहे?''

तेव्हां एक माणूस गाडीतून खाली उतरला. त्याने उंची कपडे घातले होते. गळ्यांत हार होता. चारी बोटांत अंगठ्या होत्या. चांगला श्रीमंत दिसत होता.

मुरलीधर



गोपूकडे निरखून बघितल्यावर तो माणूस म्हणाला ''अरे गोपू! तू मला ओळखले नाहीस?''

अरे तुरे करणाऱ्या त्या माणसाकडे आश्चर्याने बघत गोपू एकदम ओरडला. ''अरे मुकुन्द, तू!''

होकारार्थी मान हलवत मुकुन्द हंसत होता. मुकुन्द खूप अगोदर म्हणजे जवळ जवळ वीस वर्षांपूर्वी ह्याच गावांत रहात होता. घरजांवई बनून तो गोपालपूर नांवाच्या गांवात रहायला गेला.

सासर श्रीमंत होते आणि ह्याने पण मेहनत करून खूप पैसे मिळविले. श्रीमंत असल्यामुळे आसपासच्या गांवांत देखील त्याला मान मिळत असे.

मोठ्या प्रेमाने गोपू मुकुन्दला आपल्या घरी घेऊन गेला. बायको मुलांशी त्याची ओळख करुन दिली. त्याचे चांगले आदरातिथ्य केले, आणि म्हणाला, ''वीस वर्षें झाली, तरी न विसरता माझ्या घरी आलास. असं वाटतंय की जणूं सुदाम्याच्या घरी श्रीकृष्ण भगवान आले आहेत. गांवात माझे थोडेफार चांगले नांव आहे. माझ्याकडून जर कांही मदत होण्यासारखी असेल तर मी जरुर करेन.''

मुकुन्द हंसत म्हणाला, ''गोपू माझे म्हणणे लक्ष देऊन ऐक. मला दोन मुलगे आहेत. एकही मुलगी नाही. माझे दोन्ही मुलगे शेती करतात. शेती हा आमचा सहावा प्राण आहे. कितीही नोकर माणसे असली, तरी शेतीची कामे आम्ही स्वतः करतो. माझी बायको पण घरी राहून घरकाम करते. गाईगुरांची काळजी होते. देवदयेने पहिली सून देखील अशाच स्वभावाची मिळाली आहे. दुसरी सून बघायला जवळच्याच वसन्तपूर गांवी जाणार होतो. पण मला नाही वाटत त्याची आता कांही आवश्यकता आहे. तुझ्या घरीं आल्यावर मला असें वाटले की तुझी धाकटी मुलगी वाणी माझी दुसरी सून झाली, तर फार चांगले होईल. हे स्थळ माझ्या मुलाला व पत्नीला पण आवडेल. मी माझे मनोगत तुला सांगितले. या नंतर जशी तुझी मर्जी.''

गोपूच्या आनंदाला पारावार राहिला नाही. त्याला वाटले आपण स्वप्नांत तर नाही ना? तो म्हणूं लागला ''माझे ह्यापेक्षां अधिक मोठे भाग्य काय असणार? माझी मुलगी एका संपन्न कुटुंबात सून म्हंणून जाईल, ह्यापेक्षां मला आणखी काय पाहिजे? तूं जेवढा मागशील





तेवढा हुंडा मी कदाचित् देऊं शकणार नाही, पण थोडाफार हुंडा मी नक्कीच देईन.''

मुकुन्द गोपूची पाठ थोपटत म्हणाला, ''गोपू, तुझ्यापासून कांही लपलेले नाही. मी देखील साधासुधा शेतकरी तर होतो. घरजांवई होऊन श्रीमंत सासुरवाडीस गेलो. पण त्या लोकांनी माझा फार चांगल्या तऱ्हेने सांभाळ केला. मला आपल्या कुटुंबातलाच एक मानला. आपल्या व्यवहारांत, बोलण्या चालण्यांत कधी कडवटपणा आणला नाही. मी हुंडा घेऊन काय करुं? माझ्याकडे पैसा अडका पुष्कळ आहे. सून आमच्या कुटुंबात मिळूनमिसळून वागेल, आमच्या कुटुंबातलीच एक होऊन जाईल, येवढीच माझी मुलीबद्दल अपेक्षा आहे.''

मुकुन्द निघण्याआधी असे ठरले की, मुकुन्दची बायको व मुलगा लवकरच मुलीला पहायला येतील. आणि मग मुहूर्ताची तारीख ठरेल. मुकुन्दला निरोप देण्यास जेव्हां गोपू बाहेर आला, तेव्हां परसदाराकडून वाणी पळत आली व म्हणाली, ''लवकरच जोराचा पाऊस येईल असे वाटते आहे. थोडं थांबून नंतर गेलात तर बरे होईल'' मुकुन्द आकाशाकडे पहात म्हणाला, ''तू असे काय म्हणतेस? इथे तर चांगले कडक उन पडले आहे. आणि तू म्हणतेस पाउस येईल?''

वाणी मुकुन्द आणि आपल्या वडिलांना मागच्यादारी घेऊन गेली. आणि म्हणाली, ''हे बघा, मुंग्या तोंडात पांढरी अंडी पकडून ओळीने बाहेर येत आहेत. कोंबडी आपले पंख पसरुन वाळवते आहे.

माशा सैरावैरा इकडे तिकडे उडत आहेत. ही सगळी पावसाची लक्षणें आहेत.''

मुकुन्द ताबडतोब म्हणाला, ''वा!वा! तू माझी सून व्हायला अगदी योग्य मुलगी आहेस. तुझ्या सासूला तू एकदम पसंत पडशील.''

थोड्याच वेळांत पाऊस पडूं लागला. व वाणीचे भविष्य खरे ठरले.

घरीं आल्यावर मुकुन्दने आपल्या बायकोला सर्व हकीगत सांगितली. त्याची बायको व मुलगा वाणीला बघायला आले. त्यांना पण ती खूप आवडली. त्यांनी आपापसांत ठरविले, वाणी आपली सून करायची.

मुकुन्दच्या बायकोने वाणीला विचारले ''छोटा आणि मोठा जर मामाला मिळाले तर फायदा होईल, कीं आंधळा आणि कुबडा मिळाले तर फायदा होईल? ह्याचे बरोबर उत्तर दिलेस तर माझी सून होण्याला योग्य ठरशील.''

वाणीने लगेच उत्तर दिले. ''असे जर समजले की ह्यापासून गोपाललाच फायदा होणार आहे, तर मामाबरोबर कुणीही राहिले तरी त्याचा फायदाच होईल.''

वाणीचे उत्तर ऐकून मुकुन्दचा आनंद गगनात मावेना. तो आपल्या मुलाला म्हणाला, ''मुला, मला वाणी अतिशय आवडली आहे. तीच तुझी पत्नी व्हायला लायक आहे.''

तेव्हां मुकुन्दच्या मोठ्या मुलाने वाणीला समजावून सांगितले की ''नवग्रहांत सूर्य हा मोठा आहे. बुध हा छोटा. आंधळा म्हणजे शुक्र व कुबडा म्हणजे शनी. मामा म्हणजे चंद्र. जेव्हां हे सगळे ग्रह चंद्राजवळ येतात तेव्हां पाउस पडतो. आपली ग्रहदशा चांगली असेल तर असे घडते. तेव्हां शेतीला आवश्यक असणारा पाऊस पडतो. गुरु ग्रहावर विश्वास ठेवूनच शेतकरी शेती करतो. तू बरोबर उत्तर दिलेस म्हणून मी तुझे कौतुक केले.''

वाणी हंसत म्हणाली, ''हे अनुभवाचे बोल आहेत पण त्याच्यावरच अवलंबून रहाणे हाही बरोबर मार्ग नाही.''

हे ऐकून मुकुन्दची बायको तिच्यावर जास्तीच खूष झाली. कारण तिच्या म्हणण्यांत ओतप्रोत सत्य भरलेले होते.

थोड्याच दिवसांनी त्यांचे लग्न झाले. जाता जाता मुकुन्द गोपूला म्हणाला, ''अगदी योग्य मुलीला सून म्हणून घेऊन जात आहे. तिच्या आगमनाने माझ्या घराची भरभराट होईल.''





## ६२. अश्वमेध यज्ञ

# महाभारत

युधिष्ठिराच्या राज्याभिषेकानंतर श्रीकृष्णांनी बराच काळ हस्तिनापुरांत राहून त्यांचा पाहुणचार घेतला. त्यावेळेस त्यांना आपले पिता वसुदेव यांना भेटण्याची इच्छा झाली. म्हणून सात्यकी व सुभद्रेसह ते द्वारकेला परत आले.

वसुदेवाने कृष्णाकडून युद्धाची सारी हकीकत जाणून घेतली आणि आपला नातू अभिमन्यू याच्या मृत्यूबद्दल शोक व्यक्त केला.

त्यामधल्या काळांत युधिष्ठिराने अश्वमेध यज्ञासाठी आवश्यक ते धन हिमालयांतून आणण्याचा संकल्प केला. पांडवानी सैन्य एकत्र केले. तेव्हां धृतराष्ट्र, कुंती आणि गांधारीची अनुमती घेऊन पांडव हिमालयाच्या दिशेने जाऊं लागले. नद्यानाले, अरण्ये व पर्वतांच्या रांगा ओलांडत ते हिमालयांत पोंचले. मरुत्तने जिथे आपली संपत्ती ठेवली होती तिथेंच त्यांनी मुक्काम ठोकला. एक रात्रभर उपवास व जागरण करुन ते व्याघ्रांबरावर बसले. आणि त्यांनी शिव, कुबेर आणि मणिभद्राची प्रार्थना केली. भुतांसाठीं अन्नबळी देऊन त्यांनी ती संपत्ती शोधून काढली. ती सारी सोन्याची पात्रें होती. ती घेऊन जाण्यासाठीं असंख्य उंट, घोडे, वाहने, आणि माणसांची जरूर पडली. शेवटीं सारे धन घेऊन पांडव मंडळी हस्तिनापुराकडे परतली.

अश्वमेध यज्ञाची तयारी सुरुं आहे ही बातमी ऐकून कृष्ण, प्रद्युम्न, सात्यकी वगैरेंना घेऊन





हस्तिनापुराकडे निघाले. त्यांच्याबरोबर सांब, चारुदेष्ण, गद, कृतवर्मा, सुभद्रा आणि बलराम-देखील निघाले. धृतराष्ट्राने विदुराच्या बरोबर पुढें होऊन त्यांचे स्वागत केले. यावेळेस कृष्ण युयुत्सुच्या भवनांत राहिले.

त्यावेळीं उत्तराने एका बालकाला जन्म दिला. पण ते बालक रडले नाही. निर्जीव असल्यासारखे पडलेले होते. सर्वजण फारच उदास झाले. कुंतीने कृष्णाला बोलावण्याचा विचार मनांत आणला. तेवढ्यांत सात्यकीबरोबर कृष्णच तिथें आले. त्यांना पाहून तिथें उपस्थित असलेल्या सुभद्रा, द्रौपदी वगैरे स्त्रिया रडायला लागल्या.

कुंतीदेवी कृष्णाला पाहून रडवेल्या आवाजांत म्हणाली, "हे कृष्णा, आता तूंच या बालकाला वांचवलं पाहिजेस. अश्वत्थामाने ज्या अस्त्राचा उपयोग केला होता, त्यामुळें तुझ्या भाच्याचा मुलगा आज मृतावस्थेंत जन्मला आहे. त्याला कृपा करुन वांचव."

अशाप्रकारें सुभद्रा, उत्तरा आणि द्रौपदीनेही कृष्णाला अनेक प्रकारे तेच सांगितले. ही बातमी ऐकून उत्तरा बेशुद्ध झाली.

कृष्णाने आपल्या कमलचरणांनी मृत बालकाच्या शरीराला स्पर्श केला. तेव्हां त्या बालकाच्या शरीरांत चेतना निर्माण झाली. लगेच सर्वजण प्रसन्न झाले. ब्राम्हणांनी बालकाला आशिर्वाद दिला. पांडवांचा वंश परिक्षीण होत असतानाच तो बालक जिवंत झाला म्हणून त्याचं नांव कृष्णाने परिक्षित ठेवलं. ते बालक दिसामाजी चांगलं वाढूं लागलं.

परिक्षित महिन्याचा झाला. तोपर्यंत पांडव हिमालयांतले धन घेऊन हस्तिनापूरला परत आले. त्यांच्या आगमनाची माहिती कळताच शहर सुंदर तऱ्हेने सजवले गेले. सर्व पांडवांचे स्वागत करायला यादव पुढें निघाले. सर्वत्र नृत्यगायन सुरुं झाले. या कोलाहलांत पांडवांनी हस्तिनापुरांत प्रवेश केला. जेव्हां त्यांना इतरांकडून कळलं की त्यांना एक नातू झाला होता, तो जन्मतःच मृत होता आणि त्या बालकाला कृष्णाने बांचवलं, तेव्हां ते फारच प्रसन्न झाले, सर्वांनी मनमोकळेपणाने कृष्णाचे अभिनंदन केले.

त्यानंतर युधिष्ठिराने व्यास आणि कृष्णाची संमती घेऊन अश्वमेध यज्ञ करण्याचा उपक्रम केला. चैत्र पौर्णिमेच्या दिवशीं युधिष्ठिराने यज्ञाची दीक्षा घेतली. यज्ञाच्या घोड्याची परीक्षा सूत व ब्राह्मणांनी मिळून करायची होती. त्यानंतर त्या घोड्याला सर्व देशांत फिरवून आणायचा होता.



साऱ्या देशभर हिंडवून नंतर तो परत येणार होता. ही या यज्ञाची पद्धत होती.

अश्वमेध यज्ञाच्या वेळीं युधिष्ठिर पूर्जेत असतील म्हणून अशी योजना ठरली की भीम नकुलच्या मदतीने राज्यकारभार पाहील. अर्जुनाने यज्ञाच्या घोड्यामागून चालत घोड्याचे रक्षण करायचे ठरले आणि त्याचे रक्षण व कुटुंबाचे उत्तरदायित्व संभाळण्याची जबाबदारी पाहण्यास सहदेवास नियुक्त केले.

अश्वरक्षकाच्या रुपांत त्याच्यामागें जाणाऱ्या अर्जुनाला युधिष्ठिराला सांगितले, "हे अर्जुना, यज्ञाच्या घोड्याच्यामागून त्याचे रक्षण करीत जाताना जर कुणा क्षत्रियाने तुझ्याशी सामना केला, तरी तूं त्याच्याशी वैर निर्माण करुं नकोस. आणि त्यांनाही यज्ञांत भाग घेण्यासाठीं निमंत्रण दे."

यज्ञाची दीक्षा घेऊन युधिष्ठिराने यज्ञाचा घोडा स्वतःच सोडला, घोड्याच्या पाठीमागून गांडीव धनुष्य धारण करून अर्जुन चालूं लागला. तेव्हां नगरांतले एकत्र झालेले सारे नागरिक फारच आनंदित झाले. अर्जुनाबरोबर अश्वाचे पोषण करणारा याज्ञवल्क्याचा एक शिष्य, वेदपारंगत कतिपय ब्राह्मण व आणखी कांही क्षत्रिय चालूं लागले. युद्धांत पांडवांनी जी भूमी जिंकली होती, त्यांत यज्ञाचा घोडा मुक्तपणें फिरत होता.

जरी युधिष्ठिराने सांगितलं होतं की कुणाशी युद्ध करुं नकोस, तरीही अर्जुनाला आपल्या मार्गांत अनेकजणांशी युद्ध करावे लागले. कांही ठिकाणीं किरात व यवनांशी त्याला सामना करावा लागला. अनेक आर्य क्षत्रियांनी देखील अर्जुनाशी युद्ध केले. परंतु सगळ्या लहानमोठ्या युद्धांत अर्जुन नेहमी विजयी ठरला.





महाभारतीय युद्धांत त्रिगर्ताला अर्जुनाने ठार मारलं होतं. म्हणून यज्ञाच्या घोड्यामागून अर्जुन येतो आहे असं समजल्यानंतर त्रिगर्तांचे मुलगे व नातू यज्ञाच्या घोड्याला पकडण्यासाठीं आले. त्यांच्याशी ममतेने बोलावे असे अर्जुनाच्या मनांत होते, पण त्या सर्वांनी अर्जुनावर बाणांचा वर्षाव केला. म्हणून अर्जुनाला त्रिगर्तांचा नेता सूर्यवर्मा याच्याशी युद्ध करावे लागले. जेव्हां अर्जुनाने सूर्यवर्मा, केतुधर्म, धृतवर्मा आणि इतर अठरा त्रिगर्तबिरोबरच्या योद्धयांना मारले, तेव्हां बाकीचे सर्वजण अर्जुनाच्या आधीन झाले.

अशाच तऱ्हेने प्रागज्योतिषपुरांत भगदत्ताचा पुत्र वज्रदत्त याने अर्जुनाबरोबर युद्ध केले. अर्जुनाने त्याला पराजित केले, पण त्याचा वध न करता त्याला सोडून देऊन अश्वमेध यज्ञांत भाग घेण्यासाठीं त्याला निमंत्रण दिले.

त्यानंतर सैंधवांच्याबरोबर अर्जुनाने युद्ध केले. अर्जुनाने सर्व सैंधवाना हरवले. महाभारतीय युद्धांत अर्जुनाच्या हातून सैंधव मारला गेला होता. त्याची पत्नी दुःशला धृतराष्ट्राची मुलगी होती. अश्वमेध यज्ञाच्या घोड्याबरोबर अर्जुन आला आहे, हे ऐकल्यावर दुःशलाचा मुलगा सुरथ याने प्राणत्याग केला.

दुःशलाने आपल्या नातवाला एका रथांत बसवून त्याला अर्जुनाकडे नेले आणि ती म्हणाली, ''हाही तुझा नातू आहे, परीक्षितासारखाच; त्याला पाहून तूं या साऱ्या सैंधवांना क्षमा कर. याच्या आजोबांनी तुझ्याशीं द्रोह केला होता. त्याबद्दल आम्हाला फार वाईट वाटतं, म्हणून तूं ही गोष्ट विसरून जा.''

हे बोलणें ऐकून अर्जुनाने आपली चुलतबहीण दुःशला हिला जवळ घेतले, व तिला आणि तिच्या नातवाला घरीं परत पाठवले. त्यानंतर तो आपल्या यज्ञाच्या घोड्याच्या पाठीमागून जाऊं लागला.

कांही दिवसानंतर यज्ञाचा घोडा मणिपूरमधें पोंचला. त्यावेळेस बभ्रुवाहन मणिपूरवर राज्य करीत होता. तो अर्जुन व चित्रांगदाचा पुत्र होता. जेव्हां त्याने ऐकलं की त्याचे वडील त्या प्रदेशांत येत आहेत, तेव्हां त्याने कांही ब्राह्मणांना बरोबर घेतले व तो अर्जुनाला पाहायला आला.

आपल्या मुलाचे हे वर्तन पाहून अर्जुनाला फारच राग आला. तो म्हणाला, ''तूं क्षत्रिय नाहीस की काय? मी इथें कांही पाहुणचार घ्यायला आलेलो नाही. हातांत अस्त्र घेऊन यज्ञाच्या घोड्याचे रक्षण करण्यासाठी आलो आहे. जर तूं



खरा वीर असशील तर घोड्याला पकडून माझ्याशी युद्ध कर। हे करायचं सोडून तूं गोड गोड गप्पा मारायला कशाला आला आहेस? तुला याची लाज वाटत नाही कां?''

त्यावेळीं तिथें उलुपी आली, आणि आपला मुलगा बभ्रुवाहन याला म्हणाली, ''बाळ, मी नागवंशातली एक स्त्री आहे, तुझी माता आहे. तुझे पिताश्री युद्धाच्या मस्तींत आहेस. तूं युद्ध करून त्यांना प्रसन्न कर.''

यावर बभ्रुवाहनाचा पुरुषार्थ जागा झाला. रणवेष घालून, रथावर स्वार होऊन तो अर्जुनाशी युद्ध करायला आला. दोघांच्यात जोरदार युद्ध झाले. त्या युद्धांत दोघेही बेहोष झाले. चित्रांगदाने येऊन पाहिले की तिचा पती व पुत्र दोघेही बेहोष होऊन जमिनीवर पडलेले आहेत. ती रडायला लागली. थोड्याच वेळांत बभ्रुवाहन शुद्धीवर आला. अर्जुनासाठीं रडणारी आपली माता पाहून आपल्या कृत्याबद्दल त्याने पश्चात्ताप व्यक्त केला आणि अनशन व्रत केले.

त्यावेळेला उलुपीने त्याच्याजवळ जाऊन म्हटले, ''अरे वेड्या, तुला काय वाटलं की तुझे वडील तुझ्या हातून मारले गेले आहेत? अरे, त्यांना कुणीही जिंकू शकणार नाही. मी आपल्या मायेच्या प्रभावाने तुझ्या मनांत असा भ्रम पैदा केला आहे. हा मणी घेऊन जा आणि त्याचा स्पर्श त्यांना कर. ते लगेच उठून उभे राहातील.'' बभ्रुवाहनाने त्याप्रमाणें केले. त्या मण्याचा स्पर्श होताच अर्जुन उठून बसला. अर्जुनाने बभ्रुवाहनाला आलिंगन दिले. तिथेंच उलुपी आणि चित्रांगदाला पाहून तो फारच प्रसन्न झाला. त्या दोघीजणींना त्याने विचारले, ''तुम्ही



दोघी युद्धक्षेत्रांत कां आला आहात?''

त्याला उत्तर देताना उलुपी म्हणाली, ''आपण भीष्मपितामहांना अन्यायाने मारलं होतंत, आणि त्या पापाचे आपण धनी झाला होतात. त्या पापाचा परिहार करण्याच्या निमित्ताने मी आपल्याला आपल्या पुत्राच्या हातून मारवलं.''

हे ऐकून अर्जुन अतिशयच प्रसन्न झाला. त्याने बभ्रुवाहनास अश्वमेध यज्ञांत भाग घेण्यासाठी निमंत्रण दिले. बभ्रुवाहनाने अर्जुनाला विनंती केली की त्याने निदान एक रात्र तरी आतिथ्य स्वीकारावे. पण घोड्याच्या पाठोपाठ जाणें अनिवार्य असल्यामुळें ही विनंती मान्य करणे शक्य नव्हते असे अर्जुनाने सांगितले.

यज्ञाचा घोडा त्यानंतर समुद्रकिनाऱ्यापर्यंत गेला, व तिथून इंद्रप्रस्थाकडे जाऊं लागला. अनेक देश फिरत फिरत शेवटी मगधची राजधानी राजगृह

इथें तो पोंचला. तिथला राजा मेघसंधि अर्जुनाबरोबर केलेल्या युद्धांत हरला.

मेघसंधीच्या युद्धकौशल्यावर अर्जुन खूष होऊन म्हणाला, "तूं लहान आहेस, तरीसुद्धां तू फारच चांगल्या प्रकारें माझ्याशी लढलास. तुझा वध करण्याची मला मुळीच इच्छा नाही. येत्या चैत्र पौर्णिमेला माझे ज्येष्ठ बंधू युधिष्ठिर अश्वमेध यज्ञ करणार आहेत. तूं तिथे येऊन यज्ञांत भाग घेतला पाहिजेस."

अशा रितीने अर्जुनाने घोड्याच्या मागून चालत म्लेंच्छ, निषाध, शकुनिचे पुत्र, गांधार राजा, द्राविड, आंध्र आणि उडिय राजांच्याबरोबर युद्ध केले आणि विजयी होऊन हस्तिनापुरला परत आले. तोपर्यंत चैत्रपौर्णिमा जवळ आली होती. एक महिन्यापूर्वीच यज्ञाच्या साऱ्या विधींना सुरवात झालेली होती.

यज्ञाच्या वेळीं असंख्य लोक उपस्थित होते. त्यांत अनेक वेदविद्यापारंगत आणि राजेही होते. कृष्ण आणि बलराम आपल्याबरोबर सात्यकी, प्रद्युम्न, सांब, गदा, कृतवर्मा आणि अनेक यादव प्रमुखांना बरोबर घेऊन आले होते. चित्रांगदा व उलुपीला बरोबर घेऊन बभ्रुवाहनदेखील यज्ञांत भाग घेण्यास आला.

ठरलेल्या मुहूर्तावर अश्वमेध यज्ञ मोठ्या थाटामाटांत पार पडला. यज्ञांसाठी आलेल्या सर्वजणांना युधिष्ठिराने भरपूर दानधर्म केला. सर्वांनी यज्ञाची प्रशंसा केली. युधिष्ठिराच्या दातृत्वाची मुक्त कंठाने स्तुती केली. त्यावेळी तिथे एक मुंगूस आले आणि म्हणाले, "आपण सारेजण या यज्ञाची तोंड दुखेपर्यंत स्तुती करत आहात. पण मधुकरी मागून कुरुक्षेत्रांत राहणाऱ्या एका मुनीने जे सत्तूचे दान केलेले आहे, ते या दानापेक्षां कितीतरी महत्वपूर्ण आहे."

मुंगुसाचे हे बोलणें ऐकून सारेजण आश्चर्याने थक्क झाले. त्यांनी विचारले, "तूं कोण आहेस? कुठून आला आहेस? शास्त्रविधीच्या नियमानुसार हा जो यज्ञ संपन्न झाला आहे, त्यांत कोणते न्यून आहे? खरं खरं काय आहे ते सांग पाहूं!"

- क्रमशः




**Statement about Ownership of CHANDAMAMA (Marathi)**
Rule 8 (formVI), Newspaper (Central) Rules, 1956

| | |
|---|---|
| 1. Place of Publication | 82 Defence Officers Colony<br>Ekkatuthangal<br>Chennai-600 097 |
| 2. Periodicity of Publication | MONTHLY<br>1st of each calendar month |
| 3. Printer's Name<br>Nationality<br>Address | B. VISWANATHA REDDI<br>INDIAN<br>82 Defence Officers Colony<br>Ekkatuthangal<br>Chennai-600 097. |
| 4. Publisher's Name<br>Nationality<br>Address | B. VISWANATHA REDDI<br>INDIAN<br>82 Defence Officers Colony<br>Ekkatuthangal<br>Chennai-600 097 |
| 5. Editor's Name<br>Nationality<br>Address | B. VISWANATHA REDDI (Viswam)<br>INDIAN<br>82 Defence Officers Colony<br>Ekkatuthangal<br>Chennai-600 097 |
| 6. Name and Address of individuals who own the paper | Chandamama India Ltd.<br>Board of Directors:<br>1. Vinod Sethi<br>2. B. Viswanatha Reddi<br>3. P. Sudhir Rao<br>82 Defence Officers Colony<br>Ekkatuthangal<br>Chennai-600 097 |

*I,* **B. Viswanatha Reddi,** *do hereby declare that the particulars given above are true to the best of my knowledge and belief.*

1st March 2001 B. VISWANATHA REDDI



# मुलाची जबाबदारी

माधवी

देवसेन हा श्रीधरपुराचा राज्यकर्ता होता. लोक म्हणायचे की ते कट्टर धर्मनिष्ठ आणि अनुभवी राजकारणी आहेत.

विनीतसेन हा त्यांचा मुलगा. क्षत्रियांस आवश्यक असणाऱ्या सर्व विद्यांत पारंगत होता. तो अतिशय हुषार व समजूतदार होता. म्हणून देवसेनाने त्याच्यावर लवकरच राज्याची जबाबदारी टाकायचे ठरविले. तरीही त्याची राज्य करण्याची पद्धत व व्यवहार चातुर्य ह्याची परिक्षा घ्यावी अशी राजाची इच्छा होती.

एक दिवस देवसेन आपल्या बरोबर आपल्या मुलाला दरबारांत घेऊन गेला. सिंहासनावर बसल्या बरोबर मंत्री राजाला म्हणाले, ''महाराज, आपल्या दर्शनासाठी एक स्त्री व तिचा मुलगा आलेला आहे.''

राजाने त्यांना दरबारांत घेउ येण्यांस फर्माविले. सीता आणि तिचा मुलगा गोविंद दरबारांत आले.

''तुम्हाला माझ्याशी काय बोलायचे आहे? तुमची काय अडचण आहे?'' राजाने त्यांना विचारले. ''गोविंद म्हणाला, ''महाराज, आम्ही गरीब आहोत. मोलमजुरी करुन आम्ही पोट भरतो. मला तीन मुले आहेत. मी आणि माझी बायको सतत काम करतो. पण तरीही कुटुंबाचे पोषण नीट करुं शकत नाही. त्यांच्या गरजा भागवूं शकत नाही. अशा परिस्थितीत माझ्या म्हाताऱ्या आईचा सांभाळ करणें मला शक्य नाही. त्या खेरीज ही सारखी आजारी पडते. जेव्हां बघावे तेव्हां सारखी म्हणत असते, ''पोटांत दुखतंय. डोकेदुखीने मी अगदी बेजार झालेली आहे.'' आता मी आईच्या दुखण्याचा इलाज कसा करणार? म्हणून मी तिला सारखा म्हणत असतो की वृद्धाश्रमांत जा. पण ही म्हातारी तिथे रहाण्यास तयार नाही. आता आपण तरी तिला समजावूं शकाल, अशी आशा करुन आपल्याकडे आलो आहे महाराज.''

सीता म्हणूं लागली, ''महाराज, एका आईचे दुःख आपणच समजू शकाल. शरीरांत जोपर्यन्त बळ होते, जोर होता, तोपर्यन्त मी काम करत होते. आता मी म्हातारी झाले आहे. शरीरांत ताकद नाही. कुठलेही काम करायच्या स्थितीत नाही. मुलगे, सून, नातवंडे असून देखील मी अनाथ झाले आहे. वृद्धाश्रमांत जा म्हणून हे सगळे माझ्यामागे लागले आहेत. ह्यामुळे माझा जीव अगदी कासावीस होतो. आता तुम्हीच सांगा, मी काय करूं?'' म्हातारी रडत रडत म्हणाली.

देवसेनाने दोघांचे म्हणणे लक्ष देऊन ऐकले होते. जवळच बसलेला त्याचा मुलगा देखील हे संभाषण नीट ऐकत होता. आणि त्यावरच विचार करत होता. गोविंद व त्याच्या आईचे तो बारकाईने निरीक्षण करत होता.

राजाने विनीतच्या कानांत हळूंच म्हटले, ''विनीत, हे भांडण कसे सोडवायचे? मला तर कांही सुचत नाही. तूंच विचार करुन ह्यांतून मार्ग काढ.''

विनीतसेन म्हणाला, ''ह्यांत न समजाण्या-सारखे काय आहे? गोविंद जे म्हणतो आहे ते सुद्धां खरे आहे. त्याला आपल्या भविष्यकाळाची काळजी वाटते. व आपण अगदी अगतिक आहोत असे त्याला वाटते आहे.'' मग गोविंदकडे वळून तो म्हणाला, ''थोडेफार शिकलेला दिसतोस. कुठल्या एका ग्रंथात असे कांही लिहीले आहे कां, की अगदी मरेपर्यन्त आई वडिलांचा सांभाळ करणे मुलाचे कर्तव्य आहे?''

''नाही महाराज, असे कुठेही लिहीलेले नाही.'' गोविंद ठासून म्हणाला. नंतर म्हणाला, ''आपण वेगवेगळे पशुपक्षी पहातो, त्यांचे पालन पोषण त्यांना पंख फुटेपर्यन्तच केले जाते. उडायला




Restore

127







यायला लागले की ते स्वतः आपले पोट भरतात. ते आपल्या मुलांना असे म्हणत नाहीत की आत्तापर्यन्त आम्ही तुम्हाला सांभाळले, तेव्हां आता आमचा सांभाळ करणे हे तुमचे कर्तव्य आहे."

"तू जे म्हणालास ते खरे आहे. पण गोविंद, मला मला एक शंका आहे." विनीतसेन म्हणाला. गोविंदला वाटले ह्या विषयांत विनीतसेन त्याचीच बाजू घेत आहेत म्हणून तो उत्साहाने म्हणाला, "विचारा महाराज." विनीतसेनने विचारले "तू मानव आहेस की पशुपक्षी? नीट विचार करून उत्तर दे."

गोविंद घाबरत म्हणाला "मी मानवच आहे महाराज."

"तू जर खरोखरच मनुष्य असशील तर आईला मानाने घरी घेऊन जा. आणि आपली चूक समजून, मिळून मिसळून राहायला शीक. स्वार्थी बनू नकोस. सर्व प्राणिमात्रांत मानवजन्म उत्तम व सर्वश्रेष्ठ समजला जातो. अनेकवेळां परतफेडीची आशा न करता मनुष्य दुसऱ्याला मदत करतो. त्यांचे कष्ट कमी करतो. तुझी आई तुला कोणी परकी नाही. तिने तुला जन्म दिला आहे. तुझ्यासाठी अनेक कष्ट केले आहेत. तुला वाढवून मोठे केले आहे. अशा थोर मातेला झिडकारणें हे फार मोठे पाप होईल. तूं हे पाप करू नकोस. आता तुला सत्य काय ते कळले कां? आपले कर्तव्य काय हे कळले कां?" विनीतसेनने विचारले.

विनीतसेनचे बोलणे ऐकून गोविंदचे डोके गरगरुं लागले. आपल्या चुकीचा त्याला पश्चात्ताप होउन आपल्या आईची क्षमा मागत तो तिच्या पायावर कोसळला. आईने अगोदर आपल्या मुलांस व नंतर विनीतसेनास "शंभर वर्षे जगा." असा आशिर्वाद दिला.

आपल्या मुलाचा निर्णय ऐकून राजा खूप खुष झाला. त्याला समजले की आपल्या मुलाला धर्मकारणांतले बारकावे चांगलेच माहिती आहेत. आणि तो चांगला बुद्धिमान आहे. ह्या घटनेनंतर कांही दिवसांतच राजाने आपल्या मुलाच्या हातांत राज्यकारभार सोपविला.











## परदेशांत

### इंग्लंडचा भारतीय विजेता

पी. गोपीचंद हा ऑल इंग्लंड बॅडमिंटनचा सर्वश्रेष्ठ खेळाडू ठरला. बर्मिंगहॅमला झालेल्या सामन्यांत त्याने चीनच्या चेन हाँगचा सरळ सेटस्‌मधे पराभव केला आणि भारताची शान वाढवली.

जागतिक खेळाडूंमधे गोपीचंदचा



सध्यां दहावा क्रमांक लावण्यांत आला आहे. उपांत्यफेरीमधे त्याने जगांत श्रेष्ठ ठरलेल्या पीटर गेड याचा पराभव केला होता. यापूर्वी हे अजिंक्यपद मिळवणारा पहिला भारतीय खेळाडू आहे प्रकाश पडुकोण! त्याने हे पद १९८० मधें मिळवले. प्रकाश पडुकोण म्हणतात, ''गोपीच्या विजयामुळें भारतीय स्पर्धकदेखील तितकेच निष्णात असूं शकतात हे सिद्ध झाले आहे. हा अपूर्व विक्रम आहे आणि भारतीय बॅडमिंटनचा

### ब्रॅडमनची उणीव भासेल.

क्रिकेटची रंगत सतत वाढतेच आहे. आंतरराष्ट्रीय सामान्यांत विरोधी संघ अटीतटीने खेळत आहेत. पण ह्या वेळेला, एका गृहस्थाची, क्रिकेट-भीष्माची गैरहजेरी जाणवणार आहे. सर डोनल्ड ब्रॅडमन हा विसाव्या शतकातला क्रिकेटमधला सर्वश्रेष्ठ चमत्कार समजला जातो. त्यांनी एकूण ६,९९६ धांवा काढल्या होत्या व त्यांची विक्रमी सरासरी होती ९९.९४! डॉन-हे त्यांचं लोकप्रिय नांव - यांनी फक्त ५२ कसोटी सामन्यांत खेळून ही चमकदार फलंदाजी दाखवली होती.

डोनल्ड जॉर्ज ब्रॅडमनचा जन्म २७ ऑगस्ट १९०८ रोजीं ऑस्ट्रेलियांतल्या, न्यू साऊथ वेल्समधल्या कूटामुंद्रा या गांवी झाला होता. त्याचे वडील सुतारकाम करीत. आणि पांच मुलांपैकी तो सर्वांत लहान होता.

डॉन शाळेंत असतानाच क्रिकेट



खेळत असे. तो एक गोल्फबॉल पाण्याच्या टाॅंक्यात तळाला फेकायचा आणि स्टंपने तो बॉलला फटका मारायचा. १९२८ मधें ब्रिस्बेनला त्यांनी प्रथमच कसोटी सामन्यांत भाग घेतला आणि मग त्यांची यशस्वी कारकीर्द जोरांत सुरुं झाली. प्रथम श्रेणीच्या क्रिकेटमधे त्यांनी एकूण २८,६०७ धांवा काढल्या. त्यांत ३३८ डावांत ११७ शतकें होती.

त्यांच्या या क्रिकेटमधल्या कामगिरीबद्दल त्यांना १९४९मधें 'सर' हा किताब देऊन त्यांचा सन्मान करण्यांत आला.

### बुद्धाचा पुतळा फोडला जातो.

जगांतील सर्वांत उंच असा गौतम बुद्धाचा उभा असलेला पुतळा व दुसरा जगप्रसिद्ध बामियन बुद्ध, हे दोन्ही पुतळे अफगाणिस्तानांतल्या तालीबाननी फोडून टाकले.



हे दोन्ही पुतळे नष्ट करण्या-साठीं तालीबान सैनिकांनी क्षेपणास्त्रें आणि विमान विरोधी शस्त्रें वापरली.

तालीबान म्हणजे अफगाणिस्ता-नांतले धर्मांध इस्लामी सैनिक! १९९४ पासून त्यांची सत्ता वाढत गेली. आणि आता दोनतृतीयांश अफगाणिस्तानांत

''इस्लामी नसलेले प्राचीन पुतळे आम्ही नष्ट करीत आहोत'' असे तालिबानचे वृत्तप्रसारण व सांस्कृतिक खात्याचे मंत्री मौलवी कुदरतुल्ला जमाल यांनी जाहीर केले. हे दोन्ही बुद्धाचे पुतळे तिसऱ्या आणि पांचव्या शतकांत दगडांतून खोदून काढलेले होते. त्यांचे बामियन बुद्ध असे लोकप्रिय नाव होते.

१९६० साली नऊ परदेशी संघटनांनी एकत्र येऊन या मूर्तींचे पुनरुज्जीवन केले होते. अफगाणिस्ता-नच्या त्यावेळच्या सरकारने ''देशाचा सांस्कृतिक वारसा जपल्याबद्दल'' या

वेताळ कथा

## मनुष्य धर्म

दृढ निश्चयी विक्रमार्क पुन्हा झाडाजवळ गेला. प्रेत झाडावरून खाली उतरवून त्याने खांद्यावर घेतले. आणि तो स्मशानाकडे जाऊं लागला. तेव्हां प्रेतातील वेताळ त्याला म्हणाला, ''राजा राजघराण्यांत जन्मलेल्या राजपुत्र किंवा राजकन्यांना साहसी विद्यांचे चे शिक्षण दिले जाते. आणि ही कांही अशक्य गोष्ट नाही. अशी माणसे तुझ्यासारखेच कठोर परिश्रम करतात. आपल्या ध्येयप्राप्तीसाठी रात्रंदिवस अडचणींना सामोरे जातात. अशा तऱ्हेने ते धाडसी बनतात. परंतु असे दिसून येते की ध्येयपूर्ती समोर दिसत असताना कांही लोक चंचल मनाच्या आहारी



जाऊन यशाच्या ऐवजी अपयशाचे धनी होतात. आपल्याच हाताने आपल्या पायावर धोंडा पाडून घेतात. खूप पूर्वीची गोष्ट आहे. उद्दंड देशाचे महाराज श्रुतवर्मा ह्यांच्या हातून पण अशीच चूक झाली. असेच मनाच्या दोलायमान अवस्थेत त्यांनी हाती आलेली चांगली संधी गमावली. तुझी दमणूक कमी होण्यासाठी ती गोष्ट मी तुला सांगतो." असे म्हणून वेताळ गोष्ट सांगू लागला.

"प्रवाळ देशाचा राजा मरुन्तवर्माला मुलगी झाली. लग्नानंतर पुष्कळ वर्षांनी तिचा जन्म झाला. ती पौर्णिमेच्या दिवशी जन्मली म्हणून तिचे नांव कौमुदी ठेवले. ती जशी मोठी झाली तसे तिचे सौंदर्य आणखी खुलत गेले. तशीच ती अतिशय बुद्धिमान झाली. आणि तिच्या सौंदर्य व बुद्धिमत्तेची कीर्ती सगळीकडे पसरली.

मरुन्तवर्माला हे माहीत होते की ज्याचा कौमुदीशी विवाह होईल तोच भविष्यांत प्रवाळ देशाचा महाराज बनेल. त्याने कौमुदीच्या लहानपणीच तिच्या होणाऱ्या पतीची निवड केली होती. तो होता मरुन्तवर्माच्या सख्ख्या बहिणीचा मुलगा. जो उद्दंडदेशाचा भावी महाराजा होणार होता. ज्याचे नांव श्रुतवर्मा होते.

श्रुतवर्मा जेव्हां प्रवाळ देशात येत असे तेव्हां तो अभ्यासासाठी राजगुरु मुकुंदाचार्यांकडे जात असे. राजगुरुंकडे श्रुतवर्मा बरोबर कौमुदी व मणिमंत पण अभ्यास करत असत. मणिमंत हा राजा मरुन्तवर्माच्या प्रधानमंत्री रत्नकेसरीचा मुलगा होता. मोठे होईपर्यंत तिघांनी एकाच गुरुकडे शिक्षण घेतले. ह्या काळांत मणिमंत आणि कौमुदीमधे नेहमी वादविवाद व्हायचे. परंतू दोघेही आपली मर्यादा सोडत चर्चा मुकुंदाचार्य लक्ष देऊन ऐकत असत. त्यांना त्या दोघांच्या चर्चेतील गंभीर विचारांचे मोठे कौतुक वाटत असे. श्रुतवर्मा मधे कांही बोलत असे परंतु वादविवादाच्या कलेतील त्याचे ज्ञान मर्यादित होते.

मोठी झाल्यावर कौमुदीचे शिक्षण अंतःपुरातच होऊं लागले. बाकी दोघे ज्या शस्त्रविद्या शिकत होते, त्या विद्या पुरुषवेष धारण करुन तिनेही शिकल्या. अशा तऱ्हेने त्या तिघांची मैत्री कायम राहिली.

महाराज मरुन्तवर्मांना दोन्हीही मुले आवडत होती. श्रुतवर्मा जांवई होणार होता. व मणिमंत कुशाग्र बुद्धीचा होता. त्या दोघांबरोबर आपल्या मुलीचा वाढता सहवास बघून तो थोडा



काळजीत पडला. दिसण्यांत व शस्त्रविद्येत मणिमंत श्रुतवर्मापेक्षा सरस होता. फरक एवढाच होता की एक राजकुमार व दुसरा मंत्र्याचा मुलगा होता. परंतु तो सुद्धां उत्तम क्षत्रिय योद्धा होता. राजाला चांगले माहीत होते की जर त्याची मुलगी मणिमंताकडे आकर्षित झाली तर त्याला बऱ्याच अडचणींना तोंड द्यावे लागेल. श्रुतवर्माच्या आईवडीलांची खात्री होती की मरुन्तवर्मा त्यांच्या मुलालाच आपला जांवई बनवेल. श्रुतवर्माला पण कौमुदी आवडत होती. तिच्यावर त्याचे प्रेम होते.

मरुन्तवर्माला ह्या सर्व गोष्टींची पूर्ण जाणीव होती. परिस्थिति बदलली तर मामला गंभीर होईल अशी भीती देखील वाटत होती. हे सर्व लक्षांत घेऊन त्याने प्रथम आपल्या मुलीची काय इच्छा आहे ते जाणून घेण्याचे ठरवले. यासाठी मालतीची मदत घेण्याचे ठरवले. आपल्या मुलीशी बोलताना त्याच्या असे लक्षांत आले कीं, श्रुतवर्माशी जवळचा एक नातेवाईक म्हणून ती त्याच्याशी आपलेपणाने वागते. ती मणिमंतालाच आपला पती होण्यास योग्य समजते व त्याच्यावर तिचे प्रेम आहे. कौमुदी संबंधी ह्या सर्व गोष्टी महाराजांना समजल्यानंतर मालतीने असेही सांगितले की मणिमंताच्या मनांत आपल्या मातृभूमीविषयी अपार प्रेम व आदर आहे.

मालतीच्या बोलण्यावरुन हे देखील स्पष्ट झाले कीं कौमुदी कोणा परक्या देशाच्या राजाची राणी बनून परदेशी जायला राजी नाही. तिला असे वाटते कीं जर मणिमंताशी तिचा विवाह



झाला तर स्वतःच्याच देशांत राहून ते दोघे राज्यकारभार सांभाळू शकतील.

असं जर झालं नाही तर प्रवाळ देशाची सत्ता कुठल्या तरी राजप्रतिनिधीकडे सोपवावी लागेल. कारण प्रवाळ देशाच्या गादीला कोणी वारस नव्हता. आता महाराजांना वाटूं लागले की ज्या गोष्टीची भीती वाटत होती, तसेच घडणार आहे. ह्या विचाराने त्यांच्या शरीराला कंप सुटला. त्या क्षणांपासून कौमुदीच्या विवाहाविषयींची त्यांची काळजी वाढतच गेली.

परंतु एक गोष्ट त्यांना माहीत नव्हती. की श्रुतवर्माला देखील, विवाहाविषयी कौमुदीच्या मनांत काय आहे ते माहीत होते. त्याने कौमुदीला लहानपणापासून आपली पत्नी मानले होते. कौमुदी व मणिमंताच्या एकमेकांवरील प्रेमामुळे तो अगदी निराश झाला होता.



कोणीतरी कुऱ्हाडीने आपल्यावर वार करत आहे, असे त्याला वाटले. त्याने ह्या विषयांवर खूप विचार केला. आणि आपल्या मामाला आपल्याला माहीत असलेली सर्व हकिगत सांगितली.

महाराजांनी पुष्कळ दिवस विचार केला. मग एक दिवस आपल्या भाच्याला बोलावून ते म्हणाले. "श्रुतवर्मा, कौमुदीच्या विवाहा संबंधी मी पुष्कळ विचार केला, आणि एक निर्णय केला आहे. तू उद्याच मणिमंताला भेटून स्पष्ट सांग. की तुला त्याच्या आणि कौमुदीच्या मनांत काय इच्छा आहे ते समजले आहे. त्याला हे देखील सांग की "मणिमंत तुझे प्रेम कौमुदीवर आहे त्यापेक्षां कितीतरी जास्त प्रेम मी तिच्यावर करतो. तिचा पती बनायची आपली समान योग्यता नसूनसुद्धां माझा आणखी एक गुण आहे. तो म्हणजे आमचे नाते. तरीदेखील मी या गोष्टीचा फायदा घेऊं इच्छित नाही. तेव्हां आपण युद्ध खेळून आपले बळ आजमावूं व ह्या प्रश्नाचा निकाल लावूं. विजेत्यास प्रवाळ देशाचे सिंहासन व कौमुदी प्राप्त होईल." राजा परत श्रुतवर्माला म्हणाला "मणिमंत हे आव्हान नक्कीच स्वीकारेल. तू आपली सर्व ताकद पणाला लावून कौमुदी मिळव. जर तुझा विजय अशक्य झाला, तुझ्या विरुद्ध परिस्थिती निर्माण झाली, तर मी कांही तरी जालीम उपाय शोधीन की ज्याने तुझाच जय होईल. तुझ्या विजयानंतर मणिमंत काय म्हणेल ते कौमुदीला सांग. म्हणजे ती पण निमूटपणे तुझा पती म्हणून स्वीकार करेल".

मामाचे बोलणे ऐकून थोडावेळ विचार करुन श्रुतवर्मा म्हणाला "मामा आम्ही दोघे समान योध्दे आहोत. पण माझ्यापेक्षा मणिमंतात अधिक आत्मविश्वास आहे. त्याचे धाडस व पराक्रम त्यामुळे दुप्पट वाढते. तेव्हां आपण एक काम करुं या. अरवली पर्वतांजवळ कृष्णचंद्र नांवाच्या गुरुंनी एक गुरुकुल स्थापन केले आहे. त्याविषयी तुम्ही ऐकले असेलच. भावी राजांना ते शस्त्रास्त्र विद्येचे खास शिक्षण देतात. उद्यांच मी तेथे जाईन. त्यांचा शिष्य होऊन आणखी प्राविण्य मिळवीन. पुढे आपण सांगितल्या प्रमाणे करुंया". महाराजांनी श्रुतवर्माच्या म्हणण्याला होकार दिला.

दुसऱ्या दिवशी श्रुतवर्मा कृष्णचंद्रांकडे गेला. आणि त्याने सहा महिने एकाग्रतेने शस्त्रास्त्र विद्येचा अभ्यास केला. शिक्षण पूर्ण झाल्यावर





कृष्णचंद्रांनी त्याला विचारले "तू म्हणालास प्रवाळ देशाचे महाराज तुझे मामा आहेत. त्या देशाच्या प्रधानमंत्र्यांच्या मुलाशी, मणिमंताशी तुझा कसे संबंध आहेत?"

गुरुंच्या ह्या प्रश्नाने आश्चर्यचकित झालेला श्रुतवर्मा म्हणाला "मणिमंत? हो. मी त्याला चांगला ओळखतो. पण आपण मला हा प्रश्न कां विचारला? ह्याचे कारण कळेल का?"

हंसत कृष्णचंद्र म्हणाले "मला एक संवय आहे. बहुरुपी बनून मी देशोदेशी फिरतो. त्यामुळे मी कोण आहे हे कोणाला समजत नाही. तू येण्याआधी पंधरा दिवसांपूर्वी प्रवाळ देशांत वसंतोत्सव साजरा झाला. तेव्हां मी तेथे हजर होतो. तिथें मी मणिमंताची अपूर्व युद्धकला बघितली. दृढ आत्मविश्वासाने चमकणाऱ्या योद्धयांमधेंच अशा युद्धकलेची क्षमता असते. हे दुसऱ्यांना शक्य होत नाही. अशा निडर योदध्याला मी विसरुं शकत नाही.. मणिमंताला सांग की त्याला इथें येण्याचे मी आमंत्रण देतो आहे. त्याने जरुर माझ्या आश्रमात यावे."

गुरुंचे बोलणे ऐकून श्रुतवर्मा अवाक् झाला. पण स्वतःला सांभाळत तो म्हणाला "त्या दिवशी जे युद्ध प्रयोग झाले त्यांत मी पण भाग घेतला होता".

त्याचे बोलणे ऐकून आश्चर्याने कृष्णचंद्र म्हणाले "काय, खरंच तू पण तिथे होतास?" आणि हंसले.

दुसऱ्या दिवशी श्रुतवर्मा प्रवाळ देशास परतला. आणि आपल्या मामांना भेटून म्हणाला ''मामा, कृष्णचंद्रांच्या शिक्षणाने माझा विश्वास व सामर्थ्य वाढले आहे. पण मला असे वाटते की नातें आणि योग्यतेच्या आधारावर कौमुदीच्या इच्छेविरुद्ध वागणे योग्य नाही. माझे म्हणणे ऐका व कौमुदी आणि मणिमंताचा विवाह करा''.

गोष्ट सांगून वेताळ म्हणाला, ''राजा, मी तुला आधीच सांगितले आहे की श्रुतवर्माने सहा महिने प्रशिक्षण घेतले. कठोर मेहनत केली. आणि आपल्या हातानेच सगळ्याची विल्हेवाट लावली. त्याची इच्छा पुरी होणार होती. पण मनाच्या चंचलपणामुळे व पुरेशा आत्मविश्वासाअभावी त्याने ही संधी गमावली. असा अविचारी माणूस कुठे सापडेल कां? माझ्या ह्या शंकेच उत्तर माहीत असून देखील तू मौन पाळलेस तर तुझ्या डोक्याची शकले होतील.''

विक्रमार्क म्हणाला ''श्रुतवर्मा स्वतःहून कृष्णचंद्रांचा शिष्य बनला. कोणाच्या सांगण्यामुळे त्याने हे काम केले नाही. कारण त्याची गुरुंवर गाढ श्रद्धा होती. अशा महान गुरुने मणिमंतास आपल्याकडे बोलावले. ह्यामुळे मणिमंताच्या युद्धकौशल्याचा त्यांच्यावर केवढा प्रभाव पडला होता हे दिसले. जरी श्रुतवर्माने स्वतःहून, आपण तेथे युद्धखेळांत भाग घेतल्याचे सांगितले, तरी त्यांनी त्याचे कौतुक केले नाही व ते हंसून गप्प बसले. त्यामुळे श्रुतवर्मास त्याच्यात व मणिमंतात किती अंतर आहे ते समजले. मणिमंताबरोबर आपली बरोबरी होऊं शकत नाही हे देखील कळले. युद्धांत त्याच्या विजयाची शक्यताच नाही हे जाणून, त्याने तो कौमुदीसाठी योग्य वर नाही असा निर्णय घेतला. हा मनाचा चंचलपणा नसून, राजनीति व मानवधर्माचे खऱ्या अर्थाने पालन करणे आहे.

राजाच्या मौन भंगामुळे वेताळ प्रेतासह अदृश्य झाला व झाडावर जाऊन बसला.

**(आधार-लक्ष्मी गायत्री ह्यांची कथा)**







# यक्ष पर्वत

## 4

(खड्ग व जीवदन्त यांनी मांत्रिक व जटाभुताचा पाठलाग केला. पण गुहेंत ते कोठेही दिसले नाहीत. तेव्हां ते भुयारांतील वाटेने गेले. आणि जुनाट पडकी घरे असलेल्या जागी येऊन पोचले. त्या घरांत रहाणाऱ्या पुजारिणीने मांत्रिकाला आज्ञा केली की खड्ग व जीवदन्तास ताबडतोब पकडा. तलवार उपसून जटाभुताला आपल्या बरोबर घेऊन मांत्रिक निघाला. त्यानंतर...)

डोळ्यांची पापणी न हलवता जीवदन्त त्या पडक्या घरांकडे पहात राहिला. तो स्वतःशीच विचार करुं लागला. ही घरे किती जुनी असतील? कशामुळे ही अशी उजाड मोडकळीला आली असतील? पण खड्गवर्माला मांत्रिक व जटाभुताचीच चिंता होती. जमेल तेवढ्या लवकर त्यांना मारुन, त्याला तेथून निघून जायचे होते.

एवढ्यांत जवळच्या विटांवर कांहीतरी जडवस्तू आपटल्याचा आवाज दोघांनी ऐकला. तो आवाज ऐकून खड्गवर्मा ताबडतोब उठून म्हणाला ''जीव, हा कसला आवाज आहे? आपल्यावर कोणी हल्ला तर करत नाही ना? आपल्याला अगदी सावध राहिले पाहिजे''.

दोघे भिंतीजवळ जाऊन दुसऱ्या बाजूला काय आहे ते पहाणार, तेवढ्यांत मांत्रिक भिंतीवर उभा राहून ओरडूं लागला ''नराधमांनो, ह्याक्षणी महाभूताच्या पायावर तुम्हा दोघांना बळी देतो.'' असे म्हणत त्याने जीवदन्ताच्या गळ्याचा वेध घेत तलवार फेकली.

खड्गवर्मा मांत्रिकाच्या तलवारी पासून स्वतःला वाचवत म्हणाला ''अरे मूर्ख मांत्रिका! आम्हाला आव्हान देऊन तू स्वतःचा जीव धोक्यांत घालत आहेस''. असे म्हणत त्याने मांत्रिकाचा हात पकडून त्याला जोरांत खाली



ओढले. मांत्रिक भिंतीवरुन खाली पडला.

इतक्यांत जटावाली लावसट "बळी, बळी, बळी" म्हणत भिंतीवर उभी राहिली. आपल्या गुरुची काय स्थिती आहे हे तिला माहीत नव्हते. मोठ्या आवेशाने उडी मारुन ती भिंतीवर उभी राहिली. तिने बघितले की तिचा गुरु जमिनीवर बेशुद्ध पडला आहे. तेव्हां ती ओरडू लागली. तेवढ्यात जीवदन्ताने कंबरेत एक जोरदार लाथ मारुन म्हणाला, "खड्ग, आता येथे जास्त वेळ थांबणे धोक्याचे आहे. हा सगळा प्रदेश मांत्रिकांनी भरलेला आहे. समोर दिसणाऱ्या एखाद्या घरांत जाऊन आपला बचाव करुं या".

ते दोघे धावत समोरच्या घरांकडे गेले. एका घराशी उभे राहून आजूबाजूला बघूं लागले. शत्रू कुठल्या बाजूने येईल ह्याचा अंदाज घेऊं लागले. पण त्यांना कोणी दिसले नाही. फक्त मांत्रिक व जटाभुताचे कण्हणें ऐकू येत होते.

ते दोघे गुपचूप चालत एका खोलीशी येऊन पोचले. खोलीत चार, पांच उंदीर इकडे तिकडे पळत होते. एवढ्यांत गिधाडायेवढे एक वटवाघूळ बाणासारखे आत आले. आणि एक उंदीर घेऊन, खिडकीवाटे बाहेर उडाले. ते दोघे खोलीत जाऊ लागले एवढ्यात अचानक त्यांच्यावर हल्ला झाला. त्यांच्या डोक्यावर मागून कोणीतरी लाठीचे वार केले. आणि त्यांना जखमी केले. ते बेशुद्ध होऊन जमिनीवर धाडकन् आपटले. पुजारिणीचे सेवक पुढे होऊन त्यांना तपासू लागले. त्यांची डोकी तपासल्यावर त्यांना कळले की दोघे मेले नसून जिवंत आहेत.

"बरे झाले हे जिवंत आहेत. जर कां हे मेले असते तर आपल्याला महाशक्ती पुजारिणीच्या रागाला तोंड द्यावे लागले असते. तिने आपल्याला



मारुन टाकले असते." सुस्कारा टाकत एक सेवक म्हणाला.

"ते मरूं नयेत म्हणून तर आपण काठ्यांना मऊ कापड गुंडाळले होते. आता ह्यांचे हातपाय बांधून ह्यांना खांद्यावर टाका. चला, ह्यांना पुजारिणीकडे घेऊन जाऊं". दुसरा सेवक म्हणाला. त्यांनी खड्ग व जीवदन्त ह्यांस खांद्यावर टाकून पुजारिणीकडे नेले.

तेव्हां पुजारिण मांडवाच्या मध्यभागी सजवलेल्या एका उच्चासनावर बसली होती. तिने खड्ग व जीवदन्ताकडे तिरकस नजरेने एकदा बघितले. आणि डोळे वटारत ती म्हणाली "अरे, ह्यांतला तर एक मांत्रिक दिसतो आहे."

"शक्य आहे महाशक्ती पुजारिणी. त्याच्या हातात मंत्रदंड व दुसऱ्या हातात एक धारदार तलवार होती." सेवक म्हणाला.

"ते कुठे आहेत? त्यांना कुठे फेकून दिलेत?" पुजारिणीने विचारले. "हे दोघे जिथे बेशुद्ध पडले होते, त्यांना तिथेच ठेवून आलो". सेवक म्हणाला.

"मूर्खांनो, ताबडतोब जा. आणि त्या वस्तू घेऊन या" पुजारिणीने आज्ञा केली. दोन्ही सेवकांनी पळत जाऊन मंत्रदंड व तलवार आणली. पुजारिणीने त्यांची काळजीपूर्वक तपासणी करुन म्हटलं, "ह्या दोन्हीत कांही खास शक्ती आहे असे वाटत



नाही. ह्या वस्तू अगदी सामान्य आहेत. ह्या दोघांना खोलीत कोंडून ठेवा. आणि ह्या वस्तू त्यांच्या जवळच असू देत. मग पुढे काय घडते ते पाहूं या".

सेवकांनी पुजारिणीच्या आज्ञेचे पालन केले. थोड्या वेळानंतर खडग्वर्मा व जीवदन्त शुद्धीवर आले. तेव्हां जीवदन्त खडग्वर्माला म्हणाला. "खड्ग, पुजारिणीने आपल्याला जिवंत ठेवले आहे, ह्यांत तिची नक्की कांहीतरी चाल आहे, ह्यामागे कांहीतरी दुष्ट हेतू आहे." एवढ्यात त्यांना खोलीबाहेर सिंहाची डरकाळी ऐकू आली. खड्गवर्मा ताडकन उठत म्हणाला, "ह्या दुष्टांना आपल्यावर सिंह सोडायचे आहेत. आणि सिंहांच्या हातून आपल्याला



मारायचे आहे.'' आणि हंसू लागला.

''हे पण एका दृष्टीने चांगलेच झाले. आपण त्या सिंहाना त्यांच्यावरच सोडू. आणि ह्या पडक्या घरांमध्ये भयानक वातावरण बनवू'' असं म्हणत जीवदन्ताने आपला मंत्रदंड जोरात भिंतीवर आपटला. भिंतीचा एक भाग तुटून खाली पडला. बाजूच्या खोलीत असलेला सिंह घाबरला आणि भिंतीला चिकटून उभा राहिला.

''सिंह महाराज, तुमची सुटका होईल व तुम्हाला छान जेवण पण मिळेल''. असे म्हणत जीवदन्त खड्‌गवर्माबरोबर खोली बाहेर आला.

दुसऱ्या क्षणी पुजारिणीचे दहापंधरा सैनिक ''कैदी पळून जात आहेत. त्यांना पकडा'' असे जोरजोरात ओरडूं लागले. ओरडत ते या दोघांसमोर आले. जीवदन्त गडबडीने पुढे झाला. आणि हातातला मंत्रदंड दाखवत त्याने सिंहाला सेवकांच्या दिशेने वळवले. डरकाळी फोडत सिंहाने त्यांच्यावर झेप घेतली. क्षणांत चार, पांच सेवक जखमी होउन जमिनीवर पडले. एका सेवकास सिंहाने तोंडामधे पकडले. तो तडफडत होता. बाकीचे सहा सात सेवक,जीव मुठींत धरुन भिंतीवरुन उड्या टाकून पळून गेले. भीतीने ते चळाचळा कापत होते.

जीवदन्ताने आपला मंत्रदंड सिंहावर रोखत म्हटलं ''सिंहराज, जवळच्या घरांतून खाली जाण्यास पायऱ्या आहेत. ह्या वाटेने खाली जा. आणि या पडक्या घरांवरुन पुढे अख्यांत जा''. असे म्हणत त्याने सिंहाला पायऱ्यांकडे नेले. व मंत्रदंडाने एक फटका मारला. सिंह गर्जना करत जीवदन्ताकडे वळला. पुढचे पाय उचलून मागल्या पायावर उभा राहून जीवदन्तावर झेप घेणार एवढ्यांत जीवदन्ताने त्याच्या पोटाखाली मंत्रदंड ठेवून त्याला लांब फेकले. सिंह जमिनीवरुन घसरत पायऱ्या असलेल्या खोलीच्या बाहेर येऊन उभा राहिला.

पुजारिणीचे सेवक पडक्या भिंतीवरुन हे दृश्य बघत होते. सिंहाच्या बरोबर झुंजायचे जीवदन्ताचे धाडस आणि शक्ती पाहून ते थक्क झाले, आणि आश्चर्याने आ वासून बघतच राहिले. त्यांच्यापैकी एकजण हात जोडून नमस्कार करत जीवदन्तास म्हणाला, ''महामांत्रिक शिरोमणींस नम्र प्रणाम. आपली मंत्रशक्ती अतुलनीय आहे. ही सामान्य मनुष्याच्या आवाक्यांतली गोष्ट नाही. आपल्या या अद्‌भुत शक्तीने आपण पुजारिणीचा नाश कां करीत नाही? आणि या पुरातन नगराचे राजे कां बनत नाही? तेव्हां आम्ही सगळे आपले शिष्य होऊं आणि आमचा जीवन चरितार्थ चालवू.''

जवळचे इतर सेवक हा 'गुरुद्रोह' आहे असे म्हणत त्याच्यावर तुटून पडले. ते आपापसांत मारामारी करुं लागले. एवढ्यात भिंतीवरचे दोन सेवक घसरून खाली पडले. सिंह गुरगुरत त्यांच्या दिशेने येऊं लागला. मंत्रदंड वर उचलून जीवदन्त सिंहाला धमकी देत म्हणाला, ''आता गुपचूप येथून निघून जा. पायऱ्या उतरुन आपल्या रस्त्याला लाग. पुजारिणीच्या शिष्यांच्या भांडणात पडून आपले नुकसान करुं नकोस. जा, इथून निघून जा.''

जीवदन्ताने सांगितल्या प्रमाणे सिंह पायऱ्या उतरुन निघून गेला. खड्‌गवर्मा गप्प बसून हे सगळे पहात होता. तो म्हणाला ''जीव, आता आपण इथे कशाला थांबायचे? पुजारिणीचे शिष्य एकमेकांशी भांडण्यांत गुंतले आहेत. एकमेकांचा जीव घेण्यास तयार आहेत. आता आपल्याला अडवायला इथे



कोणी नाही. ही जुनी घरे सोडून आपण जंगलात जाऊं या''.

''हो, हो. असंच करुं या. ज्या वाटेने तो सिंह जंगलात गेला आहे, त्याच वाटेने आपणही जंगलांत जाऊ. पण ज्या दिशेने आपण येथे आलो तिथे आपण पोचू शकूं की नाही, इतके मात्र पाहिले पाहिजे''.

असे म्हणून जीवदन्त चालूं लागला. पुजारिणीला एका शिष्याकडून खड्‌गवर्मा व जीवदन्त पळून गेल्याचे समजले. सिंहाने तिच्या कांही शिष्यांस जखमी केले आहे, आणि शिष्य आपापसांत लढत आहेत हे देखील कळले.

ही बातमी ऐकल्याबरोबर पुजारिणीने



आपले त्रिशूळ वर उचलून रागाने म्हटले ''महाभूत, हे काय घडते आहे? आपल्या मंत्रबळाने मी त्या दोघांना बंदी बनवले. ह्या दोन दुष्ट मानवांनी माझ्यावरच हल्ला चढवला, माझ्या सेवकांना जखमी करुन आता माझ्या सारख्या शक्तीशालिनीला ते आव्हान देतात. माझा अपमान करण्याची त्यांची हिम्मतच कशी झाली. एवढे धाडस? आता मला हे सगळे सहन होत नाही. आता त्यांना मारणे हेच माझे ध्येय आहे. अरे डरपोक सेवकांनो, जा! आणि त्या दोन्ही मानवी किडयांना पकडून आणा''.

खड्गवर्मा व जीवदन्ताने सिंह, मांत्रिक, जटाभुताला जागोजागी त्रास दिला. त्यांची दुर्दशा केली. तेथे उभे असलेल्या शिष्यांमधील एकाने हे सगळे बघितले होते. भीतीने थरथर कांपत तो म्हणाला, ''महाशक्ती पुजारिणी, ते दोन मानव महाबलशाली, धाडसी व उच्च कोटीचे मांत्रिक आहेत. त्यांनी आपल्या मांत्रिक,जटाभुताला....''

शिष्याने आपले म्हणणे पूर्ण करण्या अगोदरच पुजारिणीने रागाने त्या शिष्याच्या पाठीत भाला खुपसला व म्हणाली, ''अरे भेकडा, गप्प बैस. आणखी एक शब्दही बोलू नकोस. मी त्यांना आत्ता पकडीन आणि महाभुताच्या पायावर त्यांना बळी देईन.'' दांत ओठ खात ती म्हणाली. आता शिष्यांना दुसरा मार्ग नव्हता. ते मांत्रिक व जटाभुतांबरोबर, घाबरत पुढे जाऊं लागले.

तोपर्यन्त खड्ग व जीवदन्त पडक्या घरांच्या दुसऱ्या बाजूस पोचून जंगलात जाण्याचा रस्ता शोधूं लागले. ज्या भुयारी रस्त्याने ते आले होते, तो त्यांना सापडला नाही.

''जीव, असं दिसतंय की पुजारिणीच्या सेवकांपासून आपण खूप दूर आलो आहोत. सिंह कुठे गेला असेल? जंगलात पोचला असेल का?'' खड्गवर्मा म्हणाला.

''तो पण आपल्या सारखा कोठेतरी अडकला असेल. मधेमधे त्याची डरकाळी तुला ऐकू येत नाही का?'' असं म्हणत जीवदन्ताने एका खोलीत जात म्हटले ''पाहिलंस! ह्या दुष्टांनी किती प्रवाशांना लुटून केवढे धन इथे लपवून ठेवले आहे. बघ, धान्याची कितीतरी पोतीं इथें पडली आहेत.

तिथे धान्याच्या पोत्यांचे ढीगच्या ढीग होते. शिवण उसवल्यामुळे कांहीमधून गहू, ज्वारी असे धान्य जमिनीवर पडत होते.

खड्गवर्मा आश्चर्याने म्हणाला ''जटाभुताच्या मदतीने हे लोकांना घाबरवतात, व एवढी सगळी लूट जमा करतात''. ''ह्या धान्यांतील एक दाणा सुद्धा पुजारिण व तिच्या शिष्यांना मिळता कामा नये असा उपाय आपल्याला शोधला पाहिजे. त्यामुळे भुकेपोटी हे सगळे या पडक्या घरांतून बाहेर येतील. तेव्हां त्यांची अवस्था अगदी दयनीय होईल''. विचार करत जीवदन्त म्हणाला.

''आश्चर्याची गोष्ट आहे की आपल्या दोघांना एका तऱ्हेचाच उपाय सुचला.'' असे म्हणत खड्गवर्माने आपल्या अंगरख्यातून एक गारगोटी काढली व थोडा कापूस पेटवला. जळता कापूस धान्याच्या पोत्यांवर टाकला.

धान्याची पोती जळूं लागली. हळूहळूं आग पसरली. तेव्हां शेजारच्या खोलीतून आवाज आला. ''खड्ग, ह्या खोलीचे दार बंद आहे. आणि आतून कोणीतरी ओरडत आहे''. असे म्हणत जीवदन्त त्या खोलीशी आला व दरवाजा उघडायचा प्रयत्न करु लागला.

हंसत हंसत त्याच्या जवळ येत खड्गवर्मा म्हणाला ''जीव वाचवायच्या घाईत दाराला भलेमोठे कुलूप आहे, हे देखील तू बघितले नाहीस. तुझ्या मंत्रदंडाने आधी हे कुलूप तोड.''

खोलीत फार अंधार नव्हता. वरच्या खिडकीतून थोडा उजेड येत होता. त्या उजेडात त्यांना बेडयांनी जखडलेला एक म्हातारा माणूस दिसला. तो आजानुबाहू होता. त्याचे हात गुढघ्याखाली पोचतील एवढे लांब होते. आणि त्याची पांढरी लांब दाढी हवेत उडत होती. (क्रमशः)



# भारत-गाथा

एका महान परंपरेची झलक.
युगायुगातील सत्याचा शोध.

## १५. वचनपूर्ती



आजोबांनी ज्या गोष्टी सांगितल्या होत्या त्यापैकी अनेक गोष्टी संदीप-श्यामलाच्या मित्रांनी ऐकल्या नव्हत्या. जेव्हां दुसरी मुले प्रो.देवनाथांना त्या गोष्टी सांगण्याचा आग्रह करुं लागली तेव्हां आपल्या नातवंडांना, त्यांनी ज्या गोष्टी ऐकल्या होत्या, त्या सांगण्यास त्यांनी फर्मावले. आणि मुलांनी आपले काम बरोबर केले तर ते त्यांना अजून गोष्टी सांगतील, असेही कबूल केले.

दोन्ही मुलांच्या परीक्षा चांगल्या तऱ्हेने पार पडल्या होत्या. श्यामला आणि संदीपने अगोदर ऐकलेल्या गोष्टी अगदी छान सांगितल्या होत्या. ''ह्या सगळ्या परीक्षाच आहेत. आज मी तुम्हाला एका महान राजाला परीक्षांना कसे तोंड द्यावे लागले त्याची गोष्ट सांगतो''. प्रोफेसर देवनाथ आनंदाने म्हणाले. तो रविवार होता. आपल्या छोट्या श्रोते मंडळींना घेऊन ते बागेत गेले. तेथे एका मोठ्या पिंपळाच्या झाडाखाली, स्वच्छ जागा बघून, सगळेजण तिथे बसले.

''पूर्वी गोष्ट सांगणारे लोक देखील अशाच जागेवर बसत असत''. प्रो.देवनाथ म्हणाले''. आज आपण भूत व भविष्य काळांना एकत्र आणूं या. आज आपण कांही महान व्यक्तींची परत आठवण काढूं. त्यांनी अनेक वर्षांपूर्वी लोकांसमोर कांही आदर्श निर्माण केले. त्याचे त्यावेळेइतकेच आजही महत्व आहे. तुम्हाला जशी त्रिशंकू महाराजांची गोष्ट माहीत आहे, तशीच आज त्यांच्या मुलाची, हरिश्चंद्राची गोष्ट मी तुम्हाला सांगणार आहे. दोन्ही गोष्टीत विश्वामित्र आहेत. पण जे विश्वामित्र त्रिशंकूशी अत्यंत दयाळूपणे वागले, त्यांनीच हरिश्चंद्राला अतिशय कठोर वागणूक दिली.''

अशा तऱ्हेने प्रो.देवनाथ गोष्ट सांगू लागले. ही विश्वामित्रांनी वसिष्ठांना चांगले ओळखण्यापूर्वीची गोष्ट आहे. आपल्या तपस्येने श्रेष्ठ शक्ती मिळवून देखील वसिष्ठ मुनींशी असलेल्या मत्सरावर विश्वामित्र विजय मिळवूं शकले नाहीत. आणि हेच राजा हरिश्चंद्राच्या आयुष्यातील आपत्तींचे कारण बनले.

एकदा देवदरबारीं वसिष्ठांना विश्वामित्रांपेक्षा अधिक मान मिळाला. नंतर विश्वामित्रांना असे कळले की अयोध्येचा राजा हरिश्चंद्राने आपले कुलगुरु वसिष्ठ ह्यांच्या करवी एक मोठा यज्ञ केला. हा यज्ञ 'राजसूय' ह्या नांवाने प्रसिद्ध होता. जो राजा सत्यशील व सत्यवचनी असे, तोच हा यज्ञ करुं शकत असे. ह्या यज्ञाच्या पूर्तिचे फळ, यज्ञ करण्यांस सुचवणाऱ्याला व यज्ञ करणाऱ्याला बरोबरीने मिळत असे.

''हरिश्चंद्र खरोखरच इतका सत्यशील व सत्यवचनी आहे कां?'' असा विश्वामित्रांना प्रश्न पडला. आणि त्यांनी त्याची कठीण सत्वपरीक्षा घेण्याचे ठरवले.

राजाची परीक्षा कशी घ्यावी हे त्यांना समजेना. जसा जसा राजा एका परीक्षेतून पार होत असे तसतसे ते त्याच्यासमोर दुसरे संकट उभे करत असत.

सुरवात अशी झाली की ऋषींनी आपल्या शक्तीने एका राक्षसाला रानडुकरांचे रूप देऊन राज्यांतील एका सुंदर बगिच्याची नासधूस करायला सांगितली. डुकराने त्यांची आज्ञा तंतोतंत पाळली. ते डुक्कर इतके शक्तिवान होते की राजाचे सैनिक देखील त्याला पकडूं शकले नाहीत, कीं पळवून लावूं शकले नाहीत. राजाला ही बातमी मिळताच तो घोड्यावर बसून डुकराचा पाठलाग करण्यास निघाला.

डुक्कर कधी दूर पळायचे तर कधी उलटेच राजावर चाल करुन यायचे. कधी लपायचे तर कधी



राजाच्या मागून धावून यायचे.

राजाला नवल वाटले पण त्याने डुकराचा पाठलाग सोडला नाही. त्याचा पाठलाग करत करत राजा घनदाट जंगलात पोचला. आणि ते डुक्कर नाहीसे झाले.

राजा अगदी दमून गेला होता. नदीच्या पाण्याने आपली तहान भागवून राजा एका दगडावर विश्रांती घेऊं लागला. तेवढयांत एक ब्राह्मण तिथे येऊन राजाशी बोलू लागला. अशा जंगलात देखील आपल्याला चांगला प्रेमळ माणूस भेटला म्हणून राजा खूष झाला. आपण कोण आहोत ते सांगून राजाने त्याला काय हवे म्हणून विचारले. ब्राह्मणाने सांगितले की त्याचा मुलगा लग्नायोग्य झाला आहे. तरी त्यासाठी पैसे हवे आहेत.

राजाने त्याला दुसऱ्या दिवशी राजवाड्यावर बोलवले. व तू जे कांही मागशील ते तुला मिळेल

विश्वावसु



असे वचन दिले.

तो ब्राह्मण दुसरा कोणी नसून विश्वामित्रच होते. त्यांनी आपला वेष बदलला होता. दुसऱ्या दिवशी दरबारांत येऊन ब्राह्मणाने राजाकडे राजवाडा व संपूर्ण राज्य मागितले. त्यांना वाटले, राजा घाबरुन आपले वचन पाळणार नाही. राजाने उभे राहून त्यांना सांगितले की तुमची मागणी पूर्ण होईल.

विश्वामित्रांनी राजाला अशा पेंचात टाकले तरी ते त्याला असफल करुं शकत नव्हते. तरीही ते त्याची परीक्षा घेत राहिले.

''हे राजा, तू आपले वचन पाळलेस हे छानच झाले. पण सर्व पुण्यकर्मानंतर दक्षिणा देणे आवश्यक असते''. ब्राह्मणाच्या म्हणण्याप्रमाणे पहिल्या दानावर आणखी दक्षिणा देणे आवश्यक होते. पण राजाने आपले सर्वकांही ब्राह्मणास आधीच दान केले असल्यामुळे तो ब्राह्मणाला दक्षिणा देऊं शकत नव्हता. म्हणून हे कार्य देखील मी लवकरात लवकर पूर्ण करीन असे सांगून, त्याने ब्राह्मणाचा निरोप घेतला. त्यानंतर तो पत्नी तारामती व पुत्र रोहित यांना बरोबर घेऊन वाराणसीस जाण्यास निघाला.

वाराणसीला त्यांना मोठया कष्टाने एका झोपडींत जागा मिळाली होती. तेवढयांत तो ब्राह्मण तेथे येऊन पुन्हां दक्षिणा मागूं लागला. तो रागाने म्हणाला की त्याला जर लवकर दक्षिणा मिळाली नाही, तर तो त्यांना शाप देईल. तेव्हां राणी तारामती म्हणाली ''मला एक दासी म्हणून विका. त्यांतून जे पैसे मिळतील ते ब्राह्मणाला द्या.'' ज्या माणसाने तारामती व रोहित यांना विकत घेतले, ते दुसरा वेष धारण केलेले विश्वामित्रच होते. तरीपण रक्कम पूर्ण झाली नाही. म्हणून राणी व राजकुमारांपासून वेगळे होऊन राजा गल्ली बोळांतून फिरत लोकांना विनवू लागला की त्याला कोणीतरी दास म्हणून विकत घ्यावे.

शेवटी गंगेच्या कांठावरील एका डोंबाने राजाला विकत घेतले. व ब्राह्मणाची दक्षिणा त्या रकमेने पूर्ण झाली.

त्यानंतर स्मशानाची निगराणी करणे व प्रेतांना जाळण्याची व्यवस्था करण्याने काम राजाकडे आले. तेथे आलेल्या लोकांकडून पैसे वसूल करुन ते मालकाला देण्याचेही काम त्याला करावे लागत असे. अशा प्रकारें दिवस जात होते. तारामती जेथे दासी म्हणून गेली होती तिथे तिला खूप त्रास होत असे. पण ज्या उद्देशाने आपण हे काम करत आहोत तो सफल झाला, म्हणून तिला त्याचे कष्ट, दुःख होत नसे.

पण एका सकाळी तिच्यावर मोठे संकट कोसळले. साप चावून रोहित मृत्युमुखी पडला, पण तारामतीला आपल्या मुलाला बघायला देखील मिळाले नाही. तिला असे सांगितले गेले की सर्व काम पूर्ण झाल्यावर आपल्या मुलाचे प्रेत ती बघू शकेल.



शेवटी तिने सर्व काम संपल्यानंतर आपल्या मुलाचे प्रेत बघितले. ते सापाच्या विषाने काळेनिळे पडले होते. प्रेत उचलून ती एकटीच स्मशानाकडे गेली.

अंधारी रात्र होती. पाऊस पडत होता. विजा पडताना होणाऱ्या उजेडांत वाट शोधत ती कशीतरी स्मशानात जाऊन पोचली. प्रेत जाळण्यासाठी जो कर होता, तो तिला मागितला गेला. आणि मागणारा कोण? तर तिचा स्वतःचा पती, राजा हरिश्चंद्र!

राणीने पैसे देणे अशक्य आहे असे सांगून दयेची भीक मागितली, तरी राजाने आपला हेका सोडला नाही. बोलण्याच्या आवाजावरून दोघांनी एकमेकाला ओळखले. आणि आपल्या पुत्राच्या मृत्यूचा, दोघेही शोक करुं लागले. शेवटी त्यांनी असे ठरवले की आपल्या मुलांबरोबर जळून आपल्या जीवनाचा अंत करायचा. चिता तयार करुन त्यांनी रोहितचा मृतदेह त्यावर ठेवला. त्याला अग्नी देऊन राजाराणी त्यांत उडी घेणार, तेवढयांत आकाशांतून लख्ख प्रकाशात एक गर्जना झाली.

ते दोघेही क्षणभर स्तब्ध झाले आणि त्यांचा प्रिय मुलगा हंसत त्यांच्या पुढे उभा आहे, हे त्यांना दिसले. इतकेच नाही तर ज्या माणसाने राणीला विकत घेतले होते, तो खऱ्या म्हणजे विश्वामित्राच्या रूपांत प्रगट झाला. सगळे देव, स्मशानाचा डोंब म्हणजे यमधर्म, हे सगळे त्यांच्या महानतेचे गुणगान करुं लागले.

विश्वामित्रांना पुन्हा एकदा जाणीव झाली की वसिष्ठ बरोबर आहेत. त्यांनी राजा हरिश्चंद्राची बाजू घेतली होती,विश्वामित्रांनी राजाची श्रेष्ठता मान्य केली, व त्याचे राज्य त्याला परत करण्यासाठी ते अयोध्येला गेले.

आजोबा म्हणाले, ''मुलांनो, ही गोष्ट आपल्याला असे शिकवते की सत्यशील होण्यास मनुष्याला महान त्याग करायची तयारी व धर्मनिष्ठ असावे लागते. शेकडो वर्षापर्यन्त राजा हरिश्चंद्राची कहाणी लोकांच्या मनांत घर करून बसली आहे. त्यांनी राजाराणीचे दुःख अनुभवले आणि माणूस दुःख व आपत्तीतून गेल्यावर पवित्र व अधिक शक्तीशाली बनतो, हेही त्यांना समजले.



एक महिना कसा भुर्रकन उडून गेला! ते परत घरी पोहोचले होते, पण अजून त्यांची साहसी सफर पूर्ण झाली नव्हती. बाबा त्यांना गाडीने एका ठिकाणी घेऊन गेले. "मला तुम्हाला असं कांहीतरी दाखवायचंय की जे आपल्या घरापासून इतकं जवळ असूनदेखील आपल्याला त्याच्या अस्तित्वाचीदेखील दखल नाही," एवढंच बोलून ते गप्प झाले. लवकरच ते महाराष्ट्राच्या ठाणे जिल्ह्याच्या बाहेरील आदिवासी वस्तीत पोहोचले, गाडी जसजशी त्या भागातून जात होती, तसतसे स्थानिक आदिवासी कुतूहलाने जमा होऊन मुलांकडे पाहात होते.



"हे लोक वारली जमातीचे आहेत. ते महाराष्ट्र व गुजरात राज्यांच्या सीमेलगतच्या भागात राहातात," बाबा सांगू लागले. मग त्यांनी त्या लोकांशी संभाषण सुरु केले. एक स्त्री व पुरुष पुढे येऊन त्यांना आपल्या झोपडीकडे घेऊन गेले. त्या घराच्या भिंतींवर कांही चित्रे रंगविलेली होती. बाबा जवळ जाऊन ती चित्रे पाहू लागले. "या चित्रांना वारली चित्रकला म्हणतात. आणि आता ही चित्रशैली साऱ्या जगांत प्रसिद्ध झालेली आहे," ते म्हणाले. तृषा व तुहीन खूप उत्सुकतेने जवळ जाऊन ती चित्रें निरखू लागले. त्यामध्ये तऱ्हेतऱ्हेची चित्रे होती. आदिवासींच्या देवीदेवता, प्राणी झाडे आणि वेगवेगळ्या प्रकारची कामे करताना आदिवासी स्त्रीपुरुष - शिकार करताना, नृत्य करताना, शेतावर काम करताना - इ. इ..

वारली लोक स्वतःचे रंग व कुंचले स्वतःच बनवतात. ह्या सर्व चित्रांमध्ये फक्त पांढराच रंग वापरला जातो. अगदी बारीक दळलेले व चाळून घेतलेले तांदळाचे पीठ पाण्यांत मिसळून हा रंग बनवला जातो. तीन इंच लांबीच्या अगदी बारीक काड्यांनी ते ही चित्रे रंगवतात. ह्या चित्रांमधील मनुष्याकृती त्रिकोणाद्वारे आणि त्यांचे हात पाय आदि काड्यांसारखे रंगविले जातात.

काय, कशीकाय वाटली ही भारताची साहस सफर?



मी आपल्या ह्या मजेवार सुटीची गोष्ट लिहून काढणार आहे.



तुम्हीदेखील नाही कां कांही करणार?



आणि मी वारली पद्धतीची चित्रे काढणार आहे.





# धनापेक्षां श्रेष्ठ

सीतापती शेतीच्या कामात पारंगत होता. शेतीमधील बारकावे समजावून घ्यायला खूप लोक त्याच्याकडे येत असत. तो शेतीचे महात्म्य सगळ्यांना समजावून सांगत असे. तो म्हणत असे की या पृथ्वीवर शेतकरी हाच एक असा प्राणी आहे,जो दुसऱ्यांना पोटभर खायला घालूं शकतो.

रघुपती सीतापतीचा एकुलता एक मुलगा होता. तो अतिशय सज्जन व बुद्धिवान होता. सगळ्यांनी ह्याला शिक्षणासाठी काशीला पाठवा असा सल्ला दिला. सीतापतीने सगळ्यांचा सल्ला मानला. कारण त्याला असे वाटले की शिक्षणाने मुलाचे शेतीतील ज्ञान वाढून त्याची भरभराट होईल. त्याने आपल्या मुलास काशीतील एका गुरुकुलांत शिक्षणास पाठवले.

समाजाची वाढ झाल्यामुळे गुरुकुले जंगलात न राहाता शहराजवळ आली. सुशिक्षितांची संख्या वाढली. त्याच्याबरोबर बेरोजगारी पण वाढली. म्हणून गुरुकुलांत शास्त्र, पुराणांचेच शिक्षण न देता स्वावलंबी होण्यासाठी आवश्यक ते शिक्षणही दिले जाऊं लागले. त्यांत कृषिशास्त्र देखील आहे.

रघुपतीने गुरुकुलांत प्रवेश घेऊन शेती विषयक अनेक महत्वाच्या गोष्टी शिकल्या. जेव्हां सुट्टीत तो घरी जात असे, तेव्हां त्याविषयी तो आपल्या वडिलांशी चर्चा करीत असे. आपल्या मुलाचे ज्ञान बघून सीतापतीला खूप आनंद होत होता.

थोड्या दिवसांनी रघुपतीचे शिक्षण पूर्ण झाले. पण शहरी जीवनाचे त्याला आकर्षण होतेच. एक दिवशी त्याने आपल्या वडिलांना स्पष्ट सांगितले की "मी शहरांत मोठा उद्योग सुरुं करुं इच्छितो. शेती उत्पादनातून मी आकर्षक वस्तू निर्माण करीन. आपण पिढयानपिढ्या जे कमावतो आहे, त्याच्या दसपट अधिक धन मी मिळवीन".

सीतापतीला त्याचा मुलगा हे गांव सोडून शहरात जात आहे, व शेती करणे सोडून देणार आहे, हे अजिबात आवडले नाही. त्याने रघुपतीला समजावत म्हटले "मुला, जी शांती तुला गांवात मिळेल ती शहरात नसेल. शेती हा आपला पेशा आहे. शेती करणें हेच आपल्याला शोभून दिसते. दुसऱ्या लोकांना खायला घालण्यांत जो आनंद आहे, तो दुसऱ्या कशांत मिळेल कां? अधिक



पैशांनी जास्त सुख मिळेल हा तुझा निव्वळ भ्रम आहे''.

रघुपतीला आपल्या वडिलांचे म्हणणे पटले नाही. तो स्पष्टपणे म्हणाला, ''बाबा शेती करून आपण दुसऱ्याला खायला घालू शकता, पण मी जेव्हां उद्योग सुरु करीन, तेव्हां अनेकांना रोजगार देईन. आणि मी कृषिपरिवारांतून आलो असल्यामुळे शेतकऱ्यांचा पण माझ्यामुळे फायदा होईल.

ह्या दीर्घचर्चेनंतर शेतकऱ्याला आपल्या मुलाच्या म्हणण्यातली सत्यता पटली. शेवटी त्याने आपली मान्यता दिली. परंतु धंदा सुरु करण्यास एक लाख रुपयांची गरज होती. एवढी रक्कम उधार देऊं शकेल असे गांवात कोणी नव्हते.

''शहरात कितीतरी लोक आहेत जे कर्जाऊ रक्कम देतात. आपले संपूर्ण शेत गहाण ठेवले, तर कोणीही सावकार एवढे धन नक्की देईल. धंदा सुरु झाला की अगदी थोडयाच दिवसांत आपण कर्ज फेडून टाकू''. रघुपती म्हणाला.

सीतापती धान्य देणाऱ्या आपल्या जमिनीस आई समान व डोक्यावर छत्र देणाऱ्या आपल्या घरास पित्यासमान मानत असे. त्यांच्या जोरावरच तो आपले साधेसुधे आयुष्य जगत होता. आपल्या मुलाचे म्हणणे त्याला आवडले नाही. ''मी आपल्या आई-वडिलांसमान जमीन कधीच गहाण ठेवणार नाही. जर कोणी माझ्या शब्दावर विश्वास ठेवून पैसे देत असले तरच मी पैसे घेईन''. असे तो म्हणाला.

तेव्हां रघुपतीने शहरांत रहाणाऱ्या नातेवाई-कांची नांवे सुचवली. तसे ते सधन होते पण त्यांच्याकडे फारसे जाणेयेणे नव्हते. म्हणून सीतापती म्हणाला ''मुला, मी पैसे मागितले आणि त्यांनी नाही म्हटले, तर त्याच्याइतका माझा मोठा अपमान नाही. तुझ्या माहितीत असा कोणी आहे कां, जो नाही म्हणणार नाही? मी स्वतः त्याच्याकडे जाऊन कर्ज मागेन''.

''बाबा तुमचे बोलणे हिरण्यकश्यपु सारखे आहे मला माहीत आहे की तुम्हाला मला मदतच करायची नाही.'' रघुपती नाराजीने म्हणाला.

मुलाचा आरोप ऐकून सीतापतीला वाईट वाटले. आपला प्रामाणिकपणा कसा सिद्ध करावा म्हणून तो खूप विचार करु लागला. तेव्हां त्याला एकदम कमलाची आठवण आली.

कमला, सीतापतीच्या मोठया काकांची मुलगी होती. हुंडयामुळे तिचे लग्न मोडणार होते. तेव्हां सीतापतीने आवश्यक रकम देऊन त्यांना मदत केली होती. त्या दिवशी त्याचे हात हातांत घेऊन कमला म्हणाली होती'' गरजेच्या वेळी एवढे पैसे देण्यास माझ्या नात्यांतला एकही नातेवाईक पुढे आला नाही. दादा, तुझे उपकार मी जन्मभर लक्षांत



ठेवीन. माझा विश्वास आहे की या उपकाराची फेड करायला देव मला एखादी सुसंधी देईल''.

खरोखरच देवाने तिला मदत केली. लग्नानंतर दोन वर्षांनी तिच्या पतीने नोकरी सोडून धंदा सुरु केला. तेव्हांपासून त्यांच्या जीवनात प्रगती होत गेली. दिवसेंदिवस कमाई वाढत गेली व ते आता श्रीमंत झाले होते.

कमला जेथे रहात होती त्या शहरांत सीतापती आपल्या मुलाला घेऊन गेला. कमलाने त्या दोघांचे स्वागत केले. प्रेमाने चांगला पाहुणचार केला. सीतापतीने विलंब न करता आपल्या येण्याचे कारण सांगितले.

हे ऐकून कमलाचा चेहरा उतरला. ती म्हणाली, ''दादा, माझे पती कोणालाही कर्ज देण्याच्या विरुद्ध आहेत. हा त्यांचा सिद्धांत व आदर्श आहे. पण ते असं उघड बोलत नाहीत. त्यांच्याकडे पैसे मागायला आलेल्यांना कांही ना कांही कारण सांगून परत पाठवतात.

एक दिवस त्यांचे बोलणे ऐकून पहा. ते काय काय कारणे सांगून लोकांना परत पाठवतात. मग विचार करा, की तुम्ही असा मार्ग काढू शकता कां, की ज्यामुळे ते तुम्हाला परत पाठवूं शकणार नाहीत. आजपर्यन्त त्यांच्याकडून कोणीही कर्ज घेऊं शकले नाही. एवढे मला नक्की ठाऊक आहे.'' सीतापतीला वाटले की कमला या बाबतीत निर्दोष आहे. तिच्या बोलण्यांत कांहीही लबाडी नव्हती. त्याला माहीत होते की कुठलीही विवाहित स्त्री, आपल्या पतीच्या मनाविरुद्ध जाण्याचे धाडस करं शकत नाही. म्हणून त्याने कमलाने सुचवलेला मार्ग उपयोगांत आणायचे ठरवले.

एक माणूस आपल्या मुलीच्या हुंडयासाठी कर्ज मागायला आला. कमलाचा नवरा त्याला म्हणाला



''कर्ज घेताना ते फेडायचे कसे ह्याचा मार्ग प्रथमच शोधायला लागतो. खरं तर हुंडा देण्याच्या प्रथेच्या मी अगदी विरुद्ध आहे. मी त्याची बाजू कधीच घेणार नाही. उगाचच कुठल्यातरी बड्याघरी मुलगी देण्याच्या मागे कां लागता? आपल्या तोडीचे स्थळ पाहून मुलीचे लग्न करा. म्हणजे या कर्जाच्या भानगडीतच पडायला नको. जा. असा मुलगा बघा की तुम्हीपण सुखी व्हाल आमि तुमची मुलगी पण सुखी होईल''.

अजून एकजण कर्ज मागायला आला. त्याला त्याने असे सांगितले, ''तुझा मुलगा मोठा झाला आहे आणि तूं माझ्याकडे कर्ज मागायला कां आला आहेस? आपल्या मुलाचे लग्न करायचे आहे म्हणून सांग. लोक मुलासाठी व जास्तीजास्त हुंडा द्यायला रांग लावतील.'' त्या माणसाने सांगितले की तो हुंडा घेण्याविरुद्ध आहे. ते त्याच्या आदर्शा विरुद्ध आहे. कमलाचा नवरा म्हणाला ''जर तू तुझा आदर्श

सोडूं शकत नाहीस, तर मग मी माझा आदर्श कसा सोडणार? कर्ज न देणें हा माझा आदर्श आहे. कर्ज न घेण्याच्या आदर्शाचे पालन सगळेजण करुं लागले तर जगांतल्या पैशाविषयीच्या निम्म्या समस्या आपोआप सुटतील.''

कमलाच्या नवऱ्याची व्यवहाराची ही पद्धत पाहून रघुपती व सीतापतीला पक्के कळले की तो कधीही कर्ज देणार नाही. तरी पण सीतापतीने त्याच्याकडे कर्ज मागायचे ठरवले. पण रघुपती आपल्या वडिलांना म्हणाला, ''मी तुमचा आदर्श मानतो. जर यांनी कर्ज द्यायला नकार दिला तर तुमचा अपमान होईल. तुम्हाला वाईट वाटेल. आपण येथून चुपचाप निघून जावे, हेच बरे होईल''.

सीतापतीने आपल्या मुलाचा सल्ला न मानता त्या दिवशी रात्री कमलाच्या नवऱ्याला सगळी हकीगत सांगून एक लाख रुपयांचे कर्ज मागितले.

हे ऐकताच कमलाच्या नवऱ्याने आश्चर्याने, म्हटले ''हे काय? आपल्या मुलाला धंदा करायचाय? तो सुद्धां शहरांत? शेती विषयक आपल्या विचारांनी मी प्रभावित झालो आहे. आपल्या विचारांचे मला कौतुक वाटते. जर आपला मुलगा आपल्या आदर्शाच्या विचाराविरुद्ध वागणार असेल तर मी त्याला कधीही मदत करणार नाही. कृपया माझ्याकडून मदतीची अपेक्षा करु नका.''

रघुपती रागावून म्हणाला ''ह्याचा अर्थ माझे आदर्श, विचार पोकळ आहेत कां?''

''दुसऱ्याच्या विचारांना, आदर्शांना ठोकरणारे विचार कसे उत्तम समजणार?'' कमलाच्या नवऱ्याने विचारले.

त्याच्या ह्या उत्तराने रघुपतीला स्पष्ट कळले की धंदा सुरु करायला आपल्या वडिलांकडे धन मागणे सुद्धां बरोबर नाही. ध्येयसिद्धी साठी आपणच प्रयत्न केले पाहिजेत. हे सत्य कळल्यावर रघुपती कमलाच्या नवऱ्याला म्हणाला, ''आपल्याकडे कर्ज मागायला जे लोक येतात त्यांना आधीच माहीती असते, की तुम्ही कर्ज देणार नाही.

तरीसुद्धा ते आपल्याकडे कां येतात हे आता मला छान कळले. कारण आपण त्यांच्या अडचणींवर योग्य मार्ग सांगता. आता मला कळले की हे जाणूनच माझे वडील तुमच्याकडे कर्ज मागायला आले. माझा भ्रम दूर झाला. आता मी धंद्याचा विचार सोडून देईन आणि शेतीच्या कामात वडिलांना मदत करेन.''

रघुपतीच्या या निर्णयाने सीतापती व कमलाच्या नवऱ्याला खूप आनंद झाला.





६३. धृतराष्ट्राचा वानप्रस्थाश्रम

# महाभारत

युधिष्ठिर आणि याज्ञिकांच्या प्रश्नाला उत्तर देताना मुंगूस म्हणाले, ''मी खोटं सांगत नाही. हा यज्ञ कधीही त्या सत्तूच्या दानाची बरोबरी करुं शकणार नाही. ही गोष्ट मी स्वतः पाहिली आहे. पिकावरचे गळलेले दाणे वेचून कुरुक्षेत्रांत राहणारे मुनी, त्यांची पत्नी, पुत्र व सून ही सर्वजण स्वर्गात गेली आहेत. त्यांच्यामुळेच माझ्या शरीराचा अर्धा भाग सुवर्णाचा झालेला आहे.

''मी ज्या ब्राम्हणाविषयी सांगतो आहे, ते आपली पत्नी, पुत्र व सून यांच्यासह उञ्छ वृत्तीने पक्षांप्रमाणे जीवन कंठीत होते. दिवसांतून ते एक वेळ भोजन करीत असत.

''एकदां भयंकर मोठा दुष्काळ पडला. त्या प्रदेशांतली सारी झाडेंझुडुपें सुकून गेली. या परिवाराला दिवसांतून एकवेळ अन्न मिळणें मुष्कील झाले होते. एक दिवस दुपारच्या रणरणत्या उन्हांत जाऊन त्यांनी थोडेफार दाणे गोळा केले. त्याचे पीठ करुन त्याचे चार भाग केले. चौघे जण ते वाटून घेऊन खाणारच होते, तेवढ्यांत एक ब्राह्मण त्यांच्या दारांत अतिथी म्हणून उभा राहिला.

''त्या भुकेल्या ब्राम्हणाला सर्वांनी घरांत बोलावले. त्याला अर्घ्य व पाद्य देऊन गवताच्या आसनावर बसवले. तेव्हां त्या घरांतल्या यजमानाने आपल्या वांटणीचा सत्तूचा भाग ब्राम्हणाच्या हातांत





दिला. अतिथीने तो खाल्ला पण त्याचे पोट भरले नाही. त्याच्या पत्नीने आपल्या वांटणीचा भाग मोठ्या आनंदाने अतिथीला दिला. त्यानंतर त्या अतिथीने क्रमाने ब्राम्हणाचा मुलगा व सुनेच्या वांटणीचा आहार ग्रहण केला. त्यावर त्या ब्राम्हणाने प्रसन्न होऊन सांगितलं की तो यमराज होता, आणि त्या सर्वांना स्वर्गप्राप्तीचे वरदान द्यायला आला होता.

"महाराज, त्यावेळेला मी माझ्या बिळांतून बाहेर आलो. त्या सत्तूचा वास लागून आणि तिथल्या पाण्यांत भिजल्यामुळें माझे डोके आणि शरीराचा अर्धा भाग, सोन्याच्या रंगाचा झाला. इथें फार मोठा यज्ञ होतो आहे हे ऐकल्यानंतर मी मोठ्या आशेने इथें आलो होतो. मला वाटलं होतं की माझे उरलेले अर्धे शरीरही सोन्याचे होऊन जाईल. पण माझी ही इच्छा कांही पूर्ण झाली नाही."

असे बोलून ते मुंगूस सर्वांच्या डोळ्यांदेखतच अंतर्धान पावले. युधिष्ठिर आपल्या भावांबरोबर राज्य कारभार पाहात होता. विदुर, संजय व युयुत्सु धृतराष्ट्राची सेवा करण्यांत तत्पर असत. कुंती नेहमी गांधारीच्याबरोबर राहात होती. द्रौपदी, सुभद्रा व पांडवांच्या इतर राण्याही नेहमी त्या सर्वांवर देखरेख करीत असत. व्यास वरचेवर येत आणि कथाकहाण्या ऐकवून परत जात. युधिष्ठिर कोणत्याही बाबतींत धृतराष्ट्राच्याविरुद्ध बोलत नसे. धृतराष्ट्राला जे कांही हवे असेल ते युधिष्ठिर लगेच मागवून त्याला देत असत. गांधारी व धृतराष्ट्राला त्यांच्या पुत्रांचा वियोग जाणवूं नये म्हणून पांडव सर्वतोपरी काळजी घेत असत. एकटा भीम मात्र धृतराष्ट्रावर नाराज असे.

धृतराष्ट्र नेहमी दानधर्म करत होता. ब्राम्हणांना अग्रहार देत होता. युधिष्ठिरने आपल्या दरबारांतल्या मंडळींना सक्त आज्ञा दिली होती की धृतराष्ट्राच्या इच्छेविरुद्ध व्यवहार करणाऱ्यांना अत्यंत कठोर शिक्षा देण्यांत यावी. थोडक्यांत सांगायचे तर धृतराष्ट्राचे मुलगे जिवंत असताना जसे त्याचे आयुष्य चालले होते, तसाच त्याचा राज्यकारभारही सुरळीत चालला होता. गांधारी व धृतराष्ट्रदेखील पांडवांना आपल्या मुलांच्या जागी मानत होते.

अशा प्रकारे पंधरा वर्षे गेली, धृतराष्ट्र व गांधारीला कोणत्याही प्रकारची कमतरता नव्हती. तरीही अधूनमधून संधी मिळाली की भीम त्यांना टोमणे मारुन बोलत असे. त्यामुळें त्या दोघांना वाईट वाटे. पण ही गोष्ट धृतराष्ट्राला ठाऊक नव्हती.

एक दिवस धृतराष्ट्राने युधिष्ठिराला म्हटले, "पुत्रा, आजवर तूं आमच्याशी फार आदराने वागला आहेस. त्यामुळें आम्ही दोघेही प्रसन्न आहोत. मी अनेक दानधर्म केले आहेत. क्षत्रियधर्माचे पालन केल्यामुळें माझ्या पुत्रांना उत्तमलोक प्राप्त झाले आहेत. मी त्यांचे श्राद्धदेखील केले. आता माझ्या हातून होण्यासारखे कांही काम राहिले नाही. आता ज्यामुळें मला



वैयक्तिक लाभ होईल असे पुण्य मिळवायची माझी इच्छा आहे. तूं संमती दिलीस तर आता वानप्रस्थाश्रम स्वीकारण्याची माझी इच्छा आहे. गांधारीही माझ्याबरोबर राहील. मी अरण्यांत राहिलो तरीही तुमचे सदैव कल्याण होवो, हा आशिर्वाद तुम्हाला देत राहीन."

हे धृतराष्ट्राचे बोलणे युधिष्ठिराने मानले नाही. तो म्हणाला, "आपण अरण्यांत कष्ट करीत राहिलात, तर मला इथें सुखाने राज्य करता येणार नाही. आपण उपवास करुन जमिनीवर झोंपी जाल, तर माझी व माझ्या भावांची, जग निंदा करणार नाही कां? मला हे राज्य नको किंवा इथले सुखोपभोगही नकोत. मी हे राज्य युयुत्सुवर सोंपवतो. मला असं वाटतं की आपण कोणत्यातरी कारणाने दुखावले गेला आहात आणि म्हणून हा निर्णय घेत आहात. मी आपले दुःख दूर करुं शकेन."

"माझ्या मनांत तपस्या करावी अशी इच्छा आहे. आपल्या वंशातल्या लोकांनी वनवासास जाण्याचा प्रघात आहेच. मी तुमच्याजवळ बराच काळ राहिलो आहे. आता मी वृद्ध झालो आहे. माझा वनवास तुम्ही मान्य केला पाहिजे." धृतराष्ट्राने युधिष्ठिरास समजावले. वानप्रस्थास जाण्यासाठी त्याने केवळ फक्त आग्रहच धरला नाही, तर युधिष्ठिराने जर या प्रस्तावाला मान्यता दिली नाही तर धृतराष्ट्राने अन्नग्रहण करायचे नाही असे ठरवले.

त्यावेळीं व्यास महर्षी तिथे आले व धृतराष्ट्राला वानप्रस्थाश्रम स्वीकारण्यासाठी अरण्यांत जाण्याची संमती द्यावी म्हणून त्यांनी युधिष्ठिराची समजूत घातली.

धृतराष्ट्र वानप्रस्थासाठीं अरण्यांत जाणार ही बातमी कळताच हस्तिनापुरांतल्या सर्व वर्णांचे लोक त्यांना भेटायला येऊं लागले. धृतराष्ट्राने त्या लोकांना



सांगितले, "गांधारी व मी, दोघेही वनवासाला जात आहोत. त्यासाठी तुम्ही मंडळींनी आम्हाला अनुमती द्यावी. दुर्योधनापेक्षां युधिष्ठिर फारच चांगल्या प्रकारें राज्य करतो आहे. या पृथ्वीवर प्रथम शंतनू, नंतर भीष्म, आणि विचित्रवीर्याने राज्य केलेले आहे. मीही जमेल तशी तुम्हा सर्वांची थोडीफार सेवा केली होती. माझा राज्यकारभार कसा होता ते मला माहीत नाही. त्यावेळेस जर माझ्या हातून कांही चुका झाल्या असतील तर मला क्षमा करा. आमच्या दुर्योधनाच्या दुष्ट स्वभावामुळें क्षत्रिय वंशाचा विनाश झाला आहे, त्यांत माझाही दोष आहे. मी आपल्या सर्वांसमोर हात जोडून विनंती करतो की आपण त्या चुका विसरुन जा. आजपासून युधिष्ठिर तुमचा शासनकर्ता राहील."

हे बोलणें ऐकल्यानंतर जनतेचा प्रतिनिधी या नात्याने एका ब्राम्हणाने धृतराष्ट्राला सांगितले, "राजन! आपण आमच्याशी नेहमीच प्रेमाने वागत



आला आहात. आपल्या वंशातल्या कोणाही व्यक्तीने आम्हाला कांहीही कमी केलेले नाही. दुर्योधनाने आमच्याबाबतींत कांही द्रोह केलेला नाही. आपण वनवासाला गेलात तर आम्हाला चिडण्यासाठी कायमचे एक कारण राहील. युद्धाला आमंत्रण दिल्याबद्दल आम्ही कांही दुर्योधनाला दोष देणार नाही. कुरुवंशाचा क्षय होण्यास परमेश्वर कारणीभूत आहे, दुसरा कोणीही नाही. युधिष्ठिर उत्तम पुरुष आहे. त्याने आमच्यावर हजार वर्षे राज्य करावं.''

दुसऱ्या दिवशीं सकाळीं विदुर युधिष्ठिराजवळ येऊन म्हणाला, ''पुत्रा, धृतराष्ट्र कार्तिक महिन्यांत वनवासाला जाणार आहेत. जाण्यापूर्वी त्यांना भीष्म, सोमदत्त, द्रोण, सैंधव, आपले पुत्र आणि मित्रांचेही श्राद्धकर्म करायची इच्छा आहे. त्यासाठीं त्यांना थोडं धन हवं आहे.''

विदुराची मागणी ऐकून युधिष्ठिर आणि अर्जुनाने मोठ्या आनंदाने धन द्यायचे मान्य केले. परंतु भीम कांहीच बोलला नाही. त्यावर अर्जुनाने भीमाला समजावलं, ''अरे, तूंही थोडे धन दे ना! वानप्रस्थाला जाण्यापूर्वी श्राद्धकर्म करण्यासाठीं धृतराष्ट्र आपल्याकडे धन मागत आहेत. तुला आठवतच असेल कीं आपणदेखील एकवेळ आपल्याला राज्य मिळावे म्हणून त्यांच्याकडे याचना केली होती.''

त्यावर भीमाने उत्तर दिले, ''भीष्म, सोमदत्त, बाल्हिक, भूरिश्रव, द्रोण आणि इतर लोकांचे श्राद्धकर्म करण्यासाठीं धन द्यायला हवंच. कर्णाच्या श्राद्धासाठीं कुंती धन देईल, पण दुर्योधनासारख्यांच्या श्राद्धासाठी आपण कशाला धन द्यायचं? त्याला उत्तमलोक प्राप्त झाला नाही तर काय झालं? त्याने आपल्याला असंख्य यातना दिल्या होत्याच ना?''

तेव्हां युधिष्ठिराने भीमाला सांगितलं, ''आता तू मौन पाळलंस तर ते योग्य होईल.'' नंतर युधिष्ठिर विदुराला म्हणाला, ''भीमाला वाईट वाटायचं कांही कारण नाही. धृतराष्ट्रांना जितकं धन हवं असेल ते मी त्यांना देईन.''

त्यानंतर धृतराष्ट्राने मोठ्या प्रमाणावर श्राद्धकर्माचे धार्मिक विधी केले. युधिष्ठिरामार्फत त्याने अपार दानधर्म केला. हे कार्य संपल्यानंतर धृतराष्ट्राने गांधारीबरोबर कार्तिकपूजा केली, वल्कलें नेसली आणि वानप्रस्थाश्रमासाठी ते दोघेजण चालायला लागले. त्यांच्यापुढें अग्निहोत्र नेले जात होते. त्यांच्या मागोमाग कौरवस्त्रिया चालत होत्या. त्यांना जाताना पाहून पांडवांच्या डोळ्यांत अश्रू आले. कुंतीदेवी गांधारीचा हात पकडून चालत होती. द्रौपदी, सुभद्रा, परीक्षितबरोबर उत्तरा आणि नगरांतल्या अनेक स्त्रियाही त्यांच्या पाठोपाठ चालायला लागल्या. विदुर आणि संजयने धृतराष्ट्राच्या बरोबर जाण्यासाठीं अनुमती मिळवली.

नगराच्या वेशीबाहेर गेल्यानंतर युयुत्सु आणि



कृपाचार्याला धृतराष्ट्राने परत जाण्यास सांगितले. एकएक करत मागे राहात गेले. शेवटीं युधिष्ठिर एकटा राहिला. त्याने कुंतीदेवीला सांगितले, ''मातोश्री, तूं परत जा. मी महाराजांबरोबर परत जाईन.'' पण कुंतीने गांधारी व धृतराष्ट्र यांच्याबरोबर जायचा निश्चय केला होता. तिने युधिष्ठिराला सांगितले, ''पुत्रा, गांधारी व धृतराष्ट्र माझ्या सासूसासऱ्याप्रमाणे मला आहेत. त्यांची सेवा करता करता मीही तपस्या करीन.'' सर्व पांडवांनी तिला थांबवण्याचा प्रयत्न केला. पण तिने त्यांचे ऐकले नाही. शेवटी निराश होऊन पांडव द्रौपदीबरोबर हस्तिनापुरला परत गेले.

धृतराष्ट्र व इतर संध्याकाळपर्यंत चालत, गंगेच्या कांठावर एका स्थानावर जाऊन थांबले. ब्राह्मणांनी अग्निहोत्र तयार केले. नंतर विदुर व संजयने धृतराष्ट्र आणि गांधारीसाठी गवताची शय्या तयार केली. ती रात्र आनंदात गेली.

विदुराच्या सल्ल्यानुसार गंगेच्या कांठावर धृतराष्ट्रासाठीं एक पर्णकुटी बांधण्यात आली. तिथें कांही दिवस राहून धृतराष्ट्र कुरुक्षेत्रांतल्या एका आश्रमांत पोंचले. तिथें शतायूप नांवाचा एक राजर्षी राहात होता. त्याने आपल्या पुत्रावर राज्य सोंपवले होते आणि तो वानप्रस्थाश्रमांत आला होता. धृतराष्ट्राने तपस्येला प्रारंभ केला. त्यांना भेटण्यासाठीं जर कुणी आले तर त्यांची सेवा व विचारपूस कुंती करत होती. तपस्या करीत असताना धृतराष्ट्र अधूनमधून अनेक कथा सांगत असे.

धृतराष्ट्र महाराज वनांत गेल्यानंतर नगराची शोभा कमी झाली आहे असे नगरवासीयांना वाटूं लागले. नागरिक नेहमी त्या वृद्ध राजाच्या गोष्टी एकमेकांना सांगत असत. आता पांडवांच्याबद्दल सांगण्याची कांही विशेष आवश्यकता नव्हती. त्यांची आई कुंती धृतराष्ट्राच्याबरोबर वनांत गेल्यामुळें त्यांचे मन उदास



झाले होते. कोणत्याही दैनंदिन कामांत त्यांना स्वारस्य राहिले नव्हते.

सर्वांत जास्त सहदेव व्याकुळ झालेला होता. कुंतीला भेटायला तो अतिशय उतावीळ झालेला होता. द्रौपदीनेदेखील एक दिवस युधिष्ठिराला सांगितले, ''गांधारी, धृतराष्ट्र व कुंती यांना भेटायची इच्छा राजपरिवारांतल्या सगळ्या स्त्रियांना आहे.''

तिने हे सांगायचाच अवकाश, युधिष्ठिराने धृतराष्ट्राच्या आश्रमाकडे जाण्याचे ठरवले. ज्या नागरिकांना या मंडळींच्यासमवेत जाण्याची इच्छा होती, त्यांनी अवश्य यावे अशी युधिष्ठिराने जाहीर घोषणा केली. दुसऱ्याच दिवशी हा प्रवास सुरुं झाला.

त्यांच्याबरोबर एक महासेनाच चालूं लागली. रथ, घोडे, उंट आणि पायदळाबरोबर लोक चालूं लागले. राजस्त्रिया पालखींत बसल्या. युयुत्सु आणि धौम्य राजमहालांत थांबले. पांडवांच्या आगमनाची वार्ता ऐकून कांही आश्रमवासी त्यांना भेटायला आले.

युधिष्ठिराने त्यांना विचारले, "माझे काका कुठे आहेत?" आश्रमवासीयांनी सांगितले की धृतराष्ट्र फुलें आणि पाणी आणायला यमुनेच्या तीरावर गेलेले आहेत.

त्यांनी सांगितलेल्या मार्गावर पांडव गेले. त्यांनी दूर अंतरावर असलेले धृतराष्ट्र, गांधारी आणि कुंतीला पाहिले. सहदेव जोराने धावत पुढें गेला आणि कुंतीदेवीचे पाय धरुन, तो रडायला लागला. तिच्याही डोळ्यांतून आसवांच्या धारा लागल्या. तिने सहदेवाला उठवून त्याला मिठींत घेतले आणि ही बातमी गांधारीला सांगितली. तेवढ्यांत तिला इतर पांडवही दिसले.

पांडव आणि त्यांच्या पत्नी आपल्या चारी बाजूला बसलेले आहेत, हे ऐकून धृतराष्ट्राला आपण हस्तिनापुरांतच आहोत असे वाटायला लागले. आश्रमांतले सर्व मुनीजन पांडवांना पाहायला आले. संजनने मुनींशी पांडवांचा परिचय करुन दिला. ते सारे मुनी आश्रमांत परत गेल्यानंतर युधिष्ठिराने धृतराष्ट्राची विचारपूस करताना म्हटले, "विदुरकाका इथें दिसत नाहीत ते? ते कुठे असतात?"

"विदुराने अन्नपाणी वर्ज्य केले आहे व तो घोर तपस्या करण्यांत गुंतलेला आहे. तो फारच निर्बल झालेला आहे. आश्रमांतले ब्राह्मण सांगतात की तो दिगंबर होऊन वनांत फिरत असलेला कधीकधी दिसतो." धृतराष्ट्राने उत्तर दिले.

धृतराष्ट्र हे बोलत असतानाच दूर अंतरावरुन आश्रमाच्या दिशेने येत असलेला विदुर दृष्टीस पडला. युधिष्ठिर एकटाच विदुराच्याजवळ जाऊं लागला. त्या दाट दुर्गम जंगलात विदुर कधी दिसत होता आणि कधी अदृश्य होत होता. त्याला पाहून युधिष्ठिराने ओरडून सांगितले, "विदुरकाका, मी तुम्हाला भेटायला आलो आहे."

युधिष्ठिर जंगलातल्या एका प्रदेशांत उभा होता. "मी युधिष्ठिर!" असं म्हणून तो विदुरासमोर उभा राहिला. विदुर फारच अशक्त व दुर्बल झालेला त्याला दिसला. युधिष्ठिराकडे विदुर एकटक पाहूं लागला. युधिष्ठिराच्या मनांत अशी अनुभूति आली की विदुराचे एकएक अवयव त्याच्या अवयवांत मिसळून जात आहेत, आणि विदुराचे प्राण त्याच्या प्राणांत मिळून एकजीव होत आहेत. यानंतर थोड्याच वेळांत विदुराचे शव एका वृक्षाच्यालगत टेकलेले युधिष्ठिराला दिसले. युधिष्ठिराने विदुराच्या कलेवरावर दहनसंस्कार करायचे ठरवले. परंतु यतीचा दहनसंस्कार करणें धर्माच्याविरुद्ध होते.

म्हणून या कल्पनेचा त्याग करुन युधिष्ठिर आश्रमांत परत आला. त्याने ही गोष्ट सर्वांना सांगितली. ते ऐकून सारेजण आश्चर्यचकित झाले.

- क्रमशः











गरुडाचा एक पंख हिमालयांत पडला होता. तो एका मुनींना ठेवला होता. ते त्याची पूजा करत असत. मग त्यांनी तो आमच्या पूर्वजांना दिला. ते सर्व राजे होते. त्यांनी अखंडपणे पंखाची पूजा केली. ती आजही केली जाते. असे म्हणतात की सहाव्या पिढीतला माणूस ह्याची पूजा करेल व सर्वाधिक सुखी होईल. आदित्य तू सहाव्या पिढीतला युवक आहेस.

माझ्या नंतर तू ह्या पंखाची परंपरा चालव. प्रत्येक पौर्णिमेला ह्याची पूजा कर. हा तुला अधिक शक्ती व बळ देईल. त्याचा उपयोग तू लोकांच्या कल्याणासाठी कर. ज्या प्रकारे गरुडाने आपल्या आईच्या मुक्तीसाठी संघर्ष केला, त्याप्रमाणे तू चन्द्रपुरी मातेला अराजकते पासून वाचव. माझ्यावर गुप्तपणे पाळत ठेवली जात आहे. कदाचित माझा शेवट जवळ आला असेल. आदित्य बाळा, गरुड तुझे रक्षण करो.

बाबा, मी माझ्या मातृभूमीचे रक्षण करीन

क्रमशः



# चंचल मन

एक शेतकरी आपल्या शेतात जमीन नांगरत होता, तेंव्हां नांगरांचा फाळ कुठल्यातरी वस्तूवर आपटला. शेतकऱ्याने त्या जागी खोदल्यावर त्याला एक तांब्याचे भांडे मिळाले. भांडे सोन्याच्या मोहोरांनी भरलेले होते.

भांडे भरून सोने पाहून शेतकऱ्याचे मन अस्थिर झाले. तो विचार करू लागला. सोन्याने मोठमोठी कामे करता येतात. श्रीमंत माणूस म्हणून प्रतिष्ठा वाढते. पण त्याचबरोबर अडचणी पण आहेत. चोरांना हे कळले तर दरोडा घालतील, सोने पळवतील. त्यांना थांबवायचा प्रयत्न केला तर मारून देखील टाकतील.

अशा परस्परविरोधी विचारांनी शेतकरी काळजीत पडला. इतक्यांत त्याला दूरवर एक न्यायाधिकारी दिसला. शेतकऱ्याला वाटले, सारे सोने त्याच्याकडे दिले म्हणजे कांही धोका नाही. असा विचार करून शेतकरी पळत त्याच्याकडे गेला. व त्याला म्हणाला "आपण कृपा करून माझ्या शेतावर चला".

दोघेजण शेतात जिथे तांब्याचे भांडे जमिनीत होते, तिथे गेले. एवढयांत शेतकऱ्याचे मन बदलले. त्याने भांड्यावर माती पसरली व तो न्यायाधिकाऱ्याला म्हणाला, "महाराज आपण अचूक निर्णय घेता. कृपया मला सांगा की माझ्या या दोन बैलांपैकी कुठला बैल श्रेष्ठ आहे?"

हा प्रश्न ऐकून न्यायाधिकारी रागावला व तिथून निघून गेला.

"मी हे सोने न्यायाधिकाऱ्याकडे कां नाही दिले? आता सगळ्यांच्या नजरेआड होईल असं हे मी कुठे लपवूं?" अशा शंकेने शेतकरी मनांतल्यामनांत जास्तच घाबरू लागला.

दिवसभर तो हाच विचार करत बसला. त्यामुळे शेतात थोडेंसुद्धा काम झाले नाही. सूर्य मावळत होता तेव्हां न्यायाधिकारी गांवाकडे परतत असल्याचे त्याने पाहिले. शेतकऱ्याच्या जिवांत जीव आला. पुन्हां तो धावत

२५ वर्षांपूर्वी चांदोबात प्रसिद्ध झालेली जुनी कथा

न्यायाधिकाऱ्याकडे गेला व आपल्या शेतावर येण्याची विनंती केली. न्यायाधिकाऱ्याला वाटले कांहीतरी संकट आलेले आहे. म्हणून तो शेतकऱ्याबरोबर शेतात गेला. तेवढयांत शेतकऱ्याचे मन परत बदलले. व तो न्यायाधिकाऱ्याला म्हणाला, ''असं सांगा की मी हे शेत, जे काल नांगरलंय ते चांगले, कीं आज नांगरलय, ते चांगले आहे?'' शेतकऱ्याचे डोके फिरले आहे, असे वाटून न्यायाधिकारी तिथून निघून गेला. शेतकरी परत विचार करं लागला, ''हे सगळे सोने मी त्याच्या हातांत कां सोपवले नाही? आता हे मी कुठे लपवूं? कसे लपवूं?'' तो अगदी चिंताग्रस्त झाला.



शेवटी सोने असलेले भांडे एका पोत्यांत घालून, ते आपल्या पाठीवर लादून शेतकरी घरी आला.

घरी आल्याआल्या शेतकऱ्याने आपल्या बायकोला सांगितले ''हे बघ, बैलांना बांधून त्यांना वैरण, पाणी लवकर दे. मला न्यायाधिकाऱ्यांकडे जायचे आहे.''

आपला नवरा पाठीवरील पोते खाली ठेवत नाही. हे पाहून शेतकऱ्याच्या बायकोने विचार केला की यांत नक्की कांहीतरी गुपित आहे. आणि ते काय आहे ते जाणून घ्यायचे तिने मनाशी ठरवले.

ती शेतकऱ्याला म्हणाली ''हे काय माझं काम आहे? तुम्हीच बैलांना बांधा. मी फक्त गाय नि शेळ्या मेंढयांना सांभाळते. नंतर तुम्हाला पाहिजे तिथे जा. आणि पाहिजे तेव्हां परत या''.

नाईलाजाने शेतकऱ्याने पोते खाली ठेवले व बैलांना बांधायला गेला. तेवढयांत शेतकऱ्याच्या बायकोने पोत्यातले तांब्याचे भांडे बाहेर काढले. ते मोहोरांनी भरलेले होते. तिने ते भांडे घेऊन एका जागी लपवून ठेवले. आणि एक जड दगड पोत्यात भरून ठेवला. तेवढयांत शेतकरी बैलांना बांधून, चारापाणी देऊन, परत आला.

पोतें पाठीवर टाकून तो सरळ न्यायाधिकाऱ्यांच्या घरी गेला. तो त्यांना म्हणाला ''महाराज मी आपल्यासाठी एक भेट आणली आहे.''

न्यायाधिकाऱ्याला वाटले कांहीतरी किंमती भेट असेल. म्हणून त्याने पोते उघडले तर आंत एक मोठा दगड होता. हे बघून न्यायाधिकाऱ्यांच्या बरोबर शेतकरी सुद्धा आश्चर्यचकित झाला. न्यायाधिकाऱ्याला वाटले शेतकऱ्याच्या अशा वागण्याचे निश्चित कांहीतरी खास कारण आहे.



त्याने शेतकऱ्याला एका कोठडीत बंद केले व आपल्या दोन नोकरांना सांगितले'' रात्रभर शेतकरी कायकाय बडबडतो, कसे वागतो, ह्यावर लक्ष ठेवा''.

शेतकरी रात्रभर कोठडीत बसून आपल्याशीच ''ओहो, एवढे मोठे भांडे, इतके उंच, एवढे सोने''. असे म्हणत हातवारे करत होता.

नोकरांनी शेतकऱ्याच्या हातवाऱ्याबद्दल न्यायाधिकाऱ्याला सांगितले. शेतकऱ्याला बोलावून न्यायाधिकारी त्याला म्हणाला'' अरे बाबा, रात्रीं तू तुझ्या हाताने कांहीतरी मोजत होतास. ते काय होते?'' शेतकऱ्याने धाडस करून सांगितले'', साहेब, मी आपलेच माप घेत होतो. साहेब हा म्हणत होता कीं आपले डोके एवढे लड्ड आहे. आपली मान लठ्ठ आहे, आणि आपले पोट केवढे उंच आहे.''

न्यायाधिकाऱ्याला शेतकऱ्याच्या बोलण्याचा खूप राग आला. त्याने आपल्या सेवकांना सांगितले, ''ह्या मूर्खाला ताबडतोब फांशी द्या''.

नोकर शेतकऱ्याला घेऊन गेले. फाशीच्या खांबाची व्यवस्था केली. खांबाला दोरखंड बांधून त्याचा विळखा शेतकऱ्याच्या गळयांत टाकणार तेवढयात तो म्हणाला ''थांबा, मला न्यायाधिकाऱ्यांना एक गोष्ट सांगायची आहे.''

नोकरांनी शेतकऱ्याला न्यायाधिकाऱ्याकडे नेऊन त्याला शेतकऱ्याची अंतिम इच्छा सांगितली

''बोल, तुला काय सांगायचे आहे?'' नायायधिकारी म्हणाले.

''साहेब, तुमचे नोकर माझ्या गळयांत फांशीचा दोर इतका घट्ट आवळून बांधत आहेत की मला श्वासच घेता येत नही. तो बंद होतो आहे.''

हे ऐकून न्यायाधिकाऱ्याची हंसून हंसून मुरकुंडी वळली. हंसत हंसत तो म्हणाला ''ह्या मूर्खाला सोडून द्या''.

मग काय, शेतकरी आपल्या घरी गेला. त्या सोन्याचा उपयोग करुन, बायको बरोबर आपले दिवस सुखांत घालवू लागला.





# विचित्र विजय

कपिशा नगरीत माधवशर्मा नांवाचा एक महापंडित होता. तो चांगला श्रीमंत होता. त्याला श्यामला नांवाची सुंदर मुलगी होती. तीदेखील आपल्या वडिलांप्रमाणेच बुद्धिमान होती.

श्यामला सुंदर तशीच बुद्धिमान असल्यामुळे, अनेक तरुण तिच्याशी विवाह करण्यास पुढे झाले. पण श्यामला त्या सगळ्यांना खूप प्रश्न विचारत असे. आणि बरोबर उत्तर मिळाले नाही, की नकार देत असे. ज्या तरुणाला तिच्या प्रश्नांची उत्तरे बरोबर देता येतील त्याच्याशींच ती विवाह करेल असा तिचा निश्चय होता.

त्याच गावात राधाकांत नांवाचा एक गरीब तरुण रहात असे. त्याचे वडील भिक्षा मागून उदरनिर्वाह करत असत. राधाकांत पण अगदी हुषार होता. त्याला ज्ञान मिळवण्याची आवड होती. म्हणून त्याने कित्येक गुरुंची सेवा करुन ज्ञान मिळवले. तरी देखील ज्ञानार्जनाची त्याची ओढ कांही कमी झाली नाही. त्याला अजून मोठ्या विद्वानांकडे जाऊन आणखी ज्ञान मिळवायचे होते. ह्याच्यासाठी त्याला पैशांची गरज होती.

माधवशर्माकडून थोडीफार पैशाची मदत मिळवावी ह्या विचाराने राधाकांत त्याच्या घरी गेला. त्याने ऐकले होते की माधवशर्माची मुलगी बुद्धिमान आहे आणि जो कोणी तिच्याशी विवाह करायला येतो त्यांना ती प्रश्न विचारत रहाते. तिची अशी पण अट आहे की, जो कोणी या प्रश्नांची समाधानकारक उत्तरें देईल त्याच्याशीच ती विवाह करेल. पण ह्याच्याशी त्याला कांहीच कर्तव्य नव्हते. तो फक्त पैसे मिळवण्यासाठी तिथे गेला होता.

श्यामलाला वाटले की हा तरुण पण विवाह करण्याच्या इच्छेनेच आला आहे. म्हणून तिने राधाकांतला विचारले, ''मला एक शंका आहे. मी खूप लोकांना विचारले पण कोणीही समाधानकारक उत्तर देऊं शकले नाही.''

''काय शंका आहे ? सांगा तरी !'' राधाकांत म्हणाला.

''ह्या लोकांत आणि परलोकांत कोण सुखी होऊं शकतं? आणि कोण दुःखी रहातं ?'' श्यामला म्हणाली.

''ह्या लोकांत किंवा परलोकांत संन्यासी सुखी होतो. त्यांना सांसारिक चिंता नसतात. ते कुठल्याही झाडाखाली झोपतात. जे मिळेल ते गोड मानून खातात. त्यांच्या मनांत कुठलीच इच्छा आशा नसते. त्यामुळे ते कधीच निराश होत नाहीत. अशा प्रकारे इहलोकांत सुखी जीवन जगून बंधनमुक्त होऊन ते परलोकांत जातात. त्यामुळे तिथेपण सुखी होतात.

इहलोकांत किंवा परलोकांत सुद्धां दुःखी होणारा मनुष्य भिकारी आहे. त्याचे इहलोकांतले आयुष्य अडी अडचणी सोडविण्यात जाते. तो उन्हांत राबतो, पावसांत भिजतो, थंडीत कुडकुडतो, त्याचा सारावेळ पोटा-पाण्याच्या चिंतेत जातो. तरी पोट भरत नाही. भीक मागणे त्याला आवडत नाही.

''परन्तु ह्याशिवाय त्याच्यासमोर दुसरा पर्याय नाही. सर्बवेळ स्वतःच्या पोटा-पाण्याच्या चिंतेत असल्यामुळे तो दुसऱ्याला कांहीच मदत करूं सकत नाही. त्यामुळे परलोकांत सुद्धा त्याला तिळमात्र सुख मिळत

पंचवीस वर्षापूर्वी चांदोबात प्रसिद्ध आलेली जुनी कथा



नाही." राधाकांतने उत्तर दिले.

राधाकांतच्या उत्तरावर खूष होऊन त्याच्याशी विवाह करण्याचे श्यामलाने ठरविले. पण राधाकांतला कांही विवाह करण्याची इच्छा नव्हती. तो माधवशर्माकडून पैसे मिळविण्याच्या इच्छेने आला होता. इतका वेळ श्यामलाशी बोलल्यावर त्याच्या मनांत आले की श्यामलाच्या मदतीने कांही पैसे मिळवता येतील.

म्हणून तो श्यामलाला म्हणाला" मी तुला एक प्रश्न विचारतो. ह्याचे उत्तर तुला आले नाही, तर आपल्या वडिलांकडून तू मला कांही आर्थिक सहाय्य मिळवून दिले पाहिजेस". श्यामलाने होकार दिला.

"इहलोकी सुख भोगून परलोकी दुःखी कोण होते? आणि इहलोकी कष्ट भोगून परलोकी कोण सुखी होते?" राधाकांतने विचारले.

विचार करून श्यामला म्हणाली "इहलोकांत सुख भोगून परलोकांत दुःख झेलणारी व्यक्ती, दुष्ट स्वभावाची असली पाहिजे. असा माणूस धनिक असून धन मिळविण्यासाठी सर्व तऱ्हेची पापें करतो. तो कित्येकांचे सुख हिरावतो. अशा तऱ्हेचे आयुष्य जगणारा परलोकी सुखी होत नाही. इहलोकी दुःखें झेलून परलोकांत सुखी होणारा माणूस योगी आहे. तो इहलोकांत सुखाचा त्याग करून परलोकांत सुखी होतो".

आपल्या प्रश्नाचे बरोबर उत्तर ऐकून राधाकांत निराश झाला. पण तेवढयांत माधवशर्मा तिथे येऊन म्हणाला, "मुला, तू माझ्या मुलीच्या प्रश्नाचे बरोबर उत्तर दिलेस. ती तुझ्याबरोबर विवाह करण्यास तयार आहे. जर तुझी संम्मती असेल तर मी तुमचा विवाह करूं इच्छितो".

हे ऐकून राधाकांत आश्चर्यचकित झाला. आपले काम कल्पनेच्या बाहेर सफल झालेले पाहून त्याला आनंद झाला. व त्याने श्यामलाशी विवाह करण्यास होकार दिला.



# चित्रशीर्षक स्पर्धा








**खालील चित्रांना जोडणारी छोटी नांवे किंवा वाक्यें तुम्ही जुळवाल कां?**

तुमची जोडनांवे एका पोस्टकार्डावर लिहून पुढील पत्त्यावर पाठवा.
चित्र परिचय प्रतियोगिता, चन्दामामा,
प्लॉट नं. ८२, (जुना नं. ९२), डिफेन्स ऑफिसर्स कॉलनी, ईकाडुतांगल, चेन्नई ६०० ०९७.
तुमचे पत्र या महिन्याच्या २० तारखेपर्यंत आमच्याकडे पोंचले पाहिजे. सर्वोत्तम शीर्षकास रु. १०० चे पारितोषिक दिले जाईल. व हा निर्णय पुढल्या अंकानंतरच्या अंकात जाहीर केला जाईल.

## अभिनंदन

*मार्च स्पर्धेतील विजेता आहेत*
श्री. सुधाकर दत्तात्रय महाजन,
११, राजेंद्र, गोखले रस्ता,
मुलुंड (पूर्व)
मुंबई - ४०० ०८९.

**विजयी शीर्षक**



वनात चिमुकली राणी
योगासनी गमे बालयोगिणी













## पांच वर्षांच्या मुलाची पन्नाशी उलटली

गेली पन्नास वर्षे 'डेनिस द मेनेस' हा व्रात्य मुलगा पांच वर्षांचाच राहिलेला आहे. मि. हेन्री 'हँक' केचॅम यांच्या कुंचल्यातून निर्माण झालेले 'डेनिस' हे सर्वाधिक लोकप्रिय विनोदवीर पात्र आहे. जगांतल्या असंख्य वृत्तपत्रांतून आणि मासिकांतून डेनिसची उपस्थिती असते. केचॅमचा स्वतःचाच मुलगा डेनिस ह्याच्यावरून त्यांना ही कल्पना सुचली. त्यांचा डेनिस जेव्हां पांच वर्षांचा होता तेव्हां त्यांची पत्नी रागाने नवऱ्याजवळ येऊन म्हणाली, ''तुझा मुलगा म्हणजे एक त्रास (मेनेस)



आहे!'' केचॅम त्यावेळीं चित्रपटासाठी चित्रें व व्यंगचित्रें काढीत असे. त्यांना (आता त्यांचे वय ८१ आहे) १९५१ मधें ही चित्रें तयार करण्याची त्यांना स्फूर्ति झाली. डेनिसला त्याचे जन्मदाते मिचेल पतीपत्नी, त्यांचे शेजारी विलसन, मित्र जोई, कुत्रा टफ या सगळ्यांना कॅन्सास राज्यांतल्या विचिटा या गांवी केचॅमनी स्थायिक बनवले. त्यांनी मनाशी ठरवले की याच्या खोडसाळपणाच्या लहानशा उंदराला, कधीं डोंगराएवढा वाढू द्यायचाच नाही. डेनिस हा खट्याळवीर आबालवृद्धांचा अतिशय आवडता मुलगा आहे.

## पटपट

गुजरातमधल्या शाळांतल्या मुलांना सध्यां इमारतीमधून बाहेर पडण्यासाठी खास शिक्षण दिले जाते आहे. तास संपल्याची किंवा मधल्या सुट्टीची जी घंटा असते त्यापेक्षां ही घंटा वेगळी वाजते. ही घंटा त्यांना 'घाई करूं नका, पण रांगेने चालत जाऊन शिक्षकां बरोबर मैदानांत जा' असे सांगते. या नव्या पद्धतीचा कांही दिवस सराव केल्यानंतर अहमदाबादमधें चांचणी घेताना पाहिले तर एका शाळेची हजारों मुलें एक मिनिटांतच शिक्षकांसह ओळीने बाहेर पडली.

## सहस्त्रकोटी लोकसंख्या

गतवर्षी १ मेला, आपल्या देशाची लोकसंख्या एक हजार कोटी या आंकड्याला पोंचवणारे बालक जन्माला आले. २००१च्या जनगणनेचा पहिला टप्पा २८ फेब्रुवारीच्या मध्यरात्रीं पूर्ण झाला. प्राथमिक गणनेवरुन जो निकाल महिनाभरानंतर जाहीर झाला त्यांत दहा महिन्यांतच आपली लोकसंख्या २७,०९५,२४७ या आंकड्याने वाढली आहे. त्या मोजणीनुसार १ मार्चला देशांत ५३१,२७७,०७८ पुरुष आहेत आणि ४९५,७२८,१६९ स्त्रिया आहेत. जगांत सर्वाधिक लोकसंख्या चीनमधे आहे आणि हजार कोटी लोकसंख्या असलेले भारत राष्ट्र दुसऱ्या क्रमांकावर आहे.

नागरिकांमधे साक्षरतेचे प्रमाण ६५.८३ टक्के आहे. त्यांत ७५.८५ टक्के पुरुष आणि ५४.१६ टक्के स्त्रिया साक्षर आहेत. केरळमधें साक्षरतेचे प्रमाण ९०.९५ टक्के आहे. दुसऱ्या क्रमांकावरच्या मिझोराम राज्यांत ८८.४९ टक्के लोक साक्षर आहेत. तिसरा क्रमांक लक्षद्वीपचा आहे. तिथले ८७.५२ टक्के लोक साक्षर आहेत.

९ ते २८ फेब्रुवारीपर्यंत, जनगणना करणाऱ्या १७,००० अधिकाऱ्यांनी, ५२०० गांवातल्या आणि ६४०,१०० खेड्यांतल्या मिळून २००० घरांना भेट दिली व जनगणना पूर्ण केली. लोकसंख्येची पहिली गणना १८७१ साली केली होती. २००१ सालीं केलेली ही

वेताळ कथा

# कौशिकाची तपस्या

दृढ निश्चयी विक्रमार्क पुन्हा झाडाजवळ गेला. प्रेत झाडावरुन खाली उतरवून त्याने खांद्यावर घेतले. आणि तो स्मशानाकडे जाऊं लागला. तेव्हां प्रेतातील वेताळ राजाला म्हणाला, ''राजा, सगळीकडे अंधारच अंधार आहे. तरी तू निर्भयपणे पुढे जात आहेस. तुझ्या मनोधैर्याचे करावे तेवढे कौतुक थोडेच आहे. हे स्मशान आहे. इथे भुतेंखेते, आणि भयानक जनावरे आहेत. कदाचित् ती तुझ्यावर अचानक हल्ला देखील करतील. तुला आपल्या जिवाची जरासुद्धा भीती वाटत नाही? तुझ्या या धाडसाचे मला अगदी आश्चर्य वाटते आहे. तुझ्या स्वार्थासाठी



कां? की दुसऱ्या कोणाचे भले करण्यासाठी हे काम करत आहेस? या विचाराने मला अगदी चैन पडत नाही. तुला तर माहीत आहे की मी तुझे भले इच्छितो. कांही दुर्घटना घडेल ह्याचीच मला भिती वाटते. जो मानव आपल्या ध्येयप्राप्तीसाठी कुठल्याही अडथळ्याचा सामना करतो त्याचे कौतुक केले पाहिजे. माझ्या दृष्टीने जो आपल्या ध्येयपूर्तीसाठी तन,मन,धन खर्चून प्रयत्न करतो, वेळप्रसंगी आपल्या जिवावर उदार होतो, असा मानव धन्य आहे. पण त्याचा आत्मबंधू वा गुरु त्याला मधेच जर म्हणाला की, "हे तुला शोभत नाही, तू हे बंद कर." आणि त्यांचे सांगणे ऐकून त्याने जर प्रयत्न सोडून दिले, तर माझ्या दृष्टीने तो कांही शहाणा ठरत नाही. फार पूर्वी कौशिकाने देखील दुसऱ्यांचे ऐकून अशी चूक केली. तू पण असा अविवेकी बनूं नयेस म्हणून तुला सावधान करण्यास, चूक करण्यापासून तुला वाचविण्यांसाठी, त्याची एक गोष्ट सांगतो. नीट लक्ष देऊन ऐक." असे म्हणून वेताळ गोष्ट सांगू लागला.

"फार पूर्वीची गोष्ट आहे. गुरुमुख नांवाच्या पंडिताच्या गुरुकुलांत कौशिक नांवाचा विद्यार्थी विद्याभ्यास करत होता. वयाच्या विसाव्या वर्षीच त्याने सर्व शास्त्रांचा अभ्यास केला होता. आणि त्यात तो पारंगत झाला. आता पुढे काय करावे हे त्याला कळेना. म्हणून त्याने आपले गुरु गुरुमुख यांना सल्ला विचारला. तेव्हां गुरु म्हणाले "मुला, तुझ्यांत अद्भुत, असामान्य, बुद्धिमत्ता आहे. पण एकाग्रतेचा अभाव आहे. म्हणून तू कांही दिवस तपस्या कर, म्हणजे भगवान प्रसन्न होऊन स्वतःच तुला पुढें काय करायचे ते सांगतील." कौशिक दंडकारण्यात पोचला. तिथे एका विशाल वटवृक्षाखाली बसून तपश्चर्येत गुंग झाला. त्याची तपश्चर्या खडतर होती. सकाळीं उठून सर्व दैनंदित व्यवहार आटोपून, कंदमुळे खाऊन तो तपश्चर्येस बसत असे. सूर्यास्तानंतर तो परत कंदमुळें खाऊन झोपत असे. अशा तऱ्हेने सात वर्षे त्याने तपस्या केली. तरी देखील देव प्रसन्न झाला नाही.

देशपर्यटन करत असलेल्या गुरुमुखांनी कौशिकाला त्या वटवृक्षाखाली पाहिले. कौशिकाने आपली दुःखभरी कहाणी गुरुला सांगितली.

"तपस्येसाठी एकाग्रतेची जरुर आहे. तुझ्या तपस्येत एकाग्रतेचा अभाव तर नाही ना?" गुरुमुखांनी विचारले.

"अजिबात नाही, गुरुवर्य." कौशिक म्हणाला.

"ठीक आहे. मी मणिपाल नांवाच्या राजाला



भेटायला जात आहे. तिथून परत आल्यावर तुझ्या समस्येवर उपाय व मार्ग सांगीन." असे सांगून गुरुमुख तेथून निघाले.

त्याचवेळी राजा मणिपालच्या समोर एक बिकट समस्या उभी राहिली. त्याचा अनुभवी कोषाधिकारी अचानक मरण पावल्यामुळे नवीन कोषाधिकाऱ्याची नेमणूक, हा एक गंभीर प्रश्न त्याच्या समोर उभा राहिला.

पहिला कोषाधिकारी खजिन्याच्या समोरच्याच घरात राहात होता. व बायको मुलांबरोबर आरामांत आपले आयुष्य घालवित होता. तो अगदी गाढ झोपेत कां असेना, आजूबाजूला काय चालले आहे, याचा त्याला बरोबर पत्ता लागत असे. ह्याचे कारण मनाची एकाग्रता. विराग, भोग आणि वेग या तिघांनी सांगितले की ते देखील एकाग्रचित्ती आहेत, तर त्यांना कोषाधिकारी बनवावे. त्यांच्या ह्या मागणीवर राजा कुठलाच निर्णय घेऊं शकत नव्हता.

त्या तिघांत विराग संगीत विद्वान होता. भोग महानभक्त होता. तर वेग मेहनती होता. तिघेही आपण विश्वासू आहेत असे सांगत होते. राजा याच विचारात गढलेला होता, की तिघांपैकी कोणाची निवड करावी? बरोबर त्याचवेळी गुरुमुख तिथे आले. राजा मणिपालने त्यांचे आदरातिथ्य केले. "आपण अगदी योग्यवेळी आला आहात. मला कांही उपाय सांगून ह्या संकटातून सोडवा." राजा म्हणाला.

गुरुमुखाने त्या तिघांना बोलावून सांगितले की "मी तुम्हा तिघांच्या एकाग्रतेची परिक्षा घेऊं



इच्छितो. दंडकारण्यात विशाल वटवृक्षाखाली माझा एका शिष्य तपस्या करीत आहे. त्याच्या तपस्येच्यावेळी विराग दोन तास गाणे गात राहील. एकाग्रतेने म्हटले तर दोन तासांत पंचवीसएक गाणीं गाता येतील. विराग जेव्हां तेथे गाणे गात असेल तेव्हां भोग शंकराच्या पूजेसाठी कांटेरी झाडांची फुलें तोडून आणेल. एकाग्रतेने काम केले तर दोन तासांत स्वतःला कांटे टोंचून न घेता, शंभरएक फुलें तोडून आणता येतील. अशाच तऱ्हेने वेगला पण तेथील वृक्षाची मुळें कुऱ्हाडीने तोडून पन्नास लांकडे जमवायची आहेत."

तिघांनी गुरुमुखाच्या ह्या अटी मान्य केल्या.

दुसऱ्याच दिवशी राजा त्याच्या परिवारांतील कांही सदस्य, गुरुमुख, आणि ते तिघे दंडकारण्यातील त्या वटवृक्षाजवळ जाऊन



पोचले. कौशिक डोळे मिटून ध्यानात मग्न होता. तिन्ही स्पर्धक आपापल्या कामाला लागले.

राजा मणिपाल गुरुमुखाला म्हणाला, "तुमच्या शिष्याची तपस्या फारच कठोर व अद्भुत आहे. सकाळपासून इतकी गडबड चालली आहे, पण त्याला त्याची कांही जाणीव नाही. तो तपस्येत मग्न आहे."

गुरुमुखाने हंसत म्हटले, "आपल्याला माझ्या शिष्याची परिक्षा घ्यायची नसून विराग, भोग आणि वेग यांच्या एकाग्रतेची परिक्षा घ्यायची आहे." असे म्हणून त्याने एका सैनिकास शिट्टी वाजवायला सांगितली. तरीसुद्धा कोणी मागे वळून बघितले नाही.

त्यांनी याकडे लक्षच दिले नाही. गुरुमुखाने सांगितल्याप्रमाणे कांही सैनिक या तिघांच्या चहूंबाजूंनी खड्गयुद्ध खेळू लागले. तरी ते तटस्थ राहिले. त्यानंतर एक सैनिक वाघा-सारखा डरकाळ्या फोडू लागला. पक्षांसारखा कलकलाट केला, व "पुरामुळे पाणी येत आहे", असे ओरडला. तरीपण त्या तिघांवर त्याचा कांही परिणाम झाला नाही.

दोन तास पूर्ण होईपर्यंत विरागने पंचवीस गाणी गायली. भोगने शंभर फुले तोडली. वेगने पन्नास लांकडे तोडली. "या तिघांनी आपापली कामे व्यवस्थित केली आहेत. आता आपण कृपया सांगा, ह्या तिघांमध्ये कोण योग्य आहे?" राजा मणिपालने गुरुमुखाला विचारले.

मंद हास्य करीत गुरुमुखाने तिघांना आपल्या जवळ बोलावले, आणि म्हणाला, "तुम्हा तिघांच्या एकाग्रतेची अजून एक वेगळी परिक्षा मी घेणार आहे. तुम्ही हे सांगा की ज्या वेळीं तुम्ही आपले काम करत होता, तेव्हां तुमच्या आजूबाजूला कोणत्या गोष्टी घडत होत्या? उत्तर बरोबर असेल पाहिजे."

पण विराग, भोग व वेग यांना त्यांच्या आजूबाजूस काय घडते आहे ह्या गोष्टीचा पत्ताच नव्हता. सैनिकाची शिट्टी, सैनिकांचे खड्गयुद्ध, पक्षांचा कलकलाट, याबद्दल त्यांना कांहीच ही माहीत नव्हते. विरागचे संपूर्ण लक्ष गाण्यांत, भोगचे फुलांत, तर वेगचे लांकडांत होते. त्यांची ही एकाग्रता पाहून स्वतः राजा देखील चकित झाला.

"या तिघांमध्ये कोण योग्य आहे याचा निर्णय बुद्धिबळावर घेता येत नाही. यासाठी आवश्यक ती तपशक्ती माझ्या शिष्यांत आहे." असे म्हणत त्याने कौशिकला दोनदा हांक मारली.



तरी कौशिक हलला नाही. अशा तऱ्हेने दहावेळा हांक मारुन शेवटी गुरुमुख गप्प झाला.

कौशिकची एकाग्रता पाहून राजा अवाक् झाला. त्याचे अभिनंदन करण्यास संध्या-काळपर्यन्त तो तेथेच थांबला. सूर्यास्त होताच कौशिकने डोळे उघडले.

"आमच्यामुळे तुझ्या तपस्येत व्यत्यय आला नाही ना?" गुरुमुख म्हणाला. कौशिक आनंदात डोके हलवत म्हणाला "गुरुवर्य, सकाळी मी तपस्या सुरु केली तेव्हां सिंहाने दोन हत्तींना पळवले. मग चार हरणें इथे चरत होती. नंतर एका माणसाने पंचवीस गाणीं म्हटली. एकाने कण्हत कांटे असलेली शंभर फुले तोडली. एकाने लांकडे तोडली. कोणी शिट्टी वाजवली. कांही खड्गयुद्ध करत होते. मी वाघाची डरकाळी, पक्षांचा कलकलाट, ऐकत होतो. मग आपण दहा वेळां मला हाक मारलीत. अशा माझी एकाग्रता भंग करणाऱ्या गोष्टी घडत होत्या. तरीही मी न हलता बोलता तपांत मग्न राहिलो. मला असं वाटतं, की आता माझ्या एकाग्रतेवर आपला विश्वास बसला असेल."

शिष्याच्या ह्या उत्तरावर गुरुमुख राजाला हंसत म्हणाला, "राजा, मला माहित आहे की तुम्ही चाणाक्ष आहात. विराग, भोग व वेगाच्या एकाग्रतेबरोबर माझ्या शिष्याच्या तपस्येबाबत पण आपण ऐकले. खजिन्याच्या समोरचे घर माझ्या शिष्याला द्या. आणि त्याला कोषाधिकारी पद द्या. एक पान जरी हलले तरी माझ्या शिष्याला ते कळेल व तो खजिन्याचे रक्षण करेल."

राजाने आपला होकार दिला. पण कौशिक निराश होऊन "गुरुवर्य" असे म्हणून पुढे कांही बोलणार एवढ्यांत त्याला अडवत गुरुमुख म्हणाला "मुला, माझी हार्दिक इच्छा आहे. की तू मणिपालच्या राजाचा कोषाधिकारी व्हावेस.



आपली योग्यता सिद्ध कर. गृहस्थाश्रम स्वीकारुन आनंदाने आयुष्य घालव. यामुळे तुझे आणि राज्याचे कल्याण होईल.'' असे बोलून तो आपल्या गुरुकुलांत जाण्यास निघाला.

ही गोष्ट सांगून वेताळ म्हणाला, ''राजा, गुरुमुखाने राजा मणिपालला जो सल्ला दिला, तो योग्य व विवेकी वाटत नाही. सर्व शास्त्रांत पारंगत, देवाच्या दर्शनासाठी कठोर तप करणाऱ्या कौशिकाला 'कोषाधिकारी हो', असे सांगणे योग्य आहे कां? तसेच पक्की एकाग्रता असणारे विराग, भोग व वेग ह्यांच्यावर त्याने अन्याय केला. मी. तर म्हणेन त्याने त्यांचा अपमान केला. त्याने पक्षपात केला. राजाला चाणाक्ष म्हणून, त्याचे लांगूलचालन करुन, त्याने आपले काम साधले. ह्या सगळ्याचा अर्थ काय? माझ्या या शंकांची उत्तरे माहित असून जर तू गप्प राहिलास तर तुझ्या डोक्याची शंभर शकले होतील.''

विक्रमार्क म्हणाला, ''जर कोणालाही आपल्या कामात सर्वोच्च पदास पोचायचे असेल तर त्यासाठी एकाग्रतेची अत्यंत जरुर आहे. त्यासाठी फक्त बुद्धिमान असणे पुरेसे नाही. हे विराग, भोग व वेगवरुन सिद्ध होते. पण तप करुन महानकार्य करुं इच्छिणाऱ्या कौशिकात या एकाग्रतेचा अभाव आहे. कुठलाही विषय चांगला समजणे वेगळे, आणि आपल्या कार्यसिद्धी साठी ते प्रत्यक्ष आचरणांत आणणें या दोन वेगळ्या गोष्टी आहेत.

कौशिकमध्ये हा गुण किंवा असे कौशल्य नाही. त्याचमुळें तपस्येत मग्न असूनसुद्धां त्याचे लक्ष इकडे तिकडे होणाऱ्या छोट्या गोष्टींकडे जाते. या गोष्टी त्याच्या लक्षांत रहातात. अशीच व्यक्ती कोषाधिकारी होण्यास लायक आहे. ज्या तिघांनी या पदाची अशा केली, ते मोठे एकाग्रचित्ती होते. पण त्यांचे सामर्थ्य तितकेच मर्यादित आहे. म्हणून ते या पदासाठी अगदी अयोग्य आहेत.

गुरुमुखाला माहित होते की त्याने राजाला जे कांही थोडेफार सांगितले आहे, ते राजाला समजेल. त्याचा मतितार्थ त्याला कळेल. म्हणून गुरुमुखाने राजाला चाणाक्ष म्हणून त्याचे कौतुक केले.''

अशा तऱ्हेने राजाचा मौनभंग झाल्यामुळे वेताळ प्रेतासह अदृश्य होऊन झाडावर जाऊन बसला.

**आधार ''वसुंधरा'' यांची गोष्ट**







# यक्ष पर्वत

## 5

*(खड्गवर्मा आणि जीवदन्ताने सिंहाला आणखी एका पडक्या घराकडे हाकलले आणि त्या घरांतून बाहेर पडण्याचा रस्ता ते शोधूं लागले. खोलींत पडलेली धान्याची पोती त्यांना दिसली. त्यांनी त्याला आग लावली. तेवढ्यांत त्यांना शेजारच्या खोलीतून कोणाचेतरी ओरडणे ऐकूं आले. तिथे जाऊन पाहिले तर त्या छोट्या खोलीत एक म्हातारा बंदी होता.)*

खड्गवर्मा व जीवदन्ताला पाहून त्याने विचारले, ''तुम्ही कोण आहात? तुम्ही त्या चोर पुजारिणीचे शिष्य आहात असे तर वाटत नाही. तुम्ही कोणीही असा, पण माझे रक्षण करा. शेजारच्या खोलीत धान्य जळत आहे. त्यामुळे धगीने भिंत गरम झाली आहे आणि माझे अंग भाजत आहे.''

''थोड्याच वेळांत खोलीचे छत खाली कोसळणार आहे'' असं म्हणत जीवदन्त म्हाताऱ्याजवळ आला. त्याने आपल्या हातांतील दंडाने म्हाताऱ्याच्या हातांतील बेड्या तोडल्या. व तो त्याला बाहेर घेऊन आला.

वृद्धाने आतुरतेने चारी बाजूला बघितले. ''बऱ्याच काळानंतर मी स्वतंत्र झालो आहे. अजूनही ती चोर पुजारीण ह्या पुराण्या नगरांवर राज्य करते आहे कां? तुम्ही कोण आहात? हे तर तुम्ही सांगितलेच नाही.''

जीवदन्त वृद्धाचे बोलणे मधेंच थांबवत म्हणाला ''तुझ्या जीवनाची कहाणी ऐकायला आत्ता आमच्याकडे वेळ नाही. आम्हाला त्या पुजारिणीच्या हृदयापासून बचाव करुन जंगलात जायचे आहे. तुला इथेच थांबायचे



आहे की आमच्या बरोबर जंगलात येणार आहेस, ते आधी ठरव.''

वृद्ध मांत्रिक क्षणभर गप्प बसला. व मग बोलूं लागला. ''त्या चोर पुजारिणीचा वध करुन बदला घेतल्याशिवाय कुठल्याही परिस्थितींत मी येथून हलणार नाही. माझी अशी दयनीय अवस्था पाहून माझे शिष्य मला नक्की मदत करतील. त्यांच्या मदतीने त्या नीच पुजारिणीचे तुकडे तुकडे करुन गिधाडांना खायला घालीन तेव्हांच मी शांत होईन.''

जीवदन्त त्या वृद्धाला कांही म्हणणार एवढ्यांत पुजारीण, मांत्रिक व जटाभूत एकदम तिथे येऊन धडकले. वृद्धाला बघून खोखो हंसत पुजारीण म्हणाली, ''वा, हा म्हातारा लांडगा काळकोठडीतून बाहेर आला कां? आता ह्या सगळ्यांना पकडून त्यांचा महाभूताला बळी देईन.'' असे म्हणत पुजारीण पुढे येऊं लागली. ताबडतोब धनुष्याला बाण लावून पुजारिणीवर नेम धरत खड्गवर्मा म्हणूं लागला, ''ए पुजारिणी, एक पाऊल पुढे टाकशील तर बघ. हा बाण तुझे धड मस्तकापासून वेगळे करेल. खबरदार!''

पुजारिणीच्या एका शिष्याने हातांतले त्रिशूळ जोराने हलवीत म्हटले ''हे महाशक्ती पुजारिणी, ह्या म्हाताऱ्या पुजाऱ्याला व या दोघां तरुणांना आपल्या मंत्रशक्तीने भस्मसात कर.''

''नाही, मी ह्यांना इतक्या सहजपणे भस्मसात करणार नाही. ह्या तिघांना नेऊन महाभूताच्या पायाशी बळी देणार आहे.'' असे म्हणत शेजारी उभ्या असलेल्या मांत्रिकाला व जटाभूताला पुजारीण म्हणाली ''अरे, नुसते आ वासून उभे काय राहिलात? पकडा त्यांना.''

तिच्या बोलण्यावर हंसत जीवदन्त म्हणाला, ''ए भुता, हे पण कळत नाही कीं तू भूत आहेस की लावसट? उभे कशाला राहिलात? आम्हाला पकडा तर, मग बघा काय होते.''

जटाभूत घाबरत मांत्रिकाला म्हणाले ''गुरु, ह्या दोघांना मी पकडून गिळून टाकूं?''

''शिष्या, असे करुं नकोस. महापुजारिणीने आपल्याला त्यांना जिवंत पकडायची आज्ञा दिली आहे. घाई करुन आपण कांहीचेबाही केले म्हणजे?'' मांत्रिक म्हणाला.

तेव्हां वृद्ध पुजारी उच्च स्वरांत म्हणाला, ''आता त्या गुरुद्रोहिणीकडे कांही मंत्रशक्तीच



उरलेली नाही. तिच्या साऱ्या मंत्रशक्ती मी हरण केल्या आहेत.''

''हे धादांत खोटे आहे. या म्हाताऱ्या लांडग्याच्या बोलण्यावर विश्वास ठेवूं नका.'' असे म्हणत ती म्हाताऱ्या पुजाऱ्याकडे जाऊं लागली.

'थांब', असे म्हणत खड्गवर्माने तिच्या हातावर बाण मारला. बाण लागल्याने तिच्या हातातला दंड गळून खाली पडला. हे पाहून तिथे असलेले दोन शिष्य ओरडायला लागले, ''पुजारिणीची मंत्रशक्ती संपली. आता हे वृद्ध पुजारीच आमचे गुरु आहेत.''

इतक्यांत आणखी शिष्य तेथे आले. वृद्ध पुजारी खूष होत म्हणाला ''वा, महाभूता, कित्येक वर्षांनंतर माझ्या शिष्यांना सत्याची जाणीव झाली. आणि तू त्यांना अंधःकारातून प्रकाशांत आणलेस. पूर्वी प्रमाणे भविष्यांत पण मी तुला प्राण्यांचे बळी देईन.'' दाढीवर हात फिरवित त्याने आपले दोन्ही हात वर उचलले.

आपले डोळे बारीक करुन वृद्ध मांत्रिकाला न्याहाळत जीवदन्त खड्गवर्माला म्हणाला, ''खड्ग, हा वृद्ध मांत्रिक पण पुजारिणीसारखाच क्रूर व दुष्ट दिसतो आहे.'' मग तेथे जमलेल्या शिष्यांना तो म्हणाला, ''तुमच्या आपसांतल्या गोष्टींत आम्ही लक्ष घालूं इच्छित नाही. तुम्हीच आपला निर्णय घ्या.''

एवढ्यांत वृद्ध पुजाऱ्याच्या पक्षांतील शिष्य



व पुजारिणीचे शिष्य दंगा करत आपापसांत मारामारी करुं लागले. हे दृश्य बघून खड्गवर्मा म्हणाला, ''जीव, ह्या लढाईत दोन्ही चोर, मांत्रिक व त्याचे शिष्य कदाचित् मरतील.''

''मेले तर मरुं देत. ह्या पडक्या घरांत बसलेल्या सिंहाला कांही दिवस तरी खायला मिळेल.'' जीवदन्त म्हणाला.

ह्यानंतर आपली तलवार परजत खड्गवर्मा म्हणाला ''अरे मांत्रिका, तुझ्या जटाभूताला आम्हाला इथून बाहेर जाण्याचा रस्ता दाखवायला सांग.''

''अवश्य'' असे म्हणत मांत्रिक पुढे झाला. आधीच्या रात्रीं पडक्या नगरांतून ज्या भुयारांतून ते आले होते त्याच भुयारांतून जात ते गुहेच्या तोंडाशी येऊन पोचले.



गुहेंतून खाली आल्यावर चहूंबाजूला न्याहाळत ते मांत्रिकाला म्हणाले "आता तुम्ही सगळेजण पुरातन नगरात परत जा. आणि भक्तीपूर्वक महाभूताची आराधना करा."

"हे वीरांनो, तुम्ही चांगली गोष्ट सांगितलीत. आम्ही हाच जन्म काय, पुढचा जन्म देखील महाभुताच्या आराधनेत घालवूं. आम्हा प्राण्यांना ह्यापेक्षां अजून काय हवे?" असे म्हणत मांत्रिक व जटाभूत तेथून निघाले.

एवढ्यांत तेथे गडबड होऊं लागली. उंटावर बसलेला एक स्वार घसरुन गडगडत खाली येऊं लागला. खड्गवर्मा व जीवदन्त पळत तिकडे गेले. उंटाचे पाय तुटले होते आणि वेदनेने तो तडफडत होता. त्यावर स्वार झालेला माणूस पण जखमी होऊन कण्हत होता. त्याचा वेष बघून खड्गवर्मा व जीवदन्ताने ओळखले की हा लुटारुंच्यातील एक आहे.

जीवदन्त त्या चोराजवळ येऊन म्हणाला "अरे चोरा, तू तर मोठा भाग्यवान दिसतोस. इतक्या उंचावरुन पडून देखील सहीसलामत आहेस. उंट मरणाच्या दारांत आहे. पण बा, तुला कांही झाले नाही."

चोर भीतीने कापत म्हणाला "साहेब, मला मारुं नका. गण्डकमृग जमातवाल्यांची पिकें चोरणाऱ्यांतला मी नाही. स्वर्णाचारीला विचारल्यावर माझ्या बोलण्यावर आपला विश्वास बसेल."

त्याचे बोलणे ऐकून खड्गवर्मा व जीवदन्त आश्चर्यचकित झाले. आता त्यांना कळले की स्वर्णाचारी जीवंत आहे व चोरांच्या बरोबर आहे.

तलवार परजत खड्गवर्माने त्याला विचारले "गण्डकमृग जमातवाल्यांची पिकें चोरणाऱ्यांतला जर तू नाहीस, तर तुला कसे कळले की आम्ही त्यांच्या बाजूचे आहोत?"

"जंगलात भेटलेल्या मित्रांनी मला आपल्याबद्दल माहिती दिली. तुमचे कपडे, हत्यारे बघताच मी आपल्याला ओळखले. माझ्या बोलण्यावर विश्वास ठेवा." आपल्या डोक्यावर हात ठेवून शपथ घेत तो म्हणाला.

"बा, तू तर अगदी चलाख आणि हुषार दिसतोस. एक गुरुकुल स्थापन करुन विद्यार्थ्यांना शिक्षण तरी द्यायचे होतेस. चोरांच्या टोळीत



कशाला आलास? ते दगडधोंडे उंटावर लादून कशाला आणि कोठे नेत होता?" खड्गवर्माने विचारले.

"महाशय, आमचे सरदार राजधानी व एक किल्ला बांधत आहेत. ह्या साठी आवश्यक असा आराखडा स्वर्णाचारीने बनविला आहे. त्यांच्याच आज्ञेप्रमाणे हे दगडधोंडे त्या जागी नेत आहोत." चोर म्हणाला.

जेव्हां हे तिघे बोलण्यात गर्क होते तेव्हां डोंगरावरल्या दोघा तिघांनी त्यांना ओळखले व ही गोष्ट स्वर्णाचारीला सांगितली. स्वर्णाचारीच्या आनंदाला पारावार उरला नाही. तो चार चोरांबरोबर खाली येऊन पोचला. जीवदन्ताने हंसत हंसत त्याची पाठ थोपटली व म्हणाला, "स्वर्णाचारी, ठीक आहेस ना? असं वाटतं की हळूंहळूं तू ह्या चोरांचा नेता बनला आहेस."

हे बोलणे ऐकून तो थोडावेळ आश्चर्याने गप्पच बसला. मग स्वतःला सावरत तो म्हणाला, "माफ करा पण निरुपायाने मी ह्यांचा सरदार समरबाहूसाठी एक किल्ला बांधत आहे. पण बांधकाम पूर्ण झाल्यावर वास्तुशास्त्रानुसार मी व विघ्नेश्वरपुजारी कोठे तरी जाऊन तपश्चर्या करुं."

"चांगला विचार आहे. पण गण्डकमृग जमातीबरोबर राहून आपले आयुष्य आरामांत घालविणारा पुजारी, तुझ्याबरोबर तप करेल? मला हे शक्य होईल असे वाटत नाही."



जीवदन्ताने आपली शंका विचारली.

"ते सगळे देवाच्या इच्छेवर अवलंबून आहे. चला, माझ्या घरी जाऊं. तिथे भोजन करुन विश्रांती घ्या." स्वर्णाचारीने विनंती केली.

डोंगर चढून ते स्वर्णाचारीच्या घरी पोचतच होते. तेवढ्यात त्यांनी पाहिले की, अस्वलाचे कातडे पांघरलेल्या एका माणसाला चोहीकडून धरुन चोर आवाज करत होते, त्रास देत होते आणि आपसांत कुजबुजत होते. स्वर्णाचारीने त्यांना विचारले "ही काय भानगड आहे? आणि अस्वलाचे कातडे पांघरलेला हा माणूस कोण आहे?"

अस्वलाचे कातडे पांघरलेल्या माणसाने स्वर्णाचारीला वाकून नमस्कार केला व म्हणाला "स्वर्णाचारीजी, मी जाणुनबुजून हे

कातडे पांघरलेले नाही. आज सकाळी सरदार शिकारीस जंगलात गेले होते. अचानक आमच्यावर हल्ला झाला. कांही जंगली लोक सरदारांना पकडून घेऊन गेले. मी कसातरी पळून निघून आलो.''

''जंगलींनी चोरांच्या सरदारला अमरसिंहाला पकडून नेले? त्यांचे एवढे धाडस! ते जंगली कुठे रहातात? कुठे आहे ती जागा?'' हंसत खड्गवर्मा म्हणाला.

जीवदन्त म्हणाला ''खड्ग, हसूं नकोस. सरदार तर दुष्ट आहेच. पण त्याहीपेक्षा दुष्ट लोकांनी त्याला बंदी बनवले आहे. ही विचार करण्यासारखी गोष्ट आहे. हंसण्यासारखी नाही!''

ही खबर ऐकून स्वर्णाचारी आश्चर्यचकित झाला. त्याच्या शरीरांतून भीतीची एक लहर उठली.

प्रथम ह्या सरदाराने त्याला बंदी बनवले. पण नंतर त्याने व त्याच्या टोळीने स्वर्णाचारीला आदराने वागविले. व समरबाहू आणि त्याची चांगली मैत्री झाली.

''देवा खड्ग आणि जीवदन्ता, मी मोठ्या संकटात सापडलो आहे. तुम्ही दोघे महाशक्तीशाली आहात. त्या जंगली लोकांपासून तुम्हीच सरदाराचे रक्षण करुं शकता.'' स्वर्णाचारीने असहायपणे विनंती केली.

जीव आणि खड्गाने एकमेकांकडे पाहिले. मग खड्ग आपले डोके नकारात्मक हलवित म्हणाला ''जीव, आपण कशी मदत करावी, यांवर तूच मार्ग काढ. आपला मित्र स्वर्णाचारीची विनंती आपण मान्य करायची की नाही हे तुझ्या निर्णयावर अवलंबून आहे.''

जीवदन्ताने क्षणभर विचार करुन अस्वलाचे कातडे पांघरलेल्या चोराला विचारले, ''तुमच्या सरदाराला ते जंगली कसे पकडू शकले? तिथे काय घडले ते सविस्तरपणे सांग.''

आपला गळा खाकरुन तो चोर बोलू लागला. ''जंगलात जे कांही घडले ते मी आपल्याला थोडक्यात सांगतो. कारण आपण आमच्या सरदारांना लौकर सोडविले नाही तर ते जंगली नरभक्षक आमच्या सरदारांना खाऊन टाकतील.''

(क्रमशः)




# मूर्ख पंडित

एका गांवात एक डिंगमार पंडित रहात होता. आपल्या हुशारीबद्दल गांवभर तो लोकांपाशी बढाया मारत असे.

एक दिवस एका हुशार गृहस्थाने या पंडिताला सांगितलं, ''महाशय, तुमच्या हुशारीबद्दल माहिती नसणारा एकही मनुष्य आपल्या या गांवात नाही. पण या गांवात तुमच्या हुशारीची कुणालाच कदर नाही, किंमत नाही. तुम्ही निरनिराळ्या गांवांत जा आणि तिथल्या पंडितांना हरवा. म्हणजे साऱ्या देशांत तुमच्या हुशारीची प्रशंसा होईल आणि आपल्या गांवाचं नांवही उज्वल होईल.''

हा सल्ला पंडिताला पटला, एका चांगल्या शुभ दिवशी शुभ मुहूर्त पाहून तो गांवातून बाहेर पडला. जेव्हां तो दुसऱ्या गांवाजवळून जात होता, तेव्हां गांवाबाहेर एक कुंभार त्याला दिसला. पंडिताने कुंभाराला विचारले, ''हे बघ भाऊ, तुमच्या गांवात कुणी एखादा पंडित आहे कां? असलाच तर मला त्याला हरवायचं आहे. तुला माहीत आहे कां? मी एक फार मोठा पंडित आहे.''

हा पंडित फुशारकी मारतोय हे कुंभाराला लागलीच समजलं. त्याने चटकन खालीं वाकून जमिनीवरची एक मूठभर माती घेतली आणि पंडिताला विचारलं, ''सांगा पाहूं, माझ्या हातांत किती माती आहे ती?''

पंडित रागावून बोलला, ''कसला बाष्कळ प्रश्न विचारतो आहेस रे तूं? तुझ्या हातांतली माती कांही मी तोलून बघितलीय की मापून पाहिलीय? आं?'' ''पंडितजी, मुठींत मूठभरच माती आहे! एवढंसुद्धां तुम्हाला सांगता येईना, असले कसले पंडित तुम्ही?'' कुंभाराने पंडिताची खिल्ली उडवली.

अपमानित होऊन पंडित घरीं परतला. तेव्हांपासून त्याने बढाया मारणें सोडून दिले.



# भारताची गाथा

एका महान परंपरेची झलक - युगायुगातील सत्याचा शोध

## १६. अहंकारावर विजय मिंळविणारा राजा



''हरिश्चंद्राची गोष्ट खरोखरच एका जागी खिळवून ठेवणारी होती. ती ऐकल्यानंतर इथून उठावेसेच वाटत नाही.'' संदीप म्हणाला.

''मग तुम्ही इथेच बसा. मी निघालो.'' असे म्हणत देवनाथ उभे राहिले. मुले पण हंसत उभी राहिली.

''नदीकिनाऱ्यावर चक्कर मारुया कां?'' देवनाथांनी विचारले.

''जरुर'' असे म्हणून मुले पण त्यांच्या मागे मागे जाऊं लागली. थोडे दूर गेल्यानंतर एका बाकावर बसत देवनाथ म्हणाले'' मी थोडावेळ इथे बसतो. तुम्ही थोडावेळ हिंडून फिरुन या.''

''तुम्ही उठला तेव्हां आम्ही उठलो. तुम्ही निघाला तेव्हां आम्ही तुमच्या मागे मागे आलो. आता तुम्ही इथे बसला आहात तर आम्ही पण इथेच बसणार. आम्ही तुमचे शिष्य आहोत ना?'' संदीप म्हणाला. सगळी मुलें हंसत हंसत बाकावर बसली.

''पूर्णचंद्राचा उदय, झुळझुळ वाहणारी नदी, थंड वारा, आणि ऐकण्यास मोह पाडणारे आजोबा. वा! काय बहारदार वातावरण आहे.'' श्यामला मंद हंसत म्हणाली. ''आपला पुराणकालीन इतिहास, त्याची माहिती करुन घ्यायची आमची तीव्र इच्छा आहे. आमचे शिक्षक आपल्या देशावर झालेल्या अतिक्रमण, हल्ले व त्यामुळे झालेले परिणाम, ह्याचीच माहिती देतात. ज्या गोष्टी आपण सांगता त्या गोष्टी ते कां नाही सांगत?'' संदीपच्या मित्राने आपली शंका विचारली.

विश्वावसु

''ही आपल्या शिक्षकांची चूक आहे. इंग्रजांनी जो इतिहास आपल्या पाठ्यपुस्तकात नेमला, त्यांतच थोडाफार बदल करुन आज इतिहास शिकवला जातो. त्यांनी आपल्या इतिहासाला असे रुप दिले की त्यांचा शासनकाल हेच भारताचे सुवर्णयुग होते. त्यांनी स्वत:च्या प्रसिद्धीसाठी हे केले आणि ते स्वाभाविक आहे. त्यामुळे त्यांनी प्राचीन काळातील घडलेल्या महान घटनांकडे दुर्लक्ष केले. आणि प्रसिद्ध व्यक्तींविषयी उदासीनता दाखविली. त्यांनी हे सगळे पुराण आहे म्हणून टाळले, पण त्यांचे हे म्हणणे खरे नाही. आपली पुराणे बहुतांशी ऐतिहासिक घटनांवर आधारित आहेत. पण आपल्याला हा विषय वेगळ्या दृष्टिकोनांतून पण पाहिला पाहिजे. एखादे व्यक्तिमत्व, भलेही काल्पनिक हो, पण जर जनमानसांवर पिढ्यानपिढ्या आपला प्रभाव पाडत आहे, त्याला सत्यच मानायला हवे ना? हे व्यक्तिमत्व जिवंत माणसांपेक्षाही महान आणि उदात्त आहे. होय ना? युगानुयुगे ज्या व्यक्तिंनी व घटनांनी लोकांच्या हृदयावर राज्य केले, त्या लोकांचा इतिहास आपण जाणणे अतिशय जरुरीचे व अनिवार्य आहे.'' देवनाथ म्हणाले.

''सत्तेवर असूनसुद्धा हरिश्चंद्राने विनयपूर्वक राज्य केले. कर्तव्य आणि धर्मनिष्ठेने आपल्या जबाबदाऱ्या सांभाळल्या. जर अजून असे काही राजे असतील तर कृपया त्यांच्याबद्दल आम्हाला सांगा'' श्यामला म्हणाली.

सत्तेच्या आहारी जाऊन अरेरावी करणारे राजे खूप होते. पण आपल्या दुरहंकारावर विजय मिळविणारे राजे फारच कमी. जनक हा त्यांतलाच एक राजा होय.

प्रजेचे कल्याण हे त्यांचे ध्येय होते. त्यांनी स्वत:ला देवाचा दूत समजून राज्यकारभार केला.



आपली कर्तव्ये चांगल्या तऱ्हेने पूर्ण केली. अशा सुशील व सद्गुणी राजांपैकी ते एक होते.'' देवनाथांनी सांगितले.

''अहंकाररहित जगणे इतके अवघड आहे का आजोबा?'' श्यामलाची मैत्रिण सुस्मिताने विचारले.''

''हो मुली, फारच कठीण आहे. दुसऱ्या राजांवर विजय मिळविण्यापेक्षांही अवघड आहे. अहंकारावर विजय मिळविणारे सत्यव्रती राजे पुष्कळ होते. आपण त्यांच्याबद्दल दीर्घकाळांपासून बोलत, ऐकत आलो आहोत. उदाहरणार्थ जनश्रुती महाराज. ते एक आदर्श राजा होते. जनतेच्या क्षेमकुशलतेची चौकशी करुनच मग ते झोपण्यास जात असत. अशा तऱ्हेने देवनाथ त्यांची गोष्ट सांगू लागले.

''ही हजारो वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. आजच्या सारखाच तोही पौर्णिमेचा दिवस होता. भोजन करुन महालाच्या गच्चीवरती महाराज इकडे तिकडे टेहळणी



करीत होते. तेव्हां काही हंसपक्षी आपसांत बोलत उडत जात होते. जनश्रुती महाराजांना हंसांची भाषा कळत होती, त्यामुळे ते त्यांचे बोलणे लक्ष देऊन ऐकूं लागले. ''या राजाच्या महालातून एक वेगळाच उजेड दिसत आहे. हा कांही सामान्य उजेड नाही. हा दिव्य प्रकाश आहे. हे काय असेल बरं?'' एका हंसाने दुसऱ्या हंसाला विचारले.

''हो, हा नक्कीच दिव्य प्रकाश आहे. ह्या अगोदर मी असा दिव्य प्रकाश एकदा पाहिला होता. कुठे बघितला होता ते आठवत नाही. हं, आता आठवले की पूर्वी रैत्व महाराजांच्या महालात असाच दिव्य प्रकाश बघितला होता. तो तर याहीपेक्षा मोठा व दिव्य प्रकाश होता.'' दुसरा हंस म्हणाला.

नंतर हंस दिसेनासे झाले. ह्या गोष्टी ऐकून नंतर जनश्रुती महाराजांनी काय केले माहित आहे? हे ऐकून त्यांना फार आनंद झाला, की असा माणूस देखील आहे जो त्यांच्यापेक्षा श्रेष्ठ आहे. या आनंदात ते झोपीं गेले.

कांही दिवसांनंतर त्यांना रैत्व महाराजांबद्दल आणखी माहिती कळली. ते स्वतः त्यांना जाऊन भेटले. रैत्व तरुण होते. म्हणून त्यांनी आपल्या मुलीचे लग्न त्यांच्याशी केले. नंतर आपले राज्य रैत्वांवर सोपवून, वानप्रस्थाश्रमाचा स्वीकार करुन जंगलात निघून गेले.''

''याचा अर्थ असा झाला की राजा नीति-नियम व सत्याला सगळ्यात जास्त मानत होते. आणि त्यांच्या दृष्टीने ते अनमोल होते.'' राम म्हणाला.

''हो. एवढेच नव्हे तर कांही राजे असे पण होते की जे मोठ्यांचा राग ओढवून घेत असत पण सत्य बोलण्यास कचरत नसत. ह्यासाठी हरितस्व हे एक उदाहरण आहे.'' देवनाथ म्हणाले.''

''मग तर त्यांची गोष्ट सांगाच ना!'' श्यामलाने हट्ट केला. देवनाथ मग हरितस्वांच्या बद्दल बोलू लागले. ''हरितस्व हे फक्त समर्थ व कुशल शासकच नव्हते. तर ते एक अद्भुत गायक पण होते. त्यांच्या तोलाचा गायक कदाचित् त्या काळात नसेलही. एक दिवस ते आपल्या बागेत बसून गात असतांना, नारदमुनी तेथे आले. त्या गाण्यामध्ये ते अगदी रंगून गेले. त्यांनी ही गोष्ट ब्रह्मदेव व सरस्वतीला सांगितली. त्यांनापण हरितस्वांचे गाणे ऐकण्याची इच्छा झाली. नारदांनी त्यासाठी लागणारी व्यवस्था केली. राजा ब्रह्मलोकी गेले. ब्रह्मदेव त्यांना म्हणाले ''महाविष्णु लोकांच्या रक्षणाच्या कामांत सदैव गुंतलेले असतात. त्यामुळे त्यांना नीट झोप येत नाही. आपल्या गायनाने आपण त्यांना शांत झोपवूं शकाल कां?''

''देवा, मी प्रयत्न करीन.'' राजा विनयाने म्हणाला. राजाचे मधुर गायन तन्मयतेने ऐकत महाविष्णु निद्रिस्त झाले. त्यांच्या सफलतेवर खुष होत ब्रह्मदेव म्हणाले ''राजा, तुझी प्रतिभा असामान्य, अमोल आहे. कांही वर हवा असेल तर माग.''

''संगीताचा मूळपुरुष परमेश्वर आहे. त्यांचे गायन ऐकण्याची मला तीव्र इच्छा आहे. हीच माझी एकमेव आवड आहे. माझी मागणी कांही चुकीची असेल तर क्षमा करा.'' राजा हरितस्व म्हणाले.

ब्रह्मदेवाने त्यांच्या मागणीचा स्वीकार केला. शंकरांनी पण आपला होकार दिला. श्रीशंकरांचे गाणे ऐकण्यास सर्व देव जमले. शंकराने शंकराभरण राग आळविला. देवदेवता प्रसन्न झाले. गायन संपल्यावर हरितस्व न हलता बोलता तसेच बसून राहिले.

ब्रह्मदेवाने हाक मारताच ते दचकून म्हणाले ''गायन अजून चालेल असे वाटले. इतक्या लवकर संपले?'' त्यांच्या बोलण्यास आश्चर्य होते.

''तुम्हाला असं कसं वाटले की गायन अजून चालेल म्हणून?'' ब्रह्मदेवाने विचारले.

''शंकराभरण आळवितांना गायकाने समाधानाने, शांतचित्ताने गायले पाहिजे. पण....'' असं म्हणून ते थांबले.

त्यांच्या ह्या बोलण्याचे सगळ्यांना आश्चर्य वाटले. की राजाचे म्हणणे असे तर नव्हते ना, की शंकरांनी शांत चित्ताने गायन केले नाही.

शंकरांनी आपला तिसरा डोळा उघडला. सर्वांना वाटले, आता रागावलेले शंकर कुठल्याही क्षणी हरितस्वांना भस्मसात करतील. पण असे घडले नाही. शंकर राजाच्या सत्यवचनावर आणि धाडसावर खुष झाले. त्यांच्यावर दया दाखविली. मंद हंसत राजाने शंकरांना साष्टांग नमस्कार केला.

''ब्रह्माच्या आज्ञेनुसार मी हा राग आळवीत होतो तो सुद्धा एका मानवासाठी. मला क्षणभर अशी शंका आली की माझ्या गायनाचा आस्वाद घेण्याइतकी या मानवाची पात्रता आहे का? माझ्या ह्या विचारांच्या चलबिचलतेमुळेच गायनात जी शांती, एकाग्रता पाहिजे, ती राहिली नाही. खरंतर ही माझीच चूक होती. आणि या महान गायक राजाने ती अचूक जाणली.''

शंकरांच्या तिसऱ्या डोळ्यातून निघालेल्या अग्निने महाराज हरितस्व पावन झाले. आणि अत्यंत शक्तिशाली बनले. भविष्यकाळात महेंद्राला बंदी बनविणाऱ्या अंधिकासुरासारख्या भयंकर राक्षसाचा देखील त्यांनी वध केला.

(क्रमशः)





# भूषणची पेटी

भूपालपूर गांवात व्याज घेऊन पैसे उधार देणाऱ्या भूषणला ओळखत नाही अशी एकही व्यक्ती नव्हती. शेती, तसेच छोटा मोठा व्यापार करून आपल्या कुटुंबाचा उदरनिर्वाह करणाऱ्या गांवकऱ्यांची आर्थिक स्थिती चांगली नव्हती. त्यामुळे ज्यावेळीं पैशाची गरज असे तेव्हां ते भूषणकडे जात असत. भूषण त्यांच्या अडीअडचणीला जरूर मदत करत असे. पण त्यांच्या लाचारीचा फायदा घेऊन त्यांना अधिक व्याज लावायला कधी विसरत नसे. गांवकरी त्याचा हा स्वभाव पूर्णपणे जाणून होते. व मनांतल्या मनांत त्याला शाप देत राहात.

भूषण आपल्या संपत्तीविषयी कधी कोणाला सांगत नसे, अगदी आपली बायको, भूदेवीला सुद्धा. भूदेवीला लग्न होऊन या घरांत येऊन पांच वर्षे झाली होती, पण तिच्या अंगावर एक दागिना नव्हता. भूषण इतके पैसे कमवायचा, पण त्या बिचारीच्या अंगावर जुने फाटके कपडेच असत.

भूषणच्या घरात पूर्वजांपासून चालत आलेली एक लांकडाची मोठी पेटी होती. त्या पेटीला नेहमीं कुलूप असे व त्याची चावी भूषण आपल्या कमरेत लटकावून ठेवून बाहेर जात असे. भूदेवीला फक्त इतकेच माहिती होते की त्या पेटीत संपत्ती आहे, पण काय आहे, किती आहे, याची तिला कांहीच कल्पना नव्हती व ती आपल्या नवऱ्यालाही कधी विचारत नसे.

एक दिवस भूदेवी मुन्सिफाच्या घरी मंगल कार्याला गेली होती. तिथे बाकीच्या इतर बायकांनी तिच्यावर मारलेले शेरे व टोमणे ऐकून तिला खूप वाईट वाटले. त्या आपापसांत कुजबुजत होत्या - "मूलबाळ नाही पण तरीही पैसा पैसा एकत्र करून ठेवते, चांगलं जेवणसुद्धा धड जेवत नाही.





मंगळसूत्राशिवाय कांही दागिना तरी आहे का पहा गळ्यांत. हे कसलं आहे जीवन?"

गांवच्या मुन्शीची बायको खदाखदा हंसत म्हणाली - "मी असं ऐकलंय की त्यांच्या घरी बापजाद्यांपासून चालत आलेली एक मोठी पेटी आहे. आणि माझी सासू तर सांगत होती की त्यांत खूप संपत्ती आहे व तिची चावी तिच्या नवऱ्याच्या खोलीत लटकत असते. याचा अर्थ असा की व्याजाची कमाई ते याच पेटीत सुरक्षित ठेवतात."

हे सर्व ऐकून भूदेवीला खूप वाईट वाटले, जाणूनबुजून या बायका आपला अपमान करत आहेत असे तिला वाटले. त्या दिवशी रात्री तिने भूषणला स्पष्टपणे सांगून टाकले की, "आत्ताच्या आत्ता मला पाहायचे आहे या पेटीत किती संपत्ती आहे ते? जर तुम्ही मला दाखवणार नसाल तर मी विहीरीत उडी मारून आत्महत्या करून घेईन."

पत्नीची ती गंभीर धमकी ऐकून भूषण म्हणाला, - "अगदी अवश्य बघ. पण पाहून झाल्याबरोबर लगेच त्याविषयी विसरूनही जा." असे म्हणून भूषणने पेटी उघडली.

पेटींत असलेल्या सोन्याचांदीच्या मोहरा व सुंदर दागदागिने पाहून भूदेवीला चक्कर आल्यासारखे वाटले. ती निराशेने म्हणाली - "इथे इतके दागिने असताना माझ्या अंगावर मात्र एक दागिनासुद्धा नाही. मी जुने पुराणे कपडे घालून गांवभर फिरते. सणावाराला सुद्धा डाळभाताशिवाय दुसरे कांही नाही. हे कसलं आलंय जीवन?"

"अग वेडे, असं किंचाळतेस कशाला? हळू बोल. पेटी भरून दागिने झाले की शहरांत जाऊ. तिथे मी समुद्रावर व्यापार करीन. मग तुझ्या अंगावर भरपूर दागिने असतील."

"पण ही पेटी भरणार कधी?" भूदेवीने विचारले.

"ते सर्व त्या देवावर अवलंबून आहे. मी शपथ घेतली आहे की जोपर्यंत ही पेटी भरत नाही तोपर्यंत त्यांतल्या एका पैशालाही हात लावणार नाही म्हणून." असे म्हणून भूषणने पेटी बंद केली.

त्या रात्री भूदेवीला एक स्वप्न पडले. भूषण दोन माणसांच्या मदतीने ती पेटी घोड्याच्या गाडीवर चढवत असल्याचे तिने स्वप्नात पाहिले. दुसऱ्या दिवशी तिने नवऱ्याला आपल्या स्वप्नाविषयी सांगितले व म्हणाली - "आपण लवकरच शहरांत जाणार असे वाटतेय."

"तसेच होईल. लक्ष्मीची कृपा झाली तर बघता बघता पेटी सोन्याने भरून जाईल." भूषण म्हणाला.

ती दोघेही त्या दिवशी संध्याकाळीं अष्ट-लक्ष्मीच्या मंदिरात गेली. तिथे भूदेवीने आपले

स्वप्न लवकरच खरे होऊ दे म्हणून देवीजवळ प्रार्थना केली. मग दोघांनी एका कोपऱ्यात बसून देवळांत दिलेला प्रसाद खाल्ला.

त्याचवेळी दोन उंच, थिप्पाड व मोठ्या मोठ्या मिशा असलेली माणसे तिथे आली व पुजारीला विचारूं लागली - "पुरोहितजी, मोठ्या डोळ्यांची, सुंदर बांध्याची, ओठावर तीळ असलेली, गोरीपान मुलगी इकडे आली आहे का?"

भूषण व भूदेवीने त्या माणसाचा प्रश्न ऐकला. पुजारी म्हणाले की अशी कुणी मुलगी इकडे आली नाही. तेव्हा ते निराश होऊन जायला निघाले तेव्हा पुजारी म्हणाले - "पण ही मुलगी आहे तरी कोण?"

दबलेल्या स्वरांत ते म्हणाले - "ती दुसरी तिसरी कोणी नसून आमची राजकन्या चंद्रलेखा आहे. हल्लीच त्या पूर्वीपर्वतप्रांत पाहायला गेल्या होत्या. तिथे एक भिल्ल तरुणावर त्यांचे प्रेम बसले. महाराज संतापले व रागाने खूप बोलले. त्यामुळे कोणालाही न सांगता त्या अंत:पुरातून पळून गेल्या. आता राजाने जाहीर केले आहे की जो राजकन्येला परत आणील, त्याला पन्नास हजार मोहरा बक्षीस म्हणून दिल्या जातील. आम्ही त्यांनाच शोधत आहोत."

"त्या पन्नास हजार मोहरांनी आपली पेटी भरून जाईल" भूषण म्हणाला. "तर मग उशीर कशाला? आत्ताच तिला शोधायला जा." भूदेवीने त्याला उत्तेजन दिले "काय, त्या पूर्वी पहाडी प्रांतात जाऊ? नाही, नाही, तिथे तर वाघ, सिंह, वगैरे जंगली जनावरें स्वच्छंदपणे फिरत असतील." भूषण म्हणाला.

त्या दिवशी रात्रीं जेवण झाल्याबर दोघेही जेव्हां



झोंपायला जायला निघाली, तेव्हां कुणीतरी दरवाजा ठोठावल्याचा आवाज ऐकू आला. इतक्या रात्री कोण बरे आले असेल, असा विचार करत भूषणने दार उघडले आणि राजकन्येला पाहून तर तो सुन्नच झाला. त्या माणसांनी म्हटल्याप्रमाणे ती गोरीपान, सुंदर, बारीक, मृगनयनी व तिच्या ओठावर तीळ पण होता. त्याला वाटले की भाग्यलक्ष्मी स्वत:च त्याचे घर शोधून आली आहे. ती तरुणी म्हणाली - "मी एकटीच आहे. आजची रात्र मला आपल्या घरात आश्रय मिळेल का?"

"अवश्य, अवश्य, या ना आंत." भूषणने तिला आत बोलवाले व एका खोलीत बसवले. नंतर दुसऱ्या खोलीत झोपलेल्या भूदेवीला उठवत तो म्हणाला - "आपलं नशिब चांगलं आहे. ती राजकन्या आपणहून आपल्या घरी आली आहे."

भूदेवीने दूरून तिला पाहिले व शंकित मनाने ती म्हणाली - "ही राजकन्या असेल असे वाटत







नाही. हिच्या अंगावर दागिने नाहीत, डोक्यावर मुकुट नाही, ती राजकन्या असेल का?"

"अंत:पूर सोडून पळून आलेली राजकन्या मुकुट, दागिने थोडेच घालून येईल? शिवाय कुणाला कळू नये म्हणून तिने वेष पण बदलला असेल. मी आत्ताच घोड्याच्या गाडीवर राजाला ही बातमी कळवायला जातो व परतताना सैनिकांना बरोबर घेऊन येईल. उद्या रात्रीच आपली पेटी भरून जाईल." त्याने असे म्हटले व लगेच घोडा-गाडी घेऊन तो राजधानीकडे निघाला.

घोडा-गाडी अर्धी वाट सुद्धा गेली असेल नसेल तेवढ्यांतच थांबली. नदीला पूर आल्यामुळे पुढे अनेक गाड्या थांबल्या होत्या व कुणालाही पुढे जाणे अशक्य होते. गाडीवाला हताश होऊन म्हणाला - "आजची रात्र आपल्याला इकडेच काढावी लागेल."

ते ऐकून भूषण सुन्न झाला. सकाळपर्यंत घरी पोहोचलो नाही तर राजकन्या घरातून निघून जाईल म्हणून त्याला भीती वाटली. लवकर घरी जाऊन राजकन्या असलेल्या खोलीला बाहेरून कुलूप लावून बंद करून ठेवू या असा विचार त्याच्या डोक्यात आला.

भूषण त्वरित गाडीत बसला व पुन्हां घरी आला. घरी येऊन पाहतो तर घराचे सर्व दरवाजे उघडे. घाबरत तो आत आला. व त्याने पाहिले की एक खोली बाहेरून बंद केली आहे. व आतून भूदेवीचा मोठमोठ्याने ओरडत असल्याचा आवाज ऐकू येत होता. भूषणने दार उघडले तर त्याला आश्चर्याचा धक्काच बसला. भूदेवीला दोरखंडानी बांधून एका कोपऱ्यात बसवले होते. तिचे दोर सोडून तिला मोकळे करीत भूषण म्हणाला, "काय, झालं काय? राजकन्या कुठे आहे?"

"ती राजकन्या नाही, चोरांची राणी आहे. मी

झोपले होते आणि तिने जाऊन बाहेरचे दार उघडून दिले. आपण देवळांत ज्या उंच, धिप्पाड व मोठ्या मिशा असलेल्या माणसांना पाहिले होते, त्यांना आपल्या पेटीविषयी सर्व माहिती असावी. ते या चोरांच्या राणीबरोबर आंत आहेत, मला दोरींनी बांधून त्या खोलीत ढकलून दिले व आपली पेटी घेऊन गेले.'' भूदेवी म्हणाली.

ते ऐकताच डोके घट्ट धरून भूषण मटकन खाली बसला. त्याचे डोके गरगरत होते. भूदेवी त्याच्यासाठी पाणी घेऊन आली व म्हणाली - ''इतके कशाला दुःखी होताय? इतकी मोठी पेटी भरून धन-दौलत असतानासुद्धा आपण गरीबीत जीवन घालवले, आताही ती पेटी आपल्या घरातच आहे असं समजून शांतपणे व समाधानाने आपण आपले दिवस काढू या. याशिवाय दुसरा उपायदेखील आपल्याला नाही.''

भूषणला अतिशय दुःख झाले होते, त्याच्या डोळ्यांतून अश्रू येत होते. कसेबसे स्वतःला सावरत तो म्हणाला - ''भूदेवी, तू प्राचीन काळांतल्या स्त्रीसारखी पतिव्रता आहेस. ह्या घरांत काय ठेवलंय, मी जाते माझ्या माहेरी, असं तू म्हटलं नाहीस. तुझ्या बोलण्यातून तुझा चांगुलपणा व मनाचा खरेपणा दिसून येतो. तुझी जितकी स्तुती करावी तितकी कमीच आहे. पण तू निर्धास्त रहा. लोकांकडून जी रक्कम मिळेल, ती थोडीशी एकत्र झाली की मी कापडाचे दुकान सुरू करेन. व एक दोन वर्षात मोठा व्यापारी होईन.''

''मग तो व्यापार करून आलेली धन-दौलत व संपत्ती सुरक्षित ठेवायला पुन्हा अशीच मोठी पेटी विकत घेणार का?'' भूदेवीने विचारले.

''नाही, नाही, बिलकुल नाही. आता असल्या पेट्यांचा जमाना गेला आहे. जे आहे त्याच्यातच आनंदाने राहू.'' भूषण समाधानपूर्वक म्हणाला.

त्यानंतर म्हटल्याप्रमाणे भूषणने छोटा व्यापार सुरू केला व हळूंहळूं तो वाढवला व त्यानंतर विविध प्रकारचे व्यापार केले व खूप संपत्ती कमावली. लवकरच तो भूपालपूर गांवचा एक मोठा व्यापारी म्हणून मानला जाऊ लागला. आता तो जितके कमावायचा ते सर्व बायकोला द्यायचा. अशा रीतीने नवरा-बायको दोघेही दुसऱ्यांना मदत करत सुखाने व शांती-समाधानाने राहू लागले.







# साफसफाई मोहीम

**निसर्ग वाचवा**
**स्वतःला वाचवा**



''वा वा! आता शेवटी एकदाचे घर दिसणार. जवळच्या बागेत फिरायला जाताना किती मजा येत होती. ती बाग नेहमी हिरवीगार असते''. दिल्लीच्या इंदिरा गांधी आंतरराष्ट्रीय विमानतळावर सिद्धार्थचे विमान उतरत असताना त्याच्या मनांत विचार येत होते.

अमेरिकेतल्या नॉर्थ कॅरोलायना विद्यापीठांत पांच वर्षे राहून सिद्धार्थ प्रथमच भारतांत घरी परतत होता. त्याचे आईवडील विमानतळावर त्याला न्यायला आले होते. तिघेही पडपडगंजकडे जायला निघाले. त्या कॉलनीत ते जन्मभर राहिलेले होते. केव्हां एकदा घरी पोहोचतोय असं सिद्धार्थला झाले होते. त्याच्या डोळ्यांसमोर, बालपणापासूनच्या आनंदी आठवणींतली ती प्रसन्न वसाहत दिसत होती.

पण जेव्हां तो गाडीतून घरासमोर उतरला तेव्हां तिथले दृश्य पाहून त्याला धक्काच बसला. त्याच्या आठवणींतली ही जागा नव्हती. आत्ताचे दृश्य एकदम बदललेले होते. ते बाभळीचे झाड कुठे गेले? आणि तो मोठा डेरेदार गुलमोहर? दर उन्हाळ्यांत त्याच्या केशरी फुलांचा सडा सुधीरचाचांच्या घराभोवती पडलेला असायचा. आता तिथे सगळीकडे कचरा पसरलेला होता. त्या घाणीच्या ढीगावर असंख्य माशा घोंघावत होत्या.

तितक्यांत समोरच्या घरांतून शर्माबाई बाहेर आल्या. त्यांनी सिद्धार्थचे स्वागत केले, हातांतला कचरा त्या कुंडीच्या जवळ फेकला आणि त्या परत गेल्या. हे पाहून तो थक्क झाला. त्याच्या नजरेला असलं पाहाण्याची संवय नव्हती.

आजूबाजूच्या सगळ्या इमारती जुनाट दिसायला



पाहिले तेव्हां त्याचे रडणें थांबले, आणि तो घरांत गेला. राजन यांनी कुतुहलाने या मंडळींकडे पाहिले.

"मणीला जे झालं त्याबद्दल आम्ही सांगायला आलो आहोत. गांवातल्या कोणाही मुलावर असा प्रसंग ओढवूं नये असं तुम्हाला वाटतं की नाही, साहेब?" डॉ. सुंदर यांनी विचारलं.

त्या शब्दांनी राजनच्या मनावर जणूं कांही सुरीच खुपसली गेली. त्याने सर्वांना आंत बोलावून दिवाणखान्यांत बसवलं. कारखान्यामुळें प्रदूषण कसे वाढले आहे, आणि सर्वांच्या जीवनावर त्याचे दुष्परिणाम कसे झाले आहेत, ते डॉ. सुंदर यांनी राजनना समजावून सांगितलं.

विजय घरांतून एकदम धांवत आला. डॉ. सुंदर यांचे बोलणे तो ऐकत होता. "म्हणजे बाबा, तुम्हीच माझ्या मणीला ठार मारलंत? म्हणजे तुम्ही खुनी आहात. आता माझा मणी मला परत आणून द्या." तो बेभान होऊन वडलांच्यावर ओरडायला लागला. "बिचाऱ्या एका छोट्या कुत्र्याला ठार मारायला तुम्हाला लाज कशी वाटली नाही? त्या कुत्र्याने तुमची सेवा केली, तुमच्यावर प्रेम केलं होतं! तुम्ही खून कसा करायला लागलात बाबा? एखादे दिवशी, तुम्ही मलाही असंच माराल होय ना?" रागाने बोलत विजयने वडिलांच्यावर आरोप केला.

डॉ. सुंदर विजयजवळ गेले आणि त्यांनी त्याला जवळ घेतले. त्यांनी त्याला शांत करायचा प्रयत्न केला. "वडिलांच्याशी असं बोलणं बरोबर नाही हं, विजय! त्यांनी कांही जाणूनबुजून असं केलेलं नाही. माझी खात्री आहे की ते या चुकीची दुरुस्ती करतील." डॉक्टरांनी त्याला समजावलं.

राजन हादरून गेले. त्यांना धक्काच बसला होता. आत्तापर्यंत मूठभर गांवकरी त्यांच्याकडे बोट दाखवत होते. पण आता, प्रत्यक्ष त्यांचा मुलगाच पित्यावर खुनाचा आरोप करीत होता. त्यांना ते सारे असह्य झाले. डॉ. सुंदर व त्यांच्या सहकाऱ्यांनी सुचवलेली योजना त्यांनी अंमलात आणायचे ठरवले. निदान तेवढं तरी करणं त्यांना सहज जमण्यासारखं होतं.

राजनच्या डोळ्यांतील निर्धार डॉक्टरांना समजला. नदीचे गढूळलेले जीवन पुन्हां सुधारेल, आणि त्यानंतर गांवकऱ्यांना शुद्ध हवा, आणि पाणी पुन्हां मिळायला लागेल, याची त्यांना खात्री पटली.

- सुकेशिनी

हंसण्यावारी नेण्याजोगं नाही !






# निर्भय

एक घनदाट जंगल होतं. त्यांत जगदंबा नांवाची एक जादुगारीण राहात होती. ती अतिशय दुष्ट आणि क्रूर होती. जंगलातून जाणाऱ्या लोकांना ती भिववीत असे. नंतर त्यांना ती ठार मारायची. त्यांत तिला खूप आनंद होई. ती एका गुहेंत राहात होती. ती गुहा मेलेल्या माणसांच्या हाडांनी व सांपळ्यांनी भरलेली होती. आजूबाजूला हाडांचे पसरलेले ढीग होते. त्याच्या मधोमध ती शांतपणें रात्रभर झोंपी जाई.

त्या जंगलाच्याजवळच्या गांवात रमानाथ नांवाचा तरुण गेल्या वर्षी जंगलात शिकारीला गेला होता. जादुगारिणीने त्याला मारले. तेव्हांपासून गांवातल्या लोकांनी जंगलाच्या बाजूला जायचे बंद केले.

रमानाथचा धाकटा भाऊ वीर हा एक निर्भय तरुण होता. त्याच्यासारखा बेडर तरुण आजपर्यंत पाहिला नव्हता असं लोक म्हणत. एक दिवस त्याने निश्चय केला की जादुगारणीला कसंही करून ठार मारायचं. कुणाला कांहीही न सांगता तो बेडरपणें जंगलात घुसला.

जगदंबेच्या गुहेजवळ जेव्हां वीर पोंचला तेव्हां ती एका मोठ्या वडाच्या झाडाखाली बसून विचारांत गढलेली त्याला दिसली. त्या बाजूला बऱ्याच दिवसांत कुणीही माणूस तिथून गेलेला नव्हता. जेव्हां वीर तिच्याजवळ पोंचला तेव्हां त्याला पाहून ती भलतीच खूष झाली. तिचे डोळे आनंदाने चमकायला लागले.

जादुगारणीजवळ येऊन वीर म्हणाला, "आजी, ठीक आहात ना?" डोळे वटारुन तिने उत्तर दिले, "अगदी मजेंत आहे बरं, म्हणून तर इथें आरामांत बसलेय ! अरे माझ्या नातवा, पण तूं कुठे निघाला आहेस रे?"

"काय सांगू आजी, माझं नांव वीर. सगळे म्हणतात की मी खूप धीट आहे. भिती ही चीज मला ठाऊकच नाही. शाळेमधे गुरुजींनी इतर विद्या शिकवल्या. पण भिती कशी असते ते मात्र

सदानंद



शिकवलं नाही. मला जो कुणी घाबरवूं शकेल त्याच्या शोधांत मी कांही दिवस फिरतो आहे. पण मला अजून तरी कुणी दिसलं नाही." धीटपणें वीरने सांगितलं.

"असं आहे कां रे नातवा! तर मग तूं अगदी बरोबर जागी आला आहेस. लवकरच तुला परलोकांत पोंचण्याचा रस्ता मी दाखवीन." विकट हास्य करीत जगदंबा म्हणाली.

"मला घाबरवणाऱ्यांना परलोकांत पाठवण्याचा तुझा इरादा आहे कां? जरूर पाठव त्यांना. मी तुझ्याबद्दल खूप कांही ऐकलं होतं. लोक म्हणतात की जगदंबा जादुगारणीचं रूप भयंकर आहे. तिला पाहूनच हातपाय कांपायला लागतात. पण तूं तर किती सुंदर दिसते आहेस! तुझे हे भुरभुरणारे पांढरे केस, तुझं हे चपटं नाक, आगीसारखे तेजस्वी असणारे तुझे डोळे - वा वा - तुझ्या सौंदर्याचं मी कितीही वर्णन केलं तरी ते कमीच आहे." वीरने तिची स्तुती करण्याचा सपाटाच लावला.

जादुगारीण त्याच्या बोलण्यावर खूष झाली आणि म्हणाली, "बाळा, खरं सांगतो आहेस ना रे तूं? खरंच कां मी इतकी सुंदर आहे?"

"माझ्या बोलण्यावर जर तुझा विश्वास नसेल तर आरशांत तरी तुझं रूप तूं बघ" असं म्हणून त्याने आपल्या पिशवीतून आरसा काढून तिला दिला. आरशांत आपली छबी पाहून जादुगारणीला खरंच वाटलं की ती खूप छान दिसतेय. ती जराशी लाजली.

"माझ्या नातवा, तूं जे सांगतो आहेस ना, ते अगदी खरं आहे. इतक्या वर्षानंतर तूं सांगितल्यावरच मला सत्य काय ते समजलं चल. आता तुला मी चविष्ट जेवण वाढते." जगदंबाने आनंदी स्वरांत, हंसत हंसत म्हटले.

"जेवणाचं नंतर पाहूं, अगोदर मला घाबरवण्याचा प्रयत्न तर करून पाहा. त्यांत तूं यशस्वी होतेस की नाही ते मी बघतो." वीर म्हणाली.

"अरे नादान मुला, मी तुला घाबरवायला लागले ना, तर तूं उभ्याउभ्या खाली मरून पडशील. पण तू माझ्या सौंदर्याची तारीफ केली आहेस, म्हणून तुला मारावंसं वाटत नाही मला." जगदंबाने नाटकी आवाजांत डोळे मिचकावून म्हटले.

"मी तर ओळखलंच आहे की तुझ्यांत मला घाबरवण्याची हिंमत नाही. तेव्हां इथें थांबून काय उपयोग? हा निघालो मी." असं म्हणून वीर मागे फिरला. "असं वाटतं कां तुला? तर चल मग माझ्याबरोबर." ती त्याला आपल्या गुहेंत घेऊन गेली.

आंत गेल्यावर वीरने तिथे मानवी हाडाच्या सांपळ्यांचा ढीग पाहिला.

"या सांपळ्यांत माझ्या भावाचाही सांपळा असेलच." मनांतल्या मनांत हा विचार करत त्याने





आपले डोळे मिटून घेतले. तितक्यांत जादुगारीण केंकाटत म्हणाली, "अरे माझ्या नातवा, मी कुणालाही ठार मारलं नाही, त्यांना विष दिलं नाही की चाकूने भोसकलं नाही!

असं म्हणतात की हुशार माणसाला जास्त सांगावं लागत नाही. तूं हुशार असलास तर मी किती भयंकर जादुगारीण आहे हे तुला कळलं असेल. हे हाडांचे ढीग पाहिल्याबरोबर तुझा चेहरा किती उतरून गेलाय ते मी पाहाते आहे की! मी कशी आहे ते आता कळलं ना तुला?"

"या सगळ्यांचं काळीज सशासारखं भित्रं असेल. एक नंबरची भेदरट असणार ही सगळी! मी त्यापैकी नाही. माझं काळीज वाघासारखं आहे!" वीरने सांगितलं.

त्याचे हे शब्द ऐकल्यावर ती संतापाने काळीनिळी झाली; ती उठली आणि म्हणाली, "मरायची तुलाही घाई झालेली दिसतेय तर." असं म्हणून तिने स्वतःशीच एक जादूचा मंत्र पुटपुटला.

दुसऱ्याच क्षणीं तिचं डोकं वाघाचं डोकं झालं. तिच्या शरीराचा गिधाडपक्षी झाला आणि त्याला मोठे-मोठे पंख होते. आपल्या टोंकदार, भक्कम नखांत तिने वीरला पकडला आणि ती आकाशांत उडायला लागली. वीरला पकडून ती थोडा वेळ आकाशांत हिंडत राहिली आणि पुन्हां त्याच जागी उतरली. तिने आणखी एक मंत्र पुटपुटला आणि तिची पुन्हां जगदांबा झाली.

वीर मात्र जसा होता तसाच राहिला. त्याच्या चेहऱ्यावर भीतीचा लवलेशदेखील नव्हता. आपल्या प्राणांच्या रक्षणासाठी त्याने तिच्या पायावर लोळण घेतली नाही, किंवा आपण हरलो असं समजून त्याने मानही खाली घातली नाही. त्याचा हा निर्भयपणा पाहून जादुगारीण चकित झाली आणि म्हणाली,

"अरे, तूं अजूनही जिवंतच आहेस कां? मला वाटलं, मेला असशील."

"तुझ्या या करणीने मी थोडाच मरणार आहे? मला आकाशांत हिंडवलंस, त्याबद्दल मात्र धन्यवाद! खूप मजा वाटली, बर कां!" वीरने उत्तर दिलं.

वीरचा बेडरपणा पाहून ती संतापली. आरडाओरडा करीत तिने आणखी एक मंत्र म्हटला. वीरने तिची टिंगल करण्याचा हेतूने म्हटलं, "तुझ्याजवळ मंत्रांची भली मोठी थैलीच दिसते आहे. याही वेळेस तू मला घाबरवूनसुद्धां जर मी भीतीने मेलो नाही तर तूच मला एक मंत्र शिकवला पाहिजेस. बोल, माझी अट तुला कबूल आहे कां?"

ज दुगारीणीने त्याची अट मान्य केली. यावेळेस ती जादूने स्वतःच एक सांपळा बनली. त्यांतून बरेच सांप फुसफुसत बाहेर आले. ते पाहूनसुद्धां वीर घाबरला नाही. त्याच्या कपाळावर घाम फुटला नाही की त्याचा चेहरा उतरला नाही त्याने मोठ्याने हंसत म्हटलं, "जगदंबाआजी, तूं हारलीस बरं कां!

आता आपलं ठलं होतं त्याप्रमाणे तूं मला एक मंत्र शिकवला पाहिजेस.''

"तुझं काळीज दगडाचं असलं पाहिजे असं दिसतंय!'' असे म्हणून तिने आणखी एक मंत्र म्हटला व तिचे पूर्वीचे शरीर तिला प्राप्त झाले.

थोडा वेळ विचार करुन जादुगारीण म्हणाली, "ठीक आहे, तुला मी एक मंत्र शिकवीन. जादुगारीण आपला शब्द मोडत नसते हे मी सिद्ध करुन दाखवीन.'' तिने वीरला एक मंत्र शिकवला. वीर म्हणाला, "इतका छोटासा मंत्र? विंचवाच्या या मंत्राचा कसला आलाय उपयोग?'' जादुगारीण नाराज होऊन म्हणाली, ''अरे धाडसी पोरा, तुला मोठा मंत्र शिकवायला मी कांही वेडी नाही बरं!''

''जगदंबा आजी, माझी आजी नेहमी म्हणायची की जादुगारणी कोणतंही रूप घेऊं शकतात. पण विंचवाचं रूप कांही त्यांना घेता येत नाही. विंचू बनणं त्यांच्या शक्तीबाहेरचं आहे. तुला विंचू होणं जमणारच नाही. होय ना?''

जादुगारणीला हा मोठाच अपमान वाटला. वीरने तिला एक आव्हान दिले होते. ती तिरीमिरींत उठली आणि त्याला ओरडली, ''तुझी ही हिंमत? माझ्या शक्तीबद्दल तू शंका प्रकट करतो आहेस, होय ना? तू मला कोण समजतोस रे?'' असं म्हणून तिने मंत्र म्हटला आणि विंचवाचे रूप घेतले, व वीरला नांगी मारली.

तोपर्यंत जादुगारणीने शिकवलेला मंत्र वीरने मनांतल्या मनांत म्हटलेला होता. म्हणून विंचवाने दंश केला तरी त्याच्यावर कांहीच परिणाम झाला नाही. त्याने विंचवाला आपल्या पायाखाली चिरडले आणि तो विंचू तडफडून मेला.

आपल्या या यशामुळें वीरला खूपच आनंद झाला. समोरच्या गुहेंतून अकस्मात माणसांच्या झुंडी बाहेर येऊं लागल्या. त्यांत वीरचा थोरला भाऊ रमानाथही होता.

भावाला पाहून वीर धांवतच त्याच्याजवळ गेला आणि त्याने रमानाथला मिठी मारली. ते सारेजण अजून भेदरलेले होते. जादुगारीण आसपास कुठे दिसते आहे कां ते भीतभीत इकडेतिकडे पाहूं लागले व म्हणूं लागले. ''जादुगारीण कुठेतरी लपली असेल. चला, आपण पळून जाऊं या. चला इथून!''

वीरने त्यांना मेलेला विंचू दाखवला आणि म्हटले, ''हीच ती जादुगारीण.'' सर्वांनी वीरचे खूप कौतुक केले. त्यांनी वीरला आपल्या खांद्यावर घेतले, व सगळेजण गांवाच्या दिशेने जाऊं लागले. तेव्हांपासून "भितीदेखील ज्याला हात लावायला भिते असा हा वीर!'' अशी त्याची प्रसिद्धी झाली.







# सासूबाईंचा आजार

रविन्द्र पांच वर्षाचा असताना त्याचे वडील मरण पावले. तेव्हां त्याची आई कल्याणीने अतिशय शिस्तीने त्याला वाढवले. रविन्द्राने देखील मनापासून अभ्यास करुन शिक्षण घेतले. व चांगली नोकरी मिळवली. त्याला आपली मुलगी व भलामोठा हुंडा देण्यासाठी लोकांच्या चकरा सुरु झाल्या.

एक दिवस कल्याणी सुधाला देवळात भेटली. तेव्हां सुधा म्हणाली ''हे बघ कल्याणी, माझे म्हणणे ऐक. हुंड्याचा मोह करुं नकोस. गरीब कुटुंबातून आलेली मुलगी तुझ्या आज्ञेत राहील. तू जसे सांगशील तशी वागेल. ती तुला व तुझ्या मुलाला दुःख होईल असे वागणार नाही. हुंड्याच्या आशेने मी माझ्या मुलाचे लग्न जमीनदाराच्या मुलीशी केले आणि आता त्याचे फळ भोगते आहे. माझ्या सुनेला माझी कांही किंमत नाही. ती मला अगदी तुच्छ लेखते. मला सारखे टोमणे मारत असते. आणि मला खूप त्रास देते.'' पदराने डोळे पुसत सुधा म्हणाली.

सुधाच्या बोलण्याचा कल्याणीवर खूपच परिणाम झाला. सुधाचे बोलणे तिच्या मनांत रुतून बसले. एक दिवस ती संध्याकाळी देवळांत गेली असातना, तिथे तिला एक मुलगी गोड आवाजांत भजन म्हणताना दिसली. त्या मुलीच्या चेहऱ्यावर तेज होते. जेव्हां मुलगी प्रसाद घेऊन निघून गेली, तेव्हां कल्याणीने पुजाऱ्याकडे तिची चौकशी केली.

पुजारी म्हणाला ''तुम्ही हिला ओळखत नाही? सावकाराकडे हिशोब लिहीणाऱ्या गोविंद पंतांची मुलगी आहे ती. बिचारे! त्यांची स्थिती अगदी हलाखीची आहे. त्यामुळे आपल्या मुलीचे लग्न करुं शकत नाहीत. हिचे नांव रत्ना आहे.''

त्याच क्षणी कल्याणीला वाटले ही मुलगी आपली सून होण्यास सर्वार्थाने लायक आहे. तिने स्वत: मनावर घेतले आणि त्यामुळे एक महिन्याच्या आंत रविन्द्रचे रत्नाबरोबर लग्न झाले.

ज्या दिवशी रत्ना प्रथम सासरी आली तेव्हां

रम्या दीक्षित



तिने प्रथम सासूच्या पाया पडून म्हटले, "तुम्ही माझे नशीब उजळवणाऱ्या देवी आहात. आपण जे सांगाल, जसे सांगाल, त्याप्रमाणे मी वागीन. आता आपण स्वयंपाक घरांत येऊं नका. आराम करा. चांगली विश्रांती ध्या. आपली सेवा करण्यात मला खूप आनंद वाटेल."

आपल्या सुनेच्या चांगल्या स्वभावावर कल्याणी खूष झाली. ती आपले आयुष्य आरामांत घालवू लागली. सून पण आपल्या आईपेक्षा सुद्धां जास्तच असेल अशी सासूची देखभाल करु लागली. सासूला खूष ठेवण्यांत तिने कोठेही कमतरता ठेवली नाही.

पण लग्नानंतर सहा महिन्याआधीच कल्याणी आजारी पडली. वैद्यांनी तपासले पण त्यांनाही कळेना की या आजाराचे काय कारण आहे. कल्याणीला उठा बसायला त्रास होत होता. सारखे दमायला होत होते. अंग मोडून आल्यासारखे वाटायचे. अशक्तपणामुळे ती बारीक सारीक गोष्टींवरुन चिडत असे. वैद्यांना देखील तिच्यावर उपचार करता आले नाहीत.

वैद्य म्हणायचे "तुम्हाला मधुमेह नाही की रक्तदाबाचा त्रास नाही. तुम्हाला आपल्या रागावर काबू आणला पाहिजे. तुमचे हृदयतर चांगले सशक्त आहे. त्यामुळे कळत नाही की छातीत का धडधडते?"

वैद्यांचे बोलणे ऐकून देखील कल्याणीला अस्वस्थ वाटत राहिले. एका संध्याकाळी श्वास घ्यायला त्रास व्हायला लागल्याने की आपल्या सुनेला म्हणाली "रत्ना...! असं वाटतंय की नातवंड पाहिल्याशिवायच माझे प्राण जाणार आहेत. माझ्या नशीबात हे सुख नाही असे दिसते". दुःखी आवाजात ती म्हणाली.

त्या दिवशी रात्रीं रत्नाने रडत रडत आपल्या नवऱ्याला ही गोष्ट सांगितली आणि म्हणाली, "त्यांची तब्येत किती चांगली होती. त्यांना काय होतंय, देव जाणे. त्यांची ही अवस्था पाहून माझ्या मनाला फार त्रास होतो. तुम्ही उद्याच त्यांना शहरात नेऊन एका चांगल्या वैद्यांना दाखवा".

दुसऱ्याच दिवशी रविन्द्र आपल्या आईला घेऊन शहरांत गेला. या दिवशी रत्नाच्या मोठ्या आत्याचा मुलगा रत्नाला भेटायला त्यांच्याकडे आला. रत्नाने रडत आपल्या सासूच्या आजारपणाबद्दल त्याला सांगितले. आणि म्हणाली "जर कां माझ्या सासूला कांही झाले तर मी जगूं शकणार नाही."

राजा म्हणाला, "कांही कामासाठी शहरांत गेलो होतो. तुला भेटावेसे वाटले म्हणून आलो. तुझे पती व सासू शहरातून परतल्यावर मी पुन्हा येईन. आणि



त्यांचा आजार बरा करायचा प्रयत्न करीन". असे सांगून तो निघून गेला.

दोन दिवसांनी कल्याणी व रविन्द्र शहरातून परत आले. तिथल्या वैद्यांनी सर्व तपासण्या करुन, त्यांना काहीही झाले नाही असे निदान केले.

त्याच दिवशी संध्याकाळी राजा आला. तेव्हां रत्नाने त्याला विनंती केली की तिच्या सासूला तपासून खरंच कांही आजार आहे कां ते सांग.

राजाने कल्याणीची नाडीपरिक्षा केल्याचे नाटक करत विचारले. "आपल्या छातीत धडधडते, आपल्याला खूप अशक्तपणा वाटतो, हो ना?"

"सगळ्या वैद्यांना मी हेच सांगते. पण कोणी माझ्यावर विश्वासच ठेवत नाही." दुःखी आवाजात कल्याणी म्हणाली. तिचे डोळे व जीभ तपासत राजा म्हणाला "तुम्हाला फार थकवा येतो. सगळे अगदी कंटाळवाणे वाटते ना?" "हो ना, पलंगावरुन उतरुन मी चार पावले देखील टाकू शकत नाही. खाण्याची कांही चवच लागत नाही." कल्याणी म्हणाली. "आपल्याला सारखा राग येतो. बारीक सारीक गोष्टींवर चिडायला होते. ह्या रोगाच्या रोग्याला त्याची संवयच होते." राजा म्हणाला.

केवळ नाडीपरिक्षेवरुन धडाधड लक्षणे सांगणाऱ्या राजाकडे कल्याणी आश्चर्याने बघतच राहिली. त्याचे कौतुक करत ती म्हणाली "तूं तर माझ्या रोगाची लक्षणे अशी धडाधडा सांगतो आहेस, जसं कांही तुला ती आधीच लक्षांत आली होती. मुला, प्रत्येक वैद्य हेच सांगतो आहे की मला कोणताही आजार नाही." तिच्या बोलण्यात विषण्णता होती.

राजाने आपल्या पिशवींतून एक छान डबी



काढून तिला दिली. आणि म्हणाला "ह्यांत चूर्ण आहे. दिवसांतून दोन वेळा हे जेवणानंतर खा. लक्षांत ठेवा-एक चिमटीभरच. त्याचबरोबर आपल्याला थोडा व्यायाम करायला पाहिजे. परसदारातल्या झाडांना रोज पाणी घाला. देवळांत जाताना झपाझप चाला. एका आठवडयांत आपल्याला बरे वाटू लागेल".

कल्याणीने राजाच्या सांगण्याप्रमाणे चूर्ण खाल्ले. झाडांना पाणी घातले. देवळांत भराभर चालत जाऊं लागली.

राजाच्या सांगण्याप्रमाणे रविन्द्र आपल्या आईला म्हणाला "आई ग! रत्नाचा स्वयंपाक मला अजिबात आवडत नाही. कांही पण खावेसे वाटत नाही. तोंडाला कांही चवच नाही. कमीतकमी एकदा तरी तू स्वयंपाक करच. तुझ्या हातचे जेवण किती दिवसांत खाल्ले नाही. मी अगदी पोटभर जेवणार आहे."

मुलाच्या बोलण्याने खूष झालेली कल्याणी

सकाळचा स्वैपाक करुं लागली. दोन आठवडे असे गेल्यावर कल्याणीला वाटूं लागले की आपली तब्येत सुधारते आहे. थोड्याच दिवसात ती चांगली खुटखुटीत बरी झाली. जेव्हां कल्याणी संध्याकाळी देवळांत गेली होती, तेव्हां घरी आलेल्या राजाने रत्नाला सासूच्या प्रकृतीविषयी विचारले.

रत्ना म्हणाली, "तुझ्या औषधाने तर चमत्कारच केला आहे. मला माहीत आहे की तू कांही वैद्य नाहीस. तरीसुद्धा तू इतके रामबाण औषध कसे दिलेस? आणि रोगाचे कारण कसे ओळखलेस?"

तिच्या ह्या प्रश्नावर खोखो हंसत राजा म्हणाला, "ठीक आहे की मी वैद्यकशास्त्र शिकलो नाही. पण मानवीस्वभावाचा मी चांगला अभ्यास केला आहे. रोग्याचा रोग बरा व्हायला त्याचा वैद्यावर संपूर्ण विश्वास हवा.

त्याला असे वाटले पाहिजे की हा वैद्य आपल्याला बरे करुं शकेल. मी तुझ्या सासूमध्ये असा विश्वास निर्माण करुं शकलो. त्यामुळेच मी आपल्या कामांत सफल झालो. आता तुझ्या सासूच्या आजाराबद्दल सांगतो. त्यांना कुठलाही शारिरीक आजार नव्हता. त्यांचा आजार हा मानसिक आहे.

"एकुलत्या एक मुलाचे लग्न केल्यावर सर्व सासवांना साधारणपणे हे दुखणे होते. त्यांना वाटते आता घरांत कोणाला त्यांची गरज नाही. मुलगा हातांतून निसटला.

हा मानसिक ताण त्यांना आजारी पाडतो. त्या स्वतःला आजारी समजू लागतात. मी जे औषध दिलेले होते ते साखर घालून कुटलेले पीठ होते. इथून पुढे आपल्या सासूला आराम करायला सांगू नकोस. दोघी मिळूनमिसळून घरांतील कामे करा. सर्व गोष्टींत त्यांचा सल्ला घे. सगळयांत महत्वाची गोष्ट ही, की त्यांना असे वाटले पाहिजे की त्यांची तुम्हाला नितांत गरज आहे. हा समजच त्यांना निरोगी आणि ताजेतवाने ठेवेल".

उंबरठ्यावर उभे राहून रविन्द्र राजाचे सगळे बोलणे ऐकत होता. त्याच्याजवळ येत तो म्हणाला, "तुझ्या उपकारांची कायम आठवण राहील. आईला तर तू जसा कांही पुनर्जन्म दिलास". असे म्हणत त्याने रविन्द्रचे हात आपल्या हातांत घेतले.





## ६४. धृतराष्ट्राचा मृत्यू

# महाभारत

धृतराष्ट्राने आपल्या पाहुण्यांना आदरपूर्वक कंदमुळे आणि फळें खाण्यास दिली. आणि त्यांच्या राहाण्याची पण चांगली व्यवस्था केली. त्या रात्री पांडव आपल्या आईच्या चारी बाजूंना झोपले.

दुसऱ्या दिवशी ते बायका, पुरोहितांना बरोबर घेऊन आजूबाजूचा प्रदेश पाहाण्यास गेले. एका ठिकाणी त्यांना अग्निकुंड दिसले. त्यांत अग्नी प्रज्वलित होता. त्याच्यासमोर बसून ऋषी, मुनी होम करीत होते. तिथे वेगवेगळी जनावरे निर्भयपणे इकडे तिकडे वावरत होती. तसेच वेगवेगळे पक्षी देखील मुक्तपणे संचार करीत होते. पांडवांनी सगळीकडे फिरुन तो आश्रम बघितला. पांडवांना खूप आनंद झाला. आणि त्यांनी सगळया मुनींना विविध प्रकारची कालडी व कांबळी भेट दिली. नंतर ते धृतराष्ट्राकडे परत आले.

त्याच वेळी महर्षी व्यास आपल्या शिष्यांसह तिथे पोंचले. त्यांनी धृतराष्ट्राला विचारले "राजा, तुला हा वनवास सुखावह आहे ना? पुत्रशोक तुझे मन विकल करीत नाही ना? तुझ्यामुळे गांधारीला त्रास तर होत नाही ना? कुंतीदेवी तुम्हा दोघांची





चांगली काळजी घेत आहे ना? मला असे वाटतें कीं तुम्हाला इथे कुठल्याही गोष्टीची कमतरता नाही.''

त्यानंतर व्यासांनी विदुराच्या जन्मरहस्याची हकीगत सांगितली. ''विदुरच वास्तविक युधिष्ठिर आहे. महामुनी मांडवांच्या शापामुळे यमराजाने तुमचा भाऊ म्हणून जन्म घेतला. तोच यमराज योगबळाने युधिष्ठिराशी एकरूप झाला आहे. हे त्याचे जन्मरहस्य आहे. ह्यासाठी त्याने आपल्या योगबलाचा उपयोग केला आहे.''

पांडव आपल्या परिवाराबरोबर त्या आश्रमांत एक महिनाभर राहिले. तेव्हां महर्षी व्यास पुन्हां एकदा तिथे आले. अनेक गोष्टी सांगून त्यांनी सगळ्यांची करमणूक केली. ह्याकाळांत नारदमुनी, पर्वत, देवल, विश्ववसु, तुंबरु व चित्रसेन तिथे आले. धृतराष्ट्राच्या अनुमतीने युधिष्ठिराने सर्वांचा यथोचित आदर सत्कार केला. तेव्हां व्यास, दुसरे पाहुणे, पांडव, धृतराष्ट्राबरोबर गांधारी, कुंती, द्रौपदी, सुभद्रा, इत्यादी स्त्रिया पण येऊन बसल्या.

प्राचीन महर्षी, देव आणि असुरांच्या गोष्टी ऐकल्या व ऐकवल्या गेल्या.

एकदा धृतराष्ट्र महर्षी व्यासांकडे आपले मन मोकळे करत म्हणाला, ''आपल्या आगमनाने माझा जन्म सफल झाला. मला परलोकाची भीती नाही. पण मला ही काळजी आहे. माझ्या मुलांनी दुष्टपणाने पुण्यशील पांडवांचा अपमान केला. अनेक तरुण युद्धांत मारले गेले. युद्धांत मरण पावलेली माझी मुले, नातवंडे, स्वर्ग, नरकांत कुठे जातील कोण जाणे. ह्या काळजीने माझे मन शांत नाही''.

धृतराष्ट्राचे हे बोलणे ऐकून गांधारीचे दुःख उफाळून आले. तिच्या बरोबर कुंती, द्रौपदी, सुभद्रा ह्या स्त्रियाही रडू लागल्या.

गांधारी हात जोडून म्हणाली ''माझी मुलें मृत्युमुखीं पडून सोळा वर्षे झाली. तेव्हांपासून माझे पती रात्रंदिवस त्याचा शोक करीत आहेत. आमच्या मुलांच्या बायकाही दुःखी आहेत. द्रौपदी आपली मुले, भाऊ ह्यांच्यासाठी रडत आहे. सुभद्रा अभिमन्यूसाठी तर भूरिश्रवाची पत्नी आपले सासरे, पती व मुलांच्या मृत्यूचा शोक करत आहे. ह्या सर्वांचे दुःख दूर करण्याचा कांही उपाय सांगा''.





व्यासांनी कुंतीला विचारले की ''सांगा, तुमच्या मनांत कांही दुःख आहे कां?'' ह्यावर कुंती म्हणाली की ती कर्णाच्या मृत्यूने दुःखी झाली आहे.

तेव्हां व्यास गांधारीला म्हणाले ''तुला तुझे पुत्र, सगळे नातेवाईक दिसतील. कुंतीदेवी कर्णाला, सुभद्रा अभिमन्यूला, द्रौपदी आपल्या मुलाला, वडिलांना व भावाला देखील पाहील. हा विचार माझ्या मनांत आधीच आला होता. तो तुम्ही व कुंतीदेवींनी प्रगट केला. तुम्हाला कोणासाठीही दुःखी होण्याचे कारण नाही. महाभारतीय युद्धांत मरण पावलेले सगळे देव तरी आहेत, किंवा राक्षस आहेत. धृतराष्ट्र एक गंधर्व राजा आहे. पांडू मरुतगणाशी संबंधित आहे. विदुर व युधिष्ठिरांत यमराजाचा अंश आहे. त्याचप्रमाणे दुर्योधनात कलीचा व शकुनीत द्वापार आहे. दुःशासन इत्यादित राक्षसांचा अंश आहे.

भीमात वायूचा अंश, अर्जुनात नर नावाच्या महर्षींचा अंश, नकुल सहदेवांत अश्विनी-कुमारांचा, अभिमन्यूत चंद्राचा, तर द्रौपदी व दुष्टद्युम्नात अग्नीचा अंश आहे. शिखंडीत राक्षसाचा अंश, तसेच द्रोणाचार्यांत बृहस्पती व अश्वथाम्यात शंकराचा अंश आहे. भीष्म वसूंमधील एक आहेत. तुम्ही सगळे उशीर न करता भागीरथीच्या तीरावर जा. युद्धांत मृत्यूपावलेल्या सर्व लोकांचे दर्शन घडवून मी तुमचे दुःख दूर करीन''.

हे बोलणे ऐकून सगळ्यांचा उत्साह वाढला. मग काय, सगळे गंगेच्या तीराकडे निघाले. धृतराष्ट्र आपल्या बरोबर पांडव व मुनींना घेऊन निघाला. सर्व लोक गंगेच्या कांठावर पोचून चांगली जागा बघून विश्रांती घेत होते. सूर्यास्तानंतर सर्वांनी लगेच गंगेत स्नान करुन आपले विधी पूर्ण केले. नंतर सर्व लोक महर्षी व्यासांजवळ जमले. व्यासांनी गंगेच्या पाण्यात डुबक्या मारुन पांडव, कौरव योद्धे व महाभारतीय युद्धांत मरण पावलेल्या सर्व वीरांना व्यासांनी उच्च स्वरांत आवाहन केले.

लगेचच नदीच्या तटावर मोठा गोंगाट ऐकूं येऊं लागला. भीष्म, द्रोण वगैरे एक एक करत नदीतून कांठाकडे येऊं लागले. विराट, द्रुपद, उप पांडव, अभिमन्यू, घटोत्कच, कर्ण, दुर्योधन, वगैरे ज्या वेषात व ज्या वाहनांवर युद्धभूमीवर गेले होते, तसेच नदीच्या पाण्यातून बाहेर येऊं लागले. आता त्यांच्यामधे कोणतेही शत्रुत्व नव्हते. व्यासांनी

आपल्या तपोबलाने धृतराष्ट्राला दृष्टी दिली. गांधारी व धृतराष्ट्र आपल्या प्रिय व्यक्तींना नीटपणे तृप्ती होईपर्यंत बघू शकले. आपापल्या प्रिय व्यक्तींना प्रगट होताना पाहणे हा अद्‌भुत अनुभव होता. सगळयांच्या अंगावर रोमांच उभे राहिले.

जिवंत लोकांनी मृत व्यक्तींबरोबर मिसळून अनुपम सुख मिळवले. पांडव, कर्ण, अभिमन्यू व उपपांडवांना भेटले. सगळयांनी मोठ्या आनंदात ती रात्र घालविली. नंतर मृतव्यक्ती जशा गंगेतून बाहेर आल्या तशाच गंगेत अंतर्धान पावल्या.व ज्या ज्या लोकांतून आल्या होत्या, त्या त्या लोकी परत गेल्या.

त्यानंतर व्यासांनी कौरव स्त्रियांना सांगितले, "तुम्हाला कोणाला आपल्या पतीबरोबर त्या लोकांत जायचे असेल तर नदीत प्रवेश करा." तेव्हां धृतराष्ट्राच्या सर्व सुना सासूसासऱ्यांची संमती घेऊन गंगेत उतरल्या.

ह्या प्रसंगानंतर धृतराष्ट्राचे दुःख पूर्णपणे दूर झाले. व तो शांत चित्ताने आपल्या आश्रमांत परतला.

एक महिनाभर आपल्याबरोबर रहाणाऱ्या पांडवांस त्याने सांगितले की आता त्यांनी हस्तिनापुरास जाऊन राज्यकारभार सांभाळावा. खरे तर युधिष्ठिराच्या मनांत तेथून जाण्याची





इच्छा नव्हती. किंवा राज्य करण्याचीही इच्छा नव्हती. त्याला आता सगळे सुने सुने वाटत होते.

युधिष्ठिराप्रमाणेच सहदेवाला देखील तिथून कुंतीपासून दूर जायचे नव्हते. पण कुंतीनेच त्यांनी हस्तिनापुरास परत जावे असा आग्रह धरला. त्यांना नाईलाजाने परत जावे लागले. धृतराष्ट्राने सर्व पांडवांना आलिंगून निरोप दिला. व युधिष्ठिर सहपरिवार हस्तिनापुरास जाण्यास निघाला.

काही काळानंतर नारदमुनी युधिष्ठिराला भेटण्यास आले. युधिष्ठिराने त्यांचे यथोचित स्वागत करुन खुशाली विचारली. नारद म्हणाले की ते गंगातीरावरील तपोवनास भेट देऊन आले आहेत. तेव्हां युधिष्ठिराने विचारले'' आपण माझ्या काकांना भेटलात का? ते सुखी आहेत ना? गांधारी, कुंती, संजय कसे आहेत?''

तेव्हां नारद म्हणाले'' युधिष्ठिरा! तुम्ही तेथून निघाल्यावर धृतराष्ट्र, गांधारी व कुंती कुरुक्षेत्राहून गंगाद्वारास गेले. संजय व याजक ब्राह्मण अग्निहोत्र घेऊन गेले. गंगाद्वाराजवळ तुझ्या काकांनी सहा महिने केवळ वायुभक्षण करुन कठोर तप केले. गांधारीने केवळ जलग्रहण केले. कुंतीने मासोपवासाचे व्रत घेतले. संजय एकभुक्त झाला. याजक अखंड अग्निहोत्र करत राहिले.

यानंतर धृतराष्ट्र कोणाचाही विचार न करता रानावनांत फिरु लागले. गांधारी, कुंती त्यांच्यामागे जात राहिल्या. कुंती गांधारीची सतत काळजी घेत असे. तेवढ्यांत एक दिवस धृतराष्ट्र गंगास्नान करुन आश्रमाकडे परत येत असताना जोराचे वादळ सुरु झाले. जोराने वाहाणाऱ्या वाऱ्यांमुळे साऱ्या जंगलात आग पसरली.

आग आपल्याजवळ येत आहे हे जाणून धृतराष्ट्र संजयाला म्हणाला ''तू ह्या क्षणीं ज्या दिशेला आग नाही त्या बाजूला जा. आम्ही या आगीत भस्म होऊन उत्तम लोक प्राप्त करुं. आमचा विचार आता कोणी बदलू शकत नाही. तुला माझ्या या शेवटच्या आज्ञेचे पालन केलेच पाहिजे.''

संजय मोठ्या काळजीने म्हणाला ''हे राजन, तुम्ही अग्नींत भस्म होणे मला मान्य नाही. आगीने आपल्याला चारी बाजूंनी वेढले आहे. आता काय करायचे?''

''संजय, तपस्वी लोक वायू, अग्नी किंवा जल, ह्यातील कुठल्याही कारणाने मरण्यास तयार असतात. तू उशीर न करता येथून निघून जा''. धृतराष्ट्राने त्याला आज्ञा केली.

संजयाने धृतराष्ट्र, गांधारी व कुंतीला भक्तिभावाने प्रदक्षिणा घालून योगसमाधी लावण्यास सांगितले. तिघांनी तसेच केले. त्यांची शरीरे काष्ठवत झाली. संजय दावानलातून बाहेर पडून गंगातटावर पोचला. आणि नारदांना भेटला. धृतराष्ट्र, गांधारी व कुंती दावानलात भस्मसात झाले. ही गोष्ट नारदांना सांगून संजय हिमालयात गेला.

ही बातमी कळताच पांडवांबरोबर सारे हस्तिनापुर शोकांत बुडाले. तेव्हां नारदांनी युधिष्ठिराला समजावले की दावानलांस कारण झालेला अग्नी धृतराष्ट्राचाच आहे. आपल्याच अग्नीने मृत्यू पावलेला धृतराष्ट्र उत्तमलोकी गेला आहे.

युधिष्ठिराने गंगातटी जाऊन मृत व्यक्तींसाठी जलतर्पण केले. नंतर श्राद्ध करुन बाराव्या दिवशी दानधर्म केला. महाभारत युद्धानंतर अठरा वर्षांनी धृतराष्ट्र मृत्यू पावला. त्यांतील शेवटची तीन वर्षे त्यांनी वनवासात घालविली.

धृतराष्ट्राच्या मृत्यूनंतर युधिष्ठिराने आणखी अठरा वर्षे राज्य केले. त्या काळांत त्यांना अजून एक भयंकर बातमी कळली की एका मुसळामुळें समस्त यादवकुळ नष्ट झाले आहे. केवळ श्रीकृष्ण व बलराम वाचले आहेत.

युधिष्ठिराने आपल्या भावांना बोलावून विचारले की ''असं कानावर आले आहे की समस्त यादव आपसांत लढून मारले गेले आहेत. आता आपण काय करावे?''

यादवांच्या नाशाचे कारण असे होते की एकदा विश्वामित्र, कण्व, व महर्षी नारद द्वारकेस गेले. त्यांना येताना बघून सारण इत्यादी यादवांनी सांबाला स्त्रीवेष धारण करुन मुनींना सांगितले ''ही तर गर्भवती आहे. हिच्या पतीला मुलगा हवा आहे. आपण सांगा कीं काय होणार आहे?''

तेव्हां मुनींनी सांगितले ''सगळ्या यादवांचा नाश करणारे मुसळ ह्याच्या गर्भातून जन्मेल''

ह्या नंतर मुनींनी कृष्णाचे दर्शन करुन त्याला घडलेली हकिगत सांगितली. कृष्णाने हा वृत्तांत ऐकून मनाशी निश्चय केला की मुनींचा शाप खोटा ठरणार नाही. व्यर्थ जाणार नाही. **(क्रमशः)**





# महाराणीचा स्वयंपाक

जगदीश्वरीदेवी राजा वीरसेनाची पट्टराणी होती. दोघे जनतेचा आदर्श बनून राज्य करत होते.

एका कार्तिक महिन्यातल्या पौर्णिमेला राजाराणी फिरायला समुद्राकांठी गेले. समुद्रकिनारी एक झोपडी होती. त्यात एक कोळ्याचे जोडपे रहात होते.

या वेळी ते दोघे एका बाजेवर बसून जेवत होते. कोळ्याने पातेल्यातून भाजी आपल्या ताटांत वाढून घेतली. आणि म्हणाला ''लच्छे, तुझ्या हातचे जे कांही खाणे बनते ना, ते अगदी अमृतासारखे लागते. माश्याचे हे कालवण काय चवदार झालंय बघ. झिंग्याची ही आमटी वा! किती कौतुक केले तरी ते कमीच आहे''. तो आपल्या बायकोची स्तुती करतच होता.

कोळ्याची बायको नवऱ्याच्या स्तुतीवर खूष होऊन सांगू लागली'' उद्या तुमच्यासाठी माशाचे असे कालवण बनवते की एकदा खाल्ले, की तुम्ही रोज तेच पाहिजे म्हणून हट्ट कराल''. तिच्या आवाजात आनंदीआनंद भरला होता.

हे दृष्य राणीच्या मनावर पक्के ठसले. तक्षणी तिने असा निश्चय केला, की ती भविष्यांत असे जेवण बनवेल, की जे खाऊन तिचे पती वीरसेन तिचे आभाळायेवढे कौतुक करतील.

दुसऱ्याच दिवशी तिने सर्व स्वैपाक्यांस स्वयंपाकघरातून बाहेर काढले. आणि कष्ट करुन स्वतः स्वयंपाक केला. तिने केलेले पदार्थ आचाऱ्याने राजाला वाढले.

राजाने जेवायला सुरवात करण्याआधीच राणी म्हणाली ''आयुष्यांत प्रथमच मी स्वतः तुमच्यासाठी स्वयंपाक केला आहे. चव घेऊन स्वयंपाक कसा काय झाला आहे ते आपण सांगा''.

राणीने बनविलेले पक्वान्न राज्याच्या पोटात जाते न जाते तोच त्याला ओकारी येऊं लागली. वरणांत मीठ नाही, तर भाजीत तिखटच-तिखट. आणि तीही करपलेली, खिरीचे दूध फाटलेले होते. पण त्याला राणीला निराश करायचे नव्हते. तिचे मन दुखवायचे नव्हते. म्हणून तिच्या जेवणाची स्तुती करत राजा म्हणाला'' तुझ्या जेवणाची चव अमृतासारखी आहे. मला स्वप्नांतसुद्धा वाटले नव्हते की तूं इतके स्वादिष्ट जेवण बनवू शकतेस''.

ह्या प्रशंसेने राणीच्या आनंदाला पारावार उरला नाही. जेव्हां ती जेवूं लागली तेव्हां तिला एकही पदार्थ चविष्ट लागला नाही.तरीपण तिने ठरविले की जर आपल्या पतीला आपले जेवण आवडले असेल तर आपल्याला थोडाफार त्याग केला पाहिजे. तिने राजाला सांगितले. ''इथूनपुढे मीच स्वयंपाक करीन, त्याला अमृत समजून आपण खात रहा''.

तिचे बोलणे ऐकून राजा मोठ्या संकटात सांपडला. त्याला आपल्या घशांत कांहीतरी अडकल्यासारखे वाटूं लागले. रोज राणीच्या हातचे जेवण जेवण्याच्या कल्पनेने तो भयभीत झाला. आणि म्हणाला ''महाराणी, तुला इतके कष्ट करायची काय जरूर आहे?'' त्याने तिला समजावण्याचा प्रयत्न केला.

पण राणीने राजाचे बोलणे थांबवून म्हटले, ''पतीसाठी स्वयंपाक करायला कष्ट कसले? कोणत्याही भारतीय नारीला असे वाटणें शक्यच नाही.'' तिने साफ साफ सांगितले. त्या दिवसापासून राजा मोठ्या अडचणींत पडला. राणी रोज वेगवेगळी पक्वान्नें बनवून त्याला जबरदस्तीने खायला घालते आहे, अशी त्याला स्वप्नें पडूं लागली. एका आठवड्यात त्याला आयुष्य व्यर्थ वाटूं लागले.

या कठीण गंभीर समस्येतून सुटण्यासाठी त्याला एकही योग्य मार्ग सापडेना. शेवटी त्याने दरबारांतल्या बलराम विदूषकाला बोलावून म्हटले, ''बलराम, राणीच्या स्वयंपाकाच्या संकटातून तूंच मला वांचवू शकतोस. जे काय करायचे आहे, ते लवकर कर. आणि मला ह्यांतून सोडव''.

''महाराज, घाबरूं नका. चक्रवर्तींच्या जन्मोत्सवांत भाग घेऊन चार, पांच दिवसांत परत येतो. लागलीच या भीतिच्या जंजाळातून आपल्याला सोडवून आपले रक्षण करीन'' विदूषक राजाला धीर देत म्हणाला.



चक्रवर्तींचा जन्मदिवस व वीरसेनच्या पित्याचा श्राद्धदिवस एकाच दिवशी येत असत. ह्या कारणाने राजाने चक्रवर्तींच्या जन्मदिन उत्सवांत कधीही भाग घेतला नाही. पण यावर्षीच्या उत्सवाचे एक वैशिष्ठ्य होते, की त्यांच्या विवाहानंतर हा पहिला जन्मदिन साजरा होणार होता. म्हणून मोठ्या प्रमाणावर साजरा केला जाणार होता. लोकांचे असे म्हणणे होते की चक्रवर्तींची पत्नी फार सुंदर आहे.

उत्सवांत भाग घेऊन परतल्यावर बलराम विदूषकाला राणी जगदीश्वरीदेवीने आपल्या अंतःपुरात बोलावून घेतले. ती हे जाणून

'मीरा सिंह'

घेण्यासाठी उत्सुक होती की चक्रवर्तींची बायको किती सुंदर आहे?

"उत्सव काय मोठ्या प्रमाणावर साजरा केला कां? असं ऐकले की चक्रवर्तींची पत्नी फार सुरेख आहे. हे खरं का?" राणीने विदूषकाला विचारले.

विदूषकाने निराश झाल्यासारखे दाखवून म्हटलें "खरं म्हटलं तर आपल्या चेहेऱ्यावर जे तेज, झळाळी आहे ते मशाल घेऊन शोधले तरी कुठे सापडणार नाही. आपले सौंदर्य सहज आहे. त्यांचे सौंदर्य दागिन्यांमुळे आहे, ते कृत्रिम आहे. मला वाटतं की आजकाल आपण जास्त वेळ स्वयंपाकघरात घालवीत आहात. ही गोष्ट आपल्याला अगदी नवीन आहे. धुरामुळे आपल्या चेहेऱ्यावरचे तेज कमी होत आहे. डोळे लाल दिसत आहेत. आपल्या कांतीचा रंग बदलत आहे."

हे ऐकून राणीचा चेहरा पडला. स्वतः स्वयंपाक केल्याने चेहेऱ्यावरचे तेज कमी होते आहे, हे ऐकून तिला वाईट वाटले.

राणीच्या चेहेऱ्यावर बदलणारे भाव बारकाईने बघत विदूषक होता. तो म्हणाला, "महाराणी, चक्रवर्तींच्या पत्नीचे एक वैशिष्ट्य आहे. त्याबद्दल आपल्याला सांगितलेच पाहिजे."

राणीने तावडतोब विचारले "ते काय आहे?"

"उत्सवासमयी चक्रवर्ती दांपत्याने सर्वांच्या बरोबर बसून जेवण केले. तेव्हां चक्रवर्तींच्या बायकोने तिथे ठेवलेल्या चोवीस पक्वान्नांतील, पतीला आवडणारी पक्वान्नें निवडून स्वतःच्या हाताने वाढली. तिला असे वाढताना पाहून चक्रवर्ती मनांतल्या मनांत तिची प्रशंसा करु लागले. कारण राणी त्यांच्या आवडीचे जेवण त्यांना वाढत होती. असं ऐकलं की अंतः पुरातल्या बायका स्वयंपाकघरांकडे ढुंकूनदेखील बघत नाहीत. त्या नातेवाईकांना व पतीला फक्त जेवायला वाढायचे काम करतात."

विदूषक म्हणाला.

त्या दिवसापासून राणीने स्वयंपाक करणे सोडले. आचाऱ्यांनी बनवलेले पदार्थ ती स्वतः राजाला वाढू लागली.

राजाचे कष्ट असे दूर झाले. आता त्याचे आनंदाचे दिवस आले होते. खूष होऊन राजाने विदूषकाला ह्या कामाबद्दल एक मोत्यांचा हार भेट दिला.









## या महिन्यांत जन्मलेली श्रेष्ठ व्यक्ति

### पी.सी. महालनोबिस

तुम्ही जर संख्याशास्त्राचे प्रेमी, विद्यार्थी, किंवा अभ्यासक असलात, तर तुम्ही बहुविध विश्लेषणांत नमुन्यांचे पृथक्करण करणें आणि त्यांचे वेगवेगळे घटक यांची शास्त्रशुद्ध पाहाणी करणे, याबद्दल ऐकलं असेलच.

जमवलेल्या माहितीची मोजणी करणे व त्याची सांगड घालणें ही सखोल पद्धत एका भारतीयाने - प्रसंतचंद्र महालनोबीस यांनी शोधून काढलेली आहे.

या महान शास्त्रज्ञाने भारताला संख्याशास्त्राच्या जगतात, मानाचे पान दिले आहे. त्यांचा जन्म २९ जून १८९३ रोजीं झाला. कलकत्ता विद्यापीठांतून त्यांनी बी. एस.सी. (ऑनर्स) ही पदवी घेतली, आणि इंग्लंडमधल्या केंब्रिज विद्यापीठांतून गणितांत एम्.ए.ची पदवी घेतली. या काळांत त्यांची योगायोगाने संख्याशास्त्राशी ओळख झाली.

त्यांचे गुरु डब्ल्यू.एच्. मॅकॉले यांनी त्यांना 'बायो-मेट्रिका आणि बायोमेट्रिक टेबल्स्' ह्या नुकताच प्रसिद्ध झालेला ग्रंथ वाचण्यास सांगितले. त्यांच्या गुरुंचा अंदाज अचूक ठरला. या ग्रंथांमुळें महालनोबीस अगदी भारावून गेले, आणि त्या विषयांत त्यांनी रस घेण्यास सुरुवात केली. १९१५ सालीं ते भारतांत परतले. त्यांनी कलकत्त्याच्या प्रेसिडेन्सी कॉलेजमधें लेक्चररची नोकरी घेतली. आणि उरलेल्या वेळांत त्यांचा संख्याशास्त्राचा अभ्यास चालूं राहिला.

१९१७ सालीं कलकत्ता विद्यापीठांतल्या विद्वान शिक्षणतज्ज्ञांनी परीक्षांच्या पद्धतींत बदल करण्याचे ठरवले, तेव्हां त्यांनी महालनोबीस यांची मदत मागितली. संख्याशास्त्रांतल्या नवीन चिकित्सापद्धतीचा निकष त्यांनी प्रश्नपत्रिका, विद्यार्थी व प्राध्यापक या सर्वांना, महालनोबीस यांनी लावला व या समस्येचा खोलवर अभ्यास केला.त्यावरुन यांनी कांही निष्कर्ष काढले व सूचना के [illegible] परीक्षांच्या पद्धतींत बदल करण्यांत आले. तेव्हांपासून मानववंश शास्त्र, लोकसंख्याशास्त्र, रोगराईचे शास्त्र आणि हवामानशास्त्रासारख्या निरनिराळ्या विषयांवर त्यांचा सल्ला घेण्यांत येऊं लागला.

१९३९साली त्यांनी इंडियन स्टॅटिस्टिकल इन्स्टिट्यूटची स्थापना केली.

१९५० सालीं जेव्हां योजनासमिती स्थापन झाली तेव्हां त्या समितीचे अध्यक्ष पंतप्रधान नेहरु होते आणि महालनोबीस उपाध्यक्ष होते. 'महालनोबीस अंतर' हे



त्यांचं जगाला सर्वांत मोठं योगदान आहे. पृथ्वीच्या पाठीवरच्या कोणत्याही दोन भौगोलिक स्थानांमधले अंतर मोजण्यासाठीं याचा वापर केला जातो.

१९४९ मधें महालनोबीस इंडियन नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ स्टॅटिस्टिक्स चे अध्यक्ष झाले, व त्यांनी राष्ट्रीय नमुन्यांचे सर्वेक्षण करण्याचे काम सुरु केले. १९४५ मधें ते रॉयल सोसायटीचे सदस्य म्हणून निवडून आले. त्यांना १९६८ मधें त्यांच्या शास्त्रीय कामगिरीबद्दल पद्मविभूषण हा बहुमान दिला गेला. २८ जून, १९७२ रोजीं त्यांचे निधन झाले.



# विजयी कोण?

मगधराजाच्या दोन बायका होत्या. दोघींनीही एकाच दिवशी एकाच वेळी, एकेका मुलाला जन्म दिला. एकाचे अमरसिंह व दुसऱ्याचे जयसिंह, अशी त्यांची नांवे ठेवली. दोन्ही मुले रुप ताकदीत एकमेकांपेक्षां कमी नव्हती. सर्व विद्यांत दोघेही सारखेच पारंगत होते. युद्धकलांत देखील दोघे तितकेच कुशल होते.

पण दोघांत एक फरक होता. अमरसिंह घोडेस्वारी व खड्‌गयुद्धांत निपुण होता. तर जयसिंह हत्तीवर स्वार होण्यात व मल्लयुद्धांत निपुण होता. दोघांचे एकमेकावर अतोनात प्रेम होते.

राजा म्हातारा झाला होता. त्याला हाच विचार सतावत होता. की दोघांमधील कोणाला गादीवर बसवावे? दोघांचा जन्म एकाच दिवशी झाला होता. त्यामुळे लहानमोठे असण्याचा प्रश्नाच नव्हता. राज्याचे दोन तुकडे करणे पण शक्य नव्हते.

म्हणून त्या दोघांच्या योग्यतेची, लायकीची परिक्षा घेऊन जो अधिक योग्यतेचा आहे. त्याच्यावर राज्य सोपविणे योग्य होते. राजा व मंत्री खूप दिवस ह्या गोष्टीवर विचार करत होते. परन्तु दोन्ही राजकुमारांत अधिक योग्य कोण आहे ह्याचा निर्णय ते घेऊं शकले नाहीत.

राजा व मंत्री राज्याच्या वारसाबद्दल विचार करत आहेत ह्याची दोन्ही राजकुमारांना जरासुद्धा जाणीव नव्हती.

त्याचवेळी कौशिक देशाच्या राजकुमारीचे स्वयंवर आयोजित केले होते. त्यासाठी अशी घोषणा केली होती, की



ह्यावेळी विविध स्पर्धा होतील. आणि सर्व स्पर्धांमध्ये ज्याला यश मिळेल त्याच्याबरोबर राजकुमारीचा विवाह होईल.

ही बातमी ऐकल्यावर राजा व मंत्रींनी दोन्ही राजकुमारांना स्वयंवराला पाठविण्याचे ठरविले. त्यांना अशी खात्री होती की तेथे कोण जास्त योग्य आहे हे निश्चितपणे कळेल.

आपल्या वडिलांच्या आज्ञेप्रमाण अमरसिंह व जयसिंह दोघे कौशिक राजकुमारीच्या स्वयंवरात भाग घेण्यास गेले.

स्वयंवरासाठी अनेक देशांचे राजकुमार आले होते. अमरसिंह व जयसिंहाने त्या सर्वांशी वेगळी वेगळी स्पर्धा केली, व त्यांना हरवून दोघे सारखेच विजयी झाले.

शेवटी त्या दोघांच्यात स्पर्धा झाली, तेव्हां अश्वारोहण व खड्गयुद्धात अमरसिंह विजयी झाला, तर मल्लयुद्ध व हत्तीवर स्वार होण्यात जयसिंह विजयी झाला. अशा तऱ्हेने दोघांच्या विजयांची संख्या सारखीच झाली.

या दोन्ही युवकांपैकी कोणाशी आपल्या मुलीचा विवाह करायचा ह्याचा निर्णय कौशिकराजाला देखील करता येईना.

आपला निर्णय आपण तीन दिवसांनी सांगू असे म्हणून त्याने सर्व राजकुमारांना त्यांच्या निवासस्थानी पाठविले.



नंतर कौशिकाने आपल्या मंत्र्यांशी सल्लामसलत करुन एक दवंडी पिटली. की जो युवक अमरसिंह व जयसिंहामधे कोण अधिक योग्य आहे हे सांगेल, त्याच्याशी राजा, आपल्या दुसऱ्या मुलीचा विवाह करेल. व त्याला अर्धे राज्य देईल.

दुसऱ्या दिवशी एक मुनी आपल्या शिष्याला घेऊन दरबारांत आले व म्हणाले "राजा, तुझ्या मुलीच्या विवाहासंबंधी तुला जो प्रश्न पडला आहे, त्याचे उत्तर माझा हा शिष्य देईल."

राजाने विचारले "मुनीवर्य, हा प्रश्न कसा सुटेल?"

तेव्हां शिष्य म्हणाला "राजा अमरसिंह घोडेस्वारी व खड्गयुद्धांत प्रवीण आहे. पण मल्लयुद्ध व हत्तीवर स्वार होण्यात तेवढा पारंगत नाही. हत्तीवर स्वार झालेल्या खड्गधारी योद्ध्यापेक्षां घोड्यावर स्वार झालेल्या वीराला कांहीही करता येत नाही. म्हणून जयसिंहापेक्षा अमरसिंह अधिक योग्य आहे."

हा विचार सर्व लोकांना पटला. राजाला पण समाधान वाटले की त्याची एक मोठी चिंता दूर झाली.

तेवढ्यात मुनी व त्यांच्या शिष्याने आपले नकली वेष काढून टाकून आपले खरे रुप प्रगट केले. मुनींचा वेष अमरसिंह तर शिष्याचा वेष जयसिंहाने घेतला होता.

कौशिकराजाने आपल्या दोन्ही राजकन्यांचा विवाह दोन्ही राजकुमारांशी करुन जयसिंहाला अर्धे राज्य दिले. ह्याबरोबरच मगधराजाचा पण प्रश्न सुटला. नंतर मगधराजाने अमरसिंहास राज्याभिषेक केला.



वेताळ कथा

# गंधर्व कन्येचे वरदान

दृढ निश्चयी राजा विक्रमार्क परत त्या पुराण्या वृक्षाजवळ गेला. वृक्षावरील प्रेत खाली उतरवून त्याने आपल्या खांद्यावर टाकले. आणि स्मशानाकडे चालू लागला. तेव्हां प्रेतातील वेताळ म्हणाला ''राजा, तुझी ही वाईट परिस्थिती पाहून मला तुझी दया येते आहे. मला असं वाटतंय की तू माझ्या सहानुभूतीचा चुकीचा अर्थ काढतो आहेस. मी तुझा हितचिंतक आहे. इतक्या अंधाऱ्या रात्री तू एवढा त्रास सहन करावास असं मला वाटत नाही. कुठल्याही क्षणी भूतंखेतं झपाटतील. किंवा कुणी दुष्ट प्राणी तुला खाऊन टाकून आपली भूक भागवतील. माझं ऐक, हा आपला हट्ट सोड. आणि आपल्या गांवी परत जा. तुझे इतके



कष्ट बघून मला 'प्रबोध चित्रकाराची' आठवण झाली. तो पण तुझ्यासारखाच मानसिक रोगाला बळी पडला होता. दुसऱ्याचे नुकसान न होता स्वतःचे केले होणाऱ्या कुठल्याही गोष्टीला स्वार्थ म्हणत नाहीत. हेच तत्व न समजल्यामुळे अगदी शेवटपर्यन्त तो अनेक कष्ट सहन करत राहिला. त्या चित्रकाराची गोष्ट ऐक. आणि मग आपल्या कर्तव्याविषयी निर्णय घे. मला आशा आहे की तुला थोडी तरी सुबुद्धी येईल''. असे म्हणून वेताळ गोष्ट सांगू लागला.

वैशालिनी राज्यांत प्रबोध नांवाचा एक चित्रकार राहात होता. चित्रकलेत तो निपुण होता. त्यांची चित्रें सुंदर आणि जिवन्त वाटत असत. परंतु दुर्दैवाने सामान्य जनतेला त्याच्या चित्रांची कांहीच कदर नव्हती. त्यामुळे त्याला आपला संसार चालविणे अत्यंत कठीण होत होते. कुटुंबातल्या लोकांना पोटभर खायला देणे सुद्धा मुश्किल होते.

तरी पण तो बदलायला तयार नव्हता. कांही दुसरे काम करुन पैसा मिळविण्याची त्याची तयारी नव्हती. सगळे कुटुंब त्याच्यावर अवलंबून होते. आपल्या कुटुंबाची दुर्दशा पाहून त्याला फार दुःख होई. बायकोमुलांना उपाशी बघून त्याला चैन पडत नसे. ह्या सगळयांवर विचार करुन त्याने आपले सारे कसब पणाला लावून एक सुंदर चित्र काढायचे ठरविले.

त्याला असे वाटत होते की हे चित्र राजकुमाराला दाखवावे, राजा नुकताच मरण पावल्यामुळे लवकरच राजकुमार राजा बनणार होता.

थोडयाच दिवसांत त्याने आपली सारी कला पणाला लावून एका सुन्दर अद्‌भुत स्त्रीचे चित्र काढले. ते चित्र घेऊन तो राजधानीत गेला. राजकुमाराला भेटायचे त्याचे सर्व प्रयत्न असफल झाले. त्याला वाटले दुर्भाग्य कांही त्याची पाठ सोडायला तयार नाही. ह्यातून सुटकेचा कांही मार्ग नाही.

त्या रात्री प्रबोध एक धर्मशाळेत राहिला. तेथे राहाणाऱ्या दुसऱ्या प्रवाशांनी त्याचे चित्र पाहून त्याचे खूप कौतुक केले. पण त्यांच्या कौतुकाने त्याला जास्तच वाईट वाटले. आपल्या असहाय स्थितीचे तो मनातल्या मनांत दुःख करीत होता.

त्या रात्री एक प्रवासी उशीरा धर्मशाळेंत आला. तो तरुण होता. रुबाबदार होता. दिसायला सुंदर होता. त्याने दुसऱ्या प्रवाशांकडून प्रबोधच्या चित्राचे कौतुक ऐकले म्हणून त्याला पण ते चित्र बघण्याची इच्छा झाली. प्रबोधने त्या तरुणाला ते चित्र दाखविले.

चित्रांतल्या त्या स्त्रीचे सौंदर्य पाहून तो क्षणभर



स्तब्ध झाला. मंत्रमुग्ध होऊन कांहीवेळ एकटक त्या चित्राकडे तो बघत राहिला. बोलता बोलता त्याला कळलें की प्रबोधला राजाला भेटता आले नाही. तो म्हणाला ''चित्रकलेतले तुझे नैपुण्य प्रशंसनीय आहे. माझ्या बरोबर येशील तर मी तुझी राजाशी गांठ घालून देईन''.

प्रबोधला आणखी काय हवे होते? तो त्या तरुणाबरोबर गेला. तो तरुण त्याला सरळ राजवाडयांत घेऊन गेला. त्याला एका दालनात बसवून तो आत गेला व राजाच्या वेषांत परत आला. प्रबोधच्या लक्षांत आले की हा तरुण दुसरे कोणी नसून स्वतः राजकुमारच आहे. प्रबोध त्याला वंदन करुन म्हणाला ''माफ करा, पण धर्मशाळेंत मी आपल्याला ओळखूं शकलो नाही.''

राजकुमार अभिषिक्त हंसत म्हणाला'' राज्यांत काय घडामोडी चालू आहेत हे समजून घेण्यासाठी मी वेषांतर करुन फिरत असतो. कुणी माला ओळखूं नये म्हणून सामान्य माणसासारखे कपडे घालतो. आता हे तुझे चित्र| ह्यातील या सुंदरीने माझे मन मोहून टाकले आहे. तिच्याशींच मी विवाह करण्याचा निश्चय केला आहे. तू मला तिची माहिती दिलीस तर मी तुला दहा हजार मोहोरा बक्षिस देईन''.

''राजकुमार हे नुसतेच रंगविलेले चित्र आहे. ही कुणी जिवन्त सुंदरी नाही. ही माझी केवळ कल्पना आहे.'' प्रबोध म्हणाला.

अभिषिक्त परत म्हणाला ''प्रबोध, मलासुद्धा चित्रकलेचे थोडेफार ज्ञान आहे. कुठलेही चित्र पाहून मी सांगू शकतो की हे जिवन्त माणसाचे आहे, की काल्पनिक आहे. माझ्यावर विश्वास ठेव. तिच्याबद्दल तू जी माहिती देशील ती मी गुप्त ठेवीन.



खरंच सांग ही सुंदरी कोण आहे? कुठे आहे?''

अभिषिक्तांचे बोलणे ऐकून प्रबोध घाबरुन गेला. आणि म्हणाला ''मी आपल्याला जे सांगितले ते खरं आहे. हे चित्र केवळ माझी कल्पना आहे.''

त्याच्या या उत्तराने नाराज झालेल्या अभिषिक्ताने सैनिकांना बोलावून सांगितले, ''या मूर्खाला पर्वताच्या कडयावर घेऊन जा. याचे डोके उडवून खाली दरीत फेकून द्या''.

सैनिक प्रबोधला पर्वताच्या कडयावर घेऊन गेले. आपल्या दुर्दशेवर शोक करत ते म्हणू लागला. ''चित्रकलेवर विश्वास ठेवून संकट ओढवून घेतले. आता सुटकेची आशा पण नाही. माझी बायको मुले अनाथ होतील. आता देवच त्यांचे रक्षण करो''.

सैनिक प्रबोधचा शिरच्छेद करणार एवढ्यांत एक स्त्री तिथे प्रगट झाली. तिने सैनिकांना थांबवले आणि त्यांना विचारले'' तुम्ही याला कां मारत आहात?''



सैनिक म्हणाले "राजाची आज्ञा".

तेवढ्यांत प्रबोधने त्या स्त्रीला बघितले. त्याच्या आश्चर्याला सीमा उरली नाही. नकळत त्याच्या तोंडून शब्द बाहेर आले, "तुझ्यामुळेच ही शिक्षा मला मिळाली आहे". त्याच्या बोलण्यावर चकित होत ती म्हणाली, "माझे नांव मणिमालिका आहे. माझी मर्जी असेल तरच मानव मला बघूं शकतात. आजपर्यन्त तू मला बघितलेलेच नाहीस. तर मी तुझ्या शिक्षेचे कारण कसे होईन?"

प्रबोधने आत्तापर्यन्त घडलेली हकिगत तिला सांगितली तेव्हां मणिमालिका म्हणाली, "हे अगदी अजब वाटते आहे. माझे चित्र तू कसे काढलेस? माझा तुझ्या बोलण्यावर विश्वासच बसत नाही."

"मी काढलेले चित्र तू पाहिलेंस तर तुला कळेल की मी जे म्हणतो आहे, ते अक्षरन् अक्षर खरं आहे." प्रबोध म्हणाला.

"जर ते चित्र हुबेहूब माझ्यासारखेच असेल तर तू म्हणशील ते बक्षिस मी तुला देईन". मणिमालिका म्हणाली.

मणिमालिका, प्रबोध बरोबर राजवाडयांत जायला निघाली तेव्हां सैनिकांनी त्यांना अडवले. ते म्हणाले "राजाज्ञेनुसार ह्याचा शिरच्छेद करायलाच पाहिजे. तुम्ही बाजूला व्हा."

त्यांचे बोलणे ऐकून रागाने मणिमालिका म्हणाली" मूर्खांनो मी किती शक्तिशाली आहे हे तुम्हाला माहित नाही. दगड बना!". असे म्हणत तिने त्यांना शाप दिला.

दुसऱ्याक्षणी सर्व सैनिक दगड बनले. मणि-मालिका प्रबोधला घेऊन अदृश्य झाली आणि पळभरांत दोघे राजवाडयांत पोचले.

प्रबोधला तिथे बघताच युवराज अभिषिक्ताने विचारले, "तू कसा सुटून आलास?" दुसऱ्याक्षणी, त्याने मणिमालिकेला बघितले आणि आनंदून विचारले "हीच ना तुझ्या चित्रांतील सुंदरी! शेवटी मला जे वाटलं होतं तेच खरं निघाले. तुझे चित्र सजीव स्त्रीचेच आहे. आता कां होईना तू तिला माझ्या समोर घेऊन आलास हे चांगलेच झाले. हेच काम तू पहिल्यांदा केले असतेस तर किती बरे झाले असते."

तेव्हां मणिमालिका म्हणाली "राजकुमार, ते चित्र मला दाखवा तरी. मला पण ते चित्र एकदा बघूं दे".

अभिषिक्ताने ते चित्र आणून मणिमालेला दाखवले. अगदी आपल्या सारख्या दिसणाऱ्या त्या स्त्रीच्या चित्राकडे बघून चकित होत ती म्हणाली, "राजकुमार, हे चित्र खरोखरच प्रबोधने कल्पनेने काढलेले आहे.कारण माझ्या सारख्या गंधर्वकन्येला प्रबोध बघणे शक्यच नाही."



"तू गंधर्वकन्या अस! नाहीतर आणखी कुणी अस. मला तुझे दर्शन झाले हे मी माझे भाग्य समजतो. कृपया तू माझ्याशी विवाह कर". अभिषिक्ताने प्रार्थना केली.

दृढ स्वरांत मणिमालिका म्हणाली, "मी तुझी इच्छा पुरी करुं शकत नाही. पण प्रबोधला मी जे वचन दिले होते ते मी पूर्ण करीन. तो जे मागेल ते मी त्याला देईन".

अभिषिक्त तावडतोब प्रबोधला म्हणाला, "ही माझ्याशी विवाह करेल असा वर माग. लवकरच माझा राज्याभिषेक होणार आहे. मी तुला जहागीर देउन राजा बनवीन. मी वचन देतो".

मणिमालिकेने त्याला धीर देत म्हटले "प्रबोध, जर मी राजकुमाराशी विवाह करावा अशी तुझी इच्छा असली तर जरूर करीन. मी तो वर तुला देईन. कारण मी दिलेले वचन परत घेणार नाही. निःसंकोचपणाने तुझी इच्छा सांग".

हात जोडून प्रबोध म्हणाला "हे गंधर्व सुंदरी, मला मारणाऱ्या सैनिकांना तू दगड बनवलेस. कृपाकरुन त्यांना परत मनुष्यरूपात आणून जिवंत कर. मला तुझ्याकडून हाच वर हवा आहे."

"तथास्तु" असे म्हणून गंधर्वकन्या अदृश्य झाली. प्रबोधने अभिषिक्ताला प्रणाम करत म्हटले "युवराज, मला माफ करा. मी आपली इच्छा पुरी करुं शकलो नाही. आपण जी शिक्षा द्याल, ती भोगण्यास मी तयार आहे."

अभिषिक्ताने त्याला प्रेमाने आलिंगन दिले. आणि म्हणाला "तुझी चित्रकला खरोखरच अजोड



आहे. अवर्णनीय आहे. तू उच्चकोटीचा चित्रकार आहेस''. अशी प्रशंसा करुन त्याने प्रबोधला विविध अमोल भेटवस्तू देऊन निरोप दिला.

ही गोष्ट सांगून वेताळ म्हणाला ''राजा, प्रबोधने आयुष्यांत किती कष्ट सहन केले. पैसे मिळत नसल्याने तो आपले कुटुंब पोसू शकत नव्हता. शेवटी अभिषिक्ताच्या आज्ञेनुसार मरणारच होता. पण गंधर्वकन्या मणिमालिकेने त्याचे प्राण वाचविले. अशा परिस्थितीत मणिमालिका त्याला हवा तो वर द्यायला तयार असताना, त्याने अपार संपत्ती मागायला हवी होती. त्याऐवजी त्या मूर्खाने दगड बनलेल्या सैनिकांचे प्राण परत मागितले.

हा त्याचा वेडेपणा नाही तर अजून काय आहे? आता अभिषिक्ताचे बघ. त्याला माहित होते, की प्रबोधने वर मागितला असता, तर त्याचा गंधर्वकन्येशी विवाह झाला असता. तरी सुद्धा प्रबोधने असे न करता दगड झालेल्या सैनिकांना वाचविण्यासाठी त्याचा उपयोग केला. ह्या अपराधाची प्रबोधला त्याने कडी शिक्षा द्यायला हवी होती. पण त्याने असे कांही न करता प्रबोधच्या चित्रकलेची प्रशंसा केली व त्याला खूप बक्षिसे दिली. माझ्या मताने हा अभिषिक्ताच्या मनाचा चंचलपणा आहे. माझ्या या शंकांची उत्तरें माहित असून तू ती दिली नाहीस तर तुझ्या डोक्याची शकलें होतील''.

वेताळाच्या शंकेचे निरसन करण्यासाठी विक्रमार्क म्हणाला, ''अभिषिक्ताने प्रबोधला जहागिरीचे आमिष दाखविले पण तो त्यापासून दूर राहिला. त्याने सैनिकांचे प्राण वाचविले. तो कलेतून मिळालेल्या पैशानेच आपल्या कुटुंबाला सुखी करुं इच्छितो. पण मिळालेल्या वराद्वारे संपत्ती कमवायची व सुख भोगण्याची त्याची अजिबात इच्छा नाही. हेच खऱ्या कलाकारांचे लक्षण आहे. त्याच्या स्वभावाचे दर्शन आहे. त्याला त्याचा वेडेपणा मानणे अन्यायकारक ठरेल. आता अभिषिक्ताविषयीं बोलू. राजाज्ञेचे पालन करणाऱ्या सैनिकांस मणिमालिकेन नराधम म्हणून दगड बनविले.

त्यामुळे अभिषिक्ताच्या लक्षांत आले की मानव व गंधर्व भिन्न प्रकारचे असून त्यांच्या शक्तीत व व्यवहारात फरक आहे. ह्याचमुळे तो प्रबोधवर न रागवता त्याने त्याने कौतुक केले.''

राजाच्या मौनभंगामुळे वेताळ प्रेतासहित अदृश्य होऊन पुन्हा झाडावर जाऊन बसला.

**(आधारः चिदानंदांची रचना)**



# यक्ष पर्वत

## 6

*(डोंगराळ भागात पोंचलेल्या जीवदन्त व खड्गवर्मा यांना चोर व स्वर्णाचारी दिसले. त्यांच्या मागोमाग हे दोघे डोंगराबर गेले. तेंव्हा एक चोर धावत त्यांच्याजवळ आला,व म्हणाला की जंगलात शिकारीस गेलेल्या त्यांचा सरदार, समरबाहूला जंगली नरभक्षकांनी पकडून कुठेतरी दूर नेले आहे.) पुढे चालू...*

त्या चोराचे बोलणे ऐकून खड्ग व जीवदन्त बुचकळयांत पडले. खूप दिवसांपासून ते जंगलात हिंडत फिरत होते. पण आजपर्यन्त त्यांनी अशा नरभक्षकांना पाहिले नव्हते किंवा त्यांच्याबद्दल कांही ऐकले नव्हते.

जीवदन्त चोराला म्हणाला ''नरभक्षक तुझ्या सरदाराला कच्चा खातील की भाजून खातील हे आपण नंतर बघू. प्रथम तिथे काय घडले हे तू आम्हाला सांग''

''साहेब जंगलात शिकार करताना आम्ही एक हरीण मारले. आणि त्याला खांद्यावर टाकून घरी येत होतो. रस्त्यांत आम्हाला वाघाची डरकाळी आणि एका माणसाचे घाबरलेले ओरडणे ऐकूं आले. आम्ही दोघे तिकडे वळलो. थोडे दूर गेल्यावर आम्हाला दिसले की एक आदिवासी वाघाच्या पायाजवळ मरुन पडला आहे. व वाघाच्या छातीत त्याने भोसकलेला सुरा रुतून बसला आहे. जवळच वाघाचे पिल्लूं अस्वस्थपणे येरझाऱ्या घालतंय'' चोर म्हणाला.

''पुढे काय झाले?'' जीवदन्ताने विचारले.

''आमच्या सरदारांना ते पिल्लूं पाळायचे होते. पुष्कळ प्रयत्नानंतर मी त्याला पकडले. तेवढ्यांत



झाडामागून दहापंधरा लोक आले. त्यांनी अस्वलाची कातडी पांघरली होती. ते आमच्यावर तुटून पडले. व आम्हाला त्यांनी पकडले. त्यांच्या सरदाराने अस्वलाच्या डोक्याचा मुखवटा त्याच्या तोंडावर घातला होता. त्यांनी आमचे सरदार व एका साथीदाराचे हात दोरीने बांधले. व त्यांच्याबरोबर चालण्याचा हुकूम दिला. मला, वाघाच्या पिल्लाला घेऊन त्यांच्या पाठोपाठ येण्यास सांगितले. मी धाडस करुन वाघाच्या पिल्लाला त्यांच्या सरदाराच्या खांद्यावर फेकले; त्याने आपला चेहेरा अस्वलाच्या डोक्याच्या मुखवट्याने झाकला होता.

मी वाघाच्या पिल्लाला सरदाराच्या अंगावर फेकताच त्याने त्याचा गळा पकडला. सरदार स्वतःला वांचवायच्या गडबडीत असताना मी पळून आलो.''

तेवढ्यांत एका उंच खडकावर चढलेला चोर टेहळणी करत खड्गवर्मा व जीवदन्तास म्हणाला, ''पाहुणे साहेब, या डोंगराच्या खालच्या जंगलात खूपसे आदिवासी ढोल वाजवत अस्वलांना नाचवत जात आहेत.

त्यांच्या पुढे आमचा सरदार व माणूस पण आहे. त्यांचे हात बांधलेले आहेत''.

''असं काय?'' असं म्हणत स्वर्णाचारीने डोंगराखाली बघितले.व हात जोडत तो म्हणाला, ''प्रभू, कसेही करा पण समरबाहूचे रक्षण करा.''

''स्वर्णाचारी, त्याला आम्ही जरुर वाचवूं. आता तू इतका गयावया करतो आहेस तेव्हां आम्ही त्याला वांचवायचा प्रयत्न करूं''. जीवदन्त म्हणाला.

त्यानंतर खड्ग व जीवदन्त डोंगर उतरुन खाली जंगलात आले. थोडे पुढे गेले असतील की नाही, तेवढ्यात लांबून येणाऱ्या ढोलांचा आवाज एकदम थांबला. व अरण्यांत एकदम शांतता पसरली.

कांही क्षणांनंतर त्यांना झाडामागून लांडग्याच्या ओरडण्याचा आवाज आला. ते ओरडणे ऐकतांच जीवदन्त म्हणाला, ''कांहीतरी विचित्रच वाटतंय. दिवसा जिथे माणसांचा वावर आहे, तिथे लांडग्यांचे हे ओरडणे कसे?'' असं म्हणत तो झाडाच्या मोठ्या फांदीवर उभे राहून तो पुढे बघूं लागला.





खड्ग, जीवदन्ताला समोर लागवडीची जमीन दिसली. जिथे वेगवेगळी झाडे, पालेभाज्या लावलेल्या होत्या. बाकीच्या जागेत फळें लगडलेली झाडे होती. हे दृष्य बघताना फारच सुंदर होते. चार लोक भाज्यांना पाणी घालत होते. अस्वलाची कातडी पांघरलेले दोघेजण झाडाच्या सावलींत बसले होते. त्यांच्या जवळच दोन लांडगे तोंडातून जिभा बाहेर काढून बसले होते.

खड्गवर्मा व जीवदन्त ''आता काय करावे?'' असा विचार करत असतानाच अस्वलाचे कातडे पांघरलेला माणूस झाडांना पाणी घालणाऱ्या माणसांजवळ जाऊन ओरडू लागला. ''अरे गुलामांनो, लवकर काम आटपा!'' हे सांगून तो एका झाडाखाली बसून पेंगू लागला. दुसरा लांडग्याच्या डोक्यावरुन हात फिरवत निद्रानंदात डोलू लागला.

''वा, काय राखणदार आहेत.'' असे म्हणत खड्गवर्मा तलवारीने वार करणार, एवढ्यात भाज्यांना पाणी घालणाऱ्या गुलामातील एक, झुडुपामागून झाडाजवळ पेंगणाऱ्या राखणदाराकडे जाऊं लागला. खड्ग, जीवदन्ताला कळेना की हा काय करणार आहे. त्यांनी बघितलं, की गुलामाने पाण्याच्या मडक्यांतून एक दगड काढून राखणदाराच्या डोक्यांत मारला. राखणदार ओरडत तोंडावर पुढे आपटला. गुलाम तिथून पळूं लागला. ''जीव, आता काय करायचं?'' लांडगे पळणाऱ्या गुलामाच पाठलाग करत आहेत. काय माहिती? ते त्याला पकडू शकतात की नाही? चल, जंगलात थोडं दूर जाऊंया. कदाचित समरबाहूला पकडणाऱ्यांचा तपास लागेल''. खड्ग म्हणाला.

ज्या बाजूने लांडग्यांच्या ओरडण्याचा आवाज येत होता, त्या दिशेकडे निघाले. थोडे दूर गेले असतील तेवढ्यात त्यांना अचानक ताशे वाजंत्री वाजल्याचे ऐकू आले. त्या बाजूस वळल्यावर खड्ग, जीवदन्ताला लांबवर असलेल्या झाडांमागून काळा धूर येताना दिसत होता.

''समरबाहूला मारुन, भाजून खायची तयारी तर चालूं नाही ना?'' शंकीत होत जीवदन्त म्हणाला. ''शक्य आहे! चल, तिकडे जाऊं या'' आतुरतेने खड्गवर्मा म्हणाला.



मग ते दोघे वेगाने त्या बाजूस पळू लागले. कांही क्षणांत ते तिथे पोचले. दोघं एका उंच झाडांवर चढून बघू लागले की अस्वलांचा समुदाय काय करत आहे.

जिथून धूर येत होता त्याच्याजवळ एक भगदाड होतं. जंगलातून ते जे पशुपक्षी मारुन घेऊन होते, त्यांना ते भाजत होते. कांही लोक डफ वाजवत होते. कांही अस्वलांना नाचवून करमणूक करुन घेत होते.

''जीव, हे जे मोठं भगदाड दिसतंय ना, तेच त्यांचे राहाण्याचे ठिकाण असावे. भगदाडांत उतरायला पायऱ्या पण आहेत. हे चोर समर-बाहूला मारुन खाताना तरी दिसत नाहीत.'' खड्गवर्मा हसत म्हणाला.

हे दोघेजण बोलत असताना टोळींतल्या एका सदस्याने समरबाहू व त्याच्या साथीदाराला त्यांच्या गुरुपुढे उभे केले. आणि हात जोडून तो म्हणाला ''गुरु भल्लूक, हे दोघे मला जंगलात सांपडले. हे चांगले शूर दिसतात. कारण त्यांना पकडायला मला बरेच कष्ट घ्यावे लागले.''

गुरु भल्लूक सभामंडपासारख्या गोल सपाट जागेवर दगडात बनवलेल्या आसनावर बसला होता. त्याने आपला चेहेरा अस्वलाच्या मुखवट्याने झांकून घेतला होता. त्यामुळे त्याचा चेहेरा दिसत नव्हता. आसनाच्या दोन्ही बाजूस दोन भयानक लांडगे तोंड उघडून बसले होते.

अस्वलांच्या टोळीच्या सरदाराचे बोलणे ऐकल्यावर तो समरबाहूला न्याहाळत म्हणाला ''अरे, तुझा वेष पाहून तू नगरांत राहाणारा दिसतोस, या जंगलात तुझं काय काम?'' त्याने उच्च स्वरांत विचारले.

समरबाहू म्हणाला, ''मी सिंधच्या वाळवंटातून आलो आहे. माझे हजारों सेवक आहेत. ते तुमचा व तुमच्या भगदाडांतील घराचा नाश करुं शकतात''. गंभीर आवाजात तो निर्भयपणे म्हणाला.

''वीररसाने भरलेले तुझे बोलणे ऐकायला चांगले वाटते.पण हे चांगले समजून घे, की हे भगदाडांतील घर नसून हा भगदाडांतील किल्ला आहे. तुझे सैनिक इथे पोंचण्याआधीच माझे भल्लूक सैनिक व माझे लांडगे त्यांना खाऊन



टाकतील. माझ्या समोर बढाया मारुं नकोस. वायफळ बडबड करुं नकोस. मी तुला व तुझ्या शिष्यांना पकडून माझे गुलाम बनवीन. आणि तुमच्याकडून शेतीची कामें करुन घेईन.'' गुरु भल्लूक म्हणाला.

त्याने आपले बोलणे पूर्ण करण्याआधीच त्याचे दोन सेवक पळत तिथे आले आणि समरबाहूला बघून तिथेच थांबले. गुरु भल्लूक त्यांना म्हणाला ''बोला, काय म्हणणे आहे? थांबलात का? हा कैदी आपल्याला कांही अपाय करुं शकत नाही. जे कांही सांगायचे आहे, ते बेधडक सांगा. यांना मी आता लांडग्यांच्या दगडांजवळ पाठविणार आहे.''

''गुरु भल्लूक, फार महत्वाची गोष्ट आहे'' असे म्हणून ते त्याच्याजवळ आले व त्यांनी त्याच्या कानांत कांहीतरी सांगितले. दुसऱ्याचे क्षणी गुरु भल्लूकाने समरबाहूला पकडून आणलेल्या सरदारावर गुरकावत म्हटले ''तुझी अक्कल काय केळी खायला गेली होती? ठीक आहे. या दोघांना याक्षणींच लांडग्यांच्या दगडाजवळ घेऊन जा. व तिथेच सोडून या. त्यांच्या हाताला बांधलेल्या दोऱ्या सोडून टाका.''

गुरु भल्लूकाच्या हुकुमाप्रमाणे सैनिक त्या दोघांना तिथून घेऊन गेले. ते तिथून गेल्यानंतर भल्लूक आपल्या साथीदारांना म्हणाला, ''या नव्या दोघांजणांना आपल्या भगदाडांतील किल्ल्याबद्दल माहिती झाली आहे. ते दोघे मला



जिवन्त कैदी हवेत''. ''जशी आपली आज्ञा''. असे म्हणत त्याचे दहा पंधरा सैनिक भगदाडांतील किल्ल्याकडे वळले.

झाडावरुन उतरत जीवदन्त खड्गवर्माला म्हणाला ''खड्ग, आपल्याला जे बघायचे ते बघितले. खूप भूक लागली आहे. इथे कुठल्यातरी तळयांत आंघोळ करुंया. आणि फळें खाऊं. रात्र झाल्यावर किल्ल्यांत कसा प्रवेश करता येईल ते पाहूं.''

खड्गवर्मा कांही न बोलता झाडावरुन खाली उतरला. आणि ते दोघे तळयाजवळ पोचले. तळयाच्या चारीबाजूस झाडी आणि मोठे वृक्ष होते. त्यांनी अशा कांही पावलांच्या खुणा बघितल्या, की त्यामुळे जंगली जनावरे इथें पाणी पिण्यासाठी येत असली पाहिजेत, हे त्यांच्या लक्षांत आले.



"खड्ग, इथून लवकरच आंघोळ करुन निघून जाणेच आपल्या हिताचे आहे. असं दिसतंय की जंगली जनावरे व अस्वलांची टोळीवाले देखील ह्याच तळयांतील पाण्याचा उपयोग करतात" जीवदन्त म्हणाला.

जीवदन्ताचे बोलणे पुरे होण्याआधीच जंगली कोंबडे व कोंबड्या कलकलाट करीत झाडींतून बाहेर आले. त्यांना बघताच खड्गवर्मा म्हणाला, "जंगली कोंबड्यांचे मांस खाऊन खूप दिवस झाले." असं म्हणत त्याने त्यांच्यावर बाण सोडला.पण एकही बाण कोंबडयांना लागला नाही. पण दुसऱ्याक्षणी एका माणसाची किंकाळी ऐकू आली. तो ओरडत होता की "गुरुभल्लूक मेला".

त्याचे ओरडणे ऐकून ते दोन क्षण स्तब्ध राहिले. आणि नंतर झाडीतून ज्याबाजूने किंकाळी ऐकू आली तिकडे गेले. तिकडे अस्वलाचे कातडे पांघरलेला माणूस रक्ताने माखलेला होता व वेदनेने तडफडत होता.

जीवदन्त त्याला म्हणाला "तू कोण आहेस हे तुला बघतांच आम्ही ओळखले आहे. आम्ही जाणूनबुजून तुला मारले नाही. पण तू या झाडींत काय करत होतास?"

तो उत्तर देण्याच्या परिस्थितींत नव्हता. तो इकडे तिकडे झोकांडया खात "गुरु भल्लूक, गुरु भल्लूक" असे बडबडूं लागला. "जीव, हा कोंबडयांना पकडायला झाडींत लपला होता की गुप्तहेराचे काम करीत होता?" खड्ग म्हणाला.

"ह्याचे उत्तर हाच देऊं शकला असता पण ह्याचा आत्मा तर गुरुभल्लूकांला जाऊन भेटला असेल". असे म्हणत जीवदन्त मागे वळला.

नंतर दोघांनी तळयांत आंघोळ केली. जवळच्या झाडाची फळे खाल्ली. सूर्यास्तापर्यन्त त्यांनी विश्रांती घेतली. त्यांना शंका आली की भगदाडांतील घरांत राहाणाऱ्या लोकांना ते इथेच कुठेतरी आहेत ही गोष्ट कळली असेल. आपसांत बोलून त्यांनी ठरविले की कुठल्याही परिस्थितीत चोरांचा सरदार समरबाहूला वाचविले पाहिजे. त्यांना वाटले की न्यायाची देखील हीच मागणी आहे.

जंगलात अंधार पसरला. दोघे अस्वलाच्या टोळीच्या भगदाडांतल्या घराकडे निघाले. थोडयाच वेळात ते तिथे पोचले.भगदाड किंवा पायऱ्यांजवळ कोणी पहारेकरी नव्हता.

"खड्ग, परिस्थिती लक्षांत आली ना? ह्या लोकांना वाटतंय की अगदी विचार करुन हे आपल्याला पकडायला जाणार आहेत. त्यांना हे माहीत नाही की आपण जाणूनबुजून त्यांच्या तावडीत सांपडल्याचे नाटक करणार आहोत. आपल्याला तर हे माहिती करुन घ्यायचे आहे की समरबाहूची परिस्थिती काय आहे". भगदाडाच्या पायऱ्या उतरत जीवदत्त म्हणाला.

दोघे थोडया पायऱ्या खाली उतरले, तेव्हां दहा, बारा लोकांनी भाले दाखवत धमकी दिली. "थांबा, पळून जायचा प्रयत्न केलात तर हे भाले तुमच्या शरीरांत घुसतील".

जीवदन्त हंसत म्हणाला "आम्हाला मारण्यापूर्वी, आपल्या गुरु भल्लूकाचे दर्शनतरी आम्हाला घडवा."

त्यातला एकजण म्हणाला "इतक्या जोरांत कशाला बोलतोस? गुरु भल्लूक आपल्या इष्ट देवी वृकेश्वरीची पूजा करण्यात मग्न आहेत. तुम्हाला आधी लांडग्यांच्या तावडीत देऊं. तिथून सुटून आलात तर मग नक्की गुरुभल्लूकांचे दर्शन होईल."

"फार छान, पण हे लांडगे असलेला दगड आहे तरी कुठे?" खड्ग, जीवदन्ताने विचारले. "इतके उतावळे होऊं नका. आम्ही तुम्हाला तेथेच घेऊन जात आहोत". असे म्हणत त्यांनी या दोघांबरोबर एका भुयारांत प्रवेश केला. लांबून त्यांना लांडग्यांचे ओरडणे व भयभीत झालेल्या लोकांचे घाबरलेले आवाज ऐकू येत होते. भुयारांत त्या आवाजांचे प्रतिध्वनी उमटत होते.

"हे आवाज समरबाहू व त्याच्या साथीदारांचे असतील. लांडगे त्यांना मारुन खाण्याचा प्रयत्न तर करत नसतील ना?"

जीवदन्त म्हणाला.

खड्गवर्माने कांही उत्तर देण्याआधीच अस्वलवाल्यांच्या टोळीतला एक माणूस भाला उगारुन म्हणाला "गप्प बसा! चूप बसा! एक, दोन मिनिटांत स्वतःच बघा की लांडगे काय करतात ते?" (क्रमशः)



# बुद्धिची वृद्धि

नेवले गांवातल्या धर्मशाळेंत शील आणि गोपी नांवाचे दोन वाटसरू आले. रात्रीची वेळ होती. जेवण करुन दोघेही धर्मशाळेच्या पडवीत आडवे झाले. गोपीचे डोळे मिटायला लागले होते. तेवढ्यांत त्याने पाहिलं की शीलने आपल्या पिशवींतून कांहीतरी वस्तू काढली आणि तोंडात टाकून तो ती वस्तू चघळूं लागला.

गोपीला वाटलं की शील सुपारी खातोय, म्हणून त्याने म्हटले, ''आज सकाळींच आमच्या घरांत एक जुनी पोथी सांपडली. त्यांत लिहीलं होतं की जर बोराची बी थुंकण्याऐवजी तोंडात ठेवून चघळली तर आपील बुद्धी तीक्ष्ण होत राहाते. म्हणून मी सारा वेळ बोरांच्या बिया चघळतोय आणि नंतर थुंकून टाकतो.''

''असं कां? मला हे गुपित ठाऊक नव्हतं. तुम्हाला माहीतच आहे की मी तीर्थयात्रेला निघालो आहे. यात्रेंमधेंच माझी बुद्धिमत्ता जर वाढली तर लबाड लोकांपासून स्वतःचा बचाव करणें मला जास्त सोपे होईल की! मलाही बिया द्या!'' शीलने सांगितलं.

''या फुकट नसतात बायच्या! चार रुपये द्या आणि चार बिया घ्या!'' गोपी म्हणाला. शीलने क्षणभर विचार केला. नंतर गोपीला चार रुपये देऊन त्याने चार बिया विकत घेतल्या. त्यांतली एक बी त्याने तोंडात टाकली, आणि ती तो चघळूं लागला. अचानक त्याच्या लक्षांत आलं की आपण फसवले गेलो आहोत.

त्याने गोपीला म्हटलं, ''ही तर सरळसरळ लबाडी आहे. चार रुपयांत चार बोरेंही मिळाली असती. तुमची ही ठकवेगिरी मी या धर्मशाळेच्या मालकाला सांगीत. तुमच्याबद्दल तक्रार करीन आणि तुम्हाला इथून काढून लावीन.''

शीलची नाराजी पाहून गोपी उत्तरला, ''वा, वा! पाहिलंत, दहा मिनिटांत आंतच तुमची बुद्धी किती वाढली, किती शहाणपण सुचलं तुम्हाला!'' असं म्हणून तो जोराने हंसायला लागला. त्याचे बोलणें ऐकून शीलच्या मनांत आले की खरोखरीच त्याच्या बुद्धिमधें तीव्रता आली आहे. आपण पहिल्यापेक्षां जास्त हुशार झालो आहोत असं त्याला वाटलं. कांहीही न बोलता तो निमूटपणें झोंपी गेला.





# मैत्री

अनंताला असल्या चांगल्या स्थळाची अपेक्षा नव्हती. मुलीचे लग्न करणें ही कांही सोपी गोष्ट नव्हती. सध्या त्याची आर्थिक परिस्थितीही चांगली नव्हती. गेली दोन वर्षे पाऊस पडला नव्हता म्हणून पीकही चांगले आले नव्हते. पण इतके चांगले स्थळ नाकारणें तरी कसे शक्य होते?

तो बुचकळ्यांत पडला. काय करावे ते त्याला उमजेना. तेव्हां त्याच्या पत्नीने त्याला सुचवलं, ''इतकी कशाला काळजी करता आहात? राजधानींत तुमचे दोन चांगले मित्र आहेत. त्यांची आर्थिक परिस्थिती फारच चांगली आहे. तुम्ही त्यांच्याजवळ मदत मागितलीत तर ते नाही म्हणणार नाहीत. आपल्या मुलीच्या लग्नासाठी आपल्याला फक्त दहा हजार मोहरांची जरुर आहे. पाऊस पडला आणि धान्य तयार झाले की त्यांची रक्कम आपण लगेच परत करुं.''

पत्नीचा सल्ला अनंताला ठीक वाटला. परंतु आपल्या मित्रांजवळ रक्कम मागायचा त्याला फार संकोच वाटत होता. सुशांत व सुमंत त्याचे लहानपणापासूनचे मित्र होते. तिघांनाही एकमेकांवांचून बिलकूल चैन पडत नसे. शिक्षण पूर्ण झाल्यानंतर सुशांत वडलांचा व्यापार सांभाळूं लागला. आणि सुमंत सरकारी नोकरीत शिरला आणि आता मोठ्या हुद्यावर होता. तरीदेखील अनंताने त्यांच्याकडे कधी कांही मागितले नव्हते. इतक्या वर्षांच्या मैत्रींत कधी अंतर पडले नव्हते. त्यांचे एकमेकांवरचे प्रेम लहानवयांतल्या सारखेच अद्याप टिकले होते.

अनंत गोंधळून गेला होता. पैसे कसे मागावे हे त्याला सुचत नव्हते. ते पाहून त्याची पत्नी म्हणाली, ''तुम्ही तर असा विचार करीत आहात की जशी कांही तुमच्या हातून एखादी चूकच होणार आहे. अडचणीच्यावेळीं कर्ज घेणे हा कांही गुन्हा नाही. तुमचे दोन्ही मित्र चांगल्या स्वभावाचे आहेत. तुमचा प्रश्न हा त्यांचाच प्रश्न आहे असं समजणाऱ्यांतले आहेत. तुम्ही अगदी संकोच करुं नका आणि त्यांना भेटायला जा. तुमची अडचण ते जरूर-दूर करतील.''

आता अनंताने काय करायचे ते निश्चितपणें ठरवले. दुसऱ्याच दिवशीं तो राजधानीला पोंचला आणि सरळ सुमंतच्या घरीं गेला. सुमंत नुकताच कचेरींतून आला होता. आपल्या बालमित्राला पाहून त्याला खूप आनंद झाला. सर्वांची विचारपूस केल्यानंतर अनंताने आपण येण्याचे कारण सांगितले.



सुमंतने त्यावर आपल्याला वाटणारा खेद व्यक्त करुन म्हटले, ''तुला हवी असलेली रक्कम माझ्यासाठी कांही फार मोठी रकम आहे असं नाही. तुझी अडचणदेखील कांही सामान्य अडचण नव्हे. ती अडचण दूर करायला हवी हेही खरे आहे. पण त्याचं काय आहे, बरीच वर्षे मी एक घर बांधायचे ठरवत होतो. ते काम आत्ताच सुरुं होणार आहे. जिथें आमचे वडिलोपार्जित जुने घर होते, ते घर पाडून तिथेंच नवीन घर बांधावे असा माझा इरादा आहे. या कारणामुळें तुला पैसे देणे मला जरा कठीण जाणार आहे. पण त्यासाठी मुलीचे लग्न लांबणीवर टाकूं नकोस. आपला सुशांत तुला जरुर मदत करेल. तशी माझी अगदी खात्री आहे.''

अनंत तिथून निघाला तो सरळ सुशांतच्या घरीं गेला. सुशांतच्या पत्नीने त्याचे स्वागत केले व म्हटले, ''या, भाऊसाहेब,'' नंतर त्यांचे चांगल्या तऱ्हेने आदरातिथ्य केले. तेवढ्यांत सुशांत दुकानांतून परत आला. त्याने अनंताला मोठ्या प्रेमाने मिठी मारली आणि सर्वांचे क्षेमकुशल विचारले. दोघांनी गप्पा मारत भोजन केले. त्यानंतर अनंताने आपण येण्याचे कारण सांगितले. त्याचबरोबर ही रक्कम द्यायला सुमंतला किती त्रास झाला असता हेही सांगितले.

सर्व कांही ऐकल्यानंतर सुशांत आपली असमर्थता व्यक्त करीत म्हटले, ''तूं आजपर्यंत कधीही कांहीही मागितले नव्हतेस. आज तूं महत्वाच्या कारणासाठीं आला आहेस आणि मी तुला मदत करण्याच्या परिस्थितींत नाही. याचं मला फारच वाईट वाटते आहे.''

''तुझी कोणती अडचण आहे? हे पैसे देता येत नाहीत म्हणून तूं कां एवढा तूं कासावीस होतो आहेस?'' अनंताने मोठ्या अधीर स्वरांत विचारलं.

''वडिलांनी सोंपवलेला व्यापार मी आजपर्यंत सांभाळत आलो आहे. इतकी वर्षे परदेशांशी समुद्रमार्गे व्यापार सुरुं करावा, व भरपूर संपत्ती मिळवावी अशी मला तीव्र इच्छा झाली. त्या दिशेने मी प्रयत्न सुरुं केले. परदेशांशी व्यापार करायचा म्हणजे सुरवातीला खूप भांडवल लागते. त्याचा फायदाही तशाच प्रमाणांत जास्ती असतो. या व्यापारासाठीं माझ्याजवळ जेवढी रकम होती, ती सारी यांत मी घातलेली आहे.

आता तुझ्या लक्षांत येईल की माझी अडचण काय आहे, आणि मी यांत कसा कोंडीत सांपडलो आहे ते ! जाऊं दे, उशीर बराच झालाय. तू जाऊन झोंप जा. उरलेल्या गप्पागोष्टी उद्यां करूं या.'' असं म्हणून सुशांत आपल्या खोलींत झोंपायला गेला.

त्या वेळेला सुशांतची दहा वर्षांची छोटी मुलगी राधा, आपल्या आईला, विष्णुमंदिरात जे प्रवचन झालं त्याची कथा सांगत होती.

''तू किंवा बाबा, कधीं प्रवचन ऐकायला देवळांत गेला होतात कां ग?'' राधाने विचारले.

''कां नाही? किती वेळां तरी गेलो आहोत. लहान असताना नेहमी जात असूं. आता जेव्हां केव्हां सवड



मिळते, तेव्हां जातो कधी तरी.'' आईने तिला उत्तर दिले.

''शास्त्रीबुवांनी जे पुराणांत सांगितलं ना, ते मला कांही नीट समजलं नाही. ते सांगत होते की दुर्योधनाने कर्णाला भरपूर मदत केली होती. कृष्णानेही सुदामाला खूप धनसंपत्ती देऊन मदत पोंचवली होती. या दोघांपाकी कुणाची मदत जास्तचांगली आहे ग?'' राधाने आपली शंका विचारली.

''या प्रश्नाचं उत्तर तुझ्या बाबांनाच विचारून घे. ते माझ्यापेक्षां जास्त शिकलेले आहेत.'' सुशांतच्या पत्नीने हंसत हंसत तिला सांगितले.

राधा आपल्या वडिलांना ह्या प्रश्नाचे उत्तर विचारणार, तेवढ्यांत सुशांत म्हणाला, ''अग पोरी, ही तर फार पूर्वीच्या काळांतली गोष्ट आहे. सध्यां मी व्यापारधंद्याच्या कामांत इतका बुडून गेलो आहे की किती फायदा झाला आणि यापेक्षां जास्त फायदा कसा होईल? याखेरीज बाकीच्या सगळ्या गोष्टी मी तर विसरून गेलोय. आठवण करायला प्रयत्नदेखील मी करीत नाही. पण तुझी आई या प्रश्नाला काय उत्तर देते आहे ते ऐकायची मलादेखील उत्सुकता आहे बरं कां!''

सुशांतच्या पत्नीने एकदा आपल्या पतीकडे पाहिलं आणि ती म्हणाली, ''खरोखरच तुम्हाला माझं उत्तर ऐकायचं आहे कां?'' तिने राधाला प्रेमाने जवळ घेतले आणि ती पुढे म्हणाली, ''तुझी शंका दूर होतेय की नाही ते मला माहित नाही. पण मला वाटतं, जगांत सर्वांत श्रेष्ठ ठरते आपापली विचाराची पद्धत. आपल्या गरजेनुसार कांही लोक धन, यश, प्रतिष्ठा, मान या गोष्टी श्रेष्ठ मानतात. पण मला वाटतं सर्वांत श्रेष्ठ आहे मैत्री! दुर्योधनाच्या मनांत कर्णाबद्दल मित्रभाव होता, पण त्याचा त्यांत स्वार्थी हेतू होता. त्याला विश्वास वाटत होता की शौर्यामध्यें कर्ण अर्जुनाच्या तोडीचा आहे. आपला शत्रू अर्जुन, याचा नाश कर्णाच्या हातून व्हावा म्हणून दुर्योधनाने त्याला



अंगराज बनवले. परंतु श्रीकृष्णाने जी मदत सुदामाला दिली, त्यांत थोडासादेखील स्वार्थ नव्हता. संकोच वाटल्यामुळें बिचाऱ्या सुदामाने कृष्णाजवळ कांही मागितलं देखील नव्हतं. श्रीकृष्णे त्याला न मागताच अपार संपत्ती दिली, त्याला श्रीमंत बनवलं. हे निःस्वार्थीपणाचे एक ढळढळीत उदाहरण आहे, मैत्री अशी असायला हवी.''

राधाला हे स्पष्टीकरण पटलं. आनंदाने टाळी वाजवून तिने वडलांना विचारलं, ''बाबा, आईने जे सांगितलं ते बरोबर आहे की नाही? माझी शंका दूर झाली की नाही आता?''

''हे तुझी शंका दूर झाली की नाही ते तुलाच ठाऊक असायला हवं. गेली कित्येक वर्षे मी करोडो रुपये मिळवण्यासाठीं उतावळा झालोय. चोवीस तास पैशाचेच विचार माझ्या मनांत घोळत असतात. या क्षणापर्यंत धर्म, शंका या गोष्टींसाठीं माझ्या मनांत विचार करायलाही वेळ नव्हता किंवा डोक्यांत जागा नव्हती. आज माझ्यापुढेही एक धर्मसंकट उभं राहिलं होतं. आणि राधाच्या या प्रश्नामुळें त्या संकटात काय करायला हवं त्याचं उत्तरदेखील मला मिळालं.'' सुशांतने गंभीरपणें उत्तर दिलं.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं सुशांतने अनंताबरोबर बसून न्याहारी केली. त्यावेळेस तो अनंताला म्हणाला, ''अरे, माझी समुद्रावरच्या व्यापाराची योजना जरा पुढें ढकलली तरी कांहीएक बिघडत नाही. या व्यापारासाठी मी बरीच रक्कम शिल्लक टाकली आहे. त्यांतल्या दहा किंवा वीस हजार मोहोरा तू घेऊन जा. तुझ्या मुलीचे लग्न मनाजोगे थाटांत कर. कोणत्याही परिस्थितींत हे लग्न चांगले साजरे झाले पाहिजे.''

अनंताने सुशांतकडून दहा हजार मोहोरा घेतल्या आणि तो सुमंतकडे आला. जे सुशांतकडे घडलं, ते त्याने सुमंतला सांगितलं. सुमंतने खाली मान वळवली आणि शरमून तो म्हणाला, ''अरे, जो विचार सुशांतने केला, तो मी करूं शकलो नाही. याची मला लाज वाटते. नवीन घर बांधणं मी देखील जरा पुढें ढकललं तरी त्यामुळें कांहीही बिघडलं नसतं. त्यांत कुठलंही नुकसान होणारं नाही. निदान कमीतकमी अडचणीच्यावेळीं मी मित्राला मदत करूं शकलो हे मानसिक समाधान तरी मला मिळालं असतं!मित्राची अडचण मी निवारली असती. माझ्या कालच्या बोलण्याबद्दल मला पश्चात्ताप होतोय. मला माफ कर अनंता!''

''सुमंत, तुझ्या या बोलण्यानेच मला खूप आनंद झाला आहे. सुशांतकडून पैसे घेताना मला जी तृप्ती आणि दिलासा मिळाला, तीच तृप्ती आणि दिलासा मला तुझ्या या बोलण्यानेच मिळाला आहे. मी निघतो आता. मात्र लग्नाला सहकुटुंब सहपरिवार अवश्य यायचं बरं कां!'' अनंताने त्याला प्रेमाने सांगितलं आणि तो गांवी परत जायला निघाला.





# डोळे उघडले

पूर्णवर्मा दीप्तगिरीचा राजा होता. तो फार अहंकारी होता. त्याला जे आवडायचे तेच तो करायचा, तो कधीही कोणाचे ऐकायचा नाही. त्याचमधें आणकी एक दुर्गुण होता तो म्हणजे आपल्या देशाच्या गुणी आणि विद्वानांची तो कधी प्रशंसा करायचा नाही, नेहमी त्यांची टिंगल करायचा.

त्यांच्या गुणांची त्याला कदरच नव्हती. परंतु दुसऱ्या देशांतून आलेल्या कविगायक व विद्वानांची तारीफ करतांना मात्र तो कधी थकायचा नाही. त्यांची वाहवा करताना त्याला फार आनंद व्हायचा.

त्यामुळें दीप्तगिरीचे कवि, गायक, कलावंत व शिल्पकार त्या देशांत राहायला नाराज होते. ते निराश होऊन हळूं हळूं दुसऱ्या देशांत निघून जायला लागले. असे करताना त्यांना दुःख व्हायचे, पण त्यांचाही नाईलाज होता.

एके दिवशी रविचंद्र नांवाचा एक इसम पूर्णवर्माला भेटायला आला. तो विणकामांत कुशल होता. त्यानो आपल्या कलेचे वर्णन करत म्हटले, ''महाराज, या कलेमध्ये माझ्या तोडीचा कोणीच नाही.''

तू कोणत्या राज्याचा आहेस? पूर्णवर्माने विचारले. ''मी कलुवगिरीचा नागरिक आहे.'' रविचंद्र म्हणाला. यावर राजाने त्याला मोठ्या उत्साहाने विचारले ''या कलेंत तुझी काय विशेषता आहे? जरा दाखव तरी.''

रविचंद्राने एक पिशवी उघडली व त्यातून एका चांदीच्या डबीतून एक तलम वस्त्र बाहेर काढले व म्हणाला, ''महाराज हे तीन वार लांब व दोन वार रूंदीचे वस्त्र आहे. हा एक रेशमी पीतांबर आहे. बघा, हे एवढे मोठे वस्त्र मी ह्या

अमृत शाह

छोट्याशा डबीत बंद केले आहे.

हा माझ्या विणकामाच्या श्रेष्ठतेचा नमुना आहे. असा उत्कृष्टमाल तुम्हाला कचितच पहायला मिळेल." पूर्णवर्मा म्हणाला, "विणकामातले हे तुझे कौशल्य प्रशंसनीय आहे. आजपासून तू आमच्या संस्थानांतच रहा. तुला दरमहिन्याला एक हजार रुपये मिळतील, तुला रहाण्यास घर देण्यात येईल. तू आमच्या राजपरिवाराकरिता अशी तलम वस्त्रें विणत रहायचे."

राजाच्या उदारतेवर आनंदित होऊन रविचंद्र म्हणाला, "धन्यवाद महाराज. आपल्याकृपेने मी धन्य झालो."

एक महिन्यानंतर राजा पूर्णवर्मा आणि सचिनवर्मा नांवाचा त्याचा मंत्री, हे दोघे घोड्यावर स्वार होऊन, वेषांतर करून, देशाटन करावयास निघाले. रात्र होताच ते छोट्या छोट्या गांवांमध्ये थांबायचे, व सकाळ होताच तिथून निघून जायचे. एका आठवड्यानंतर ते कलुवगिरीला आले. गांवात पोंहोचेपर्यंत रात्र होत झाली होती. म्हणून ते एका धर्मशाळेंत उतरले, व जेवण झाल्यावर ते गांवात फिरायला निघाले.

त्यांनी पाहिले कीं एक माणूस जोरजोराने ओरडून वस्त्रें विकत होता. "अहो, वस्त्रें घ्या, फारच उत्तम वस्त्रें आहेत, ही फार स्वस्त आहेत, या पहा, आवडले तरच घ्या." लोक त्याच्या आजूबाजूला उभे राहून त्याचा माल खरेदी करत होते. इतक्यांत एक श्रीमंत माणूस गर्दीतून पुढे





आला व म्हणाला, "यापेक्षांही तलम व उत्तम वस्त्रें असतील तर दाखव."

"थोडे थांबा" म्हणत त्या व्यक्तीने बाजूला ठेवलेले गांठोडे उघडले आणि हस्तीदंताची डबी काढली. तो म्हणाला, "पहा महाशय, यांत चार गज लांबीचे व दोन गज रूंदीचे दोन पीतांबर आहेत आणि त्यांची किंमत आहे फक्त वीस रुपये."

त्या श्रीमंत माणसाने ते वस्त्र खरेदी केले. व पैसे देतांना म्हणाला, "तुम्ही याच राज्यांतले आहात कां? "नाहीं महाशय. मी दीप्तगिरी राज्याचा आहे." यावर आश्चर्य प्रकट करत तो श्रीमंत माणूस म्हणाला, "इतकी कला हातांत असताना आपले राज्य सोडून इतक्या दूर कां बरे आलात?"

तो दु:खी स्वरात म्हणाला, "आमच्या राजांचा स्वभाव फारच विचित्र आहे, आपल्या देशांतल्या गुणी व्यक्तींची आणि त्यांच्या कलेला पारखायची दृष्टि त्यांच्यात नाही. ते नेहमीच दुसऱ्या देशांच्या कलावंताना स्वत:च्या देशाच्या कलावंतापेक्षा उत्तम व श्रेष्ठ समजतात.

मी त्यांना भेटायचे पुष्कळ प्रयत्न केले, पण असफल राहिलो. स्वदेशाच्या मोठ्या मोठ्या विद्वानांनासुद्धा त्यांच्या भेटीची अनुमति मिळत नाही. जर कोणी अन्य देशाचा आहे म्हणून भेटायला गेलाच तर खरी गोष्ट कळल्यावर त्याला बंदी करण्यात येते. नाईलाज म्हणून आम्हाला असे दुसऱ्या देशात येऊन आपल्या वस्तु विकायला लागतात."

त्या व्यापाऱ्याचे कटु पण सत्य बोलणे ऐकल्यावर राजाचा चेहरा विवर्ण झाला. लाजेने मान खाली घालून तो मंत्र्याबरोबर धर्मशाळेंत परतला. त्या विणकराच्या भाषणाने त्याचे डोळे उघडले.

सकाळीच तो व त्याचा मंत्री स्वदेशी परतले. दसऱ्याच्या दिवशी मोठ्या समारंभ-पूर्वक त्यांनी आपल्या देशाच्या विद्वान, कलावंत, गायक कवि व शिल्पकारांचा यथोचित सत्कार केला.



# तीन शिंका

मूढमती एका लाकूडतोड्याचा मुलगा होता. त्याचे वडील वारले आणि लांकडे तोडण्याचे काम साहजिकच त्याच्यावर पडले. आपले गाढव बरोबर घेऊन तो जंगलात गेला. एका झाडावर चढला आणि ज्या फांदीवर तो चढला होता, त्याच फांदीवर तो कुऱ्हाडीने घाव घालायला लागला.

झाडाजवळून एक वाटसरू चालला होता. त्याने मूढमतीला समजावून सांगितलं, ''अरे, तू बसला आहेस तीच फांदी कशाला तोडतो आहेस? तू खाली पडशील ना!'' मूढमतीने त्याच्या सांगण्याकडे लक्ष दिलं नाही. त्याने तीच फांदी तोडली आणि तो धप्पकन खाली पडला. मूढमतीला वाटलं की तो वाटसरू बहुतेक ज्योतिषी असला पाहिजे. कारण होणारी गोष्ट त्याला अगोदर कळली होती. मूढमती उठला आणि धांवतच त्या गृहस्थाच्या पाठोपाठ गेला. त्याने विचारले, ''ज्योतिषीजी, माझा मृत्यू केव्हां होणार आहे ते जरा सांगा बरं!''

त्या गृहस्थाला कळलं की प्रश्न विचारणारा एक मूर्ख माणूस आहे. त्याने मूढमतीला सांगितलं, ''जेव्हां तुझे गाढव तीन वेळां शिंकेल, तेव्हां तुझा मृत्यू आहे.'' आणि तो आपल्या वाटेने पुढे गेला.

गाढवाला घेऊन मूढमती घरी परत जात होता. रस्त्याच्या कडेला एके ठिकाणी कचरा जाळला जात होता. गाढवाच्या नाकांत त्या कचऱ्याचा धूर गेल्यामुळें गाढवाला शिंक आली. मूढमती घाबरला. त्याने आपल्या डोक्यावरचे मुंडासे गाढवाच्या नाकावर बांधले. गाढवाला नीट श्वास घेता येईना, म्हणून ते पुन्हां शिंकले. आता मात्र मूढमती फारच घाबरला. त्याने गाढवाच्या नाकांत बारीक वाळू भरायचा प्रयत्न केला. तेव्हां त्या गाढवाला पुन्हां जोराने तिसरी शिंक आली. भीतीने मूढमती बेशुद्धच पडला. रस्त्यांतून जाणाऱ्या लोकांनी त्याच्या तोंडावर पाणी शिंपडले. जेव्हां तो हळूंहळूं शुद्धीवर आला, तेव्हां त्याने डोळे उघडून विचारले, ''हा स्वर्ग आहे कीं नरक?''

त्याचा हा प्रश्न ऐकून सगळेच हंसायला लागले.





# शंका आणि समाधान

शबरवाडी नांवाचे एक गाव होते. तिथे असलेल्या देवळांत शंकरराध्य नांवाचे एक पुजारी होते. गांवातले लहान मोठे सर्वजण त्यांचा खूप आदर करीत.

शंकराराध्य पहांटे लवकर उठत, नदीकाठीं जाऊन आंघोळ करीत, तिथे असलेल्या बगीचातून ताजी भाजी निवडून घेऊन, बायकोला देऊन, मग देवळांत जात असत. हेच त्यांचे सकाळचे काम असायचे.

पण अशा प्रकारे दुसऱ्यांच्या बागेतून भाजी तोडून घेऊन जाणे हा अपराध आहे, असे शंकरराध्यांना कधीं वाटलेच नाही. कारण ते ज्या ज्या वेळीं कुणाच्याही बागेत जात, तेव्हां लोक त्यांचे हंसतमुखाने स्वागत करत व परतताना आनंदाने त्यांना भाजी देत असत. पण भल्या पहांटे बागेमध्ये कुणीच नसत. त्यामुळें शंकराराध्यांना कुणाला विचारून भाजी घेऊन जायची संधीच मिळाली नाही.

ह्या संवयीमुळें त्यांच्यावर एक संकट आले. एका बागेतल्या मालकाला शंका आली कीं रोज त्याच्या बागेंत कुणीतरी येऊन चोरी करत आहे. तो एक दिवस रात्रीं बागेतल्या एका कोपऱ्यांत लपून बसला. रोजच्या प्रमाणे शंकराराध्य भल्या पहांटे आंघोळ वगैरे करून बागेत आले. त्यांनी तीन चार वांगीच तोडली असतील, पण त्या आवाजाने बागेचा मालक सावकाश पुढे आला. मागून त्याने भाजी तोडणाऱ्यावर काठीने जोराचा प्रहार केला. अंधार असल्यामुळें भाजी तोडणारा चोर कोण आहे ते समजूं शकले नाही.

''शिव, शिव!'' म्हणत पुजारी बेशुद्ध होऊन खाली पडला. बागेच्या मालकाला वाटले होते की मार पडल्याबरोबर चोर पळून जाईल, पण त्याने खाली पडताच मालकाने जवळ येऊन पाहिले, आणि त्यांना धक्काच बसला. चोर दुसरा तिसरा कोणी नसून पुजारीच होता. कसलीही हालचाल न करता पडलेल्या पुजाऱ्याला पाहून मालकाला वाटले

सुधाराणी



की आपल्या काठीच्या प्रहारामुळें पुजारी मरण पावला. त्याने पुजाऱ्याच्या नाकाजवळ हात ठेवून पाहिला, त्याचा श्वासोश्वासही चालत नव्हता.

बागेचा मालक एकदम घाबरून गेला. पुजाऱ्याला चोर समजणें हेच पाप आहे, आणि त्याला ठार मारणे हे तर महापाप आहे. ही गोष्ट गांवच्या लोकांना समजली, तर ते त्याला गांवात राहू देणार नाहीत. हा विचार येताच त्याच क्षणी तो गांव सोडून पसार झाला.

पण पुजारी मेला नव्हता, काठीच्या जोरदार प्रहारामुळे तो बेशुद्ध झाला होता. थोड्या वेळाने थंड हवेच्या झोताने तो शुद्धीवर आला. आणि त्याला आठवण झाली कीं बागेंत भाजी काढताना मालकाने कदाचित पाहिले असावे व काठीचा प्रहार केला. पण आता तो मालकही जवळपास दिसत नाही. आपण चोरी करत होतो हे गांवच्या लोकांना सांगून त्यांना बोलवून आणायला गेला आहे असे वाटते. इतके दिवस मानमर्यादेने राहिलेल्या पुजाऱ्याला जर आता लोक चोर म्हणून समजायला लागले तर किती अपमान वाटेल! यापुढे अभिमानाने डोके वर करून चारचौघात वावरताही येणार नाही, या सर्व विचारांनी त्रस्त झालेला शंकराराध्यदेखील गांव सोडून कुठेतरी दूर निघून गेला. त्यावेळी नुकतीच पहांट होत होती, पूर्वेला सूर्य थोडा थोडा डोकावत होता.

पुजाऱ्याच्या बायकोने एक दोन तास वाट पाहिली, पण पुजारी आला नाही, असे पाहताच तिने आपल्या शेजाऱ्यापाजाऱ्यांना सांगितले. भल्या पहाटे आंघोळीला गेलेला पुजारी परतला नाही, देवळांतही नाही, म्हणून शोधाशोध सुरू झाली. तेव्हां नदीच्या घाटाजवळ असलेल्या बागेंत पुजाऱ्याचा तांब्या सापडला. तेव्हा गांववाल्यांना वाटले की पुजारी आंघोळ करताना खोल पाण्यांत वाहून गेले.

पण याचवेळी बागेचा मालक पण बेपत्ता झाल्याचे सर्वांना समजले. बागेंत एका कोपऱ्यात कचऱ्याचा मोठा ढीग करून ठेवला होता. लोकांना संशय येऊन त्यांनी त्या कचऱ्यांत कांही मिळते कां म्हणून पाहताना त्यांत जळलेली हाडे मिळाली. आत्ता गावकऱ्यांनी निर्णय घेतला की मालकानेच पुजाऱ्याचा खून केला, त्याला कचऱ्याबरोबर जाळले व पळून गेला. बागेच्या मालकावर पुजाऱ्याच्या खुनाचा आरोप करून राजाचे सैनिक त्याचा शोध करायला निघाले.

एक वर्ष झाले. बागेचा मालक बैराग्याचा वेष घालून संबंध देशभर फिरत राहिला. पण त्याला आपल्या बायको-मुलांना भेटण्याची तीव्र इच्छा झाली. म्हणून मोठे धाडस करून तो परत आपल्या गांवी आला व गांवाबाहेर असलेल्या एका अतिथीगृहांत झोपून राहिला. पण लोकांच्या



बोलण्यावरून त्याला समजले की पुजाऱ्याचा खून करून त्याला मालकाने जाळले आहे अशी गांवकऱ्यांची कल्पना झाली आहे व म्हणून कुणीही पुजाऱ्याचे प्रेत पाहिलेले नाही. पण यावरून मालक समजून चुकला की पुजारी मेलेला नाही. पुजारी सुद्धा मालकासारखाच पळून गेला आहे. पण तो कां पळून गेला आहे हे कोणालाही माहिती नव्हते.

मालकाने निश्चय केला कीं कांही झाले तरी पुजाऱ्याला शोधून काढायचे. त्यासाठी तो गांवोगांव शोध करत फिरू लागला. कुठलाही साधू किंवा बैरागी दिसला की तो तीक्ष्ण नजरेने त्याला पाही, आणि त्याचा संपूर्ण पत्ता, कुठून आला आहे, इत्यादि विचारून घेऊं लागला.

या काळांत पुजाऱ्यानेही संन्याशाचा वेष घेऊन सर्व तीर्थयात्रा केल्या. शेवटी बायकोला भेटण्यासाठी आपल्या घरी जायचा त्याने विचार केला.

एक दिवस एका गांवाच्या अतिथीगृहात अचानक ते दोघे एकत्र आले. पुजाऱ्याला पाहताच मालकाला खूप बरे वाटले. धैर्य धरून तो पुजाऱ्याकडे गेला व म्हणाला, - ''आपलं नाव शंकराराध्य आहे ना? आपण असा वेष बदलून कां फिरता आहात?''

पुजाऱ्याला आश्चर्य वाटले. त्याला वाटले हा माणूस भूतकाळ, वर्तमानकाळ व भविष्यकाळांतल्या सर्व गोष्टी जाणणारा आहे. म्हणून त्याने त्याला सत्य परिस्थिति सांगून टाकली - ''मी भाजीची चोरी केली, पण बागेच्या मालकाकडून काठीचा प्रहार सहन करून मग त्याच गांवात अपमानास्पद जीवन जगण्यापेक्षां संन्यासी बनणे जास्त योग्य, म्हणून अशा रीतीने तीर्थयात्रा करत फिरतोय.''

''पुजारीजी, तो मालक मीच आहे. अंधारात तुम्हाला न ओळखल्यामुळे मी काठीने मारले. व आता त्याचे प्रायश्चित भोगत आहे. सर्व गांवकऱ्यांची समजूत झाली आहे की मी तुमचा खून केला आहे. पण कुणीही स्वप्नांतसुद्धा असा विचार केला नसेल की तुम्ही भाजी चोरली होती. आणि आता मला पकडायला राजाचे सैनिक सर्वत्र शोध घेत आहेत. आपण जिवंत आहात हे समजले तर माझ्यावरचा खुनाचा आरोप दूर होईल. मीदेखील माझ्या बायको-मुलांना भेटायला अतिशय आतुर आहे. चला, आपण आपल्या गांवी जाऊ.'' बागेच्या मालकाने म्हटले.

दोघांचे प्रश्न मिटले व दोघे आपल्या गांवी परतले. त्या दोघांनी गांवकऱ्यांना समजावले की देवाच्या कृपेने त्या दोघांनाही एकत्र तीर्थयात्रा करण्याची इच्छा झाली. व तीर्थयात्रा करून दोघे गांवी परतले आहेत. गांवकऱ्यांना त्यांचे म्हणणे खरे वाटले.



## या महिन्यांत जन्मलेली श्रेष्ठ व्यक्ती

### शंकर

भारत व इतरत्र मिळालेल्या अनेक सन्मानांपैकी, शंकर यांना सगळ्यांत आवडणारा सन्मान आहे, 'ऑर्डर ऑफ स्माईल'! हा पोलंडच्या मुलांनी त्यांना प्रदान केला होता. त्यांनी ''शंकर्स इंटरनॅशनल कॉम्पिटिशन'' च्या संस्थापकांची, श्री. शंकर यांची, १९७७ सालच्या वार्षिक सन्मानासाठी निवड केली होती. हा सन्मान त्यांना एका शानदार पदवीदान समारंभात दिला गेला. त्या समारंभात ''मी मुलांना आनंद देत राहीन'' असे वचन मुलांनी त्यांच्याकडून मिळवले.

के. शंकर पिळ्ळे ३१ जुलै १९०२साली त्रावणकोर संस्थानात (हा आता केरळचाच एक भाग आहे.) एका सनातनी कुटुंबात जन्मले. त्यांचे कुटुंब मातृसत्ताक पद्धत अनुसरणारे असल्याने ते आपल्या आई, आजी, व आईच्या मामांकडे वाढले. ते एकुलतेएक होते. त्यामुळे त्यांच्या अंगणात येणाऱ्या पक्षी व फुलपाखरांशीच त्यांची दोस्ती जमली.

एकदा शाळेंत गणिताच्या शिक्षकांनी मुलांना गणिते सोडवायला दिली व शिक्षक स्वत: खुर्चीत मागे रेलून टेबलावर पाय ठेवून झोपी गेले. हे दृश्य शंकरनी आपल्या कागदावर सहीसही रेखाटले. आणि त्या दिवशी 'व्यंगचित्रकार शंकर' जन्माला आले.

१९२६ साली पदवीपरीक्षेनंतर मुंबईत असताना त्यांनी आपला छंद चालूं ठेवला. आणि आपली व्यंगचित्रे वर्तमानपत्रात प्रसिद्ध केली. १९३२ साली ते भारतांतले पहिले पत्रकार-अधिकारी व्यंगचित्रकार झाले व 'हिंदुस्तान टाईम्स' साठी काम करुं लागले.

भारताला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर त्यांनी भारतातील पहिले व एकमेव व्यंगचित्र मासिक 'शंकर्स वीकली' सुरुं केले. १९४८च्या मे महिन्यात याचा पहिला अंक प्रसिद्ध झाला. पंतप्रधान नेहरूंनी त्यांना सांगितले ''शंकर, मला तूं कुठलीही सवलत देऊं नकोस हं!'' मग काय? तेव्हां पासून ते १९६४ सालापर्यन्त 'वीकली' मधे सुमारे १५०० व्यंगचित्रे नेहरूंवर त्यांनी रेखाटली. एक राजकीय नेता व व्यंगचित्रकार, या दोघांचाही हा उच्चांक होता.

१९४२ साली त्यांनी 'वीकली' चा मुलांसाठी अंक काढला व भारतातील मुलांचे लिखाण व चित्रे मागवली. त्या वर्षी डिसेंबर महिन्यांत मुलांचा पहिला खास अंक प्रसिद्ध झाला. नंतरच्या वर्षी १२ देशांतल्या मुलांनी भाग घेतला. आता या आंतरराष्ट्रीय स्पर्धेला बावन्न वर्षे पूर्ण झाली आहेत.

१९५० सालापासून शंकर लहान मुलांच्या कलेची प्रदर्शनें भरवूं लागले. लहानमुलांच्या कर्तृत्वावर आपला पूर्ण विश्वास आहे हे दाखविण्यासाठीं ते मुलांच्या चित्रें रंगविण्याच्या स्पर्धा घेऊं लागले. राजधानींत हा आता एक वार्षिक लोकप्रिय समारंभ होऊं लागला आहे.

नंतर त्यांनी 'चिल्ड्रेन्स बुक ट्रस्ट' स्थापन केला. त्यासाठी त्यांनी 'नेहरु हाऊस' ही पांच मजली इमारत बांधली. ट्रस्टने छापलेली सर्व भाषांतली पुस्तकें एकत्र केली तर त्यांची संख्या हजारांच्या घरांत जाईल. मुलांमधील सुप्त गुणांना वाव मिळावा म्हणून चित्रकला व लिखाणासाठी १९६८साली त्यांनी 'यंग वर्ल्ड' हे मासिक सुरुं केले. याची बरीचशी पाने मुलांच्या कलाकल्पनेला वाव देण्यासाठी राखून ठेवली होती. १९६५ साली शंकरनी फक्त मुलांसाठी वाचनालय व ग्रंथालय सुरुं केले.

हंगेरीमधून त्यांना एक बाहुली भेट मिळाली. त्यानंतर त्यांनी विविध देशांतल्या बाहुल्यांचा संग्रह करण्यास सुरवात केली. त्यांचे हे आंतरराष्ट्रीय बाहुली संग्रहालय 'नेहरु हाऊस' मध्ये आहे. यांत विविध वेषांतील व शंभर देशांतील ८,००० बाहुल्या आहेत. अशा तऱ्हेचे हे जगांतले एकमेव संग्रहालय आहे.

२६ डिसेंबर १९८९ रोजी श्री. शंकर यांचे निधन झाले. त्यांना एकदा मुलांना आनंद देण्यास सांगितलेले होते. त्यांत ते पूर्ण यशस्वी झाले. होय ना?





# तीन तुकड्यांचा मंत्र

सीतापूर गांवापासून थोड्याच अंतरावर शशीकुमारची बाभळीच्या झाडांची बाग होती. तिथें एका झाडावर एका बुटक्या भुताने आपले घर थाटले होते. जवळच असलेल्या स्मशानांतल्या भुतांनी त्याच्यावर बहिष्कार घातला होता. ते त्याला म्हणाले, ''शी, शी, तू किती बुटका आहेस! तुझा चेहरा पाहणें हादेखील गुन्हा आहे. आमच्यासारख्या भुतांमधें राहाण्याची तुझी कांही लायकी नाही.'' त्यांनी त्या बुटक्या भुताला तिथून हांकलून दिले.

एका मध्यरात्रीं या बुटक्यापेक्षांही ठेंगणें असे आणखी एक भूत तिथें आले. या पहिल्या बुटक्याला पाहून त्याला आनंद झाला. ते म्हणाले, ''आज अमावास्या आहे, त्यांतून रविवार आणि वेळही चांगली मध्यरात्रीची आहे.'' आणि ते पहिल्या भुताजवळ येऊन बसले. त्यानंतर ते म्हणूं लागले, ''आपण दोघेजण इथें मिळून मिसळून राहूं या. माझं नांव मन्याभूत आहे. तुझं नांव काय आहे ते मला सांगशील कां?''

बुटक्या भुताला एक साथीदार मिळाल्यामुळें ते खूष झाले व आनंदाने म्हणाले, ''माझे नांव मंगू भूत आहे. आपण दोघेजण मिळून इथें राहिलो तर सोन्याहून पिवळे! आपला आनंद दुणावेल. तूंदेखील याच बाभळीच्या वृक्षावर आसरा घे. कोणत्याही गोष्टींत टाळाटाळ करुं नये.''

त्या दिवसापासून मन्या भूत आणि मंगू भूत एकत्र राहूं लागले. ते दोघेही रस्त्यांतून जात असले की जाणाऱ्यायेणाऱ्यांची थट्टा करीत, त्यांना सतावायला लागले.

एक दिवस अंधार पडण्यापूर्वी त्या वाटेवरुन सहा बैलगाड्या जात होत्या. गाड्या सजवलेल्या होत्या आणि गाडी चालवणारे हंसत होते, आणि जोरजोरांत आरडाओरड करीत चालले होते. दागिन्यांनी मढलेल्या बऱ्याच स्त्रिया त्या गाड्यांत होत्या. त्यांनी रेशमी साड्या नेसलेल्या होत्या. मुलेंही मोठ्या आवाजांत गाणीं गात होती. मन्या व मंगू भुताला लगेच कळलं की हे लग्नाचं वऱ्हाड चाललेलं आहे.

''आपणही याच्याबरोबर लग्नाला जाऊं या. तिथें जरा गडबड करुं आणि जरा धांगडधिंगादेखील घालायला मिळेल.'' मन्याभुताने आपल्या स्वभा-वाची चुणूक दाखवली. नंतर दोघेही बैलगाड्यांच्या

- कामेश्वर राव -



पाठोपाठ गेले आणि लग्नघरीं पोंचले. तिथें एका खोलीच्या पोटमाळ्यावर ते जाऊन लपले. तिथें जुना पलंग, भांडीकुंडी व इतर न लागणारे सामान ठेवलेले होते.

"आपण इथें लपून बसूं आणि कांहीतरी भांडण लावून देऊं या. लोकांना कांही आपण दिसणार नाही. हे कोण करतंय आणि कां होतंय ते त्यांना समजणार देखील नाही." मंगू भुताने सांगितलं.

"तू बरोबर सांगतो आहेस. ही तर एकदम नवीन तऱ्हेची गंमत होईल. आपली सुरवात नव्या खेळाने छान होईल." मन्याने या कल्पनेचे स्वागत करीत म्हटले. "बोलताबोलता आठवलं बघ. मी जेव्हां अगोदर धर्मपूरजवळच्या एका बाभळीवर राहात होतो ना, तेव्हां एक म्हातारे भूत मध्यरात्रींच्यावेळीं माझ्याजवळ येत असे. ते डोळे मिटून बसायचं आणि स्वतःशीच बडबडत बसायचं. अधूनमधून दोन थेंब ओढ्याचे पाणी प्यायचं. एका रात्रीं मी त्याच्यासमोर बसलो आणि मला एखादा मंत्र त्याने शिकवावा म्हणून मी हट्ट धरला. त्याने डोळे लाल करून म्हटलं, "हो, मी मंत्र जरूर शिकवीन तुला. पण त्यानंतर मात्र कोणत्याही परिस्थितींत तूं इथें येता कामा नयेस. आणि त्याने मला तीन तुकड्यांचा मंत्र शिकवला."

"आपण इथल्या या मंडळींच्यावर त्या मंत्राचा उपयोग करायचा कां?" मंगूने मोठ्या उत्सुकतेने विचारले. "अवश्य! मी जसा मंत्र उच्चारीन, तसा तूं फक्त 'अस्तु' म्हणत राहा. मग काय काय होतंय ते तूंच पाहा म्हणजे झालं." मन्याभूत म्हणालं.

तेवढ्यांत जेवणखाण आटोपून नवरीमुलगी व तिचे आईवडील, तिघेही त्या खोलींत आले. नवऱ्यामुलीने तिथें ठेवलेल्या एका पेटींतून एक रेशमी साडी काढली आणि तिने वडिलांना विचारले, "बाबा, मुहूर्ताच्या वेळेला आई ही साडी नेसूं दे कां? तिला शोभून दिसेल."

"साडी चांगलीच आहे. पण किंमत किती आहे साडीची?" पित्याने विचारले.

"हजार रुपये" मुलीने उत्तर दिले.

आपल्या पत्नीकडे रागाने बघत वडलांनी म्हटले, "इतकी महाग साडी? तुझी अक्कल कुठे गहाण ठेवली होतीस? शी शी, कशी ग अशी तू? तुझ्या पोटांत काय आग पडलीय की काय?"

माळ्यावर बसलेल्या मन्याभुताने लगेच तीन तुकड्यांचा मंत्र म्हटला. मंगूने 'अस्तु' म्हटलं.

दुसऱ्याच क्षणीं मुलीच्या आईने आपले पोट आवळून धरले आणि ती वेदनेने ओरडूं लागली. ती म्हणूं लागली, "माहीत नाही, तुमच्या तोंडात बत्तिशी आहे बहुतेक. खरंच, माझ्या पोटांत खूप दुखतंय, तुमचं तोंड असं कां हो जळकं?"

मन्याभुताने पुन्हां मंत्र म्हटला व मंगू भुतानेही लगेच 'अस्तु' म्हणण्यांत उशीर केला नाही. आपले तोंड उपरण्याने पुसत मुलीचे वडील म्हणाले, "मला



वाटतं की तुझ्या आईला बहुतेक भुताने पछाडलंय, आणि तिला मंत्र शिकवलाय. कारण माझं तोंड खरंच तिखट खाल्ल्यासारखं भाजतंय." तोंड जोराने पुसत ते तिथून निघून गेले.

त्याच वेळेला नवरदेव आपल्या मित्रांबरोबर आपली भावी पत्नी पाहायला तिथें आला. तिचे सौंदर्य पाहून तो मोहित झाला. त्याच्या मित्र शेजारीं उभा होता. नवरदेवाचा खांदा हालवत तो मित्र म्हणाला, "अरे हे काय रे? तू नुसताच उभा राहिला आहेस, आनंद? चल, तुझे पाय इथेंच जमिनीवर चिकटून बसलेले दिसताहेत!"

त्याच क्षणीं मन्या भुताने, तीन तुकड्यांचा मंत्र म्हटला आणि मंगूने 'अस्तु' म्हटले. नवरदेवाचे पाय खरोखरच जमिनीला चिकटून बसले. पुष्कळ प्रयत्न केला तरी त्याचे पाय त्या जागेवरून सुटेनात.

त्या खोलींत घडलेल्या या विचित्र घटना लोकांना जेव्हां कळल्या, तेव्हां सगळेजण तिथे येऊन उभे राहिले, व मोठ्या उत्सुकतेने ते दृश्य पाहूं लागले. तिथें नवऱ्यामुलीची आजीही आली. तिच्या हातांत एक काठी होती. तिने ती काठी जमिनीवर जोराने आपटली व ती म्हणाली, "माझी नात पाणीदार मोत्यासारखी छान आहे. पण तिच्यावर कुणीतरी मंत्रतंत्राचा प्रयोग करतो आहे. जरा थोडंसं मीठ आणि थोड्या सुक्या मिरच्या आणा बरं!" तिने ओरडून सांगितलं.

तिथें उभे असलेल्या लोकांपैकी तिचा एक नातेवाईक घरांत गेला व त्याने मीठ मिरच्या आणल्या. आजीने मीठमिरच्या हातांत घेतल्या आणि चारी दिशांना ओवाळून ती म्हणाली, "खोड्या काढणारी जी कुणी खोलींत बसलेली आहेत, ती सारी भूतपिशाच्चें गाढवे बनून इथून निघून जाऊं देत."

दोन्ही भुतांना फारच आनंद झाला. इतक्या लोकांची गंमत करताना त्यांना फारच आनंद होत होता. त्या आनंदाच्या भरांत मन्याने पुन्हां तीन तुकड्यांचा मंत्र म्हटला आणि मंगू भुताने 'अस्तु' ही संवयीने म्हटले. झालं, दोन्ही भुते गाढवांच्या रुपांत माळ्यावरुन खाली उतरली आणि बाभळीच्या झाडीकडे धावूं लागली.

ते तिथून गेल्यानंतर सर्वांची स्थिती पुन्हां पूर्ववत झाली. आता नवरदेवाचा पाय हलायला लागला, आणि ठरलेल्या मुहूर्तावर लग्न उत्तमप्रकारे पार पडले.





# स्थितप्रज्ञ

शिवानंद योगी स्थितप्रज्ञ म्हणून ओळखले जात होते. कितीतरी लोक त्यांच्याजवळ आपल्या अडचणी घेऊन जात आणि आपल्या अडचणी सोडविण्याचे मार्ग जाणून घेत असत.

एकदा एक जखमी तरुण त्यांच्या आश्रमांत पळत पळत आला, आणि त्यांच्या पाया पडून त्याने अभय मागितले. शिवानंदांनी काय झाले हे विचारल्यावर त्या तरुणाने थरथरत सांगितले, "योगीश्रेष्ठ, मी रत्नगुप्त नांवाच्या एका व्यापाऱ्याच्या घरांत गेल्या पांच वर्षापासून मोठ्या प्रामाणिकपणाने काम करीत आहे. रात्री त्यांच्या घरी चोरी झाली. दहा हजार मोहरा हरवल्या आहेत. त्यांतील शंभरा मोहरा माझ्या कपडयांत सांपडल्या. मालकाला माझ्यावर संशय आला आणि तो मला भयंकर मारहाण करं लागला. मी कसाबसा बचाव करुन येथे पळून आलो आहे."

इतक्यांत व्यापारी रत्नगुप्तही तिथे पोहोचला. तरुणाला पुन्हां मारण्यासाठी त्याने हात उगारला आणि त्याचा हात थांबवत शिवानंद म्हणाले, "गुन्हा सिद्ध झाल्याशिवाय तुम्ही ह्याला मारहाण केली. त्यासाठी त्याची क्षमा मागा."

रत्नगुप्त रागाने लाल होऊन म्हणाला, "कामा-शिवाय रिकामे बसणारे तुमच्यासारखे आळशी लोक कोरडा वेदान्त सांगत राहातात, आणि जबाबदारी न घेता समोर येतात. मला चांगलेच माहीत आहे की याने माझ्या घरांत चोरी केली आहे. जर तुम्ही ह्याला चोर समजत नाही तर सांगा, की खरा चोर कोण आहे? माझ्या दहा हजार मोहरा मला मिळवून द्या. कोणत्याही परिस्थितींत मी ह्याची क्षमा मात्र मागणार नाही."

आजपर्यंत कोणीही शिवानंदांशी इतक्या कठोरपणाने बोलले नव्हते. तरीही त्यांनी मनांतल्या मनांत निश्चय केला की रत्नगुप्ताला चांगला धडा शिकविलाच पाहिजे. त्यांनी आपले डोळे मिटून घेतले आणि योगदृष्टीने खऱ्या चोराला ते शोधू लागले. त्यांना योगदृष्टीला सुद्धा अंधारच अंधार दिसूं लागला. त्यांना हे समजत नव्हते की असे कसे झाले आणि त्यांच्या शक्ति निष्फळ कशा झाल्या? ते कांही सांगू शकले नाहीत. ते रत्नगुप्ताला म्हणाले, "मला माहीत आहे

अमर

की चोर कोण आहे! दोन दिवसांची मुदत दिलीस तर चोराचे नांव देखील मी सांगीन आणि मोहराही परत करीन. पण हे सांगितल्यावर तुला ह्या तरुणाची क्षमा मागावी लागेल आणि त्याच्या हातून तुलाही मार खावा लागेल. अशा रीतीने आपले पाप तुला धुवावे लागेल."

शिवानंदाच्या बोलण्याने रत्नगुप्त थोडा फार घाबरुन गेला पण त्याचा विश्वास नव्हता की शिवानंद खऱ्या चोराचे नाव सांगू शकतील. त्याने गंभीरपणाने ही अट मान्य केली आणि तो तेथून निघून गेला.

शिवानंदांनी त्या तरुणाला विचारले, "तूं सांगू शकशील कां की खरा चोर कोण असूं शकेल?" तरुणाने डळमळीतपणाने सांगितले, "योगीश्रेष्ठ, हे बाहेरच्या माणसांचे काम नाही. घरांतच चोर आहे. माझ्या मालकाचा मेव्हणा त्याच घरांत रहात आहे. तो पैसे उडवितो, छोटया कामासाठीही खूप पैसा खर्च करतो. मालकीण आपल्या पतीपासून लपवून आपल्या भावाला नेहमी पैसे देत रहाते. माझा संशय आहे की तिनेच ही चोरी केली असेल. तिच्यावर संशय येऊ नये म्हणून तिनेच शंभर मोहरा माझ्या कपड्यांत लपविल्या असतील. माझ्या संशयाला पुरावा नसल्याने मी तिला अपराधी ठरवू शकत नाही. जर ही गोष्ट मी उघडपणे सांगितली तर माझा मालक मला मारुन टाकेल."

शिवानन्द त्याच्या स्थितीवर सहानुभूति दाखवून म्हणाले, "तू आश्रमांत रहा. जखमांसाठी औषध घेत रहा आणि येथेच विश्रांती घे. मी शहरांत जाऊन त्याबद्दल माहिती जाणून घेईन."

थोडया अन्तरावर गेल्यानंतर ते एका झाडाच्या मागे गेले आणि ते आपल्याशीच बोलू लागले, "माझे रुप पूर्ण बदलून जाऊ दे." नंतर त्यांनी डोळे मिटले. डोळे उघडून बघितले तर समजले की त्यांचा संपूर्ण पोशाख बदललेला आहे. उंच बांध्याचे ते, आता बुटके आणि लठ्ठ झाले होते.



"माझ्या शक्ति पुन्हा काम करीत आहेत असे वाटते" असा विचार करुन त्यांनी आपले डोळे मिटले. अंधाराशिवाय आणि आपल्या ज्ञानदृष्टीने रत्नगुप्ताच्या घरच्या चोराला शोधू लागले. ह्यावेळीं सुद्धा त्यांना अंधाराशिवाय कांहीही दिसले नाही.

"ही गोष्ट मोठी विचित्र आहे. मला समजत नाही की असे कां होत आहे. माझी दिव्य दृष्टी अशा प्रकारे निष्फळ कां होत राहिली आहे." असेच आपल्याशी बडबडत ते गांवाच्या दिशेने निघाले. तपास केल्यानंतर त्यांना असे समजले की रत्नगुप्ताचा मेव्हणाच वाईट संवयींच्या आहारी गेला आहे. तो नेहमी लक्ष्मण नांवाच्या एका व्यक्तीच्या घरी येत जात असे. शिवानन्द त्याच्या घरी गेले.

त्यावेळीं लक्ष्मण आपल्या घराच्या चौथऱ्यावर बसलेला होता. शिवानंदाला पाहून त्याने दोन्ही हात जोडून नमस्कार केला आणि म्हणाला, "या, योगी शिवानंद, आपल्यासारख्या योग्याचे आमच्या घरीं



येणे हे आमचे सौभाग्य आहे.''

शिवानंदाने घाबरतच स्वतःकडे पाहिले. ते बुटके, लठ्ठ होते आणि त्यांचे पोटही पुढे आले होते. त्यांच्या लक्षांत आले नाही की लक्ष्मणाने त्यांना योगी शिवानंद कसे मानले.'' मी आणि योगी! आपल्याला कांही भ्रम तर नाही झाला?'' असे म्हणत ते लक्ष्मणाजवळ बसले.

''आपल्याला पाहूनच मला असे वाटले आणि म्हणून आपल्याला योगी म्हणूनच संबोधित केले.'' लक्ष्मणाने हंसत सांगितले.

इतक्यांत एक श्रीमन्त मिशीवाला मनुष्य तेथे आला. तो सहा फुटांचा माणूस गुरगुरत लक्ष्मणाला म्हणाला, ''घे आपल्या हजार मोहरा. मला ही रक्कम देऊन तू मदत जरूर केलीस. पण असे ऐकण्यात आले की यावर तुझी पत्नी फारच नाराज झाली आहे. आणि तिने मला खरें खोटें सुनाविले. जे तोंडात आले ते ती बडबडत राहिली. तुझ्यासारखा लोभी आणि स्वार्थी माणूस मी आजपर्यन्त पाहिला नाही. खरे सांगितले तर तुझ्यासारख्याचे कर्ज चुकविणे हा मूर्खपणा आहे. मी तुला ही रक्कम परत देणार नाही. तुला जे शक्य असेल ते कर.'' असे म्हणत पैशाची थैली घेऊन तो परत निघून गेला. परन्तु लक्ष्मणाने एक गोष्टही तोंडातून काढली नाही.

शिवानंद सारे कांही पाहात राहिले होते. त्यांना आश्चर्य वाटले की इतक्या शिव्या ऐकूनही लक्ष्मण गप्प कां बसला आहे. ते लक्ष्मणाला म्हणाले, ''तोंडाला येईल ते बोलून तो निघून गेला आणि आपण तोंडातून एक शब्दही काढला नाही. त्याची गरज असूनही त्याने आपल्याबरोबर उद्धट वागणूक केली आणि आपण गुपचूप ऐकत राहिलात. मला आपल्या ह्या सहनशक्तीचे फारच आश्चर्य वाटले.''

''माझ्या बाबत सर्व लोक असेच बोलत रहातात सर्वांचे असे सांगणे आहे की आपल्यांतच कांही दोष आहे, कमतरता आहे, त्यामुळें कोणीही आपल्याला पसंत करीत नाही. मला त्यांनी असा सल्ला दिला की योगी शिवानंदाला भेटून, आणि ह्याचे कारण जाणून आपल्याला सुधारावे, संसारसागरात उडया मारणाऱ्या माझ्यासारख्याला इतकी सवड कुठे? मला आपल्याला पाहूनच असे वाटले की स्वतः शिवानंदच माझ्या घरी आले. मला असे वाटते की आपणच मला स्थितप्रज्ञ बनवू शकाल. आज माझ्या घरी रहा आणि माझा पाहुणचार स्वीकारा. माझे वर्तन कसे बदलू शकेन हे मला सुचवा.'' लक्ष्मण म्हणाला.

शिवानंद दिवसभर त्याच्याच घरी राहिले. लक्ष्मणाची व्यवहारशैली त्यांना फारच विचित्र वाटली.

लक्ष्मणच्या पत्नीने आपल्या पतीला विचारले ''आज कसली भाजी करूं?'' वांग्याची भाजी करायला लक्ष्मणने सांगितले. स्वतःशी बडबडत आणि चिडून ती तेथून गेली. तिने वांग्याची भाजी केलीच नाही पण दुधीची भाजी केली. त्यांच्या मुलाने येऊन





स्पष्टपणे सांगितले, ''मी पुढे शिकू इच्छित नाही, शेती करीन.'' लक्ष्मणाने आपली मान्यता त्यावर दिली. परन्तु त्याच्या पत्नीने अधिकाराने सांगितले, ''तुम्ही धट्टेकट्टे आहात, डोंगरासारखे धिप्पाड आहात. तुम्ही पर्वतासारखे मजबूत, एकटेच शेती संभाळू शकाल. तो शेती कां करील? तो अवश्य शिकेल.''

लक्ष्मणाने आपल्या मुलाला सल्ला दिला की तो आपल्या आईचे म्हणणे ऐकेल आणि शिक्षण चालू ठेवील. माळी, नोकर किंवा बाहेरून आलेले किती तरी लोक त्याच्याजवळ आले, कांहींनी त्याच्या स्तुतीचे पूल बांधले, तर कांहींनी त्याला मुक्तकंठाने शिव्या ऐकविल्या. परंतु लक्ष्मण गप्प राहिला. तो गुपचूप ऐकतच राहिला.

शिवानंदाला असे वाटले की लक्ष्मण असमर्थ व शक्तिहीन आहे. आपल्या बुद्धीचा उपयोग न करता, कोणताही निर्णय घेऊं न शकणें, प्रत्येक गोष्टीवर नंदी बैलासारखी मान डोलवीत रहाणे, हे शिवानंदाला अतिशय गैर दिसले. ते लक्ष्मणाला सांगणारच होते की माणसांत स्वाभिमान असावा, त्याचे आपले व्यक्तिमत्व असावे, तेवढयांत एक माणूस तेथे आला.

तो रत्नगुप्ताचा मेव्हणा होता. आपल्या पांच हजार मोहरा लक्ष्मणाला द्यायला तो आला होता.

''तुझी नियत अजूनही बदलली नाही. तूं पुन्हां चोरी कां केलीस?'' लक्ष्मणाने विचारले, ''चोरी करताना तू मला पाहिलेस कां? वेड्यासारखे असे बोलतो आहेस, यासाठींच कोणीही तुझा मान राखीत नाही. मी तुला रक्कम दिली आणि ती सुरक्षित ठेवणे हे फक्त तुझे काम आहे. ह्यापेक्षां जास्त बोलूं नकोस. आपल्या आवाक्यात रहा.'' रत्नगुप्त्चा मेव्हणा कटु स्वरांत म्हणाला.

त्यावेळी लक्ष्मण नाराज होऊन म्हणाला, ''या माझ्या गोष्टी लक्षपूर्वक ऐक-भक्त भक्तिपूर्वक ईश्वराला नमस्कार करतो, ह्याचा अर्थ असा नाही की मूर्ती दगड नाही. नास्तिकाच्या झटकारल्याने, स्वीकार न करण्याने, असा अर्थ होत नाही की मूर्तींत ईश्वर नाही. आपल्याला जो मान मिळतो तो आपल्या मोठेपणामुळे नाही, तर दुसऱ्याच्या अभिरुचीने, तसेच त्यांच्या ज्ञानावर जाणीवेवर निर्भर रहाते. जोपर्यन्त आम्ही दुसऱ्यांचा आदर करीत राहू, आणि आपले काम चांगल्या तऱ्हेने करीत राहू तोपर्यन्त आम्हाला पर्वा नसावी की कोणी आमचा मान ठेवतो आहे किंवा नाही. मी तुझे धन सुरक्षित ठेवीन. काल रात्रीं तू रत्नगुप्ताच्या तिजोरीतील दहा हजार मोहरांची चोरी केलीस आणि आपल्या बचावासाठी तू शंभर मोहरा नोकराच्या कपडयांत ठेवून दिल्यास. तुला लहान मोठी कर्जे फेडावयाची होती, ती फेडलीस आणि उरलेल्या पांच हजार मोहरा तूं मला देत आहेस. ह्या अपराधामुळे तुला तुरुंगात जावे लागले तरी त्यासाठीं मी जबाबदार नाही.''

रत्नगुप्ताच्या मेव्हण्याने लक्ष्मणाच्या बोलण्यावर विशेष लक्ष दिले नाही. आणि तो तेथून निघून गेला. शिवानंदाने आश्चर्य प्रगट करीत विचारले, "आपल्याला कसे माहित की त्याने चोरी केली?"

"त्याला पाहूनच मला असे वाटले. जसे आपल्याला पाहून मला असे वाटले की आपणच शिवानंद योगी आहात. मला असेही वाटले की ह्या चोराला पकडण्याच्या उद्देशाने आपण येथे आला आहात. आपली कोणतीच हरकत नसेल तर या विषयांत मी आपला शिष्य होण्यास तयार आहे." लक्ष्मण म्हणाला.

शिवानंदाने लगेच त्याला नमस्कार करुन म्हटले, "आपल्याला समजण्यांत मी थोडा उशीरच केला आणि अनावश्यक वेळ वाया घालविला. आपण जेव्हां शिवानंद म्हणालात तेव्हांच मला समजावयास हवे होते की आपणच खरे स्थितप्रज्ञ आहात. संसारसागर तरुनही आपण राग द्वेष, भावनोद्वेग, मीपणा इत्यादि पासून दूर आहात. स्थितप्रज्ञ होण्याचा अभ्यास मला आपल्यापासूनच करावयास पाहिजे. स्वामी उपदेश करा!"

आपले डोके नकारार्थी हालवीत लक्ष्मण म्हणाला, "मी सामान्य प्राणी आहे, साधारण जीवन जगणारा, आणि आपण सर्व कांही त्याग करुन योगसाधनेत मग्न आहात. महायोगी आहात. रत्नगुप्ताने आपल्याला टोकले, आपल्या योग शक्तीची चेष्टा केली तरीसुद्धां आपण गप्प राहिलात. एका निरपराध्याला वांचविण्यासाठी आपण जड ओझ्याचा भार आपल्यावर घेतलात. तात्कालिक रुपाने आपल्या योगशक्ति जरी निष्फळ झाल्या तरीही आपण महान आहात. माझ्यासारखे आपण कोणी सामान्य मनुष्य नव्हेत."

शिवानंद म्हणाले, "स्वामी, आता माझ्यांत ज्ञानोदय झाला आहे. स्थितप्रज्ञ होण्यास योगसाधनेची कांही जरूर नाही. आतापर्यन्त मी सगळ्यांकडून योगी म्हणवून घेण्यासाठी लालचावलेला होतो. यामुळे मी स्थितप्रज्ञ होऊं शकलो नाही." लक्ष्मणाने मनाई करुनही शिवानन्द त्याच्या पाया पडले.

नंतर लक्ष्मणाच्या साक्षीच्या आधारावर शिवानंदांनी खरा चोर रत्नगुप्ताच्या हवाली केला. सख्खा मेव्हणा असूनही रत्नगुप्ताने त्याला तुरुंगाची शिक्षा देवविली. शिवानंदांच्या म्हणण्यानुसार त्याने आपल्या नोकराची क्षमा मागितली. त्यानंतर शिवानंद आश्रम सोडून निघून गेले. आणि अज्ञात स्थळीं स्थितप्रज्ञ होऊन अनेकांना मदत करुं लागले.





## ६५. यादवांचा विनाश

# महाभारत

दुसऱ्या दिवशी सांबाच्या गर्भातून मुसळ जन्मले. हे बघून श्रीकृष्णाने यादवांना आदेश दिला की त्या मुसळाचे चूर्ण करुन ते समुद्रांत फेकून द्या. यानंतर कृष्णाने अशी घोषणा केली की कोणी मदिरा-पान करुं नये. जो कोणी मदिरेचे सेवन करेल त्याला फांशी दिली जाईल.

वृष्णि व अंधकवंशी लोक अत्यंत जागरुक होते. तरीही परत परत अनेक अपशकून होऊं लागले. सगळीकडे उंदीर वाढले. यादव अनेक गैरकृत्यें करुं लागले. मोठ्यांविषयी त्यांच्या मनात आदरभाव राहिला नाही. पती-पत्नी एकमेकांची निंदा करुं लागले. जेवणांत किडे पडूं लागले. अशा तऱ्हेचे अपशकून महाभारत युद्धाआधीदेखील झाले होते. आणि त्या अपशकुनांनी जनहानीचा संकेत दिला होता. त्याची आठवण येऊन कृष्णाने समस्त यादवांना समुद्रतीरी तीर्थयात्रेला घेऊन जाण्याचे ठरविले.

तीर्थयात्रेची तयारी झाली. मोठ्या प्रमाणांत मदिरा, मांस तयार केले गेले. सर्वजण हत्ती, घोडे व रथांवर स्वार होऊन समुद्रतीरावर पोचले. आणि





सगळ्यांनी आपल्या राहाण्याची व्यवस्था केली. थोडया अंतरावर प्रभासतीर्थ होते.

वृष्णि वंशीय उद्धव, जो श्रीकृष्णाचा लाडका सखा होता, सर्व यादव वीरांना तो समुद्रतटावर घेऊन गेला. तिथे लोक आरडाओरडा करत, दंगा करत आपल्याला हवी तशी मदिरा पिऊं लागले. तेव्हा कृष्ण व बलरामाबरोबर सर्व लोकांनी खूप मदिरा प्राशन केले. मदिरेच्या नशेत युयुधान कृतवर्माला म्हणाला ''तुम्ही झोपलेल्या उपपांडवांचा फसवून वध केला आहे. पण कुठलाही यादववंशी असा अधर्म कधीही करणार नाही.'' यावर दोघांच्यात वादावादी झाली. यादव मदिरापानाची भांडी एकमेकांवर फेकू लागले. अशा त-हेने एकाच वंशात अकारण भांडण सुरुं झाले. बघता बघता प्रद्युम्न भोजवंशीयांवर तुटून पडला. भोजवंशीयांनी सात्यकी व प्रद्युम्नावर हल्ला केला. आणि दोघांना मारले. यामुळे कृष्णाला राग आला व त्याने एक मूठभर लव्हाळे तोडून लोकांना मारले. आश्चर्याची गोष्ट अशी की त्या लव्हाळयाने मुसळाचे काम केले.

सगळयांनी तेच गवत तोडून तोडून एकमेकांना मारले. तेव्हां रागाने धुंद झालेले, वेडे झालेले लोक, एकमेकाला मारूं लागले. यावेळी मुलाने वडीलांना तर वडीलांनी मुलाला मारले. आपला मुलगा, नातवंडे, मेलेली पाहून कृष्णाने अनावरणीय क्रोधाने बाकी सर्वांना मारुन टाकले.

तेव्हां कृष्णाचा सारथी दारुक व बभ्रुवाहनाने त्याला म्हटले, ''देवा, या भांडणात सगळे लोक मेले आहेत. आपण जाऊन बलरामाला शोधूं. त्यांचा कांही पत्ता लागत नाही!''.



शेवटी त्यांना एका झाडाखाली बसलेला बलराम दिसला. तेव्हां कृष्ण दारुकाला म्हणाला ''तू तावडतोब हस्तिनापुरास जाऊन पांडवांना सांग, की सगळे यादव मुनींच्या शापामुळे मेले. ही वार्ता ऐकून अर्जुन धावत येथे येईल''.

त्याचक्षणी दारुक रथांतून निघाला. तेव्हां कृष्ण बभ्रुला म्हणाला ''तूं बायकांचे रक्षण कर.त्यांच्या अंगावरील दागिन्यांच्या लोभाने चोर त्यांना पळवून नेतील''.

पण कृष्ण बोलत असतानाच एका शिकाऱ्याचा बाण लागून बभ्रुवाहन मेला. शेवटी कृष्ण बलरामाला म्हणाला ''मी सर्व बायकांना द्वारकेला पोचवून परत येतो तोपर्यन्त तू कुठेही जाऊं नकोस. इथेच रहा.''

असे म्हणून सर्व बायकांना घेऊन कृष्ण द्वारकेला गेला. सर्व स्त्रियांना आपल्या पित्याच्या हाती सोपवून म्हणाला ''पिताश्री, मी आता इथे राहूं शकत नाही. बलराम व मी दोघे तपश्चर्या करुं''. अशी वडीलांची समजूत काढून कृष्णाने त्यांना प्रणाम केला. आणि ते बलरामाकडे परत आले.

बलराम एका निर्जन प्रदेशात योगसमाधीत होते. कृष्णासमोर एक सहस्त्र फण्या असलेला धवल सर्प बलरामाच्या तोंडातून निघून समुद्रांत गेला. त्या सर्पाचे स्वागत करण्यांस वरुणदेव व अन्य सर्प आले.

यानंतर पुष्कळ काळापर्यन्त इकडे तिकडे फिरुन कृष्ण एका स्थानी आले. इतक्यांत 'जर' नांवाचा शिकारी आपल्या शिकारीमागे धावत तिथे आला. लांबून कृष्णाला बघून हरीण समजून





त्याने कृष्णाच्या पायावर बाण मारला. तेव्हां कृष्णाने देहत्याग करुन आपल्या तेजाने पृथ्वी व आकाश भरुन टाकून ते स्वर्गांत गेले. इन्द्र व इतर सर्व देवांनी त्यांचे स्वागत करुन त्यांना आपल्या बरोबर घेऊन गेले.

श्रीकृष्णाने पाठविलेला दारुक कुरुदेशी पोचला. पांडवांना भेटून त्याने यादव वंशाच्या विनाशाची वार्ता त्यांना सांगितली. ही बातमी ऐकून पांडवांना फारच दुःख झाले. अर्जुन दारुकाबरोबर द्वारकेला आला. व अनाथ यादव स्त्रियांना भेटला. अर्जुनाला बघून त्या शोक करुं लागल्या. त्यांचे दुःख बघणे असह्य होऊन त्यांचे सांत्वन करुन अर्जुन वसुदेवाला भेटायला गेला.

वसुदेवाने त्याला आलिंगन देऊन म्हटले "अर्जुना, असामान्य राक्षसांना लीलया मारणारी माझी मुले आता राहिली नाहीत पण मी अजून जिवंत आहे. तुझे शिष्य सात्यकी व प्रद्युम्नामुळे यादव वंशाचा विनाश झाला. पण यांत कोणाचाही दोष नाही. हे सगळं मुनींच्या शापाचे फळ आहे. कृष्ण मला सांगून गेला आहे की तू इथे येशील. व तुझ्या सांगण्याप्रमाणेच मी वागायचे आहे."

यानंतर अर्जुन दारुकाबरोबर यादवांच्या दरबारांत गेला. व मंत्र्यांना म्हणाला, "लवकरच द्वारकानगरी पाण्याखाली जाईल. मी सर्वांना इंद्रप्रस्थाला घेऊन जाणार आहे. तुम्ही इथे असलेली धनसंपत्ती गोळा करा. तुमचा राजा बनणारा 'वज्र' इंद्रप्रस्थात राहील. सर्व लोकांनी यात्रेची तयारी करा. उशीर करुं नका".

त्याच्या दुसऱ्याच दिवशी वसुदेवाने योगसमाधी घेऊन प्राण सोडले. वसुदेवाच्या बायका देवकी, रोहिणी, भद्रा व मंदिरा त्याच्या बरोबर सती गेल्या. वसुदेवाच्या लाडक्या प्रदेशांतच त्याचा दहन संस्कार केला. त्यानंतर वज्र इत्यादि वृष्णि व अंधक कुमारांनी त्या स्थळी जल तर्पण केले.

त्यानंतर अर्जुनाने यादव मरण पावलेल्या जागी जाऊन त्यांची उत्तरक्रिया केली. सातव्या दिवशी अर्जुन द्वारकेहून निघाला. हत्ती, रथ, पायीं चालणारे, पुढें पुढें जात होते, व मागे समुद्र हळूहळू द्वारकेला आपल्या पोटांत घेत होता.

अर्जुन मजल दर मजल करीत पंचनदात



घेऊन पोचला. असंख्य असहाय स्त्रियांच्या बरोबर एकट्या अर्जुनाला बघून चोरांनी काठ्या घेऊन दगड फेकले व ते बायकांवर तुटून पडले. अर्जुनाने त्यांना डराधमकवायला पाहिले. पण त्यांनी तिकडे लक्ष दिले नाही. तेव्हां रागावून अर्जुनाने गांडीव धनुष्य उचलले पण ते चालविणे देखील त्याला कठीण झाले. त्याला आपली अस्त्रें आठवेनात. तो चोरांचे कांही करुं शकला नाही. आपल्या या दयनीय अवस्थेची त्याला लाज वाटली. त्याच्या देखत चोर यादव स्त्रियांना पळवून घेऊन गेले. ज्या बायका वाचल्या त्यांना व बरोबरची धनसंपत्ती घेऊन अर्जुन कुरुक्षेत्री पोचला.

युधिष्ठिराने ठरविल्यावर कृतवर्माची पत्नी व पुत्राला मूर्तिकावतमधे, छोटी मुले, स्त्रिया व वृद्धांना इंद्रप्रस्थात, सात्यकीच्या मुलाला सरस्वतीमधे ठेवून, त्याने वज्राला इंद्रप्रस्थाचा राजा बनविले. अक्रूराच्या बायकांना वज्राच्या आश्रयाला ठेवले. कृष्णाच्या बायकांत रुक्मिणीने अग्नीप्रवेश केला. सत्यभामा वगैरे वनांत जाऊन तपस्या करुं लागल्या.

तेव्हां अर्जुन महर्षि व्यासांच्या आश्रमांत गेला. अर्जुनाला पाहिल्याबरोबर व्यासांनी विचारले "अर्जुना, तू अत्यंत कष्टी दिसत आहेस. काय झाले?"

यावर अर्जुन म्हणाला "हे महात्मा, मी दुःखी कष्टी कां होणार नाही? श्रीकृष्ण, बलराम मारले गेले. मुनींच्या शापामुळे सारा यादव वंश नष्ट झाला. असाधारण धक्के खाणारे यादव वीर गवताच्या टोकांनी मेले. या घटनांनी माझ्या मनाला जबरदस्त धक्का बसला आहे. मला कळत



नाही की ज्या लोकामध्ये कृष्ण नाही तिथे मी कसा राहूं शकेन? ह्याहीपेक्षा एक भयंकर घटना घडली आहे. अचानक माझे सारे शौर्य मला सोडून गेले आहे. चोर यादव स्त्रियांनी पळवून नेत होते आणि मी कांहीही करुं शकलो नाही. माझे मन दुःखी, अशांत आहे. मी वेडयासारखा भटकत आहे. मी काय करूं?''

''हे अर्जुना, वृष्णि व अंधक शापामुळे मेले. त्यांची चिंता करुं नकोस. कृष्ण हे थांबवू शकला असता. पण हे बघून देखील तो गप्प राहिला. शाप टाळणे त्याच्या हातांत तरी होते का? कृष्णाचे अवतारकार्य पूर्ण झाले. ते आपल्या निजधामास गेले आहेत.''

तू सुद्धां भीम, नकुल व सहदेवाबरोबर अनेक महान कार्ये केली आहेस. माझा विश्वास आहे की तुम्ही कृतार्थ झाला आहांत. तुम्हाला पण लवकरच उत्तमगती प्राप्त होईल. काळ स्वतः सगळ्यांना बदलतो. हे जग काळाच्या आधीन आहे. काळच आपल्यावर राज्य करत असतो. आपल्याला नाचवत असतो. तुझ्या अस्त्रांचे कार्य संपले होते. म्हणून ती गेली. हा काळाचा महिमा आहे. म्हणून तू चिंता करुं नकोस''. महर्षि व्यासांनी त्याला समजांवले.

अर्जुन हस्तिनापुरांस परत आला. युधिष्ठिराला सगळी हकीगत त्याने सांगितली.

हे सगळे ऐकल्यानंतर युधिष्ठिराच्या मनांत महाप्रस्थान करायचा विचार आला. तो अर्जुनाला म्हणाला ''अर्जुना, काळ सर्व प्राण्यांना जखडून ठेवतो''. यानंतर सर्व पांडवांच्या मनांत महाप्रस्थान करण्याची इच्छा झाली. युधिष्ठिराने युयुत्सुला बोलावून त्याच्या हाती राज्य सोपवले.

आपल्या राज्यासाठी वारस म्हणून परीक्षित व इंद्रप्रस्थांसाठी वज्राला राजा करण्याचा निर्णय झाला. दोघांवर देखरेखीचे काम सुभद्रेवर सोपवलें. मग युधिष्ठिराने द्वारकेंत मेलेल्या लोकांचे शास्त्राप्रमाणे विधीपूर्वक श्राद्धकर्म केले. (क्रमशः)





# साहसी योद्धा

धरणीकोटमधें एक घरंदाज क्षत्रिय सरदार होता. त्याचं नांव शूरवर्मा. त्याला एक सुंदर मुलगी होती. तिचे नांव मालिनी. ती नुसतीच रुपवती नव्हती, तर त्याच्या अपार संपत्तीची वारसदेखील होती. तिच्याशी लग्न करण्यास अनेक तरुण उत्सुक होते. परंतु आपल्या प्रयत्नांत ते अयशस्वी झाले. कारण आपल्या मुलीचा विवाह एखाद्या धाडसी योदध्याशीच करायचा, असं शूरवर्माने ठरवलं होतं.

त्या शहरांत कीर्तिसिंह नांवाचा एक तरुण राहात होता. तोही अतिशय देखणा होता. एकेकाळीं त्याच्या वाडवडिलांची सत्ता कांही राज्यांवर होती. पण सध्यां तो मात्र निर्धन होता. त्याची संपत्ती म्हणजे फक्त एक तलवार आणि एक पांढरा घोडा एवढीच होती. म्हणून तो सैन्यांत भरती होऊन आपले पोट भरीत होता. तो जरी अतिशय शूर होता, तरी आपल्या शौर्याची चुणुक दाखवण्याची संधी त्याला आजपर्यंत मिळालेली नव्हती.

एक दिवस कीर्तिसिंह दूरच्या प्रवासाहून शहरांत परत येत होता. शहराच्या बाहेरच शूरवर्माचा सुंदर महाल होता. तो पाहून त्याने आपला घोडा तिथेंच बांधला. उन्हांतून प्रवास केल्यामुळें त्याला खूप तहान लागली होती. आपल्या घोडयाला व स्वतःला प्यायला पाणी मिळावे म्हणून तो महालाजवळ पोचला.

महालासमोर सुंदर झाडें व फुलझाडें असलेले एक उद्यान होते. झाडांच्यामधें कमळांनी भरलेला एक तलाव होता. त्या तलावाच्या कांठावर मालिनी बसलेली होती. पावलांचा आवाज ऐकून तिने कीर्तिसिंहाकडे मान वळवून पाहिले, आणि विचारले, "आपण कोण आहात? काय पाहिजे आपल्याला?"

मालिनीचे सौंदर्य पाहून कीर्तिसिंह चकित झाला होता. आणि खरं म्हणजे त्याचा देखणा, रुबाबदार चेहरा पाहून मालिनीदेखील चकित झाली होती.

२५ वर्षांपूर्वी 'चांदोबा'त प्रसिद्ध झालेली कथा

"मी फार लांबून प्रवास करीत आलोय. मी आणि माझा घोडा, दोघांनाही खूप तहान लागली आहे. आम्हाला प्यायला पाणी द्याल कां?" कीर्तिसिंहाने तिला विचारलं.

मालिनीने दोनदा टाळी वाजवली. लागलीच एक सेवक येऊन उभा राहिला.

"यांना प्यायला पाणी घेऊन ये. नंतर घोड्याला घेऊन जा आणि त्याला पाणी पाज."

सेवकाने लगेच कीर्तिसिंहाला पाणी आणून दिले व नंतर तो घोड्याला घेऊन गेला.

तहान भागल्यानंतर कीर्तिसिंहाचा थकवा दूर झाला. चारी बाजूला नजर फिरवून त्याने मालिनीला विचारले, "वा, हे उद्यान किती सुंदर आहे. इथें राहूनदेखील आपण उदास कां आहात?"

"माझ्या दुःखाचं कारणही तेच आहे. मला वाटतं की या जन्मीं माझा विवाह होणं कठीण आहे. माझ्या वडिलांनी निर्णय घेतलाय की ते एखाद्या साहसी योदध्याबरोबर माझा विवाह करतील. जर भीम किंवा अर्जुनापैकी कुणी जिवंत असेल तरच माझा विवाह होईल, एरवीं नाही." मालिनीने आपल्या मनांतली व्यथा प्रकट करीत उत्तर दिले.

"तर मग माझ्यासारख्या व्यक्तीला हे भाग्य लाभणार नाही. कारण मी एक साधा सैनिक आहे. आमचे घराणें मोठे आहे, पण माझी संपत्ती म्हणजे फक्त ही तलवार आणि घोडा, इतकीच! मी साहसी आहे, धाडस करुं शकेन - पण आजवर माझी पात्रता जोखण्याची संधीच मला अवाप कधीं मिळालेली नाही. जेव्हां केव्हां



मिळेल, तेव्हां माझं वय किती असेल कोण जाणे!" कीर्तिसिंह म्हणाला.

"मला सुखी करण्यासाठी आपल्यासारखी व्यक्ती योग्य आहे. परंतु माझ्या वडिलांचे समाधान होण्यासाठी आपल्यासारखी व्यक्ती कांही उपयोगी पडणार नाही." मालिनी म्हणाली.

ते दोघेजण बोलत होते तोपर्यंत सेवकाने घोड्याला पाणी पाजून परत आणले.

"आता आपण परत जावं. अनोळखी व्यक्तीशी मी बोललेलं माझ्या वडिलांना आवडणार नाही." मालिनीने त्याला नम्रपणें सांगितलं.

कीर्तिसिंहही आपल्या घोड्यावर बसून घरी परत गेला. परंतु प्रयत्न करुनही मालिनीला तो विसरुं शकला नाही. जर मालिनीला स्वतःची इच्छा पूर्ण करता आली असती तर तिने



त्याच्याशी विवाह केला असता. या जाणिवेने त्याला जास्तच वाईट वाटत होते. तो डोंगरात भटकायला जात असे व याच गोष्टीचा विचार करीत असे.

असाच एक दिवस तो डोंगरांत हिंडत होता, तेव्हां एका ठिकाणीं त्याला एक झोंपडी दिसली. झोंपडी समोरच एक म्हातारी आजीबाई बसली होती.

कीर्तिसिंहाचा चिंताक्रांत चेहरा पाहून तिने त्याला विचारलं, "काय रे बाळ? तूं इतका उदास कां दिसतो आहेस?" कीर्तिसिंहाची सारी कथा ऐकून आजीबाई झोंपडीत गेली. थोड्या वेळानंतर एक डबी घेऊन आली. "या डबींत एक लहानसा किडा आहे. ही जमिनीवर पाडलीस तर मंत्राच्या प्रभावाने त्या किडयाचे एका महासर्पांत रूप बदलेल. तूं जर त्याला मारलंस तर तूं एक साहसी योद्धा म्हणून प्रसिद्धी मिळवशील. प्रयत्न करून तर पाहा, कदाचित हिच्या मदतीने तुझी इच्छापूर्ती होऊं शकेल." असे म्हणत आजीने ती डबी कीर्तिसिंहाला दिली.

दुसऱ्या दिवशी कीर्तिसिंहाने ती डबी आपल्या कपड्यांत लपवली आणि तो शूरवर्माच्या घरीं पोंचला. शूरवर्माने त्याचे स्वागत करुन विचारले, "तूं कोणत्या कामा-साठीं आला आहेस?"

"मी एका नवशिका शिपाई आहे. एक दोन छोट्या लढायांत मी भाग घेतला आहे. मोठ्या लढायांत भाग घ्यायची संधी मला अजून मिळाली नाही. पण जेव्हां मोका मिळेल, तेव्हांच मी माझ्या शौर्याबद्दल बोलूं शकेन." कीर्ति-सिंहाने सांगितलं. "असामान्य शौर्याचे कृत्य केलेस की नंतरच मला येऊन भेट. तेव्हां आता तूं इथून निघून जा." शूरवर्माने त्याला उत्तर दिले.

कीर्तिसिंहाने मान लवून अभिवादन केले व तो बाहेर आला. आपली डबी उघडून तो किडा त्याने खाली पाडला. दुसऱ्याच क्षणीं बाहेर मोठा कोलाहल ऐकूं आला व एकच गोंधळ माजला. सर्वजण महालाबाहेर आले. शूरवर्मादेखील पळत आला.

बाहेर एक प्रचंड सर्प फुत्कारत होता. मूर्तिमंत भीती समोर उभी राहिली होती.

"अरे, तुम्ही सारेजण बघत काय बसलात? त्याला ठार मारा आधी!" शूरवर्मा ओरडूं लागला. पण कुणीही सर्पाजवळ जाण्याचे धाडस केले नाही. उलट सगळेच दूर पळूं लागले. "सरकार, त्या मोठ्या सर्पाला मारणं म्हणजे कांही लहानसहान गोष्ट थोडीच आहे?" सेवकांनी सांगितलं.

"थांबा, मी पाहातो त्याच्याकडे!" असं म्हणून कीर्तिसिंहाने म्यानांतून आपली तलवार उपसली. परंतु तो सर्प शेपटीने कीर्तिसिंहाला फटके मारायचा प्रयत्न करीत होता.

कीर्तिसिंह तलवारीने सापाची शेपटी काटण्याचा प्रयत्न करूं लागला. परंतु साप त्याचा वार चुकवून कीर्तिसिंहालाच विळखा घालण्याच्या तयारींत होता. कीर्तिसिंहाने मोठ्या शिताफीने सापाचा हेतू निष्फळ ठरवला. सांपही कीर्तिसिंहाच्या तलवारीच्या घावापासून आपले रक्षण करत होता. पण शेवटी कीर्तिसिंहाने सांपाची शेपटी तोडली. त्यानंतर त्याने सांपावर अनेक वार केले व त्याला कमजोर बनवलं आणि आपल्या तलवारीने अखेरीस सांपाला मारुन टाकलं.

सांप-माणसाची ही भयंकर लढाई पाहणाऱ्यांचे शरीर घामाने ओलेचिंब झालेले होते, व ते सगळेच घाबरलेले होते. शूरवर्माच्या चेहऱ्यावर मात्र आनंद मावत नव्हता.

तो कीर्तिसिंहाजवळ गेला आणि त्याच्या खांद्यावर प्रेमाने थोपटत त्याने त्याला शाबासकी दिली. शूरवर्मा म्हणाला, "शाबास! तूं खराच साहसी योद्धा आहेस." त्यानंतर सेवकांना बोलावून त्याने आज्ञा केली. "यांना चांगले अभ्यंगस्नान घालून नवीन कपडे द्या आणि पुरोहितांना बोलावणें पाठवा."

त्यानंतर मालिनी व कीर्तिसिंहाचा विवाह मोठ्या थाटांत साजरा झाला. कांही दिवसानंतर कीर्तिसिंह एक थैली व एक छोटी डबी घेऊन पर्वतराजींकडे गेला. त्या म्हाताऱ्या आजीला भेटून तो म्हणाला, "आजीबाई, ही घ्या तुमच्यासाठी एक भेट. आणि ही तुमची डबी. मी ती परत आणली आहे."

आजीबाईने थैली उघडून पाहिली. तर त्यांत सोनें भरले होते. डबी उघडून पाहिली तर त्यांत तो किडा होता. तिने कीर्तिसिंहाला मनःपूर्वक आशिर्वाद दिला, "बाळ! दीर्घायुषी हो आणि यशस्वी हो!"



# स्वर्ग? नरक?

रामाच्या मंदिरात एक प्रकांड पंडित प्रवचन करीत होते. पाप-पुण्य आणि स्वर्ग-नरक याबद्दलची माहिती ते श्रोत्यांना समजावून सांगत होते.

"मोक्षप्राप्ती हे सर्वांचे लक्ष्य असायला हवं! इहलोकांत पुण्यकार्य करता करता पारिवारिक जीवनांत जास्त गुंतून न जाता जे जीवन जगतात, त्यांना स्वर्गप्राप्ती अवश्य होते. पण हे दिसतं तितकं सोपं नसतं बरं! याच्यासाठी प्रथम आपल्या मनांतल्या इच्छा नष्ट करायला हव्यात. आपली दृष्टी परमेश्वरावर केंद्रित केली पाहिजे. अशा प्रकारें पुण्य मिळवून परमेश्वराच्या निकट जाण्याची ज्यांना इच्छा आहे, त्या सर्वांनी हात वर करावेत." उपस्थित असलेल्या भक्तवृंदाला पंडितांनी आवाहन केलं.

एकाखेरीज सगळ्या श्रोत्यांनी हात वर केले. तो एक म्हातारा शेतकरी होता. पंडिताने त्याच्याकडे निरखून पाहिले. पण तो शेतकरी निश्चिंत मनाने बसला होता. तेव्हां पंडितांनी जरा कठोर शब्दांत सांगितलं. "इच्छांचे गुलाम होणं ही फारच सोपी गोष्ट आहे. शारिरिक सुखांत गुंग होऊन जे परमेश्वराचे स्मरण करीत नाहीत, त्यांना नरकप्राप्ती ही ठरलेली आहे. हे सारं त्यांच्या कर्माचं फळ आहे. यमदूत येऊन त्यांना नरकांत घेऊन जातील, आणि त्यांना अनेक तऱ्हेच्या यमयातना भोगायला लागतील. अशा घोर नरकांत कुणाला तरी जावंसं वाटेल कां? कधीही नाही; कुणालाही तसं वाटणार नाही! तरीदेखील कुणाला तशी इच्छा असेलच तर त्यांनी आपला हात वर करावा." त्या म्हाताऱ्या शेतकऱ्याकडे रोखून बघत पंडित बोलत होते.

हजर असलेल्या श्रोत्यांपैकी कुणीही हात वर केला नाही. त्या शेतकऱ्याने या वेळेलाही हात वर उचलला नाही. पंडितांनी डोळे रोखून त्याला विचारलं, "अहो, तुम्हाला जायचंय तरी कुठे? मी जेव्हां विचारलं की तुम्हाला स्वर्गांत जायचंय कां, तेव्हां तुम्ही हात वरती उचलला नाहीत. आणि जेव्हां नरकांत जायची इच्छा आहे कां, हे विचारलं, तेव्हांही तुम्ही हात वर केला नाहीत! काय?"

म्हातारा शेतकरी खोकत खोकत बोलूं लागला, "आत्ता मला कुठेंच जायची इच्छा नाही. माझी छोटी नात आत्ता कुठें बोलायला लागली आहे. एखादी साळुंकी बोलावी ना, तशी गोड बोलते बघा! वा, त्या बोलण्यांत किती आनंद आहे. आणि माझी पांढरी गाय आता गाभण आहे. पशुवैद्याने सांगितलंय की यावेळीं तिला नक्की खोंड होईल. म्हणून आत्ता तर मला अगोदर त्याचीच वाट पाहायचीच."

– महेश





# मृत्युपत्र

जेरुसलेम नगरांत एक प्रसिद्ध व्यापारी होता. त्याला एकच मुलगा होता. व्यापारी दूर देशांत जाऊन व्यापार करीत असे. म्हणून त्याचा मुलगा घरी राहून शिक्षण घेत होता. व्यापारी जेव्हां परदेशीं जाई तेव्हां त्याच्याबरोबर त्याचा एक गुलाम जात असे.

एकदा व्यापारी दूरच्या एका देशांत गेला होता, तेव्हां तो अचानक आजारी पडला. त्याचा आजार बरा होण्याचे कांही चिन्ह दिसेना. आपला मृत्यू जवळ आला आहे हे जेव्हां व्यापाऱ्याला समजून चुकलं तेव्हां व्यापाऱ्याला आपल्या मुलाच्या भविष्याबद्दल फारच काळजी वाटूं लागली. कारण मुलगा अजून लहान होता.

जर व्यापाऱ्याने आपली सारी संपत्ती आपल्या मुलाच्या नांवाने लिहून ठेवली असती तर गुलामाने ती सारी हडप केली असती व मुलगा अनाथ झाला असता. हे होऊं नये म्हणून आपले मृत्युपत्र कशा प्रकारें लिहावे हा महत्वाचा मुद्दा होता. याबद्दल बराच विचार करुन शेवटी व्यापाऱ्याने एक निर्णय ठरवला.

आपले मृत्यूपत्र लिहीण्यासाठीं त्याने एका लेखकाला बोलावण्यासाठीं गुलामाला शहरांत पाठवले. याबाबतींत माहीतगार असलेल्या एका लेखकाने व्यापाऱ्याने सांगितल्याप्रमाणें त्याचे मृत्युपत्र लिहून तयार केले. त्या मृत्युपत्रानुसार व्यापाऱ्याने आपली सारी संपत्ती गुलामाच्या नांवे लिहीली, व त्यांत एक कलम घातले की व्यापाऱ्याच्या मुलाने वडिलांच्या संपत्तीमधून कोणतीही एक गोष्ट मागून घ्यावी. या विचित्र मृत्युपत्राचा हा सारांश होता.

लौकरच त्या आजारांत व्यापाऱ्याचे निधन झाले. गुलाम त्याचे मृत्युपत्र घेऊन जेरुसलेमला परत आला. मृत्युपत्रानुसार त्याने साऱ्या संपत्तीवर आपली मालकी जाहीर केली.

आपल्या वडिलांच्या मृत्यूची बातमी जेव्हां मुलाला कळली, तेव्हां त्याने सारी संपत्ती आपल्या स्वाधीन करण्यास गुलामाला सांगितले.

एक ज्यू लोक कथा

गुलामाने संपत्ती घायचे नाकारले आणि मुलाला त्याच्या वडिलांचे मृत्यूपत्र दाखवून म्हटले, "हे तुझ्या वडिलांचे मृत्यूपत्र आहे. त्यांच्या इच्छेनुसार त्यांची सारी संपत्ती माझ्या मालकीची झाली आहे. आता त्यांतली तुला जी एखादी गोष्ट स्वत:साठी हवी असेल ती सांग. ती तू पसंत करुन घेऊं शकतोस."

व्यापाऱ्याच्या मुलाला ते मृत्यूपत्र पाहून आश्चर्य वाटले काय करावे ते त्याला समजेना. शेवटी तो आपल्या वडलांच्या एका मित्राला भेटायला गेला आणि त्याने त्यांचा सल्ला मागितला. ते वृद्ध गृहस्थ अतिशय बुद्धिमान आणि व्यवहारकुशल होता. त्याने मुलाचे बोलणें लक्षपूर्वक ऐकले व तो म्हणाला, "बेटा, तूं काळजी करुं नकोस. यांत तुझं कांहीही नुकसान होणार नाही. तुझ्या वडलांनी असे मृत्युपत्र लिहून तुझ्यावर मोठा उपकार केलेला आहे. उद्यां तू न्यायालयांत ये. गुलामाला सांग की ते मृत्यूपत्र घेऊन न्यायाधिशाकडे ये. तिथें मी जे सांगेन त्याप्रमाणें जर तू केलंस तर तुझं भलंच होईल."

दुसऱ्या दिवशीं सकाळीं व्यापाऱ्याचा मुलगा व तो गुलाम, ते मृत्यूपत्र घेऊन न्यायालयांत गेले. न्यायाधीशासमोर मृत्युपत्र पुन्हां वाचले गेले.

न्यायाधीशाने मुलाला विचारले, "तूं मृत्यूपत्र वाचलेलं आत्ता ऐकलं आहेसच! आता तुझ्या पित्याच्या संपत्तीमधून तुला काय हवंय?" या प्रश्नाचे उत्तर त्या वृद्ध गृहस्थाने मुलाला अगोदरच सांगून ठेवले होते. व्यापाऱ्याच्या मुलाने आपल्या वडलांच्या गुलामाकडे बोट दाखवून म्हटले, "मला हा गुलाम हवा आहे." न्यायाधीशाने गुलामाला व्यापाऱ्याच्या मुलाच्या स्वाधीन केलं. अशा तऱ्हेने व्यापाऱ्याने गुलामाच्या नांवाने लिहीलेली सारी संपत्ती त्याच्या मुलाच्या हातांत आली.





# भारताची ओळख

## प्रश्नावली

५ जून या जागतिक पर्यावरण दिनाच्या स्मृती निमित्त या महिन्याची प्रश्नावली भारताचा निसर्ग, भूगोल व पर्यावरण यावर आधारित आहे. तुमची माहिती किती अद्ययावत आहे याचा पडताळा घ्या.

१. भारतातील सगळ्यांत जास्त लांबीची नदी कोणती?
२. कोणती नदी पूर्वी 'वितस्ता' नांवाने प्रसिद्ध होती?
३. भारतातील सर्वात उंच पर्वताचे नांव 'गॉडविन् ऑस्टिन' हे आहे. गिर्यारोहक त्याला दुसऱ्या कुठल्या नांवाने ओळखतात?
४. भारतातील दुय्यम क्रमांकाचे उंच शिखर कोणते?
५. राष्ट्रीय वन योजनेप्रमाणे जमिनीच्या कांही टक्के भागावर किमानपक्षी अमूक टक्के जंगल असले पाहिजे. ही टक्केवारी किती आहे?
६. कुठल्या राज्यांत सर्वांत कमी जंगल आहे?
७. 'प्रोजेक्ट टायगर' केव्हां सुरुं झाला?
८. 'नलसरोवर' कुठे आहे? तेथे तुम्ही काय पाहूं शकता?
९. कोळसा खाणकाम भारतांत केव्हां सुरु झाले? कोठे?
१०. कोळसा उत्पादनांत जगांत भारत कितव्या क्रमांकावर आहे?
११. कोठल्या खनिजाचा जगांतील सर्वात मोठा सांठा भारतात आहे?
१२. 'नैसर्गिक इतिहास संग्रहालय' कोठे आहे?
१३. 'अरवली पर्वत रांग' कुठल्या राज्यांत आहे?
१४. कुठल्या नदीवर 'हिराकुड प्रकल्प' बांधला आहे?
१५. म्हैसूर मधील कोलारच्या सोन्याच्या खाणी लवकरच बंद होणार, अशी नुकतीच बातमी आली होती. तेथे प्रथम खाणकाम केव्हां सुरु झाले?

(उत्तरें पुढील अंकी)

### मे मधील प्रश्नावलीची उत्तरे

१. सी.एफ्.ॲन्ड्रूज
२. डॉ. ॲनी बेझंट. त्या थिऑसॉफिकल सोसायटीच्या अध्यक्ष होत्या.
३. सर विल्यम जोन्स्, कालिदासाच्या 'शाकुन्तला'चे इंग्रजीत भाषांतर करणारे ते पहिले गृहस्थ होते.
४. 'ला मार्तिनियेर'
५. 'मॅडलिन स्लेड'ने 'मीरा बेन' असे नांव घेतले.
६. 'मदर टेरेसा.'




# मोठा कोण आहे?

एक दिवस एक शेतकरी शहरांत जात होता. रस्त्यांत त्याला एक व्यापारी व एक शिक्षक भेटले. तिघेजण गप्पा मारत पायी चालत जात होते. चालता चालता दुपार झाली. तिघांना भूक लागली होती. पण कोणाच्याच जवळ अन्न नव्हते. जवळपास कोठेही गांव दिसत नव्हते. अशा स्थितीत ते तिघे एका बागेजवळ पोचले. बागेत फणसाच्या झाडाला फणस लगडलेले होते. त्यांचा सगळीकडे घमघमाट सुटला होता.

तिघांनी बागेच्या माळ्याला सांगितले की त्यांना खूप भूक लागली आहे. म्हणून त्यांना जर एक फणस मिळाला तर ते आपसांत तो वाटून घेऊन ते आपली भूक भागवतील. माळ्याने एक पिकलेला फणस तोडून त्यांना दिला.

शेतकरी फणस कापू लागला. त्याच्या मनांत बाकीच्या दोघांपेक्षा मोठा वांटा घेण्याची इच्छा झाली. ह्या विचाराने तो म्हणाला, ''आपण तिघे तीन वेगळे उद्योग करतो. मी शेती करतो. व्यापारी व्यापार करतो व शिक्षक शिकवतात. या तिन्ही व्यवसायांपैकी ज्याचा व्यवसाय श्रेष्ठ आहे, त्याला एक वाटा जास्त मिळायला पाहिजे. यावर तुम्हा दोघांचे काय म्हणणे आहे?'' शेतकऱ्याचे म्हणणे असे होते की मनुष्याला व्यापार, व शिक्षणापेक्षा अन्न जास्त महत्वाचे आहे. म्हणून धान्य पिकवणाऱ्याला, म्हणजे शेतकऱ्याला, एक वांटा ज्यादा मिळायला पाहिजे. भुकेने बेजार झालेले व्यापारी व शिक्षक त्याच्या व्यवसायास कमी लेखणार नाहीत.

शेतकऱ्याचे हे बोलणे ऐकून शिक्षक म्हणाले, ''तुमच्या ह्या म्हणण्याला उत्तरादाखल मी एक गोष्ट सांगतो. एका गांवात एक धनिक राहात होता. त्याला तीन मुलगे होते. ते तिघे उनाडपणा करत इकडे तिकडे हिंडत असत. त्यांच्या उडाणटप्पूपणा मुळे त्याचे वडील अतिशय दुःखी होते.

धनिक म्हातारा झाला होता. तो मरताक्षणीं त्याची मुले कांही तासांतच त्यांच्या मालमत्तेची विल्हेवाट लावतील. हे टाळण्यासाठी धनिकाने एक उपाय शोधला.

त्याने आपल्या मुलांना वेगवेगळे बोलावून त्यांना आपले मृत्यूपत्र दाखवले. त्यांत असे लिहीले होते की त्याच्या मृत्यूनंतर त्याच्या मालमत्तेचे चार वाटे होतील. त्याच्याकडून ज्या मुलाला अंगठी मिळेल, त्याला एक वाटा अधिक मिळेल. धनिकाने सगळ्या मुलांना हेच सांगितले, ''मुला, तू जर जबाबदारीने वागलास तर ती अंगठी मी तुलाच देईन.''

कांही दिवसांनी धनिक मरण पावला. पंचांनी एकत्र बसून मृत्यूपत्र वाचले. त्याच्या मालमत्तेचे चार भाग केले. नंतर त्याच्या मुलांना बोलावून विचारले, ''तुमच्यातील कोणाला आपल्या वडिलांची अंगठी मिळाली आहे?''

एकाने अंगठी दाखवत म्हटले, ''मला अंगठी मिळाली आहे.'' दुसऱ्याने व तिसऱ्याने पण आपल्या अंगठ्या दाखवल्या. वडिलांनी एक दुसऱ्याच्या अपरोक्ष सगळ्यांना अंगठ्या दिल्या होत्या. तिन्ही अंगठ्या सारख्या होत्या.

निरुपायाने पंचांनी मालमत्ता तिघांत सारखी वाटून दिली.'' गोष्ट सांगून शिक्षक म्हणाले, ''आपल्या तिघांचे व्यवसाय उत्तम आहेत. यावर विचार करायची गरज नाही. त्याचप्रमाणे आपल्या तिघांची भूकपण सारखीच आहे.

एका व्यावसायिकाला जास्त आणि दुसऱ्याला कमी भूक लागत नाही. म्हणून आपण या फळाचे सारखे वांटे करुया.''

शेतकऱ्याला आपल्या आधाशीपणाची लाज वाटली. त्याने फणसाचे सारखे तीन भाग केले. तिघांनी ते खाऊन आपली भूक भागवली व ते तिथून पुढे निघाले.



# जरूरीपेक्षां जास्त अिलाज

दोन वैद्य काशीयात्रेला गेले असताना योगायोगाने भेटले. अगोदर त्या दोघांनी खूप अवांतर गप्पा मारल्या, परंतु शेवटीं ते आपल्या व्यवसायासंबंधी बोलूं लागले.

''सगळ्या रोगांत मानसिक रोगाचे निदान करणें फार मुष्कील काम असते.'' पहिल्या वैद्याने आपल्या अनुभवाबद्दल बोलताना सांगितलं. ''आमच्या देशांत एक फार मोठी विचित्र प्रथा आहे. पुत्रसंतान नसल्यास जर राजा मृत्यू पावला तर राजाच्या हत्तीच्या सोंडेत एक पुष्पमाला अडकवली जाते आणि हत्तीला मोकळें सोडण्यांत येते. ज्या कुणाच्या गळ्यांत तो हत्ती ती माळ घालतो, तो आमचा राजा होतो. आमच्या राजालाही पुत्रसंतान नाही!

''आमच्या नगराच्या वेशीवर एक लांकूडविक्या आहे. त्याला भ्रम झाला आहे की राजा लौकरच मरणार आहे, आणि तो राजदरबारचा हत्ती त्याच्याच गळ्यांत ती माळ घालणार आहे. त्याला वाटायला लागलं की आता कोणत्याही क्षणीं तो राजा बनण्याची शक्यता आहे. त्याच्या या भ्रमिष्टपणाचं रूपांतर वेडेपणांत झालं. जणूं कांही तो राजा झाला आहे अशा तऱ्हेने त्याचे वागणें सुरुं झाले. त्याच्या रोगाचे निदान करायला त्याचे आईवडील त्याला घेऊन आले. मी पांच वर्षें त्याच्यावर उपचार केले आणि मोठ्या मुष्किलीने त्याचे वेड बरे केले.''

''याचा अर्थ त्याचा भ्रम दूर झाला आणि त्याला समजलं की तो राजा नाही, एक लांकूडतोड्या आहे. मी ठीक सांगितलं ना?'' दुसऱ्या वैद्याने विचारले.

''हो, नेमका त्याच वेळेला राजाचा मृत्यू झाला आणि राजाच्या हत्तीने नेमकी त्याच्याच गळ्यांत ती माळ घातली.'' पहिला वैद्य म्हणाला.

''फारच अद्‌भुत की!'' असं म्हणून दुसऱ्या वैद्याने चुटकी वाजवली.

''आणि नंतरचं ऐका! आणखी एक महा आश्चर्य झालं बरं! त्या लांकूडविक्याने ती गळ्यांतली सुंदर माळ फेंकून दिली, आणि तो ''मी राजा नाही!'' असं ओरडत इकडेतिकडे पळूं लागला.

त्यानंतर कांही लोकांनी जंगलात लांकडे तोडताना त्याला पाहिलं. 'काय महामूर्ख आहे हा' असं म्हणून ते त्याला हंसूं लागले.''

''हे त्याचे दुर्दैवच, नाही तर दुसरं काय म्हणणार?'' असं म्हणून पहिला वैद्य थांबला, नि दुसऱ्या वैद्याकडे लक्षपूर्वक पाहूं लागला.

''असं म्हणतात की बुद्धीदेखील कर्मानुसार बदलते. तुमच्याकडून चिकित्सेत कांही चूक झाली असेल असा विचार तुमच्या मनांत कधीं आला होता कां?'' दुसऱ्या वैद्याने विनयपूर्वक विचारले.

''माझ्या मनांत नुसता विचार आला होता असं नव्हे, तर अजूनही मी विचार करीत असतो की या उपचारांत कोणती त्रुटी राहिली होती?'' पहिल्या वैद्याने विचारपूर्वक सांगितले.

''माफ करा हं! पण मला वाटतं आपण जरूरीपेक्षां जास्त अिलाज केला असेल.'' दुसऱ्या वैद्याने सांगितले. - किरण







# यक्ष पर्वत

## 7

*(समरबाहू आणि त्याच्या शिष्यांना अस्वलाचे कातडे पांघरलेले लोक त्या बिळांत घेऊन गेले. खड्गवर्मा व जीवदत्त एका ठिकाणी धूर येत होता त्या जागी पोंचले. जेव्हां त्यांना कळलं की हा भुयारी किल्ला आहे, तेव्हां त्यांनी आंत प्रवेश केला. भलूकाच्या माणसांनी त्यांना पकडले आणि त्या दोघांना एका भुयारी मार्गातून, लांडगे होते त्या कड्याजवळ घेऊन गेले. त्यापुढें...)*

सगळीकडे अंधारच अंधार होता. अस्वलाची कातडी पांघरलेल्या माणसांनी खड्गवर्मा व जीवदत्ताला भुयारातून कांही अंतरावर नेले. नंतर ते एका जागी थांबले. त्यांच्यापैकी एकजण आपल्या साथीदाराला म्हणाला, ''अरे बाबा, या दोघांना बहुतेक वाटतंय की लांडग्यांचा कडा म्हणजे आरामस्थान आहे. पूर्वी आपण ज्यांनाज्यांना इथें पकडून आणलं होतं, ते सगळेजण लांडगांचे ओरडणें ऐकून भीतीने थरथर कांपत होते. तो कडा कसा आहे ते एकदा यांना दाखवायचं कां आपण?''

''ठीक आहे, चल, त्यांना जरा त्याची गंमत कळूं देच. ''दुसऱ्या माणसाने सांगितलं. पहिल्या माणसाने लागलीच गुहेच्या वरची लोखंडी सांखळी आपली पुरी ताकद पणाला लावून ओढली. दुसऱ्याच क्षणीं एक दार उघडले आणि त्यामुळें भुयारांत उजेड पसरला.

त्या उजेडांत जीवदत्ताने भुयारी वाट नीट स्पष्टपणें पाहिली, आणि तो म्हणाला, ''खड्ग, हे बीळ लहान आहे अशी आपली चुकीची समजूत होती. हे तर खूपच मोठे आणि प्रशस्त आहे. इतके लोक आंत राहूं शकतील असं बाहेरच्या लोकांना समजणारदेखील नाही.''

त्या बोलण्यावर अस्वलाचे कातडे पांघरलेला माणूस जोराने हंसायला लागला आणि म्हणाला,



"तू फारच बारकाईने पाहातो आहेस. जर तुम्ही दोघे एका आठवड्याच्या आंत लांडग्यांच्या तावडींतून सुटलात, आणि या भुयारी मार्गापर्यंत पोहोचूं शकलात, तर गुरु भल्लूकाच्या सेवेत सारं आयुष्य घालवूं शकाल."

खड्गवर्मा व जीवदत्ताने उघड्या दारांतून बाहेर पाहिले. तिथें मोठ्या दहाबारा फूट उंचीच्या दरडीवर एक मोठा खडक होता. त्यावर दोन माणसें बसलेली होती. त्यांच्या हातांत जंबिये होते. खाली उभे राहून त्यांना खाण्यासाठीं अधीर झालेल्या लांडग्यांना ते आपले सुरे दाखवून चिडवीत होते. लांडगे उडी मारुन येऊं नयेत म्हणून त्यांना दटावत होते. कांहीं लांडगे केकाटत सैरावैरा फिरुं लागले. "त्यांच्याकडे पाहून असं वाटतंय, की त्यांच्यापैकी एक समरबाहू असावा." जीवदत्त म्हणाला.

"हा कोण बाहूचिहू आहे ते आम्हाला ठाऊक नाही, पण एवढं मात्र नक्की ठाऊक आहे की त्याला आणि त्याच्या सहकाऱ्याला थोड्याचा वेळांत लांडगे फाडून खातील आणि संपवतील. तुम्ही दोघेही त्याच कड्यावर जाणार आहात. त्यांची होईल तीच गत तुमचीही होईल. देवी वृकेश्वरीच्या कृपेने जर तुम्ही वांचलात नि परत आलात, आणि भल्लूक गुरूच्या सेवेत...."

त्याचे बोलणें तोडत जीवदत्ताने त्याला सटकावले, "पोपटासारखा तेचतेच बोलून आपल्या गुरुच्या नांवाचा जप करुं नकोस. आम्हाला त्या खडकावर पोंचायचं आहे, होय ना? आम्ही जरुर तिथें जाऊं. तूं आपल्या तुझा मार्ग बघ."

"इतकं धाडस? तुम्ही स्वतः त्या कड्यावर जाल?" अस्वलाचे कातडे पांघरलेल्या माणसाने आश्चर्यचकित होऊन विचारले.

"आता सांग की तू आम्हाला तिथे कसा पोंचवणार आहेस?" खड्गवर्माने विचारलं.

"तुम्हाला मरण्याची एवढी घाई झालीय कां? तर मग चला आमच्याबरोबर!" असं म्हणून ते दोघे भुयारी मार्गातून त्यांना आणखी थोड्या अंतरावर घेऊन गेले. तिथें त्यांना चौकोनी आकाराची एक मोठी दगडी शिळा दिसली. त्या शिळेला घट्ट बांधलेली लोखडांची एक तार अस्वल्याने आपली सारी ताकद पणाला लावून खेंचली. त्यामुळें ती शिळा तिथून सरकली. जीवदत्ताला आता लांडग्यांच्या खडकावर हातांत भाले घेऊन उभा असलेला समरबाहू व त्याचा साथीदार दिसला. दगडी शिळेचा सरकताना



होणारा आवाज ऐकून समरबाहू ओरडून म्हणाला, "अरे चंद्रा! भुयाराच्या पोटांतले लांडगे आता वर येत आहेत बरं कां!"

खड्गवर्मा व जीवदत्ताने त्यांना सांगितलं, "आम्ही लांडगे नाही आहोत. तुमच्यासारखीच माणसें आहोत. घाबरुं नकोस, समरबाहू. आम्ही तुझे मित्र आहोत." खड्ग जीवदत्ताला तिथे पाहून समरबाहू आश्चर्याने थक्क झाला. तो कांही बोलणार तेवढ्यांत त्या अस्वल्याने कळीची दगडी फरशी वर उचलून भुयाराचा मार्गच बंद करुन टाकला. तो पुढें म्हणाला, "अरे, तुम्ही सगळे मित्र आहात ना? तर मग मिळूनच सगळे लांडग्यांची शिकार बनून जा ना!"

जीवदत्ताने समरबाहूची पाठ थोपटून त्याला धीर देत म्हटले, "तुमच्याबद्दल स्वर्णाचारीकडून सारं कांही आम्हाला कळलंय. आपण या लांडग्यांपासून जरुर आपला बचाव करुं आणि आपल्या ठिकाणीं परत जाऊं शकूं. माझ्या बोलण्यावर विश्वास ठेव."

तेवढ्यांत एक भुकेला लांडगा छलांग मारुन वर येण्याचा प्रयत्न करुं लागला. खड्गवर्माने वांकून ताबडतोब आपली तलवार उपसली आणि लांडग्याच्या डोक्यावर वार केला. नंतर त्याची मानगूट पकडली आणि त्या मेलेल्या लांडग्याला कड्यावर फेंकून दिला.

जीवदत्तने खड्गवर्माच्या साहस व नैपुण्याची प्रशंसा करीत म्हटले, "खड्ग, तू तर कमालच केलीस." नंतर त्याने समरबाहूला विचारले, "हे अस्वलाची कातडी पांघरलेले या लांडग्यांना केव्हां खायला घालतात, ते माहिती आहे कां रे तुला?"



"ते सूर्योदय आणि सूर्यास्ताच्यावेळी या क्रूर प्राण्यांना जनावराचं मांस खायला घालतात. त्यासाठी, ती समोर दिसते आहे त्या भिंतीमधें एक दरवाजा आहे, तो ते उघडतात." समरबाहूने सांगितलं.

थोड्या वेळानंतर जेव्हां सूर्योदय होणारच होता, तेव्हां लांडगे जोरजोरांत ओरडायला लागले. भुयारी मार्गाच्या बाजूच्या दरवाज्याखाली ते वाट पाहूं लागले.

जीवदत्ताने खड्गला तो दरवाजा दाखवून म्हटलं, "याचा अर्थ असा झाला की अस्वलाची कातडीं पांघरणारे दरवाजा उघडून आता लांडग्यांना मांस खाऊं घालतील. तेव्हां भात्यांतून एक बाण काढून त्या दरवाजावर आपला नेम धर."

जीवदत्तच्या सांगण्यानुसार खड्गवर्माने धनुष्यावर बाण लावला आणि तो खडकावर नीट



बसला. दोनचार क्षणानंतर भुयारी मार्गावरचा दरवाजा उघडला. दोन अस्वलाची कातडी पांघरलेल्यांनी टोपल्या भरून मांस आणले होते. त्या लांडग्यांपुढें ते फेंकणार होते, तेवढ्यांत खड्गवर्माचा बाण त्यांच्यापैकी एकाच्या डोक्यावर लागला, आणि तो धाडकन जमिनीवर पडला. त्याच्याबरोबर दुसरा अस्वल्या आणि त्याच्या हातांतली टोपलीही भुयाराच्या मार्गात पडली.

बघताबघता भुयारांत गडबड सुरुं झाली. त्यावेळेला गुरु भल्लूक वृकेश्वरीदेवीच्या सन्मुख पद्मासन घालून ध्यानमग्न होता. या गडबडीने त्याचे ध्यान भंग झाले. तो चिडला नि उठून उभा राहिला. तो जोरांत ओरडून विचारूं लागला, "हे सारं काय चाललं आहे? कसला गोंधळ माजलाय? काल पकडलेल्या दोघा तरुणांना लांडगे खात आहेत ना?"

त्याच वेळेला तिथें पळतपळत तिथें एक माणूस आला. तो भीतीने थरथर कांपत होता. तो म्हणूं लागला, "गुरु भल्लूक, मोठाच अनर्थ झालाय! लांडग्यांच्या कड्यावर बसलेल्या एकाने आपल्या माणसाला ठार मारलंय."

डोळे लाल करीत गुरु भल्लूक खेंकसला, "त्याची ही हिंमत! अरे, त्याला ठाऊकच नसेल की मी वृकेश्वरीदेवीचा प्रिय भक्त आहे, आणि माझे शक्तीसामर्थ्य अफाट आहे. आत्ता या क्षणीं त्या दोघांना आपल्या शूळाने मी मृत्यूलोकांतच पाठवून देतो." असं म्हणत तो त्या कड्याच्या दिशेला वळला.

थोड्याच वेळांत तो भुयाराच्या दाराजवळ पोंचला आणि कड्यावर उभे असलेल्या दोघाजणांना पुकारून म्हणाला, "अरे पाखंड्यांनो, तुम्ही वृकेश्वरी देवीच्या एका भक्ताला मारून फार मोठा अपराध केला आहेत. आता माझ्या भाल्याने तुमचा शेवट करून करीन." त्याच्या आवाजांत कर्कशपणा भरलेला होता.

जीवदत्ताने मंत्रदंड आपल्या हातांत घेतला आणि हंसतच सांगितलं, "अरे गुरु भल्लूक, तू तर भल्लूक आहेस ना! तूं कुणा भल्लुकेश्वरी देवीची पूजा कशाला करतो आहेस? ऐक, मी खडकावरून उतरतो आहे. आणि भुयारी मार्गाच्या दरवाजाच्याजवळ पोंचतो आहे."

समरबाहूने जीवदत्ताला थांबवून म्हटलं, "असं करूं नका. भुकेल्या लांडग्यांच्यामधून त्या भल्लूक गुरूच्या जवळ तुम्हाला जायचं आहे. पण हे फार धोक्याचं आहे. भल्लूक मंत्रतंत्रांच्या बाबतीत भलताच हुशार आहे. तो सहज तुम्हाला संपवून टाकूं शकेल."

खड्गवर्माने आपली तलवार उचलून म्हटले, "समरबाहू, या शस्त्रांत आणि जीवदंत्राच्या दंडात किती अद्‌भुतशक्ती आहे ते तुला ठाऊक नाही. भल्लूकगुरूला भ्यायची आपल्याला जरूर नाही."

भुयाराच्या वाटेत गुरुभल्लूक उभा असलेला जीवदत्ताने नीट पाहिला, आणि खड्गवर्माला तो म्हणाला, "खड्ग, इथून बाहेर निघण्याचा एकच उपाय आहे असं वाटतं. ज्याप्रकारें आपण प्रथम जंगलात यक्षपूरचा राजा व तिथल्या सिंहांची शिकार केली, त्यासाठी आपण जे उपाय वापरले, तेच उपाय पुन्हां वापरायचे आणि या लांडग्यांची शिकार करूं या आणि भल्लूकगुरूच्या बिळांत खळबळ निर्माण करून टाकूं ! गोंधळ माजवूं"

"तर मग उशीर कशासाठी?" खड्गवर्माने उत्साही स्वरांत म्हटले.

जीवदत्तने यापुढें काय करायचं ते प्रथम खड्गवर्माला समजावलं. नंतर त्याने हळूं आवाजांत त्याला सांगितलं, "प्रथम त्या मेलेल्या लांडग्यांना आपल्या खांद्यावर घ्यायचं. भुकाळलेले लांडगे मेलेल्या लांडग्याचं मांस खायला आपला पाठलाग करतील, तेव्हां आपल्या तलवारीच्या धारेची मजा त्यांना चाखूं द्यायची!"

"जीव, अरे किती वेळ समजावून सांगणार आहेस? हे मेलेले लांडगे किती वेळ आपल्या खांद्यावर घेऊन फिरायचं?" खड्गवर्माने विचारलं.

"आपण आता या कड्यावरुन खाली उतरूं या. तू कड्याच्या चहूं बाजूंनी पळत राहा, आणि



जास्तीत जास्त लांडग्यांना आपल्याकडे आकर्षित कर. मीही तुझ्या पाठोपाठ पळत येतोच. त्यानंतर...."

जीवदत्ताचे बोलणे पूर्ण होण्यापूर्वीच खड्गवर्मा म्हणाला, "अरे गुरु भल्लूका, आम्ही तुझ्याकडेच येतो आहोत. तू आणि तुझी वृकेश्वरी, तुमचे प्राण तुम्हाला वांचवायचे असतील तर तुम्ही भुयारी किल्ल्यांतून पळून जा." असं ओरडत त्याने कड्यावरुन उडी घेतली. त्याच्याबरोबर जीवदत्तानेही खाली उडी मारली.

ही दोन माणसे आपल्याकडेच येत आहेत हे पाहून उपाशी लांडगे त्या दोघांकडे पळत येऊं लागले. खड्गवर्माही कड्याच्या पायथ्याजवळ वेगाने पळायला लागला. त्याचा पाठलाग करीत लांडगेही त्याच्या मागोमाग पळायला लागले. त्यांच्यामागून आपल्या मंत्रदंडाच्या मदतीने




जीवदत्त लांडग्यांना खाली पाडत होता आणि स्वतःही पळत होता.

भुयाराच्या दारांत उभा राहून भल्लूक हे सारं पाहात होता. तो उत्साहाने ओरडायला लागला, "हा सगळा वृकेश्वरी देवीचा महिमा आहे. तिने आपल्या शत्रूंची **बुद्धी भ्रष्ट** करून टाकलीय. त्यांना मूर्खासारखं वागायला लावतेय ती! त्यांना ती आपल्या लांडग्यांचा तोंडचा घास ती केव्हांच बनवून टाकील." असं म्हणून भक्तीभावनेच्या आवेगांत त्याने आपले डोळे बंद केले.

ही चांगली संधी आहे असं खड्गवर्मा व जीवदत्ताला वाटलं. जीवदत्ताने त्यावर म्हटलं, "खड्ग, हा चांगलाच मोका आहे. भल्लूक भक्तीच्या धुंदीत आहे." खड्गवर्माला त्याचा इशारा समजला. आणि त्याने तो मेलेला लांडगा डाव्या हातांत उचलून भल्लूक उभा होता त्या भुयाराच्या दारांतच फेकून दिला. आपले भोजन तिथें फेकलेले पाहून चारपांच लांडगे त्या दाराच्या दिशेने उड्या मारतच पळत सुटले.

भल्लूक डोळे मिटून देवीचे ध्यान करण्यांत मग्न होता, तेवढ्यांत त्याच्या अंगावर तो मेलेला लांडगा अचानक पडला, आणि त्या लांडग्यावर ताव मारण्यासाठी लालचावलेले चारपांच लांडगे ही भल्लूकवर तुटून पडले.

गुरुभल्लूक भीतीने थरथर कांपतच उठला. त्याने पाहिलं की कांही भुकेले लांडगे मेलेल्या लांडग्याचे मांस खात आहेत. एक भुकाळू लांडगा इतर लांडग्यांच्या गर्दीत पुढें होऊं शकला नव्हता. म्हणून गुरगुरत भल्लूककडे बघत होता. त्याचे लक्ष भल्लूकावरच केंद्रित झाले होते.

भल्लूकाने लगेच आपला शूळ उचलून घेतला आणि त्या लांडग्यावर नेम धरून तो म्हणाला, "वृकेश्वरी देवीच्या प्रिय भक्ताला खाऊन टाकायची इच्छा धरतोस काय?" असं म्हणत



तो मागेमागे जाऊं लागला आणि भुयारी मार्गातून तो मागच्यामागें पळून जाऊं लागला. भल्लूकचे पुढें काय झाले आहे, तो मेला आहे की जिवंत आहे, हे कांही इकडे खड्गवर्मा व जीवदत्ताला ठाऊक नव्हते.

"खड्ग, आपण इथे उभे राहून कांही फायदा होणार नाही. भल्लूक मेला आहे की जिवंत आहे ते आपल्याला ठाऊक नाही. भुयारांत जे लांडगे शिरले आहेत, त्या सर्वांना त्या दुष्टांच्या मनांत भीती निर्माण केली आहे. तुला तो गोंधळ आवाज ऐकूं येतो आहे ना?" जीवदत्तने विचारलं.

"कां नाही? चांगलाच ऐकायला येतोय. आत्तापर्यंत ते सगळे भागुबाई भुयार सोडून गेलेले असतील. गुरु भल्लूकला तर आपण जिवंत सोडता कामा नये." खड्गवर्माने सांगितलं.

"तर मग उशीर कशासाठी? आपण सर्वजण भुयारी वाटेनेच आंतल्या गुहेमधें पोहोचू या. समरबाहू आणि त्याच्या साथीदाराला इथेंच बोलाव." जीव म्हणाला.

खड्गवर्माने बोलवल्याबरोबर समरबाहू आणि त्याचा साथीदार लांडग्यांच्या कड्यावरुन खाली उतरले आणि खड्गवर्माजवळ गेले. जीवदत्त त्यांना म्हणाला, "समरबाहू, आपल्याला वरच्या दारांतून गुहेंत शिरायचे आहे."

समरबाहूने चारी बाजूला एकवार नजर टाकली आणि तो घाबरुन म्हणाला, "आपण चौघेजण मिळून शत्रूला मारूं शकूं कां? इथूनच परत वळून आपण जर जंगलात परत गेलो तर जास्त बरं होईल. इकडून जंगलात परत जायला एखादा रस्ता आहे की काय ते प्रथम पाहायला हवं."

"घाबरुं नकोस हं समरबाहू हा लांडग्यांचा कडा आहे. इथून बाहेर जायचं असेल तर आपल्याला या बोगद्यातूनच जायला हवं. त्यांतूनच आपल्याला बाहेर जाता येईल." असं म्हणून जीवदत्त उठला आणि भुयारी मार्गावरच्या दगडावर चढला. त्याच्यापाठोपाठ खड्गवर्माही तिथें पोंचला.

समरबाहू व त्याचा साथीदार यांना आता काय करावे त्याचा निर्णय ठरवता येईना. तेवढ्यांत जे लांडगे बाहेरच राहिले होते ते जिभल्या चाटत या दोघांना फाडून खावे म्हणून यांच्याजवळ येऊं लागले. **(क्रमशः)**





# परिवर्तन

फार फार पूर्वी कलिंग नगरांत महाजन नांवाचा एक मोठा व्यापारी होता. आपल्या धंद्यात तो फारच कुशल होता. इतकेच नव्हे तर न्यायाने निवाडा करण्याबाबत तो प्रसिद्ध होता.

दूरदूरच्या गांवांतून कित्येक लोक आपसांतले तंटे, भांडणें मिटवण्यासाठीं त्याच्याकडे येत असत व महाजनचा निकाल ते मान्य करीत. अशा प्रकारें लोकांमधे त्याचे नांव आदराने घेतले जात होते.

महाजनच्या मुलाचे नांव होते शंभू. पित्याचा एकही गुण मुलांत उतरला नव्हता. परंतु श्रीमंताच्या मुलांमधे असणारे सारे दुर्गुण मात्र त्याने आत्मसात केले होते, उदाहरणार्थ, दारू पिणें, जुगार खेळणें वगैरे. या वाईट संवयींपासून त्याला दूर करण्याचे महाजनने खूप प्रयत्न केले, पण ते सारे निष्फळ ठरले. आपल्या दुर्वर्तनाने पित्याच्या नांवाला शंभूने काळिमा फासला.

आपल्या मुलाबद्दल महाजनला सतत काळजी वाटत होती. एकुलता एक मुलगा असल्यामुळें महाजन त्याला कठोरपणे शिक्षाही करूं शकत नव्हता, कारण शंभूचा स्वभाव वाईट नव्हता.

पित्याबद्दल त्याच्या मनांत श्रद्धा व प्रेमभाव होताच. पण पित्याने सांगितलेल्या चार हिताच्या गोष्टींकडे तो सोईस्करपणें दुर्लक्ष करीत असे. म्हणून तो वाईट संवयींच्या पूर्णपणें आहारी गेला होता.

महाजनने खूप विचार करून एक धाडसी निर्णय घेतला. कांही दिवस जर तो शंभूपासून दूर राहिला, आणि पित्याकडून मदत मिळेनाशी झाली की कदाचित शंभू ताळ्यावर येऊं शकला असता. अशी महाजनला आशा वाटत होती.

एक दिवस महाजन शंभूला म्हणाला, "ऐक बाळा! मी आता व्यापारासाठी दूर समुद्रापलीकडच्या कांही देशांत जाणार आहे. म्हणून माझ्याजवळ जी कांही धनदौलत आहे ती मी बरोबर घेऊन जातो आहे. मी केव्हां परत येईन ते आत्तातरी मला सांगता येणार नाही."

हे ऐकून शंभू कासावीस झाला. त्याने पित्याला विचारलं, "इथें पैसे नसले तर माझी गुजराण कशी होईल?"

"अरे बाळ, त्याच्यासाठीच तर मी जातो आहे ना! जास्त पैसे मिळवायचे, तर आपल्याजवळ भांडवल असायला नको कां? तरी पण तूं काळजी करूं नकोस. तुला जी रक्कम लागेल ती माझ्या मित्रांकडून कर्जाऊ घे. मी परत आल्यानंतर सारे कर्ज फेडून टाकीन." असं सांगून कांही दिवसांनंतर महाजन प्रवासास गेला.

वडील गांवात नसल्यामुळें शंभूला वाटलं आता त्याला हवी तशी मनमानी करता येईल. त्याच्या उधळेपणाला आता उत आला. जिथेंजिथें कर्ज मिळत होते तिथून तो कर्जासाठी उसनवार करीत असे.

पण कांही दिवसानंतर व्यापाऱ्यांनी शंभूला कर्ज द्यायचे नाकारले. तरीही शंभूने त्याची फिकीर बाळगली नाही. घरांतले कांही उंची सामान व दागिने विकून त्याने आपला बेसुमार खर्च चालूंच ठेवला.

त्यासुमारास शंभूकडे दोन नाविक भेटायला आले आणि त्याला म्हणाले, "काय राव, काय नि कसं सांगायचं तुम्हाला? कांही दिवसांपूर्वीच तुमच्या वडिलांचे जहाज वादळांत सांपडून बुडाले. सगळा माल समुद्रांत नष्ट झाला. आम्ही दोघेजण कसाबसा जीव वांचवून परत येऊं शकलो." हे सांगताना त्या दोघांनाही अश्रू आवरत नव्हते.

ही बातमी ऐकून शंभू एकदम घाबरला, व थरथर कांपूं लागला. आता आपले काय होणार आहे हे त्याला कळेना. लौकरच सत्य परिस्थिती त्याला कळून चुकली.

महाजनच्या मृत्यूची बातमी समजल्यानंतर नगरांतले व्यापारी आपापले कर्ज वसूल करण्यासाठीं शंभूकडे येऊं लागले. ते कर्ज फेडण्यासाठीं शंभूला आपले राहाते घर सोडून बाकी सारी मालमत्ता विकावी लागली. तरीही कर्जदारांची देणीं संपली नाहीत. उरलेले कर्जदार पैशांची वसुली करण्यासाठी येतच राहिले.

शंभू घाबरून गेला. त्याने वडिलांकडे येणे असलेल्या हिशोबाच्या वह्या शोधायला सुरवात केली. वडिलांनी बऱ्याच जणांना कर्जाऊ रकमा दिलेल्या होत्या. शंभूच्या मनांत आशा पालवली. त्या कर्जाऊ रकमा वसूल करण्यासाठीं शंभूने आपल्या नोकरांना पाठवले. पण एकानेही रक्कम परत दिली नाही. उलट त्यांनी सांगून पाठवलं की त्या रकमा शंभूच्या वडिलांजवळ केव्हांच परत दिलेल्या होत्या. तशा सहीच्या पावत्याही महाजनने सर्वांना दिल्या होत्या. त्या पावत्या प्रत्येकाजवळ सुरक्षित होत्या.



आपल्या पित्याने दिलेली कर्जे जेव्हां वसूल झाली नाहीत, तेव्हां शंभूच्या मनांत शंका निर्माण झाली. त्याच्या वडिलांनी त्या रकमा वसूल करण्याची एवढी निकड कां पडली असावी? त्या पावत्या नकली असाव्यात, असे वाटून शंभूने त्या पावत्यांवरचे हस्ताक्षर तज्ञांकडून पारखून घेतले. पण ते अक्षर महाजनचेच होते असे त्यांनी मत दिले.

शंभू उरलेले कर्ज चुकते करूं शकला नाही. कर्जदारांनी त्याच्याकडे येणेजाणें, बंद केले. त्याबरोबर शंभूचे जुने चैनी मित्रही त्याला टाळूं लागले. शेवटी नगरातल्या सगळ्यांनी त्याच्याशी बोलणे चालणें बंद केले. सर्वांनी आपल्याला वाळींत टाकले आहे असं त्याला वाटायला लागले. त्याला फारच वाईट वाटत होते. त्याच्या विचारसरणीमधें एकाएकी फार मोठे परिवर्तन घडले. आजपर्यंतचे आपले बेबंद जीवन हे एक वाईट स्वप्न होते असे त्याला वाटायला लागले. त्यानंतर त्याने आपली राहाणी बदलली. एखाद्या साध्या, गरीब गृहस्थासारखे राहाण्याची संवय त्याने

२५ वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालेली कथा

स्वतःला लावली. कष्ट केल्यानंतर त्याला वाटूं लागलं, की हेच खरं जीवन. काम करण्यांत त्याला वेगळाच आनंद मिळायला लागला.

त्याच्यानंतर कांही दिवसांनी शंभूचा वाढदिवस आला. आपला वाढदिवस साजरा व्हावा असा विचारदेखील शंभूच्या मनांत नव्हता. परंतु त्याच्या मनाविरुद्ध त्याचा वाढदिवस साजरा होण्याची चिन्हें दिसूं लागली. कांही लोकांनी येऊन शंभूचे घर जरा वेगळ्या ढंगाने सजवले. आमंत्रण दिलेले नव्हते तरीदेखील त्याचे नातलग व स्नेही येऊन ठेपले. शंभू आश्चर्यचकितच झाला. नगरांतले सारे ओळखीचे व्यापारी त्याच्या घरी येऊन बसले.

शंभूला आश्चर्य वाटले आणि त्याचबरोबर खूप आनंदही झाला. या सर्वांनी त्याच्याकडे येण्याचं कारण त्याला ठाऊक नव्हतं. पण त्या सर्वांना पाहून शंभूला आपल्या वडिलांची तीव्रतेने आठवण झाली; व तो कासावीस झाला. त्याच्या डोळ्यांतून वाहाणारे अश्रू कांही केल्या थांबेनात.

तेवढ्यांत बाहेरून आंत येऊन, महाजनने शंभूला मिठी मारली. शंभूचा आपल्या डोळ्यांवर विश्वास बसेना. तो वडिलांकडे बघतच बसला. "होय बेटा! मी जिवंत आहे. मी प्रत्येक क्षणीं तुझ्यावर लक्ष ठेवून होतो. तुझ्या स्वभावांत हे परिवर्तन आणण्यासाठीच मला हे नाटक रचावे लागले." महाजन म्हणाला.

शंभूने आपल्या पित्यांचे पाय धरले व तो म्हणाला, "बाबा, मी आजपर्यंत तुमच्या मनाला किती यातना दिल्या आहेत. ही गोष्ट मला आत्ता कळते आहे. यापुढें मी असे कधी करणार नाही मला क्षमा करा."

आनंदाने महाजनचे डोळेही पाणावले. ते पाहून शंभूने मान खाली घातली तो म्हणाला, "माझ्यात बदल तर झाला आहे, पण बाबा, आता आपण गरीब आहोत. आपली सारी धनसंपत्ती कर्जफेडीसाठी कर्जदारांच्या ताब्यांत आहे. तुमच्या सह्या असलेल्या पावत्याही त्यांनी मला दाखवल्या आहेत. तुम्हीही पुन्हां एकदा त्या तपासून पाहा." महाजन हंसून म्हणाला, "ती सारी पत्रें व पावत्या माझ्यावतीनेच तयार केलेल्या होत्या. ते सर्व कागद पत्र बनावट आहेत. तुझ्याजवळ रोख पैसे शिल्लक असूं नयेत म्हणून मला हा सारा खटाटोप करावा लागला. आपली सारी संपत्ती माझ्याजवळ सुरक्षित आहे."

आपल्या वडिलांनी अतिशय सूज्ञपणें आपली संपत्ती सुरक्षित ठेवली आणि शंभूला नुकसानींतून वाचवले म्हणून शंभू फारच खूष झाला. तेव्हांपासून आपल्या वडिलांच्या सल्ल्यानुसार वागून तो जीवनांत यशस्वी झाला.





वेताळ कथा

# पंडिताची ओळख

निश्चयाचा पक्का विक्रमार्क पुन्हां त्या प्राचीन वृक्षाजवळ गेला. त्याने झाडावरून ते प्रेत खाली उतरवले आणि आपल्या खांद्यावर घेतले. निमूटपणें तो स्मशानाच्या दिशेने जाऊं लागला. तेव्हां त्या प्रेतांत असलेल्या वेताळाने म्हटले, "राजन्, तुझ्या मनोधैर्याचे मला कौतुक वाटते आहे. तूं किती कष्ट सहन करीत आहेस, मी तुला वारंवार त्रास देतो आहे, तुझा मौन-भंग करण्यांत मी सफल होतो आहे, पण तूं कांही माघार घेण्याचे मनावर घेत नाहीस. तुला या अंधाराची चिंता नाही किंवा त्या भयानक स्मशानाची भिती वाटत नाही. इतका वेळ पाहिल्यानंतर-देखील माझ्या अजून लक्षांत येत नाही की तुझे लक्ष्य काय आहे, कुणाला मदत



करण्यासाठी तू इतकी संकटे झेलतो आहेस? कारण इतका त्रास सोसून होणारी तुझी दयनीय स्थिती पाहून माझं मन कासावीस होतं. मला समजत नाही की यामागें कोणते असे कारण आहे की त्यामुळें तू इतका त्याग करण्यास उतावीळ आहेस? तूं आपले गुरु किंवा पंडित यांच्यासाठी तर इतके श्रम करीत नाहीस ना? कारण मी निश्चितपणें सांगतो की हे गुरु आणि तथाकथित पंडितगण स्थिरबुद्धीचे नसतात. त्यांच्यात व्यवहारदक्षता मुळींच नसते. त्यांच्या नसानसांत स्वार्थ आणि अहंकार भरलेला असतो. त्यांच्या शिष्य वा भक्तांपैकी जर कुणी बरोबरीचे किंवा प्रतिभावंत असले तर हे गुरुजन त्यांचा मत्सर करतात. त्यांच्याविषयी शत्रुभाव ठेवतात. त्यांचा पाण उतारा करण्याचा प्रयत्न करतात. त्यांची ही अशी क्षुद्र मनोवृत्ती असल्यामुळें त्यांचा उत्कर्ष होत नाही. उदाहरणार्थ, मी तुला जगन्नाथ पंडिताची गोष्ट सांगतो. त्याने तुझा थकवाही दूर होईल. तेव्हां नीट ऐक." असं म्हणून वेताळाने जगन्नाथ पंडिताची गोष्ट सांगायला सुरवात केली.

"फार पूर्वीची गोष्ट आहे. गोस्तनी नदीच्या कांठी हरितवन नांवाचे एक गांव होते. गांवात आणि गांवाच्या आसपास, बघावे तिकडे हिरवाईच दिसत असे. तिथे पीक चांगले येत होते. फळाफुलांनी झाडे बहरलेली असत. तिथल्या रहिवाशांना गोस्तनी नदी म्हणजे देवतासमान वाटत असे. नवे पीक घरी आले की तिथल्या मजुरापासून मालकापर्यंत सारेजण गोस्तनी नदीच्या कांठावर एकत्र जमून उत्सव साजरा करीत.

अशा हरितवन गांवात जगन्नाथ नांवाचा एक फार मोठा पंडित राहात होता. आजूबाजूच्या गांवात इतका मोठा विद्वान पंडित कुणीही नव्हता. तो केवळ पंडितच नव्हता, तर एक चांगला कवीही होता. पण त्याचे पांडित्य आणि काव्यगुण समजायला तिथे जमीनदार व अगदीच मोजके गांवकरी होते. अशिक्षित गांवकऱ्यांना ते ऐकण्यांत कांहीच फायदा नव्हता. त्याच्या विद्वत्तेमुळें त्यांना कांही लाभ नव्हता, किंवा त्याच्या कविता ऐकून त्यांना आनंदही होत नव्हता. जगन्नाथाच्या दृष्टींतून ते सगळे निरर्थक प्राणी होते. त्यांच्याबद्दल त्याच्या मनांत बिलकूल प्रेम नव्हते.

श्रीधर हा त्याचा एकुलता एक मुलगा होता. त्याचा स्वभाव पित्याच्या स्वभावाविरुद्ध होता. दोघांची मनोवृत्ती अगदी भिन्न होती. श्रीधर निसर्गसौंदर्याचा आस्वादक होता. सांजसकाळ तो शेतांत हिंडत काम करीत असे. बागबगिच्यांतून फिरायला त्याला खूप आवडत असे.



तो साध्या सोप्या आणि मन मोहून टाकणाऱ्या कविता ऐकवत असे. कवितेचा भावही अगदी सरळ, स्वच्छ असे. त्याची कविता ऐकायला व त्याचा अर्थ समजावून घ्यायला शेतावर काम करणारे मजूरही एकत्र जमत. एखाद्या कवितेचा अर्थ जर त्यांना नीट समजत नसेल, तर श्रीधर तो अर्थ त्यांना समजावून सांगें, व त्यांच्या शंका दूर करीत असे.

श्रीधरची सांगण्याची आणि वागण्याची ही पद्धत त्याच्या वडिलांना, जगन्नाथला, मुळींच आवडत नव्हती. वडील त्याला सांगत, "कवितेच्या रसांत जेवढी क्षमता आवश्यक असते, तेवढीच रसिक श्रोत्याची अभिरुचीही आवश्यक असते. या अशिक्षित अडाणी लोकांना काव्य ऐकवणें व्यर्थ आहे. असं करणं म्हणजे साक्षात सरस्वतीदेवीचा अपमान करणे आहे. विद्यादेवतेवर ही चिखलफेक आहे. तुझं हे वागणं मला जरादेखील आवडत नाही तुझी ही पद्धत जर तू बदललीस तर बरें होईल. नाहीतर तुझं कांहीएक खरं नाही." असं जगन्नाथ पंडिताने श्रीधरला अनेकवेळां सांगून पाहिलं.

असेच दिवस जात होते. हरितवनापासून दहा कोसांच्या अंतरावर असलेल्या एका गांवातून श्रीधरसाठी एक मुलगी सांगून आली. तिचे नांव शारदा होते. नारायणभट्ट नांवाच्या एका पंडिताची ती एकुलती एक मुलगी होती. वडिलांनी मुलीचा गुरु होऊन तिला उत्तम शिक्षण दिले होते.

जगन्नाथ पंडित श्रीधरला घेऊन मुलगी पाहायला म्हणून माधवीपूरला पोंचले. जगन्नाथ पंडितांनी विचारलेल्या चारपांच प्रश्नांना शारदाने चांगल्या प्रकारें उत्तरें दिली. म्हणून त्यांनी तिला उत्तीर्ण केले. श्रीधरलाही तिचा स्वभाव फारच



चांगला वाटला. ती चांगली पत्नी होईल आणि त्याला हरप्रकारें साथ देईल असा त्याला विश्वास वाटला. त्यांतून तिचे सौंदर्य पाहूनही तो मोहित झाला होता. तेव्हां आता लग्न ठरले.

महिनाभरांतच श्रीधर व शारदाचे लग्न झाले. नवी सून पाहून सर्वांनी तिचे सौंदर्य व सौजन्य याची तारीफ केली. श्रीधर नशिबवान आहे असं सगळ्यांनी वारंवार सांगितले. असेच दिवस जात होते. एके दिवशी संध्याकाळी जगन्नाथ घरांतून बाहेर आला तेव्हां गोठ्यांतून सुनेचा मधुर आवाज ऐकायला आला. त्या दिशेकडे त्याने नजर वळवली. त्यावेळेला गोठ्यांत रतन हा नोकर गाईची धार काढीत होता. गाईपासून थोड्या अंतरावर शारदा उभी होती आणि मोठ्या, गोड, मोहक आवाजांत एक श्लोक गात होती. रतन आनंदाने तल्लीन झाला होता. एकीकडे धार काढीत होता. आणि एकीकडे श्लोक ऐकत होता.



श्लोक गाऊन दाखवल्यानंतर शारदा त्याचा भावार्थ रतनला सांगू लागली, 'रतन, अरे गोकुळांत छोट्या, खोडकर कृष्णाची माता यशोदादेखील एक दिवस अशीच धार काढीत होती. छोटा कृष्ण आईच्या पाठीमागून आला, त्याने आपले दोन्ही हात तिच्या गळ्यांत घातले आणि म्हणूं लागला, 'माते, मला दूध प्यायला नाही देणार?'' तेव्हां यशोदेने त्याला चुचकारत सांगितले, ''आत्ता नाही रे कन्हैया, अंधार पडला की नंतर दूध प्यायचं हं!''

''अंधार म्हणजे काय असतं, माते?'' लहानग्या कृष्णाने प्रश्न केला. यशोदा म्हणाली, ''अंधार पडला की आपल्याला कांहीएक दिसत नाही.'' ''अरे रतन, तुला माहीत आहे त्या छोट्या कृष्णाने काय केलं ते? आपले दोन्ही डोळे त्याने घट्ट मिटून ठेवले आणि म्हणाला, ''आता बघ अंधार झालाय. मला कांहीच दिसत नाही. आता दूध देशील ना?'' मोठ्या लाडिक स्वरांत त्याने विचारले व यशोदेजवळ प्रेमाने हट्ट केला.

शारदाने बाळकृष्णाच्या लीलेचे असे वर्णन केले. तिची अर्थपूर्ण, सोपी भाषा आणि समजावून सांगण्याची पद्धत ऐकून जगन्नाथ पंडित अवाक् झाला. त्याला हे वर्णन अतिशय मनोवेधक वाटलं. आपोआप त्याची नजर रतनकडे वळली. रतनला असं वाटत होतं की यशोदेच्या जागी तोच धार काढतो आहे व बाळकृष्ण त्याच्या जवळपास आहे. त्याच्या चेहऱ्यावर समाधानाचं तेज होतं. ते दृश्य बघण्यासारखं होतं. जगन्नाथ पंडिताने आपली सून व रतन यांच्याकडे नीट निरखून पाहिलं आणि प्रसन्न मनाने तो घराबाहेर गेला.

दुसऱ्याच दिवशीं श्रीधर आणि शारदाने पाहिलं की जगन्नाथ स्वतःच कृष्णलीला तरंगिणीमधला एक श्लोक रतनला ऐकवत आहे आणि त्याचा भावार्थदेखील साध्या भाषेतून समजावून सांगत आहे. जगन्नाथमधे झालेला हा बदल पाहून ती दोघेही आश्चर्यचकित झाली. याचे खरे कारण त्यांना माहित नव्हते. परंतु मुलगा आणि सुनेला पाहून जगन्नाथाच्या चेहऱ्यावर जो शांत आणि निर्मल आनंद पसरलेला होता, तो पाहून ते दोघेही फारच खूष झाले.''

वेताळाने गोष्ट सांगितली व नंतर म्हटले, ''राजन्, जगन्नाथ पंडिताचे म्हणणे होते की कविता फक्त रसिक श्रोत्यांनाच ऐकवावी. त्याची असंही सांगण्यापर्यंत मजल गेली की अशिक्षिताला कविता ऐकवणें म्हणजे सरस्वतीचा अपमान करण्यासारखे आहे. तिच्यावर शिंतोडे उडवणे आहे. या गोष्टीवरून बापलेकांमधे कायम वादविवाद होत होते, आणि पिता मुलाला अनेकदा याबाबतीत सांगत, समजावत होता. मुलाची पद्धत थांबवावी म्हणून पित्याने पुष्कळ प्रयत्न केले पण त्याचा उपयोग झाला नाही. पण जेव्हां त्याने आपल्या सुनेलाच कृष्णलीला तरंगिणीमधला श्लोक नोकराला समजावून सांगताना ऐकलं, तेव्हां जगन्नाथ पंडित गप्प कां बसला? त्याने शारदेला, आपल्या सुनेला, 'असं करुं नकोस' असं कां सांगितलं नाही? ह्याचा अर्थ असा होतो की त्याला आपल्या मुलाबद्दल असूया वाटत होती. आपल्या मुलाची विद्वत्ता आणि वाढती लोकप्रियता पाहिल्यानंतर जगन्नाथ पंडिताने स्वतःच कृष्णलीला तरंगिणीचे श्लोक रतनला समजावून सांगायला सुरवात केली. हा त्याच व्यवहार विचित्र व अनुचित नाही कां वाटत? माझ्या या शंकांची उत्तरे माहीत असूनदेखील जर तूं मौन धरलेस तर तुझ्या मस्तकाचे तुकडेतुकडे होऊन जातील.''

तेव्हां विक्रमार्क म्हणाला, ''अत्यंत प्रतिभावान पंडितांमधे स्वार्थ व अहंकार असतो. तेव्हां त्यांत आश्चर्य वाटण्याजोगे कांहीही नाही. जोपर्यंत मुलाचे लग्न झालेले नव्हते, जोपर्यंत घरांत सून आलेली नव्हती, तोपर्यंत गांवातले सुशिक्षित लोक व सधन जमीनदार यांच्यातच त्याचे उठणेंबसणें होते. जगन्नाथ पंडिताची बुद्धिमत्ता, त्याच्या कविता याबाबतीत चर्चा करताना त्याचा कधी सर्वसामान्य अशिक्षित जनतेशी संपर्क आला नव्हता. यामुळें त्याचा जो गैरसमज होता की अडाणी लोकांना काव्य ऐकवणें हे निरुपयोगी आहे आणि त्यामुळें साहित्याला कलंक लागतो, हा समज कायम राहिला. तो आपल्या मुलाशीच स्पर्धा करतो आहे हे समजणें चूक आहे. ही ईर्षा वैयक्तिक नसून साहित्याचे विश्लेषण करण्याबाबती होती. पण जेव्हां त्याने आपल्या सुनेच्या मुखांतून कृष्णलीला तरंगिणीमधला श्लोक ऐकला, आणि जेव्हां श्लोकाचा अर्थ समजला तेव्हां रतनच्या चेहऱ्यावरचा आनंद उजळलेला पाहिला, तेव्हां त्याला प्रथमच आपली चूक लक्षांत आली. त्याला आता कळलं की सामान्य जनतेकडे कधी लक्ष न दिल्यामुळें त्याची फार मोठी चूक झाली होती. साधारण व्यक्तीमधेंदेखील कवितेचा आस्वाद घेण्याची शक्ती असूं शकते हे त्याला आत्ता समजलं. सामान्य माणसें ही काव्याचा आनंद घेऊं शकतात. हे सत्य पाहून त्याचे डोळे उघडले, आणि त्याने आपण होऊनच रतनला श्लोक ऐकवले व त्याचा अर्थ समजावून सांगितला.''

राजाचे मौन भंग करण्यांत वेताळ सफल झाला व तो शवासहित अदृश्य झाला व पुन्हां झाडावर जाऊन बसला.

**- आधार (ललिता व शर्मिलाची रचना)**



# भारताची ओळख

## प्रश्नावली

दरवर्षी १५ ऑगस्टचा स्वातंत्र्य दिन आला, की देशाच्या स्वातंत्र्यलढ्याचा आठवणींना उजाळा मिळतो. हा लढा शंभर वर्षे चालला होता, आणि ५४ वर्षांपूर्वी जेव्हां स्वतंत्र भारताची घोषणा झाली तेव्हां संपला. या महिन्याच्या प्रश्नावलींत या शंभर वर्षांतले कांही महत्वाचे प्रसंग, व देशाला स्वातंत्र्य मिळण्यासाठीं झटणाऱ्या व्यक्ती, यांच्याबद्दल प्रश्न विचारलेले आहेत.

१. कोणत्या हिंदी सैनिकांच्या तुकडीने प्रथम बंड केले आणि १८५७चे क्रांतियुद्ध सुरुं झाले?
२. इंडियन नॅशनल काँग्रेसची स्थापना कुणी केली?
३. काँग्रेसच्या पहिल्या अधिवेशनाचे अध्यक्ष कोण होते? कुठे? केव्हां?
४. अमेरिकेंत 'गदार पार्टी'ची स्थापना कुणी केली?
५. चौरीचौरा इथें काँग्रेसच्या झेंड्याखाली निघालेल्या ३००० शेतकऱ्यांच्या मोर्च्यावर पोलिसांनी गोळीबार केला, आणि ती पोलिस चौकी जाळण्यांत झाली. हा प्रसंग केव्हां घडला? चौरीचौरा कुठे आहे?
६. जालियनवाला बाग हत्याकांड कोणत्या दिवशी झाले?
७. १८७५मधें शिवजयंतीचा उत्सव सुरुं झाला. तरुणांच्या मनांतल्या देशभक्तीला चालना मिळावी म्हणून हा उत्सव कुणी सुरुं केला?
८. गांधीजी कोणत्या सालीं "माझ्या देशाची आणि देशबांधवांची" सेवा करण्यासाठी दक्षिण आफ्रिकेंतून हिंदुस्तानात परत आले?
९. बालासोर येथें १९१५ साली कोणत्या क्रांतिकारकाने पोलिसांशी लढताना प्राणार्पण केले?
१०. भारतीय नेते व ब्रिटिश राज्यकर्ते यांच्यामधे एकूण तीन गोलमेज परिषदा (राऊंड टेबल कॉन्फरन्स) भरल्या. या तिन्ही परिषदांना दोन नेते उपस्थित राहिले होते. त्यांची नांवे सांगा.
११. "इन्किलाब झिंदाबाद" ही लोकप्रिय घोषणा कुणी दिली?
१२. इंडियन नॅशनल आर्मीची स्थापना कुठे आणि केव्हां झाली? (उत्तरें पुढील महिन्यांत)

### जुलैच्या प्रश्नावलीची उत्तरें

| | | | |
|---|---|---|---|
| १. | गंगा | ९. | १७७४, राणीगंज |
| २. | झेलम | १०. | चौथा |
| ३. | के २ | ११. | अभ्रक |
| ४. | कांचनगंगा | १२. | दिल्ली |
| ५. | ३३ टक्के | १३. | राजस्थान |
| ६. | हरयाणा | १४. | महानदी |
| ७. | १८७३ | १५. | १८७२मधें |
| ८. | गुजरातमधलें पक्षी अभयारण्य | | |



## ६६. स्वर्गारोहण

# महाभारत

युधिष्ठिराने भोजन देऊन सर्व ऋषींना तृप्त केले आणि कृष्णाच्या वतीने भरपूर दानधर्म केला. परीक्षिताला शिष्य म्हणून कृपाचार्यांकडे सोंपवला. आपल्या मंत्र्यांना बोलावून युधिष्ठिराने आपण महाप्रस्थानास निघत असल्याचे सांगितले. मंत्र्यांनी त्याबद्दल चिंता दर्शवली, पण युधिष्ठिराने त्यांना निरनिराळी उदाहरणे देऊन समजावले.

त्यानंतर पांची पांडव आणि द्रौपदी यांनी आपले सर्व अलंकार उतरवले आणि वल्कले नेसली. आपल्या सर्व अग्नींना पाण्यांत घालून ते तिथून निघाले. त्या स्थितींत त्यांना पाहून नगरांतल्या स्त्रियांना, पांडव द्यूतांत हारल्यानंतर बनवासाला निघाले होते, त्यावेळेची आठवण झाली. नगरवासी स्त्रियांना रडूं येऊं लागले. परंतु पांडवांच्या मनावर त्याचा यत्किंचित परिणाम झाला नाही.

जेव्हां पांडव नगराबाहेर जाऊं लागले तेव्हां एका कुत्र्यासह एकूण सातजण महाप्रस्थानास निघाले. त्यांनी हा निर्णय बदलावा, म्हणून कांही नागरिक त्यांच्या पाठोपाठ जाऊं लागले, परंतु नाईलाजाने त्यांना परत फिरावे लागले. द्रौपदीबरोबर पांडव नगरांतून गेल्यावर उलुपीने गंगानदीत प्रवेश केला आणि चित्रांगदा मणिपूरला





परत गेली. पांडवांच्या इतर स्त्रिया, परीक्षिताजवळच राहिल्या.

सुरवातीला पांडव पूर्व दिशेकडे एकापाठोपाठ एक असे चालत होते. त्यांनी अनेक देश व नद्या ओलांडल्या. कित्येक दिवसानंतर ते ताहित्य नांवाच्या समुद्रकिनाऱ्यावर पोचले. तोपर्यंत अर्जुनाजवळ त्याचे गांडीव धनुष्य व अक्षय भाता होता.

वाटेंत पर्वतप्राय शरीर धारण करून प्रत्यक्ष अग्निदेव आडवा आला व त्याने म्हटलं, ''हे पांडवांनो, मी अग्निदेव आहे. या वेळेला अर्जुनाजवळ गांडीव धनुष्य असण्याचे कांही प्रयोजन नाही. अर्जुनाने त्याचा त्याग करावा. ते वरुणाचे अस्त्र आहे. तेव्हां ते वरुणाकडे सोंपवायला हवे.''

अर्जुनाला इतरांनी पण हेच सांगितले. तेव्हां त्याने आपले गांडीव आणि अक्षय भाता समुद्रांत फेकून दिला. त्यानंतर अग्निदेवही अदृश्य झाला, व पांडव दक्षिण दिशेला चालूं लागले. समुद्र किनाऱ्यावरुन चालत ते पश्चिमेकडे वळले. त्यांना समुद्रांत बुडालेली द्वारकानगरी दिसली. तिथून ते सर्वजण उत्तर दिशेला जाऊं लागले. कांही दिवसानंतर त्यांना हिमालयपर्वत दिसला. तो ओलांडल्यानंतर त्यांना मेरुपर्वत दृष्टीस पडला.

पांडव चालत असताना रस्त्यांतच द्रौपदीचे प्राण जाऊन ती खाली पडली. भीमाने युधिष्ठिराला हे सांगितलं, पण मागे वळून न पाहता युधिष्ठिर तसाच पुढें चालूं लागला. त्यानंतर थोड्या वेळानंतर सहदेव खाली पडला. अशा रितीने व क्रमाने, नकुल व अर्जुन मरून पडल्याचे वृत्त भीमाने युधिष्ठिराला सांगितले. त्यानंतर आपणही पडतो आहोत असे सांगून भीम खाली पडला. परंतु युधिष्ठिर मागे वळून न पाहाता पुढें चालत राहिला. तो कुत्रा मात्र युधिष्ठिराच्या पाठोपाठ चालत होता.

थोड्या वेळांतच आपला रथ घेऊन इंद्र तिथें पोंचला. त्याने युधिष्ठिराला त्या रथांत बसायला सांगितले. त्यावर युधिष्ठिर इंद्राला म्हणाला, ''माझे सर्व भाऊ वाटेंतच मरण पावले आहेत. तेदेखील माझ्याबरोबर यायला हवेत. द्रौपदी पण आमच्यासमवेत यायला हवी. आपण माझी ही अट मान्य करावी. त्यांच्याशिवाय स्वर्गांत जाण्याची मला इच्छा नाही.''

त्यावर इंद्राने उत्तर दिले, ''ते सगळे यापूर्वीच आपापल्या शरीराचा त्याग करून स्वर्गांत पोंचले आहेत. परंतु तुला स्वर्गांत सशरीर प्रवेश मिळेल.





म्हणून तू माझ्याबरोबर चल.''

''तर मग हा कुत्रा तर मोठ्या विश्वासाने माझी सोबत करतोय. त्यालाही स्वर्गांत न्यायला हवं. या कुत्र्याला एकटा सोडून मला स्वर्गप्राप्ती नको आहे.'' युधिष्ठिरने निर्धाराने सांगितले.

इंद्र म्हणाला, ''तूं तर माझ्याबरोबर स्वर्गांत येतो आहेस. या कुत्र्याबद्दल तुला इतकी कणव कशासाठी? याला सोडून दे.'' परंतु युधिष्ठिरने आपला हट्ट सोडला नाही.

त्यावर कुत्र्याच्या रुपांत वावरणारा यमराज युधिष्ठिरासमोर प्रत्यक्ष उभा ठाकला आणि त्याने सांगितले, ''वनवासांत एका यक्षाच्या रूपांत येऊन मीच तुझी परीक्षा घेतली होती. या वेळेला कुत्र्याच्या रुपांत मी पुन्हां तुझी परीक्षा घेतली. तुझ्या बरोबरीची एखादी व्यक्ती स्वर्गांतसुद्धां कुणी नाही. तुला सशरीर उत्तमलोकाची प्राप्ती होईल.''

त्यानंतर इंद्र, यमराज, मरुत, अश्विनीकुमार व इतर देवतांनीदेखील युधिष्ठिराला आग्रहपूर्वक रथांत बसवले. ते सर्वजण आपापल्या विमानांत बसून त्याच्याबरोबर निघाले.

''अनेक राजर्षी उत्तम लोकांत आले, परंतु सशरीर स्वर्गप्राप्ती मिळवणाऱ्या युधिष्ठिराची कुणीही बरोबरी करुं शकणार नाहीत.'' नारदाने आपले मत सांगितले.

''सुख असो वा दुःख, माझ्या बंधूंशिवाय मला ते नको आहे.'' युधिष्ठिराने उत्तर दिले. त्यांला प्रत्युत्तर म्हणून इंद्र म्हणाला, ''राजन्, तूं उत्तम लोकांत जाणार आहेस, तेव्हां आता मानवी नात्यांचा त्याग कां करीत नाहीस? मी खरी गोष्ट सांगतो आहे ती ऐक! तुझ्या भावांना उत्तमलोक प्राप्त झालेला नाही. या स्वर्गातल्या देवी, देवता, ऋषी व सिद्ध मंडळींना तूं पाहून घे.''

''माझ्या भावांना सोडून मी एकटा राहूं



शकणार नाही. माझे भाऊ, द्रौपदी, आमची मुलें - जिथें ही सगळी असतील तिथेंच मी जाईन'' युधिष्ठिराने दृढ स्वरांत उत्तर दिले.

स्वर्गांत पोंचल्यानंतर युधिष्ठिराने देवतांच्या-मधें एका उत्तम आसनावर दुर्योधनाला बसलेला पाहिला. तो अतिशय तेजस्वी दिसत होता. त्यामुळे युधिष्ठिराच्या मनांत त्याच्याविषयी असूया निर्माण झाली. त्याचबरोबर अशा पापी माणसाला स्वर्गप्राप्ती कशी मिळाली याचे आश्चर्यही वाटायला लागले. तो मागे वळून म्हणाला, ''या लोभी दुर्योधनाच्याबरोबर स्वर्गांत राहून सुख पाहाण्याची मला अजिबात आवश्यकता नाही.''

नारदाने हंसून म्हटले, ''राजन्, स्वर्गामधें जुने वैर विसरायचे असते. रणांगणावर वीराचे मरण लाभल्यामुलें दुर्योधनाला स्वर्गप्राप्ती झाली आहे.''

''जर सर्व प्रकारची पापें करणाऱ्या या दुर्योधनाला स्वर्गप्राप्ती होत असेल, तर मला सांगा की, महान पुण्यात्मे असणाऱ्या माझ्या भावांना कोणते उत्तम लोक प्राप्त झाले आहेत? धृष्टद्युम्न, अभिमन्यु, आणि बाकी उपपांडव कुठे आहेत? मला त्यांना बघायची तीव्र इच्छा आहे.'' युधिष्ठिराने नारदाला सांगितले.

त्यानंतर कर्ण आणि आपले हितैषी राजे, ज्या मंडळींनी युधिष्ठिरासाठी युद्धांत प्राणार्पण केले होते. ते स्वर्गांत दिसत नव्हते. म्हणून युधिष्ठिराचे शब्द ऐकून देवतांनी सांगितलं, ''तर मग चला त्यांच्याजवळ! इंद्राने आम्हाला आदेश दिला आहे की तुमची प्रत्येक इच्छा पूर्ण करावी!''

देवतांनी एका दूताला बोलावून सांगितले की ज्या ज्या व्यक्तींना पाहाण्याची युधिष्ठिराला इच्छा आहे, त्या त्या व्यक्ती त्याला दाखवाव्यात. युधिष्ठिराला घेऊन दूत इतर पांडव दाखवण्या-साठी निघाला.

ते ज्या मार्गातून जात होते, त्या मार्गांत पापी होते, मार्ग चालण्यास अतिशय कठीण होता. साऱ्या वाटेवर रक्त व मांस पसरलेले होते. त्यावर डांस व माशा घोंघावत होते. चारी बाजूला केंस, हाडें, किडे व ज्वाळा पसरलेल्या होत्या. व त्यामुळें रस्ता भयंकर दिसत होता. वाटेंतच खेळांतल्यासारखी लहानशी पाण्याची नदी वाहात होती.

''अशा मार्गावर आपल्याला आणखी किती दूर जायचं आहे?'' युधिष्ठिराने आपल्यापुढें चालणाऱ्या देवदूतास विचारले.

''राजन! तूं दमला आहेस असं वाटतं, चल,





परत जाऊं या. पुढें जाण्याचा मार्ग आता राहिलेला नाही!'' देवदूताने म्हटले.

युधिष्ठिर निराश झाला. दुर्गंधीमुळें त्याचे डोकें आता भणभणूं लागले होते. तेवढ्यांत दीनवाण्या स्वरांत कांही आवाज त्याला ऐकूं आले. 'युधिष्ठिरा! तूं आल्यामुळें आम्हाला इथें जरा सुखावह वाटायला लागले आहे. तू दोन घटका इथेंच थांब ना!''

युधिष्ठिरने त्या आवाजांना विचारले, ''तुम्ही सर्वजण कोण आहात? इथें काय करीत आहात?''

''मी कर्ण आहे ! मी भीम आहे! मी अर्जुन आहे! मी नकुल आहे! मी सहदेव आहे! मी द्रौपदी आहे !'' अशी उत्तरें त्या आवाजांकडून आली.

ही उत्तरें ऐकून युधिष्ठिर मनांत फारच कष्टी झाला. ''या पुण्यात्म्यांनी कोणते पाप केले आहे? आणि कोणते पुण्य केल्यामुळें दुर्योधन स्वर्गातले सुख उपभोगतो आहे? हे सारे काय आहे? मी झोपेंत आहे की मी जागा आहे? कीं मी वेडा झालो आहे?'' यानंतर युधिष्ठिराला देवता व धर्म यांचा फारच राग आला. त्याने त्या देवदूताला म्हटले, ''तूं ज्यांचा दूत आहेस. त्यांच्याकडे परत जा. त्यांना सांगून टाक. मी माझ्या भावांना इथें टाकून तिथें येणार नाही. मी इथेंच राहिलो तर निदान या मंडळींना जरा बरे वाटेल.''

देवदूताने इंद्राजवळ जाऊन सर्व वर्तमान सांगितले. युधिष्ठिर दोन घटका तिथेंच थांबला. तेवढ्यांत इंद्रादि देवता तिथें येऊन पोंचल्या. त्यांच्या येण्यामुळें तिथले आवाज व गजबजाट थांबले. त्याबरोबर ती नदीही अदृश्य झाली. सगळीकडे सुवास पसरला. एक नवे वायुमंडळ उत्पन्न झाले आहे असे वाटूं लागले.

इंद्राने युधिष्ठिराला सांगितले, "हे युधिष्ठिर, देवता तुझ्या वागण्यावर प्रसन्न झाल्या आहेत. आता आमच्याबरोबर चल. तू सिद्धी प्राप्त केली आहेस. तुला आणि तुझ्या भावांना उत्तमलोक प्राप्त होत आहे. तेव्हां राजन्, तूं नाराज होऊं नकोस. प्रत्येक राजाला एकदातरी नरकाचे दर्शन अवश्य करावे लागते. प्रत्येकजण जे पाप व पुण्य करतो, त्यापैकी जर तो प्रथम पुण्याचे फळ भोगतो तर पापाचे फळ त्याला त्यानंतर भोगावे लागते. त्याचप्रमाणें जो प्रथम पापाचे फळ भोगतो, तो नंतर पुण्याचे फळ भोगतो. जो कमी पापे करतो, तो प्रथम नरकवास भोगतो. म्हणून मी तुला प्रथम नरकांत पाठवले.

तुझे भाऊ व द्रौपदी यांनीही जे थोडेफार पाप केले होते, त्याचे फळ म्हणून त्यांना थोडाफार नरकवास भोगावा लागला. त्यांच्या पापांतून ते मुक्त झाले आहेत. आता तुझ्या सर्व प्रिय व्यक्ती स्वर्गांत राहातील. तुला कर्णाबद्दलदेखील चिंता होती. त्यालाही स्वर्गप्राप्ती झाली आहे. इतर राजांपेक्षां तूं जास्त पुण्य संपादन केले आहेस. हरिश्चंद्र, मांधाता, भगीरथ आणि दुष्यंताचे पुत्र यांनी जे स्थान प्राप्त केले आहे, ते स्थान तुम्हाला मिळेल. ही पाहा, आकाशगंगा! यांत स्नान केलंस की तुझे सर्व मानवी भाव नाहीसे होतील. म्हणून प्रथम तू या गंगेत स्नान कर.

युधिष्ठिराने आकाशगंगेत आपले मानवी शरीर त्यागून तो सरळ आपल्या भावाजवळ गेला. तिथें त्याला कृष्णही दिसला. अजूनही कृष्ण त्याच्या नेहमीच्याच परिचित रुपांत होता. अर्जुन कृष्णाबरोबर होता. युधिष्ठिराला पाहाताच दोघेही आदरपूर्वक त्याच्याजवळ आले.

आणखी एका स्थानावर सूर्यासारखा तेजस्वी कांतिमान असा कर्ण दिसूं लागला. भीम आपल्या पूर्वरुपांत मरूतगणांमधें दृष्टीस पडला. अशाच प्रकारें नकुल व सहदेव अश्विनीकुमारांच्या जागीं दिसूं लागले.

त्यानंतर इंद्रानें युधिष्ठिरास द्रौपदी, तिचे पुत्र, अभिमन्यू, धृतराष्ट्र, राजा पांडु, कुंती, माद्री, भीष्म, द्रोण व इतर योद्धे दाखवले, आणि त्यांच्या विषयीं सविस्तर सांगितले. **(समाप्त)**





# अचूक वाणी

सुधाम हा निरंजनपूर गांवचा राहिवासी होता. तो एक सामान्य शेतकरी होता. त्याच्या मालकीची दोन एकर सुपीक जमीन होती. स्वत: शेतांत राबून तो आपल्या पत्नी व मुलांसह आनंदात दिवस कंठीत होता.

त्याच्या गांवात पशुपती नांवाचा एक श्रीमंत गृहस्थ राहात असे. तो सावकारीही करीत असे. गरजू लोकांना व्याजाने पैसे तो देई. आणि पैसे देता आले नाहीत तर अडवणूक करुन त्यांची जमीन, घर व संपत्ती लुबाडीत असे.

सुधामच्या पित्याने पशुपतीकडून कर्ज काढले होते, पण जन्मभर त्याला कांही ते कर्ज फेडता आले नाही. सुदामलाही आपल्या वडिलांचे कर्ज फेडणें जमले नव्हते, त्यापायीं तो लाचार झाला होता. थोडे धान्य व व्याज त्याला पशुपतीला द्यावे लागत होते.

शेतांत वर्षभर मेहनत करून जे धान्य उत्पन्न होई, ते आपल्या ताब्यांत घेण्यासाठी, धान्य मळणीच्या वेळीं वसुली करण्यासाठीं, पशुपतीचा एक धटिंगण इसम हजर होई. जे धान्य भरेल ते पशुपतीच्या माणसाला देणे सुधामला भाग पडे. आपला राग आवरुन नाईलाजाने तो धान्य देई.

एकदां पशुपतीच्या गुराख्याची चारपांच गुरें चुकून सुधामाच्या शेतांत घुसली, व त्यांनी त्याच्या पिकाचे बरेच नुकसान केले. गांवच्या अधिकाऱ्याकडे तक्रार कर म्हणून शेजाऱ्यांनी सुचवले, व नुकसानभरपाईदेखील मागून घे असा सल्ला दिला. पण सुधामने शेजाऱ्यांची सूचना मानली नाही. त्याने विचार केला की पशुपतीच्या गुरांनी शेताची नासाडी केली आहे, त्यामुळें यंदा पशुपती बहुतेक आपल्याकडून व्याज घेणार नाही. परंतु शेताची कापणी झाल्याबरोबर पशुपतीचे लोक धान्य ताब्यांत घ्यायला आले. सुधाम त्यांना म्हणाला, ''तुम्हाला ठाऊकच आहे की पशुपतीच्या गुरांनी माझ्या शेतांत घुसून नासाडी केली. आता फार थोडेच पीक राहिले आहे. ते माझ्या कुटुंबासाठीं मला हवे आहे. म्हणून यंदा मला व्याजाची माफी करावी अशी तुम्ही आपल्या मालकाला जाऊन विनंती करा. पुढच्या वर्षीं धान्य आले की मी त्यांना ते देईन आणि सर्व भरपाई करीन.''

पशुपतीला हे कळल्यावर तो स्वत: सुधामकडे आला व म्हणाला, ''कोणत्याही परिस्थितीत मला धान्य मिळालेच पाहिजे.'' सुधाम, त्याची पत्नी व मुलांनी, पशुपतीला समजावून सांगितले, पण सुधामने त्यांचे ऐकले नाही. हे पाहून सुधामची सहनशीलता संपून तो खूप संतापला.

तो अत्यंत रागाने म्हणाला, ''आज माझी ही स्थिती होण्याचे कारण दुसरें कुणीही नसून तुमचीच जनावरें आहेत. जर त्यांनी माझ्या शेतांत घुसून पिकाची नासाडी केली नसती तर मी धान्य मापून तुमचे सर्व व्याज फेडले असते. माझी ही परवड तुमच्यामुळेच झाली आहे. असं असूनही तुम्ही एखाद्या निर्दय पशूसारखे वागत आहात. तुमच्यांत थोडीदेखील माणुसकी नाही.''

सुधामचे हे कठोर शब्द ऐकून पशुपती क्षणभर सुन्न झाला. सुधामसारखा एक मामुली शेतकरी रागाने इतका लालेलाल होईल, आणि असा कठोर-पणें बोलेल अशी त्याला कल्पनाही नव्हती. पशुपतीने बाहेर येऊन आपल्या लोकांना सांगून सुधामला एका झाडाला बांधले व स्वत: हातात चाबूक घेऊन त्याने सुधामला मारायला सुरवात केली. त्याला आवरण्यासाठी सुधामची पत्नी व मुलें मधें पडली, त्यांनाही पशुपती फटके मारूं लागला. तो संतापलेला होता, नि तिथें असलेल्या कोणालाही पशुपतीला शांत करणें जमले नाही.

फटके मारुन मारुन पशुपती थकून गेला. त्याने चाबूक फेकून दिला व तो म्हणाला, ''सुधाम, तुझें घर व शेत मी आता वसुली म्हणून ताब्यांत घेतले तरीदेखील तुझ्याकडून कर्जफेड पुरी होणार नाही. अर्धे कर्ज बाकी राहीलच. ते तूं कसे फेडशील ते



सुधा राणी



मला ठाऊक नाही. पण तुला ते फेडावेच लागेल. याचा विचार करण्यासाठी म्हणून मी तुला उद्यां सकाळपर्यंत मुदत देतो आहे." हे बोलून पशुपती परत जायला निघाला. सुधाम आपली सारी शक्ती एकवटून ओरडला, "अरे, थांब जरा!"

पशुपती थांबला. सुधामने त्याला 'अरे' म्हटलेले ऐकून तो चकितच झाला.

सुधामने आपले दोन्ही हात जोडून वर आकाशाकडे पाहिले व म्हटले, "जेव्हां माणसाचा विनाश होण्याची वेळ येते, तेव्हां त्याची बुद्धिसुद्धां भ्रष्ट होते, असे म्हणतात. तुझे विनाशाचे दिवस आता जवळच आलेले दिसत आहेत. ह्यासाठी तूं असे चुकीचे वर्तन करत आहेस. नि स्वतःला सर्वाधिकारी समजतो आहेस. आपली वागण्याची मर्यादा सोडून वागत आहेस. मी खरोखरच प्रामाणिक आहे, सत्य वागणारा व धर्मपरायण आहे. माझे हे शब्द खरे असतील तर उद्यां सकाळपर्यंत तुझा नाश होईल. माझ्या या बोलण्याला माध्यान्हीचा हा सूर्य साक्षीदार आहे."

सुधामचे हे बोलणे थट्टेवारी नेल्यासारखे पशुपती हंसला, व वेगांतच तिथून निघून गेला. त्या रात्रीं अचानक मुसळधार पाऊस पडला, विजा कडकडूं लागल्या, आभाळ कोसळेल की काय असं वाटूं लागले. पशुपतीच्या घरावर वीज पडली. त्याचा वाडा जमीनदोस्त झाला. आंत राहाणारे कुणीही वाचले नाही. सर्वजण मरण पावले. पशुपतीही मेला.

नेमके त्याच वेळीं नारदमहर्षी भूलोकाची यात्रा करण्याच निघाले होते. सुधामच्या शेतांत जी घटना घडली, दिवसभर व रात्रीं काय काय होत गेले, ते त्यांनी प्रत्यक्षच पाहिले. एका सामान्य माणसाच्या शब्दांत केवढी महान शक्ती आहे हे पाहून त्यांना आश्चर्य वाटले.

सत्यलोकांत पोंचल्यावर नारदांनी ब्रह्मदेवांना विचारले, "देवा, पशुपतीचा मृत्यू सहज झाला की सुधामच्या वाचाशक्तीच्या प्रभावाने झाला? एखाद्याची वाचा इतकी प्रभावी असते कां?"

ब्रह्मदेव हंसून म्हणाले, "नारदा, सुधाम कुणी सामान्य मनुष्य नाही. तो मोठा धर्मनिष्ठ, कर्तव्यदक्ष, सत्यशील व निःस्वार्थी आहे. त्यामुळें त्याची वाणी प्रभावशाली आहे. हे तुला सहज समजावे म्हणून पृथ्वीवरचा तो एक भाग बघ." असें म्हणून ब्रह्मदेवाने नारदास खाली पृथ्वीवर बघण्यास सांगितले.

तिथें अरण्यमार्गाने सुबोधक नांवाचा एक संन्यासी चालला होता. रस्त्याच्या एका बाजूला झाडीमधें कालद्रष्ट नांवाचा एक नाग अत्यंत घायाळ झालेला होता. त्याने जेव्हां सुबोधकला पाहिले तेव्हां तो मोठ्या कष्टाने झाडीच्या बाहेर आला व म्हणाला, "स्वामीजी, आपण मला ओळखले कां?" सुबोधकाने नागाला पाहिले व आश्चर्याने म्हणाला,



"अरे, तूं? काय झालं तुला? तूं घायाळ कशाने झालास?"

"काय सांगू स्वामीजी, मी माणसांना न चावता नुसते 'फुत्कार' काढून घाबरवीत होतो. असे ते दिवस संपले. आता माणसाला कळले की माझे दांतही राहिले नाहीत व विषही राहिले नाही. विनाकारण माझ्यावार आक्रमण करुन त्यांनी मला घायाळ केले आहे. मोठ्या मुष्किलीने मी सुटलो. आपण मला सांगा, मी काय करूं?" कालद्रष्टने स्वामींना विनवले.

हे ऐकून सुबोधकाने सुस्कारा टाकून म्हटले, "कालद्रष्ट, तुला जो जीवनांत हा अनुभव आला आहे ना, असा अनुभव अनेकांना आलेला आहे. मनुष्यप्राण्यांत दिवसेंदिवस हिंसक वृत्ती वाढते आहे.

पण तुझ्यासारख्या धर्मनिष्ठाला त्याचा अंदाजही लागणार नाही. धर्मबद्ध झालेल्यांचे जीवन अग्नीसारखे पवित्र व तेजस्वी असते. पण असे सांगण्याऐवजीं मूर्खाला असे सांगावे लागते की अग्नीचा स्पर्श जाळणारा असतो!" असे म्हणून सुबोधकाने कालद्रष्टाच्या अंगावरुन हात फिरवला व तो तिथून निघून गेला.

त्यानंतर थोड्याच वेळांत दोन माणसें तिथें आली. एकाच्या हातात मोठी काठी होती, व दुसऱ्याच्या हातात साप ठेवण्याची झांकणाची टोपली होती, ज्याच्या हातांत काठी होती तो झाडींत जाऊन म्हणाला, "अरे, हा इथें साप आहे. त्याच्या तोंडात दांत नाहीत. मी त्याला झाडींतून हुसकावून लावतो. तुम्ही सर्वजण घाबरुं नका. साप बाहेर आला की त्याला धिटाईने पकडा नि टोपलींत बंद करुन ठेवा." असे म्हणून त्याने झाडीवर जोराने काठी मारली.

दुसऱ्याच क्षणीं कालद्रष्ट झाडींतून बाहेर आला व त्या माणसाला चावला. नंतर तो दुसऱ्याकडे चावण्यास वळणार, तो ते दोघे ओरडत पळायला लागले.

हे दृश्य पाहून नारदांना समजले की प्राण्याच्या स्वभावधर्माप्रमाणे तो प्रामाणिकपणे वागणारा असेल तर तो अग्नीसारखा प्रखर असतो व त्याला वाचासिद्धी प्राप्त होते.









# वाचकांची पत्रे

आपण प्रसिद्ध करीत असलेला मराठी 'चांदोबा'मी नेहमी वाचतो. त्यामुळें चालू युगांत अनेक युक्त्यांचा वापर करता येतो. आपले हे कार्य असेच चालू राहो! व आपली भरभराट होवो हीच अपेक्षा. कळावे.

**दिलीप गोपाळ पाटील, बेळगांव**

'चांदोबा' हे पुस्तक काढणारे काका, काकी, मावशी, मामा या सगळ्यांना माझा, कल्पेशचा नमस्कार. मी तुमच्या फोटोंना उत्तर पाठवतो. पत्र लौकर लौकर पाठवावे.

**कल्पेश शहा, महाराष्ट्र**

साहेब, चित्रशीर्षक स्पर्धेचे पत्र आपणाकडे २० तारखेपर्यंत पोंचायला हवे आहे. परंतु चेन्नई व माझे गांव यातील अंतर फार असल्याने, आपले 'चांदोबा' (मराठी) वेळेवर मिळत नाही. बुकडेपोवाला हे पुस्तक ४-५ तारखेला आमच्या हातीं सोंपवतात. त्यामुळे पत्र लिहिण्यास व ते आपल्यापर्यंत पोंचण्यास उशीर होत राहातो. तरी ती तारीख २० ऐवजी २५ करावी ही विनंती. कृपया कांही चुकल्यास क्षमा करावी.

**श्रीनाथ आण्णाप्पा कोथळे,कर्नाटक.**

मी 'चंदामामा'चा लहानपणापासून वाचक आहे. रोजच्या दैनंदिन तणावामधून कांही वेळ संपूर्ण मुक्तता मिळवण्यासाठीं चंदामामाच्या सर, सरळ आणि बोधप्रद गोष्टी उपयोगी असत. पण सध्यां तसे वाटत नाही. गोष्टींचे प्रमाण कमी होत चालले आहे. निरुपयोगी गोष्टींवर अनेक पाने खर्ची पडत आहेत.

**के. सेनगुमा, शाहजहानपूर**

कित्येक वर्षे मी चंदामामाचा नियमित वाचक आहे. मी अजूनही चंदामामा वाचतो, पण पूर्वीच्या चंदामामाची गोष्ट वेगळी होती. घरांतली व गांवातली चित्रें खूप छान वाटत असत. गोष्टीदेखील एकापेक्षां एक चांगल्या असत. आत्ता ही हे मासिक मला आवडते, पण कांहीतरी मनांत खटकते हे खरे !

**विनय त्रिपाठी, अलाहाबाद**

शाळेंत असल्यापासून आपला चंदामामा मी मोठ्या उत्सुकतेने व आनंदाने वाचतो आहे. आता माझे वय ३६ आहे व भारतीय वायुसेनेत मी लहान वयांतच भरती झालो होतो. सुटीवर आलो की किंवा प्रवासांत मी चंदामामा विकत घेऊन अवश्य वाचतो. आता माझी मुलें व पत्नीही चंदामामा आवडीने वाचतात. मे २००१ चा अंक माझ्या हातीं पडला. नेहमीप्रमाणें गोष्टी मजेदार व रंजक आहेत. पौराणिक कथांमुळे आपल्या सांस्कृतिक ठेव्याचा परिचय होतो आहे.

**सार्जंट बी. पी. सिंह, अहमदाबाद**





# यक्ष पर्वत

८

*(गुरु भल्लूक भुयारी वाटेच्या वरच्या दाराजवळ आला. खड्ग व जीवदन्ताने मेलेल्या लांडग्याला त्या दाराच्या आंत फेकून दिले. हे बघताच कांही लांडगे भुयारांत घुसले. त्यांच्या मागोमाग खड्ग आणि जीवदन्तपण दारांवर चढले. समरबाहू व त्याचा साथीदार खाली उभे होते. लांडगे त्यांच्याभोवती जमूं लागले. इथून पुढे...)*

समरबाहू विचारांत पडला की स्वतःचे रक्षण कसे करावे. तो आपल्या चारी बाजूंस बघूं लागला. त्याला बिळांतल्या वाटेने जाऊन आपली सुटका करायची नव्हती. तेवढ्यांत चंद्र जोरात ओरडला, "सरदार, लांडगे आपल्यावर हल्ला करणार आहेत. आपण नक्की मरणार असं वाटतंय." तितक्यांत खड्गवर्माने दारापाठीमागून वाकून आपले हात खाली सोडले व म्हणाला, "समरबाहू, चंद्र, माझे हात धरून दाराच्यावर चढून या." दुसरा कांही मार्ग नसल्याने समरबाहू व चंद्रने खड्गवर्माचे हात पकडले. खड्गवर्माने तावडतोब त्यांना वर खेंचले.

तिकडे जीवदन्त आपल्या मंत्रदंडाने लांडग्यांना घाबरवत होता. आणि संधी मिळताच तो भुयारीवाटेवर आला.

आता चौघांनी ते जिथे होते त्या भुयारांत बारकाईने बघितले. खड्गवर्मा जीवदन्ताला म्हणाला "जीव, गुरु भल्लूक आणि त्याच्या टोळीचा कांही पत्ता लागत नाही. हे सगळे आता कुठे बरं गेले असतील?"

जीवदन्ताने कान देऊन ऐकलं की बिळांतून कांही आवाज येतोय. मग तो म्हणाला "खड्ग, बिळांतून आरडाओरडा ऐकूं येतो आहे. पण हे



कळत नाही की तिथे काय चाललंय. तुला कांहीच ऐकूं येत नाही कां?''

खड्गवर्माने कांही बोलायच्या आधीच समरबाहू बोलूं लागला, ''मला लांडग्यांचेच नाही तर गुरु भल्लूकाचेही ओरडणे ऐकूं येत आहे. तो आपल्या शिष्यांना सावध करतो आहे. आपण इथे जास्तवेळ थांबणे चांगले नाही.'' असे म्हणत तो भीतीने कांपू लागला. त्याच्या बोलण्याला हंसत खड्गवर्मा म्हणाला, ''तू पण कसा शूर सरदार आहेस! वाळवंटातून इतक्या लांब साम्राज्य स्थापायला आलास आणि जिवाची एवढी पर्वा करतोस? तुला हे शोभत नाही.'' हा टोमणा ऐकून समरबाहूने स्वतःला सावरलं. आपला भाला वरती करत तो म्हणाला ''मेलो तर कसं साम्राज्य स्थापणार? जोपर्यन्त माझं ध्येय पूर्ण होत नाही तोपर्यन्त मी मरूं इच्छित नाही.''

समरबाहूच्या या बोलण्यावर ते दोघे हसूं लागले. जीवदन्त भुयारांतील वाटेने पुढे जात म्हणाला ''समरबाहू, माझा हा मंत्रदंड व खड्गवर्माची तलवार, तुला आमचा मित्र स्वर्णाचारीकडे सुखरुप पोचवेल. आमचे आश्वासन ऐकून हातावर हात ठेवून स्वस्थ बसूं नकोस. गरज पडेल तेव्हां आपल्या भाल्याचा उपयोग कर.''

जसजसे ते भुयारात पुढे जाऊं लागले तसतसे लांडग्यांचे ओरडणे व माणसांचे आवाज स्पष्ट ऐकूं येऊं लागले. थोड्याच वेळांत ते भुयारमार्गाने अस्वलवाल्या माणसांच्या घराजवळ पोचले. जीवदन्ताला वाटले की भल्लूक कदाचित् वृकेश्वरी देवीच्या मंदिरात असेल.

एक अस्वलवाला भीतीने कांपत त्यांच्याकडेच पळत येत होता. एक लांडगा तोंड वासून त्याचा पाठलाग करत होता. खड्गवर्मा ताबडतोब पुढे झाला आणि त्याने आपली तलवार लांडग्याच्या शरीरांत खुपसली. लांडगा विव्हळत, ओरडत, धडपडत, तेथून पळून गेला.

तेव्हा जीवदन्त त्याला धीम्या स्वरांत म्हणाला ''अरे गुरु भल्लूकाच्या शिष्या, तू जोरजोरांत बोलूं नकोस. मी जे विचारतोय, फक्त त्याचे उत्तर दे. तुमचा सरदार गुरुभल्लूक आता कुठे आहे? तुमच्या टोळीचे सर्व लोक अजूनही बिळदुर्गातच आहेत का? ते जंगलाकडे तर पळून गेले नाही ना?''

''साहेब, लांडग्यांच्या हल्ल्याच्या भीतीने





आमचे सगळे लोक झोपड्यांतून, खोल्यांतून लपले आहेत. गुरु भल्लूक वृकेश्वरीदेवीच्या मंदिरात पूजा करीत आहेत.''

''लोकांना पकडून आपले गुलाम बनवता. त्यांच्याकडून कामे करुन घेता. स्वतःला शूर म्हणवून घ्यायला लाजत नाही. मग लांडग्यांची एवढी भीती का?'' खड्गवर्माने विचारले.

''सरकार, लोक आपल्यापेक्षां बलवानापुढे झुकतात. पण लांडगे क्रूर पशू आहेत, त्यांच्याशी कोण सामना करणार? हे तर बलवानांना देखील खातात.'' अस्वलवाला म्हणाला.

जीवदन्त त्याच्या बोलण्यावर हंसत म्हणाला, ''भ्याड आहेस पण सत्य गोष्ट बोललास. तू म्हणाला होतास गुरु भल्लूक वृकेश्वरी देवीच्या मंदिरात आहे, तू पुढे होऊन आम्हाला रस्ता दाखव. आम्हाला फसवायचा प्रयत्न केलास तर तुझी चामडी लोळवीन.''

थोडे दूर गेल्यावर भल्लूकाच्या शिष्याने एका खोलीकडे बोट दाखवून म्हटले, ''साहेब, हेच वृकेश्वरीदेवीचे मंदिर आहे व गुरु भल्लूक आंतच आहेत.''

खड्गवर्माने हळूंच मंदिराच्या दरवाजाजवळ जाऊन त्याला एक हलका धक्का दिला. त्याने बघितले की गुरु भल्लूक वृकेश्वरीदेवीच्या मूर्तीपासून चार पांच फुटावर जमीनीवर आडवे पडून साष्टांग नमस्कार घालत आहे व स्वतःशीच बडबडत आहे. खड्गने जीवदन्तास विचारले, ''सांग आता काय करायचे?'' जीवदन्त म्हणाला, ''तो मूर्तीपुढे वाकलेला आहे. तू हळूंच मूर्तीच्या मागे लप. आणि त्याला असा उपदेश



कर, जणूं देवीच त्याच्याशी बोलत आहे. देवीच्या आवाजांत त्याला असं सांग की त्याने आपल्या शिष्यांसहीत बिळदुर्गातून पळून जावे. आणि असं पण सांग की हे झालं नाही तर मोठे संकट कोसळेल.''

हलक्या पावलांनी पुढे जात खड्गवर्मा वृकेश्वरीदेवीच्या मूर्तीपाठीमागे लपला. आणि बोलूं लागला, ''भक्ता भल्लूका, तुझ्या तपश्चर्येने मी संतुष्ट झाले आहे. देशद्रोह्यांच्या प्रवेशामुळे हा बिळदुर्ग अपवित्र झाला आहे. मी आता इथून गुप्त होणार आहे. आणि जंगलातल्या तळ्याकांठच्या शमीवृक्षाखाली प्रगट होणार आहे. आपल्या शिष्यांसह तिथे पोच व माझी पूजा कर.''

देवीचा आवाज ऐकून भल्लूक घाबरुन उठून राहिला. त्याने हात जोडून म्हटलें, ''वृकेश्वरी देवी,'' तो आणखी कांही म्हणण्याच्या आंतच देवीच्या आवाजांत त्याला रागवत खड्गवर्मा म्हणाला ''आणखी कांही न बोलता तात्काळच जंगलातल्या तळ्याकांठी पोच.''

गुरु भल्लूक देवळांतून बाहेर आला. त्याआधीच जीवदन्त व इतर सगळे भिंतीआड लपून बसले. गुरु भल्लूक आपला पंचशूळ वर उचलून ओरडूं लागला, ''हे वृकेश्वरीदेवीच्या भक्तांनो, देवीने आज्ञा केली आहे की आता निघा आणि जंगलातल्या तळ्याकांठी पोचा.'' असें ओरडत तो किल्ल्यांत सगळीकडे फिरुं लागला. सगळे लोक बिळांतून बाहेर पडले. थोडे दूर गेल्यावर त्याला शंका आली की वृकेश्वरीदेवी अजूनही देवळांत आहे की गुप्त झाली? तो परत फिरुन किल्ल्याकडे येऊं लागला. तेव्हां खड्ग व जीवदन्त लांडग्यांना घाबरवून बाहेर हाकलत होते.

समोरुन येणाऱ्या लांडग्याला बघून भल्लूक भीतीने कांपत आपल्या शिष्यांकडे पळूं लागला, आणि ओरडूं लागला, ''हे वृकेश्वरीदेवी, आमचे रक्षण कर.''

हे दृष्य बघत असलेला खड्गवर्मा म्हणाला, ''चार, पांचच लांडगे यांच्या मागे लागले आहेत, त्यांना मारायचं धाडस देखील हे करुं शकत नाहीत. वृकेश्वरीदेवीच्या या भक्तांची ही दयनीय स्थिती पाहून हंसावे का रडावे तेच कळत नाही.''

जीवदन्त वेगाने पुढे झाला. हातांतल्या मंत्रदंडाने त्याने एका लांडग्याला चांगले जखमी केले. लांडगा खाली पडून तडफडूं लागला. बाकीचे लांडगे पळून गेले. हे बघून गुरु भल्लूकाच्या



आनंदाला पारावार उरला नाही. त्याने दोन्ही हात जोडून जीवदन्ताला नमस्कार केला.

जीवदन्ताने भल्लूकाला पायापासून डोक्यापर्यन्त न्याहळत म्हटलं, ''भल्लूकदादा, तुम्ही शेती करुन आरामांत आयुष्य घालवायचं होतं. तुम्ही या लांडग्यांना पाळून वृकेश्वरीची उपासना कशाला करता?''

भल्लूक नम्रपणे म्हणाला ''साहेब, मी सगळ्यांवर हुकूमत करतो. आरामांत आयुष्य घालवावे हाच माझा हेतू होता. आणि यापेक्षां दुसरा सोपा मार्ग मला सुचला नाही.''

''आता पुढे काय करायचा तुझा बेत आहे? तुझे शिष्य तर तुला लांडग्यांच्या हवाली करुन निघून गेले.'' खड्गवर्माने विचारले.

''तसं कांही नाही साहेब. ते सर्वजण जंगलातल्या तळ्यांकाठी वृकेश्वरीची पूजा करायला गेले आहेत. महाशक्तिशालिनी देवी आता किल्ल्यांतून निघून गेली आहे ना!'' गुरु भल्लूक म्हणाला.

एवढ्यांत चार अस्वलवाले लोक पळत आले. आणि सांगू लागले ''गुरु भल्लूक, त्या तळ्याजवळ पांच, सहा उंटवाले आहेत. स्वर्णाचारी नांवाच्या त्यांच्या सरदाराने आपल्या दोन माणसांना मारले. आणि आपल्या पांच लोकांना पकडले. ही वाईट बातमी सांगायला आम्ही इकडे पळत आलो.''

स्वर्णाचारीचे नांव ऐकून खड्गवर्मा, जीवदन्त व समरबाहू आश्चर्यचकित झाले. डोंगरावर



किल्ला बांधायचे सोडून हा इकडे कशाला आला हे त्यांना कळेना.

त्याचे कारण असे होते की डोंगर व जंगल हे वीरपूरच्या राजा वीरसिंहाच्या मालकीचे होते. एक आठवड्यापूर्वी वीरसिंहाच्या प्राणीसंग्रहालयाचा एक अधिकारी नव्या प्राण्यांना पकडायला जंगलात आला. त्याच्याबरोबर दहा सैनिक होते. त्यांनी जाळी लावून दोन वाघ व कांही पक्षांना पकडले. दुपारी एका झऱ्याकांठी बसून ते जेवण करुं लागले. एका सैनिकाचे जेवण झाल्यावर तो इकडे तिकडे कांही वेगळे प्राणी पक्षी दिसतात कां म्हणून शोधूं लागला. थोडे दूर गेल्यावर त्याला दिसले की झऱ्याजवळ झाडाला चार उंट बांधून ठेवलेले आहेत. हे बघून त्याला आश्चर्य वाटले आणि त्याने ही खबर आपल्या



अधिकाऱ्याला दिली. ''उंट? कुठे आहेत? आपल्या प्राणीसंग्रहालयात उंटच नाहीत. ते पण असले तर राजाची कीर्ती अजून वाढेल. आपले राज्य प्रसिद्धीस येईल.'' असे म्हणत अधिकारी आनंदात हसू लागला.

पण त्याचा उत्साहभंग करत सैनिक म्हणाला, ''सरकार, ते उंट झाडाला बांधलेले आहेत. याअर्थी जवळच त्यांचा मालक पण असणार.''

''मालक? ते कसे मालक होतील? या वीरपूर राज्याची प्रजा, जंगल, डोंगर, पाणी, हवा, या राज्यावर असलेले आकाश, या सगळ्यांचे मालक आपले वीरसिंह महाराज आहेत. तुमच्यातले चौघे जण जाऊन त्या उंटांना पकडून इकडे आणा. ते लोक मिळाले तर त्यांना पण पकडून माझ्या समोर आणा.''

उंट बांधलेल्या जागी चौघे सैनिक गेले. मालक कुठे सापडला नाही. दोरीने बांधलेल्या उंटांचे दोर सैनिक जेव्हां सोडवू लागले, तेव्हां एक उंट घाबरुन विचित्र आवाज काढत ओरडूं लागला. बाकीचे उंट लाथा मारत गडबड करुं लागले.

स्वर्णाचारी आपल्या साथीदारांना घेऊन जंगलात शिकारीस आला होता. शिकार केल्यानंतर झाडांच्या दाट सावलीत तो विश्रांती घेत होता. उंटांचे ओरडणे ऐकून त्यांच्यावर वाघ, सिंहानी हल्ला केला असे त्याला वाटले. म्हणून तलवारी उपसून ते पळत त्या जागी आले.

त्यांना पाहून सैनिकांनी म्यानांतून तलवारी बाहेर काढल्या. समरबाहूच्या साथीदारातल्या एकाने रागाने दांतओठ खात विचारले, ''कोण आहात तुम्ही? सैनिकांचा वेष घातलेले जंगली चोर दिसता. तुमच्या सारख्यांना उंटांची चोरी करता येणे अशक्य आहे.''

''आम्ही चोर नाही आहोत. वीरसिंह महाराजांचे सैनिक आहोत. कर न देता राजाच्या जंगलात प्रवेश करुन उंटांना चरुं दिल्याच्या गुन्हाबद्दल त्यांना पकडून नेत आहोत.'' एक सैनिक निर्भयपणे म्हणाला.

''हा कोण वीरसिंह महाराज? या वाटेवर समरबाहू महाराजांचा पुरा हक्क आहे. त्यांचे उंट चोरायला आलेल्या तुम्हाला चांगली कडक शिक्षा देऊं. ताबडतोब तलवारी म्यानबंद करा. आणि आमच्या स्वाधीन व्हा.'' स्वर्णाचारी ओरडून म्हणाला.

पळून जाणे अशक्य वाटले तेव्हां वीरसिंहाच्या सैनिकांनी त्यांच्याशी सामना केला. खड्ग-युद्धात वीरसिंहाचे दोन सैनिक मेले. एक घायाळ झाला. चौथा सैनिक वीरसिंहाच्या अधिकाऱ्या-कडे कसातरी पोचला.

धापा टाकणाऱ्या रक्तबंबाळ सैनिकाला पाहून अधिकारी म्हणाला, ''हे तर अगदी विचित्रच वाटतंय. मी पाळीव प्राण्यांच्या बद्दल वाचले आहे, त्यात कुठेही उंट मांसाहारी असल्याचे वाचलेले आठवत नाही. तुझ्या बरोबर असलेल्या बाकी तिघांना उंटांनी खाल्ले की काय?''

''सरकार उंटांनी नाही, त्यांच्या मालकांच्यामुळे मी जखमी झालो आहे. माझ्या बरोबरच्या तिघांना त्यांनी मारुन टाकले. ते लोक कोण आहेत ते माहित नाही पण तलवार चालविण्यांत पटाईत आहेत.'' सैनिक म्हणाला.

''आपल्यापैकी प्रत्येकजण तयारीने तलवार चालवू शकतो. त्या लोकांना ही गोष्ट माहित नाहीये. ते तलवारबाजीत आपल्यापेक्षा तरबेज असतील असं मला वाटत नाही.'' असे म्हणत त्याने आपली तलवार उपसली. त्याच्याबरोबर बाकीच्या सैनिकांनी देखील आपल्या तलवारी उपसल्या.

जखमी सैनिक तो ज्या दिशेकडून पळत आला होता त्या बाजूला एकटक बघूं लागला. त्यांच्या दिशेने येणाऱ्या समरबाहूच्या अनुयायांना बघून तो प्राणीसंग्रहालयाच्या अधिकाऱ्याला म्हणाला, ''आपल्या शंकेचे निरसन लवकरच होईल. पहा, ते लोक इकडेच येत आहेत.''

'अरे शूरवीरांनो, हे लोक तर अगदीच नवशिके दिसतात. यमदूतांना पळवून लावायची ताकद असलेल्यांशी यांना लढाई करायची आहे? उलटा आपल्यावरच त्यांना हल्ला करायचाय?'' असं म्हणत अधिकाऱ्याने सैनिकांना इशारा करुन तो समरबाहूच्या साथीदारांकडे वळला.

(क्रमशः)





# देवी भागवत

महर्षी व्यासांनी सूतमनीला ऐकवलेली अनेक पुराणें त्याने नैमिषारण्यांत राहाणाऱ्या मुनींना पुन्हां सांगितली. त्यावेळेस कोणत्यातरी संदर्भात त्याने शौनक इत्यादि मुनींसमोर 'देवी भागवत' नांवाच्या पुराणाचा उल्लेख केला होता. एक दिवस शौनकने सूतमुनीला ही आठवण देऊन हे भागवत ऐकवण्यात्री विनंती केली. त्यानुसार सूतमुनीने त्या सर्वांना 'देवी भागवत' पुराण ऐकविले.

सूताने प्रथम आदिशक्ति बद्दल माहिती सांगितली. तो म्हणाला, ''देवी एक महान शक्ति आहे, तीच विद्या आहे व सर्वलोक तिच्या आश्रयाने राहातात. खरे पाहिले तर सृष्टीची उत्पत्ति, स्थिती व लय ह्यांचे कारण ही आदिशक्ती आहे. तिच्या प्रेरणेने त्रिमूर्ति आपापल्या कर्तव्याचे पालन करीत असतात. ब्रह्मदेव हा विष्णूच्या नाभीपासून उत्पन्न झालेला आहे. विष्णूचा आधार आदिशेष आहे. हा आदिशेष सागरांत असून त्या जलाचा आधार महाशक्ति लोकमाता आहे. अशी ही देवीबद्दलची माहिती देवी भागवतांत आहे.''

सूतमुनीच्या तोंडून देवीभागवत कथा ऐकण्यास सारे मुनी उत्सुक होते. त्यांच्यातर्फे शौनकाने त्याबद्दल सूतास विचारले, ''एकदा ब्रह्माने आम्हाला एक चक्र दिले होते, व सांगितले की त्या चक्राचा आंस ज्या प्रदेशांत तुटेल, तो प्रदेश अत्यंत पवित्र आहे. तिथें कलीचा प्रवेश होणार नाही. त्या चक्राचा आंस इथेंच तुटला होता. म्हणून या प्रदेशाचे नांव नैमिष पडलं. आम्ही इथेंच राहिलो. पुन्हां कृतयुग येईपर्यंत इथें राहून कलीच्या भयापासून मुक्त राहू. इथें आम्हाला पुण्याच्या गोष्टींखेरीज इतर कसलेही काम नसते. म्हणून आपण आम्हाला पुण्यप्रद देवी भागवत पुराण ऐकवा.''

त्यानंतर सूतमुनींनी सांगितलं:

''महामुनी व्यासांनी मला 'देवी भागवत' हे पुराण जसे ऐकवले आहे त्यानुसार मी आपल्याला ते पुराण ऐकवितो. आजपर्यंत सत्तावीस द्वापारयुगें संपली व अठ्ठाविसावे द्वापारयुग सुरुं झाले. प्रत्येक द्वापारांत एका व्यासांचा जन्म झाला, वेदांचे भाग करुन पुराणांची रचना ज्यांनी केली, ते माझे गुरुदेव आहेत. ते सत्यवतीचे पुत्र म्हणून सात्यवतेय व्यास होते. त्यांनी शुकाला, त्यांच्या पुत्राला, ते देवी भागवत ऐकवत होते, त्यावेळीं मी पण ते भक्तीभावाने व श्रद्धेने ऐकण्यांत गुंग झालो. आपले पूर्वज सांगतात, ''जांवयाबरोबर भोजन करावे, आणि पुत्राबरोबर वाचन करावे.'' तसे हे देवी भागवत ऐकल्यामुळें शुकमुनी तरुन गेले. खरें म्हणजे हे पुराण जे जे लोक ऐकतात ते सुखी होतात.''

ह्यावर मुनींनी विचारले, ''शुकमुनी हे व्यासांचे पुत्र कसे? शुकांचा जन्म तर अरणिने (दोन लांकडे एकमेकांवर घासल्याने) झाला आहे असे सांगितले जाते.''

त्यावर सूताने त्यांना शुकाचा जन्मवृतांत सांगितला. ''एकदा महर्षी सरस्वती नदीच्या किनाऱ्यावर तप करीत बसले होते. त्यांनी पाहिले की कांही पक्षी नर-मादी अशा जोड्यांनी राहात होते, पिलांना जन्म देत होते, व त्यांना चोंचीने खाद्य देत होते. ते दृश्य पाहून व्यासांना खूप आनंद झाला. आपल्यालाही संतान असावे अशी इच्छा त्यांच्या मनांत उत्पन्न झाली.

लग्न करून पत्नीबरोबर सुखासमाधानाने राहून पुत्रलाभ झाला की आनंद होईल. पुत्र मोठा झाला, त्याचा विवाह झाला की लाडकी सून घरीं येईल व आनंदीआनंद होईल. पुत्र झाल्याने फार लाभ होईल. ती दोघेजण माझ्या वृद्धपणीं माझी सेवा करतील, व माझ्याबरोबर राहातील. पैसे मिळवतील व मला देतील. आपल्या मरणाच्यावेळीं आपल्याला डोकें टेकायला मांडी देतील. त्यामुळें मला उत्तमलोक प्राप्त होईल. पुत्रासारखे मनुष्याला दुसरे सुख नाही.''

असा विचार करून व्यासमुनी पुत्र मिळावा म्हणून कांचन पर्वतावर गेले. व कोणती देवता आपली पुत्रेच्छा लवकर पुरी करील याचा विचार करूं लागले.

त्यावेळीं नारद तिथें आले. व्यास त्यांना



म्हणाला, ''भगवन्, आपण अगदी योग्य वेळीं येथे आलात; कदाचित् माझी इच्छा पुरी करण्यासच आला असाल.''

ह्यावर नारद म्हणाले, ''आपण सर्वज्ञ आहात. आपल्याला कोणाच्या मदतीची जरुरी नाही. परंतु आपली कांही इच्छा असेल तर सांगावे.''

''पुत्रविहीन व्यक्तीला परलोक प्राप्त होत नाही असे म्हणतात. महर्षी, मी कोणत्या देवतेची प्रार्थना करुं म्हणजे मला पुत्रप्राप्ति होईल ते आपण मला कृपा करुन सांगावे.'' व्यास नारदांना म्हणाले. त्यावर नारदांनी उत्तर दिले, ''एकदा माझे पिता ब्रह्मदेवाचे मनांतसुद्धां हीच चिंता निर्माण झाली, तेव्हां ते विष्णुलोकांत गेले व विष्णूला म्हणाले, ''मी आपल्याला सर्वश्रेष्ठ समजतो पण आपल्यापेक्षां कुणी श्रेष्ठ व्यक्ति असेल तर मला सांगावे.'' विष्णू ब्रह्मास म्हणाले, ''आपण सृष्टी उत्पन्न करणारे, मी तिचे पालन करणारा व शिवजी प्रलयकारक आहेत असे सर्वजण समजतात. परंतु ही फार मोठी चूक आहे. बुद्धिमान लोकांना ठाऊक आहे कीं तेजोमयी

१. सूत, शौनक मुनिगण - हयग्रीवावतार



'आदिशक्ति' ही सृष्टीची निर्माणकर्ती आहे. आपण जर सृष्टीची उत्पत्ती, स्थिती व प्रलयकारक असलो तर त्याचे कारण आहे. आपणास रजोगुण, मला सत्त्वगुण व शिवजींना तमोगुण सहाय्यक आहेत. नाहीतर आपले महत्व काय असणार? मी शेषावर पहुडलेला असलो, आणि उन्मत्त राक्षसांचा वध करत असलो, तरी ती सारी आदिशक्तीची कृपा आहे म्हणूनच ना? या आदिशक्तीच्या कृपेनेच तर पूर्वी मधु व कैटभ नांवाच्या राक्षसांशी पांच हजार वर्षे लढत राहिलो. शेवटी त्या आदिशक्तीच्या मदतीनेच तर मी विजय मिळवला होता.

मी कधीं स्वतःला स्वतंत्र व्यक्ती मानतच नाही. एकदा धनुष्याच्या दोरीने माझे मस्तक कापले गेले होते तेव्हां ब्रह्मदेवा, आपणच माझ्या शिराच्या जागी घोड्याचे मस्तक आणून देवांच्या शिल्पकाराकडून ते जोडून घेतलेत, आणि मला अशा तऱ्हेने हयग्रीव नाही कां बनवलेत? म्हणून मी आदिशक्तीला मानतो. तिच्यापेक्षां दुसरी बलशाली शक्ती जगांत नाही असं मी सांगू शकत नाही."

व्यासमुनींना अशाप्रकारें समजावून नारद पुढें म्हणाले, "म्हणून आपण जर या शक्तीची आराधना केलीत तर आपली इच्छा पुरी होईल."

नारदांच्या सांगण्यावरुन व्यासांनी या लोकमातेच्य कृपेसाठी तपश्चर्या केली.

यावर मुनींनी सूताला विचारले, "विष्णूचे शीर कसें कापले गेले व त्याच्याजागी घोड्याचे डोके कसे चिकटवले ते सर्व सांगा." सूताने सांगण्यास सुरवात केली व म्हणाल, "मुनींनो, ऐका."

### हयग्रीवावतार

प्राचीन कालीं विष्णूचे राक्षसांबरोबर दहा हजार वर्षे युद्ध चालले होते. अखेरीस थकून जाऊन विष्णूने धनुष्याच्या दोरीवर जरा हनुवटी टेकली आणि त्याला झोंप लागली. त्याचवेळीं देवांनी यज्ञ करायला विचार केला व ते विष्णूच्या शोध घेत तिथें आले. बिष्णूला झोंपलेले पाहून आता काय करावे असा त्यांना प्रश्न पडला. शिवजी ब्रह्मदेवाला म्हणाले, "आपण एका किडयाला उत्पन्न करावे. त्याच्याकडून विष्णूच्या धनुष्याची दोरी तोडावी. प्रत्यंचा कापली गेली की धनुष्याची एक बाजू वर जाईल व विष्णू जागे होतील."

त्यानुसार ब्रह्मदेवाने एक किडा उत्पन्न करुन धनुष्याची दोरी तोडण्यास त्या किडयास सांगितले. तेव्हां किडा म्हणाला, "हे काम मी कसे करुं? हे मोठे पाप आहे ना? माता आणि तिची मुलें यांना वेगळे करणें, पतीपत्नींमधें विरह निर्माण करणें, किंवा दुसऱ्याची झोपमोड करणें म्हणजे ब्रह्महत्येच्या पापासारखे महान पाप आहे! हे पाप करायला आपण मला सांगता आहात?"

ब्रह्मदेवाने किडयास समजावले, "तूं चिंता करुं नकोस. यज्ञामधे अग्निला आहुती म्हणून न दिले जाणारे सारे पदार्थ मी तुला देईन."



हे ऐकल्यावर किड्याने प्रसन्न होऊन धनुष्याची दोरी कुरतडून तोडली. त्याबरोबर इतका मोठा आवाज झाला की भूमी थरथर कांपू लागली. धनुष्याची एक बाजू ताडकन वर झाली, व विष्णूचे मस्तक कापले जाऊन हवेंत उडाले. हे पाहून सर्व देव घाबरून गेले. आता काय करावे हे त्यांना समजेना. त्यांचा शोक अनावर झाला. "भगवान, आपण तर सर्वेश्वर असून सर्वांचे पालन करणारे आहात. आपली ही अवस्था कशी झाली? राक्षसांनादेखील जे काम जमले नाही ते कुणी केले? आपण तर मायेपासून अलिप्त आहात. हे काम माया करणे हे संभव आहे कां?"

त्यावर देवगुरु बृहस्पती त्यांना समजावत म्हणाले, "असे रडत बसून काय उपयोग? जे झाले ते झाले. त्यावर कांहीतरी उपाय शोधला पाहिजे."

तेव्हां इंद्र म्हणाला, "सर्व देवांच्या देखत बघता बघता विष्णूचे मस्तक तुटून उडाले. अशा परिस्थितींत प्रयत्न करुन तरी काय उपयोग? पण भगवंताच्या कृपेनेच कांहीतरी उपाय सुचेल."

हे ऐकून ब्रह्मदेवाने सर्व देवांना सांगितले, "सर्व कार्यासाठीं जगदीश्वरीचा अनुग्रह हवा. तीच सृष्टी उत्पन्न करणारी, सांभाळणारी व लयास नेणारी आहे. म्हणून सर्वांनी आदिशक्तीची प्रार्थना करावी."

त्याप्रमाणें सर्वांनी देवीची प्रार्थना केली व खरोखरच देवीने प्रकट होऊन कृपा केली.

देवीचे दर्शन झाल्यावर देव तिला म्हणाले, "माते, विष्णू भगवानांची अशी अवस्था कां झाली? त्यांचे मस्तक कां कापले गेले?"

देवीने त्यांना सांगितले, "कारणाशिवाय कोणतीही घटना घडत नाही. एके दिवशी शयनगृहांत असताना विष्णू लक्ष्मीला हंसले. तिचा चेहरा पाहून ते कां हंसले? तिला काळजी वाटूं लागली व ती बावरली. ती स्वतः कांही कुरुप होती थोडीच? की दुसऱ्या एखाद्या सुंदर स्त्रीवर ते मोहित



झाले होते, म्हणून ते हंसले असावेत? लक्ष्मीच्या मनांत असा विचार आला की सवतीचे भांडण होण्यापेक्षां पतीचा मृत्यू श्रेयस्कर! रागाच्या भरांत तिने विष्णूला शाप दिला की तिच्या पतीचे शिर तुटून जाऊन समुद्रांत पडेल. तिच्या त्या शापामुळें विष्णूची ही गत झाली होती. त्याचबरोबर हयग्रीव नांवाच्या राक्षसाने माझी कृपा व्हावी म्हणून एक हजार वर्षे तपश्चर्या केली होती. मी त्याला दर्शन देऊन वर मागण्यास सांगितले. तेव्हां त्याने मागणी केली की त्याला कुणाच्याही हातून मृत्यू येऊं नये. मी त्याला स्पष्ट सांगितलं की जो प्राणी जन्माला येतो त्याला मरण हे अटळ आहे. म्हणून मी त्याला दुसरा वर मागायला सांगितले. तेव्हां त्याने, "मी हयग्रीव आहे म्हणून मला हयग्रीवाच्याकडूनच मृत्यू यावा" अशी मागणी केली. मी त्याला हा वर दिला. पण तेव्हांपासून तो जुलमी झाला आणि लोकांना त्रास देऊं लागला. त्याला मारण्याची शक्ती तिन्ही लोकांपैकी कुणासही नाही. त्यासाठी तुम्ही एखाद्या घोड्याचे मस्तक कापून आणा व विष्णूच्या धडावर

चिकटवून हयग्रीवाला निर्माण करा. असे झाले की विष्णू हयग्रीव त्या राक्षस हयग्रीवाला ठार मारेल.''

सर्वांना हे सांगून देवी अदृश्य झाली. सर्व देवांनी मिळून त्यांच्या शिल्पकारास बोलावले. एका घोड्याचे मस्तक कापून आणून विष्णूच्या मस्तकाच्या जागी त्याच्या धडावर चिकटवण्यास सांगितले. देवांच्या शिल्पकाराने तसे केले. व हयग्रीव झालेल्या विष्णूने हयग्रीव राक्षसाचा वध केला. सर्वत्र आनंदी आनंद झाला.

त्यानंतर मुनींनी सूताला मधु व कैटभाचा नाश कसा झाला ती कथा सांगण्याची विनंती केली, तेव्हां सूताने तो वृत्तान्त सांगण्यास सुरवात केली. सूत म्हणाला, ''क्षीरसागरांत विष्णू शेषावर झोपले असताना त्यांच्या कानांतून दोन राक्षस निर्माण झाले. आपला जन्म पाण्यांत झाला आहे हे पाहून ते आश्चर्यचकित झाले. कैटभाने मधुला सांगितले की हा महासागरच आपल्याला आधार देणारा होईल.''

त्याच्या तोंडून हे शब्द निघताच आकाशवाणी ऐकू आली. मधु व कैटभ त्या वाणीचा जप करुं लागले. तेव्हां असे वाटले की आकाशांत वीज चमकून कडाडत आहे. राक्षसांना ती वीज पाहून वाटले की ते आदिशक्तीचेच तेज आहे. त्यावेळेस जो ध्वनी त्यांचा कानीं पडला तोच मंत्र समजून त्यांनी एक हजार वर्षेंपर्यंत पर्वतावर जाऊन तप केले. त्या तपस्येवर प्रसन्न होऊन देवीने त्यांना वर मागण्यास सांगितले. तेव्हां त्या राक्षसांनी ''आम्हाला स्वेच्छामरण मिळावे'' असा वर मागितला. देवीने त्यांना हा वर दिला.

त्यानंतर ते दोघेजण समुद्रांत विहार करीत राहिले. कांही काळानंतर एकदा त्यांना ब्रह्मदेव दिसला. त्यांनी ब्रह्मदेवास युद्धाचे आव्हान दिले व म्हटले, ''आमच्याशी युद्ध करायला या, नाहीतर पद्मासन सोडून कुठेतरी पळून जा.''

हे ऐकून ब्रह्मदेव अस्वस्थ झाले. योगसमाधींत स्थित असलेल्या विष्णूची त्यांनी प्रार्थना केली. ते म्हणाले, ''महात्मन, उठा नि जागे व्हा. हे दोन राक्षस माझा वध करण्याची इच्छा करीत आहेत तरी आपण माझे रक्षण करावे.''

विष्णू कांही योगनिद्रेतून जागे झाले नाहीत. तेव्हां ब्रह्मदेवाने आदिशक्तीची प्रार्थना केली. त्यांनी तिला विनवले, ''हे जगन्माते, या दोन राक्षसांचा वध करण्यासाठी आपण विष्णूला उठवावे किंवा आपण माझे रक्षण करावे.'' पण काय झालं, नेमकी त्याच वेळेला योगनिद्रा विष्णूला सोडून निघून गेली. विष्णू जागे झालेले पाहून ब्रह्मदेवास परमानंद झाला.





वेताळ कथा

# संगीत पुष्प

दृढनिश्चयी विक्रमार्क परत झाडाजवळ गेला. झाडावरून प्रेत उतरवून खांद्यावर टाकले आणि निःशब्द स्मशानाकडे जाऊं लागला. तेव्हां प्रेतातील वेताळ म्हणाला, ''राजा, सामान्यतः राजांना विलासी जीवनाची संवय होते. आपल्या शासनकाळात ते शक्य होईल तेवढा सुखोपभोग घेतात. आपली ऐहिक सुखे मनास येईल तशा तऱ्हेने पुरवून घेतात. तू पण एक राजाच आहेस. पण या सगळ्या गोष्टींपासून दूर राहून एवढे कष्ट करतोस. वेगवेगळ्या हाल अपेष्टा भोगतोस. यामागे कांहीतरी सबळ कारण असलं पाहिजे. कुठल्यातरी महाराजाने, चक्रवर्तीने तुझ्यावर कांही जबाबदारी सोपविली असेल. मला वाटतं त्यांच्या आज्ञेचे पालन करुन



कोणचेतरी ध्येय गांठायच्या मागे आहेस म्हणून या मिट्ट काळोखांत आपल्या जीवाचीदेखील पर्वा न करता आज्ञापालनात मग्न झाला आहेस. हे पण विसरुन गेला आहेस की इथे भूतप्रेते, विषारीसाप आणि भयानक जनावरें असतात. तू तुझ्या या कामांत सफल किंवा असफल देखील होशील. यामुळे वर्तमानात तू परिस्थितीचा गुलाम होशील व भविष्यातील राजवैभवाला देखील पारखा होशील. साधुसंन्यांसीच अशातऱ्हेचे नीरस आयुष्य जगूं शकतील. सुखोपभोगाच्या इच्छेपासून मुक्त होणारे राजे विरळेच. राजा असून तू एक तुला अयोग्य, असे काम करत आहेस. अजूनही वेळ गेली नाही. मागे फिर, आणि राजसुखाचा उपभोग घे. तुला सावध करण्यासाठी एका गंधर्व नांवाच्या गायकाची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक आणि आपले कर्तव्य जाणून घे.'' आणि वेताळ गोष्ट सांगू लागला.

चंदनपूर नांवाच्या गांवात कुबेर व सुचेल हे दोन श्रीमंत गृहस्थ राहात होते. दोघांची मोठाली घरे होती. घराच्या पुढे व मागे मोठाली अंगणे होती. शंभर शंभर एकर शेती होती. ह्या सगळ्यापेक्षा जास्त असा चांगुलपणा त्यांच्यात होता. पण त्यांच्या वागणुकीत खूप फरक होता.

कुबेराला पैसा मिळविण्याचे अतिशय वेड होते. सुचेलला कलेचे वेड होते. जो कोणी कलाकार गांवात येईल त्याला तो घरी बोलवून त्याचे मनःपूर्वक स्वागत करत असे. त्याला किमती भेटी देत असे. त्यांच्या सर्व सुखसोईंची व्यवस्था करत असे. कुबेर हे सगळं कांही करत नसे. पण मागितल्यावर कांहीनाकांही भेट देत असे.

गंधर्व नांवाच्या गायकाला ते गांव आवडले. कारण त्याला नुकतंच कळलं होते की त्याचे पूर्वज याच गांवात राहात होते. आणि नंतर दुसऱ्या गांवी जाऊन राहिले होते.

गंधर्वाचे खरे नांव काय आहे हे कोणालाही माहित नव्हते. फार पूर्वी एका राजाने त्याचे गाणे ऐकून त्याला हे नांव बहाल केले होते. त्याने अनेक गांवांतून गाणे गाऊन अपार धन व कीर्ती मिळविली होती. आपल्या पूर्वजांच्या गांवी जावे अशी त्याला फार इच्छा झाली. आणि आपले गाणे पण तिथल्या लोकांना ऐकवावे असे त्याला वाटले.

पण त्याच्यापुढे एक समस्या उभी राहिली. खूप दिवसांपासून त्याला सुखासीन जीवनाची सवय झाली होती. विलासी जीवन जगणे त्याला आवडत होते. तो रोज त्याच्यासाठी बनवलेल्या तळयांत गुलाबपाण्याने स्नान करीत असे. वेगवेगळया गांवाहून आलेले चार आचारी त्याच्यासाठी स्वादिष्ट



भोजन तयार करत असत. ते चौघे आपसांत चर्चा करून रोज नवीन पक्वान्न बनवीत असत.

आपले मन आनंदित राहाण्यासाठी तो रोज न चुकता नर्तकीचे नृत्य बघत असे. त्याला उन्हाळा सहन होत नसे म्हणून एका वास्तुशास्त्रज्ञाने त्याच्यासाठी हवा गार ठेवण्याचे एक यंत्र बनविले. त्या यंत्राशिवाय तो झोपूंच शकत नसे. त्या यंत्रातून येणाऱ्या वाऱ्यांत सुगंध मिसळलेला असायचा.

गंधर्व ही व्यवस्था करूं शकणाऱ्या भाग्यवान लोकांकडे त्यांनी बोलविल्यावर गायला जात असे. जे लोक त्याच्या या सर्व गरजा पुऱ्या करू शकत, ते लोक त्याच्या बरोबरच असायचे हे उघड होते. पण आता त्याला चंदनपूरला जायचे असल्यामुळे त्याने आपल्या पुलिंद नांवाच्या शिष्याला माहिती काढायला पाठवले की चंदनपुरात असा कोणी धनवान आहे कां, की जो त्याला आश्रय देईल व त्याच्या सर्व गरजा पूर्ण करेल.

पुलिंद चंदनपूरला आला. त्याने कुबेर व सुचेल बद्दल माहिती मिळविली. प्रथम तो कुबेराच्या घरी गेला. पुलिंदने केलेले सर्व वर्णन ऐकून तो म्हणाला, ''गंधर्वाने सांगितलेल्या सर्व सुखसोई माझ्याकडे आहेत. गंधर्वाला आश्रय देण्यासही मला कांही अडचण नाही. पण ना मला गाण्याची आवड आहे, ना कुठल्या कलेची. म्हणून मी त्यांच्याबरोबर वेळ घालवूं शकत नाही. की त्यांच्या बरोबर दररोज कार्यक्रमांना येऊं शकत नाही. आमच्या वाटा वेगळ्या आहेत, कारण आमच्या आवडीनिवडी सारख्या नाहीत. तुमची अशी इच्छा असली की मी कायम तुमच्या बरोबर राहूं, तुमच्या गाण्याचा



आनंद लुटूं, तर मला ते शक्य नाही. आपण सुचेलला भेटला तर बरे होईल''.

पुलिंद सुचेलला पण भेटला. त्याला सर्व माहिती सांगितली. सुचेल खूष होऊन म्हणाला'' गंधर्वासारखा प्रसिद्ध गायक इथे येत आहे? माझे व या गांवाचे भाग्यच म्हणायचे. नाहीतर काय? मी त्यांच्यासाठी एक तळें बांधीन. सर्वोत्तम आचारी, नर्तकी यांची सोय करतो. ते जोपर्यन्त इथे असतील तोपर्यन्त मी त्यांच्या बरोबर राहीन''.

पुलिंदला सुचेलचे हे बोलणे ऐकून आनंद झाला. परत येऊन त्याने गंधर्वाला सगळी खबर सांगितली. गंधर्व पण खूष झाला. व त्याने सुचेलला निरोप धाडला की एक महिन्याच्या आंत तो चंदनपूरला येत आहे.

गंधर्व जेव्हां चंदनपूरला जाण्याची तयारी करत होता तेव्हां अचानक राजाचे बोलावणे आले.



राजमाता आजारी होत्या व दोन दिवस त्या बेशुद्ध होत्या. पण शुद्धीवर येताच त्यांनी गंधर्वाचे गाणे ऐकण्याची इच्छा प्रगट केली.

आता गंधर्वाने चंदनपूरला जाण्याचे रहित करुन त्याने राजभवनात जाऊन राजमातेला आपले गाणे ऐकविले. ती रोमांचित होऊन म्हणाली, "कुठल्याच औषधाने मला इतके बरे वाटले नाही. एक महिनाभर रोज असेच तुझे गाणे मला ऐकव". गंधर्व राजमातेची आज्ञा कशी मोडणार? त्याने सुचेलला निरोप पाठविला की तो एक महिन्यानंतरच चंदनपूरला येऊं शकेल.

एका आठवड्यानंतर राजवैद्य गंधर्वाला म्हणाला, "तुमचे गाणे अद्वितीय आहे. बऱ्याच दिवसांपासून राजमाता मोठ्या विचित्र रोगाने आजारी आहेत, त्याचा आम्ही शोध लावूं शकलो नाही. मी त्याचे निदान देखील करुं शकलो नाही. एक महिनाभर तुम्ही त्यांना तुमचे गाणे ऐकवा. नंतर मी तुम्हाला एक बी देईन. ती घेऊन तुम्ही दोन सैनिकांबरोबर जंगलात जा. ते दोघे तुमच्या साऱ्या गरजा भागवतील. गाणे म्हणत ही बी एकाजागी लावा. गाणे म्हणत म्हणत याला रोज थोडे थोडे पाणी घाला. मग झाड उगवेल. सहा महिन्यांनी त्या झाडाला फुलें येतील. त्यातले पहिले फूल तोडून मला द्या. त्या फुलांपासून बनविलेल्या औषधाने राजमातेचा आजार कायमचा बरा होईल.पण एक अट तुला पाळावी लागेल. जोपर्यन्त तू जंगलात आहेस तोपर्यन्त तुला कन्दमुळे, फळें, दूध व पाणी हेच खाऊन रहावे लागेल. दुसरे कांहीसुद्धा खाता कामानये. वातावरण, आहार व दिनचर्येत कुठेही कृत्रिमता चालणार नाही म्हणून मला नाईलाजाने तुला जंगलात पाठवावे लागत आहे."

गंधर्वाला चांगले माहीत होते की जरी राजवैद्य हे सांगत असला तरी ही राजाज्ञा आहे. त्याला या गोष्टीचा आनंद पण झाला की त्याचे गाणे राजमातेचा जीव वाचविण्यास उपयोगी पडत आहे. त्याने पुलिंदला बोलवून ही खबर सुचेलला सांगायला सांगितली.

पुलिंदने स्वतःजाऊन हा निरोप सुचेलला सांगितला. सर्वव्यवस्था करुन तो मोठ्या उत्सुकतेने गंधर्वाची वाट पहात होता. वास्तुशास्त्राप्रमाणे सुचेलच्या घरी दोन महिन्यापेक्षा अधिक दिवस तळे राहूं शकत नव्हते. म्हणून ही खबर ऐकताच त्याने तावडतोब तळे बुजविले. आचारी, नर्तकीना दुप्पट पैसे देऊन परत पाठविले.

सुचेल पुलिंदला म्हणाला, "माझी सगळी तयारी वांया गेली याचे मला दुःख नाही. मला जर दहा दिवसांची मुदत दिली तर मी सगळी सोय परत करीन, आणि गंधर्वांच्या येण्याची खूप उत्सुकतेने वाट पाहीन".



पुलिंदने गंधर्वांना सुचेलशी झालेले बोलणे सविस्तरपणे सांगितले. ते ऐकून गंधर्व खूष झाले आणि त्यांना आश्चर्यपण वाटले. त्यांनी मनाशी ठरवून टाकले की सुचेलचा पाहूणचार स्वीकारण्यासाठी कां होईना, नंतर त्याला चंदनपूरला जायला पाहिजे. दुसऱ्या दिवशी तो जंगलाकडे निघाला.

गंधर्व सहा महिने जंगलातच राहिला. राजवैद्यांनी सांगितल्याप्रमाणे वागला. पहिले थोडे दिवस त्याला कष्ट झाले, पण थोड्याच दिवसांत जंगलात राहायची त्याच्या शरिराला संवय झाली. त्याला आणखी छान वाटूं लागले. त्याच्या गळ्यांतून रोज एक नवा राग निघूं लागला. आवाजाला एक वेगळेच सौंदर्य प्राप्त झाले. अगोदर त्यांत असा गोडवा नव्हता.

गंधर्व आपल्या संगीताने फुललेले फूल घेऊन राजाकडे गेला. त्या फुलापासून बनविलेल्या औषधाने राजमातेचा आजार बरा झाला. कुणाला कल्पनासुद्धा नव्हती की ती इतक्या चटकन् बरी होईल.

त्याचवेळी शेजारच्या राजाला गंधर्वाच्या औषधी संगीत पुष्पाबद्दल कळले. शेजारच्या राजाने गंधर्वाचे गाणे ऐकण्याची इच्छा प्रगट केली. राजाने गंधर्वाला तावडतोब शेजारच्या राज्यांत जाण्याची आज्ञा केली. जाण्यापूर्वी त्याने पुलिंदला सांगितले की त्याच्या चंदनपूरला जाण्याविषयी सुचेलला काही निरोप पाठवूं नकोस.

गंधर्वाचे गाणे ऐकून शेजारच्या राजाचे मन अगदी तृप्त झाले. असं समाधान त्याला पूर्वी कधी मिळाले नव्हते. गंधर्वाला आपल्या आश्रयाला कायमचे ठेवून घ्यावे असे त्याला वाटत होते. पण त्याला हेही माहित होते की गंधर्वाच्या देशाचा राजा याला कधीही संम्मती देणार नाही. अशा द्विधा मनस्थितीत त्याने राजवैद्यांचा सल्ला मागितला.

वैद्य म्हणाले "महाराज, खूप दिवसांपासून तुमचे मन अस्वस्थ आहे. मनःशांती साठी आपले मन व्याकुळ झाले होते. मलाही असे वाटले की आपल्या अशांत मनाला कांही औषध नाही. पण गंधर्वाच्या गायनाने हे करुन दाखविले. त्याच्या गाण्यांत नक्कीच कांहीतरी वैशिष्ट्य आहे. त्याचे कारण त्याच्या गायनाचे नाविन्य हे देखील असेल. आषण रोज त्याचे गाणे ऐकलेंत तर कदाचित् आपल्याला त्याचा कंटाळा येईल. तोचतोचपणा वाटूं लागेल. आणि पुन्हा आपली मनःशांती हरवेल. वैद्यशास्त्रांत संगीतपुष्पाचा उल्लेख आहे. जसे शेजारच्या राजाने राजमातेसाठी संगीतपुष्प आणविले, तसे आपण देखील कायमस्वरूपाच्या मनःशांतीसाठी संगीतपुष्प आणावे, असा माझा आपल्याला सल्ला आहे".



शेजारच्या राजाच्या विनंतीवरुन गंधर्व पुन्हा जंगलात गेला. पहिल्यांदा त्रास झाला पण नंतर हळूहळू तेच आयुष्य त्याला आवडूं लागले. संगीतपुष्प फुलवून शेजारच्या राजाला ते देऊन तो परत आपल्या देशांत परतला.

थोडयाच दिवसात तो आपल्या विलासी जीवनात पुन्हा रमून गेला. तेव्हा पुलिंदने त्याला चंदनपूरची आठवण केली. दुसऱ्याच क्षणीं गंधर्व म्हणाला, "कुबेरला निरोप पाठव की मी चंदनपूरला येत आहे. मी त्याचा पाहुणा म्हणून राहीन".

वेताळ गोष्ट सांगून म्हणाला, "गंधर्वाचा निर्णय ऐकून असं वाटतं की तो असंतुलीत मनःस्थितीत आहे. खूप दिवसांपासून सुचेल त्याच्या येण्याची वाट बघत आहे. अशा उत्सुक व चांगल्या यजमानाला सोडून, विसरुन जाऊन, कुबेराकडे पाहुणचाराचा निर्णय विसंगत नाही वाटत? त्याची बुद्धि भ्रष्ट झाली आहे आणि तो वेडयासारखे वागत आहे. जंगलात त्याने वैराग्यजीवन पत्करले आणि शहरांत आल्यावर परत विलासांत आयुष्य घालवूं लागला. यामुळें गंधर्वाला असं तर वाटत नाही नां? की मी कशाही तऱ्हेचं आयुष्य जगूं शकतो? कुठल्याही तऱ्हेचा बदल मी आपल्या अंगवळणी पाडूं शकतो? माझ्या प्रश्नांची उत्तरें माहित असूनही तू मौन धरलेंस तर तुझ्या डोक्याची अनेक शकले होतील".

विक्रमार्क म्हणाला "दुसऱ्या कुणाच्या दबावाखाली न येता स्वेच्छेने मनुष्य जो बदल इच्छितो, तो त्याला उल्हसित करतो हे शंभरटक्के सत्य आहे. परन्तु गंधर्वाचा निर्णय संगीतपुष्पासाठी होता. त्यामुळेंच त्याला दोन वेळा चंदनपूरला जाण्याचे रद्द करावे लागले. आणि अशी कांही खात्री नव्हती की तिसऱ्यावेळेस जाणे रद्द होणार नाही. गंधर्वाला हे माहित होते की आपल्या प्रवासांत अनिश्चितता आहे. म्हणून त्याने सुचेलला त्रास दिला नाही. तो त्याला खूप आवडूं लागला होता. त्याला माहित होते की त्याच्या येण्याची खबर मिळताच सुचेल मोठया प्रमाणावर सर्व व्यवस्था करेल आणि तो न गेल्यास सुचेलचे मोठे नुकसान होईल. म्हणून त्याने कुबेराचा पाहुणा बनायचे ठरविले. कारण कुबेराला त्याच्या येण्यांत कांही फार आनंद नव्हता. बस, एवढेच कारण आहे. त्याची मनस्थिति असंतुलित नाही, की त्याची बुद्धी भ्रष्टही झालेली नाही."

राजाच्या अशा मौनभंगामुळे वेताळ प्रेतासह अदृश्य होऊन परत झाडावर जाऊन बसला.

**(आधार-'वसुन्धरेतील' एक गोष्ट)**

**भारतीय उत्सव**

# राजाच्या पुनरागमनाचा जल्लोष

देवांच्या भूमींतला हा उत्सवाचा महिना आहे. केरळमधें आता ओणम साजरा होतो. ओणम म्हटलं की घराघरांच्या अंगणात काढलेल्या, अनेकरंगी फुलांच्या सुरेख रांगोळ्या डोळ्यांसमोर येतात. नद्यांच्या रुंद, संथ प्रवाहांतली चित्तथरारक नावांची शर्यत मनांत तरळते. पावसाळा संपत आलेला असतो. वसुंधरा हिरवीगार व टवटवीत दिसत असते.

*हजार वर्षांपूर्वीपासून केरळमधें ओणम हा सण साजरा होतो. एका ताम्रपट्टीवर इ.स. ८६१ या सालीं ओणम साजरा केल्याची नोंद आहे.*

केरळचे दोन प्रमुख उत्सव. पहिला ओणम आणि दुसरा एप्रिलमधें येणारा विशु! सूर्य जेव्हां मेष राशींत संक्रमण करतो तेव्हां विशु असतो. शेतींची कामें संपलेली असतात, धान्याची कोठारें भरलेली असतात, मन उल्हसित असते आणि निवांत मनाने उत्सव साजरा करण्यासाठी लोकांना सवड असते आणि उत्साह असतो.

ओणम हा सण चिंगोम महिन्यांत (ऑगस्ट-सप्टेंबरमधें) साजरा करतात. केरळच्या नव्या वर्षाचा हा पहिला महिना असतो. उत्तर हिंदुस्तानी पद्धतीनुसार जेव्हां श्रावण किंवा भाद्रपदांत श्रवण नक्षत्र येते, त्यावेळेस ओणमचा सण येतो. हा उत्सव सर्व घरांतून किमान आठवडाभर तरी साजरा केला जातो. इथें जातीजमातींचा भेदाभेद होत नाही. कांही जातींत हा हस्त नक्षत्रापासून श्रवणपर्यंत दहा दिवस साजरा करतात.



# भारताची ओळख

## प्रश्नावली

भारताचे दुसरे राष्ट्रपती कै.डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन हे जगविख्यात तत्वज्ञ व विचारवंत होते. ५ सप्टेंबरला त्यांचा जन्मदिन. हा दिवस शिक्षक दिन म्हणून देशभर पाळला जातो. या महिन्याची प्रश्नावली शिक्षणावर आधारलेली आहे.

१. प्राचीन भारतांतले कोणते नगर शैक्षणिक केंद्र म्हणून प्रसिद्ध होते?
२. विश्वभारती विद्यापीठ कुणी सुरुं केले? आणि केव्हां?
३. संगीत व नृत्यकला शिकवणारे चेन्नईतले सुप्रसिद्ध केंद्र कोणते?
४. लोकसभेने नवे शैक्षणिक धोरण केव्हां संमत केले?
५. भारतांत प्रगत अध्ययन संस्था (इंडियन इन्स्टीट्यूट ऑफ ॲडव्हान्स्ड स्टडीज) ही कुठे आहे?
६. बनारस हिंदू विद्यापीठाची स्थापना कुणी केली?
७. भारताचे भूतपूर्व राष्ट्रपती डॉ. झाकीर हुसेन यांचे नांव कोणत्या विद्यापीठाशी जोडले जाते?
८. महात्मा गांधींनी एक आधुनिक शिक्षणपद्धती सुरुं केली होती. त्याचे नांव काय?
९. पं.नेहरूंच्या मंत्रीमंडळात पहिले शिक्षणमंत्री कोण होते?
१०. कलकत्ता, मद्रास व मुंबई, ही तिन्ही विद्यापीठे एकाच वर्षी सुरुं झाली. ते साल कोणते?
११. इंग्लिश माध्यमांतून शिक्षण केव्हां सुरुं झाले?
१२. भारतांतले एक नामवंत शिक्षण तज्ञ युनेस्कोचे डेप्युटी डायरेक्टर जनरल होते. त्यांचे नांव काय?
१३. कौरव व पांडव, या राजपुत्रांना धनुर्विद्येचे शिक्षण कुणी दिले?
१४. केरळ राज्यांतली लोकप्रिय नृत्यशैली शिकवणारी संस्था कोणती आहे?
१५. एका प्राचीन विद्यापीठाशी एक रुग्णालय संलग्न होते. त्याचे नांव तुम्हाला ठाऊक आहे कां?

(उत्तरें पुढील अंकी)

### ऑगस्ट प्रश्नावलीची उत्तरें

१. तिरारे देशी घोडदळ
२. ओ.ओ.ह्यूम हे इंग्लिश गृहस्थ
३. W.C. बानर्जी, मुंबई १८८५
४. लाला हरदयाळ
५. ५ फेब्रुवारी, गोरखपूर जिल्ह्यांत
६. १३ एप्रिल १९१९
७. लोकमान्य बाळ गंगाधर टिळक
८. १९१५
९. जतीन मुखर्जी
१०. सर तेजबहादुर सप्रू आणि बॅ.मु.रा. जयकर
११. भजनसिंग
१२. सिंगापूर १९४३मधें





# कृष्णभूपति

फार वर्षांपूर्वी मंदाकिनी नदीच्या कांठी मलयद्वीप नांवाचा एक देश होता.

गोपालभूपति हा त्या देशाचा राज्यकर्ता होता, आणि कृष्णभूपति हा त्याचा दत्तकपुत्र होता. जेव्हां तो दहा वर्षांचा होता तेव्हां त्याच्या वडिलांचा मृत्यू झाला.

तो राज्याचा एकमेव उत्तराधिकारी होता. परंतु परमेश्वराच्या इच्छेपुढें कुणाचा पाड लागणार? एक दिवस घोडदौड करताना, घोड्यावरुन खाली पडल्यामुळें कृष्णच्या डोक्याला खोल जखम झाली. वैद्यांचे अनेक उपचार व प्रयत्न झाले, पण कृष्णचा त्यांतच अंत झाला.

राणी सुनंदादेवी अतिशय दुःखी झाली होती. पण राजमातेचे कर्तव्य पार पाडणें तर आवश्यक होतेच. तिने आपल्या एका शिपायाचा मुलगा दत्तक घेऊन त्याचे नांवही कृष्णभूपतीच ठेवले. हा मुलगा लहान वयाचा होता म्हणून त्याला राजकारणांतल्या डावपेंचांचे अजिबात ज्ञान नव्हते.

राज्यकारभार सुरळीत चालवण्याचे सामर्थ्य त्याच्यांत नव्हते. राजमाता सुनंदादेवीला राज्याची सर्व जबाबदारी सांभाळावी लागली. अशा अडचणीच्या वेळीं चंदनवर्माने उत्तम सहकार्य केल्यामुळें राजमातेच्या सर्व अडचणी दूर झाल्या.

चंदनवर्मा हा सुनंदादेवीचा सख्खा थोरला भाऊ होता. तो कुशद्वीपचा राजा होता. बहिणीचा पती निवर्तल्याची बातमी कळताच तो तावडतोब मलयद्वीपला गेला. बहिणीचे फक्त सांत्वन करुन तो स्वस्थ बसला नाही. अशा कठीण परिस्थितींत



तो तिला एकटी सोडून कसा जाणार? तो त्याच्या राज्यांत परत गेल्यानंतर मलयद्वीपची काय अवस्था झाली असती ते त्याला पूर्णपणें ठाऊक होते. म्हणून त्याने आपले कर्तव्य पार पाडण्याचे ठरवले. तो कुशद्वीपला परत गेला आणि राजपरिवारांतल्या एका विश्वासू व्यक्तीवर, मूल्यवंतावर त्याने तिथला राज्यकारभार सोंपवला. नंतर आपली पत्नी व मुलगी यांना बरोबर घेऊन तो मलयद्वीपला परत आला.

एका शुभ मुहूर्तावर चंदनवर्माने आपला भाचा कृष्णभूपति याला राज्याभिषेक केला आणि त्याच्या नांवाने तो स्वतः राज्याची जबाबदारी सांभाळू लागला. कृष्णभूपतीचा तो गुरू बनला आणि राज्यनीतिशी संबंधित अशा सर्व विषयांची माहिती त्याने कृष्णभूपतीला शिकवली.

युद्धकलेत प्रवीण असलेल्यांकडून त्याला शस्त्र-अस्त्र-विद्या शिकवल्या. कृष्णभूपति बुद्धिमान होता, त्यामुळें चारपांच वर्षांतच त्याने सर्व विद्येंत प्रभुत्व मिळवले. त्याला निरनिराळ्या कलांची आवड होती. तो स्वतः कविता करीत असे.

आपला भाचा उत्तम प्रकारें राज्याची व्यवस्था पाहू शकतो आहे अशी जेव्हां चंद्रवर्माला खात्री वाटली, तेव्हां त्याने भाच्यावर सारा राज्यकारभार सोंपवला व तो स्वदेशी जाण्यास निघाला.

कुशद्वीपला परतल्यानंतर त्याला अनेक अडचणींना तोंड द्यावे लागले. त्याच्या गैरहजेरींत मूल्यवंत सुखोपभोगांत गुंग झाला व त्यामुळें राज्यव्यवस्था ढासळून गेली होती. त्याने राज्य बळकावले होते व राज्याच्या लोभामुळें चंदनवर्मा तिथें पोंचल्याबरोबर त्याला कैद केले गेले. या विश्वासघातकी कृत्यामुळें चंदनवर्माला जोराचा मानसिक धक्का बसला व तो तिथल्या तिथेंच मरण पावला. त्याची पत्नी व मुलगी एका विश्वासू सेवकाच्या मदतीने कशीबशी मलयद्वीपला पोहोचली.

आपल्या मोठ्या भावाची ही दयनीय अवस्था पाहून सुनंदादेवीला फारच वाईट वाटले. आज कृष्णभूपति इतका कर्तबगार राज्याधिकारी झाला आहे तो केवळ आपल्या भावामुळेच, हे ती विसरली नाही. अत्यंत कठीण समयीं जर चंदनवर्मा तिच्या मदतीला आला नसता तर राज्याची परिस्थिति बिकट झाली असती हे ती पूर्णपणे जाणून होती. तिने आपल्या वहिनीचे व भाचीचे अतिशय आपुलकीने स्वागत केले व त्यांची जबाबदारी स्वतःवर घेतली.

राजमाता सुनंदादेवीने एक दिवस आपल्या मुलाला अंतःपुरांत बोलावून म्हटले, "कृष्ण, मी आजपर्यंत स्वतःसाठी कोणापाशी कधीही कांही मागितलेले नाही. खरं सांगायचं तर माझी तशी इच्छादेखील नाही. पण आज मी तुझ्याजवळ दोन गोष्टी मागण्याची इच्छा करते आहे. मागूं कां?"

कृष्णभूपतीने हंसून म्हटले, "आपली मागणी पुरी करणें हे माझे कर्तव्य आहे. कोणता पुत्र आपल्या आईची मागणी कधी नाकारील कां? जर आपल्याला तशी शंका आली असती, तर आपण मला बोलावलेच नसते. निःसंकोचपणें आपली इच्छा सांगावी."

"कृष्णा, मी कांही बोलायच्या आधीच तू हंसलास. ह्याचा अर्थ मी काय मागणार आहे ते तुला माहीत असावेसे वाटते." सुनंदादेवी म्हणाली.

"हे अगदी खरं की आपण काय मागणार त्याचा मला थोडाफार अंदाज आहे." कृष्णाने सांगितलं. "आता आपली इच्छा सांगा." "तर मग ऐक. माझी पहिली मागणी आहे की तू त्या मूल्यवंताला ठार करावेस. कारण ज्याने तुझ्या मामाचा विश्वासघात केला आहे, त्याचे फळ त्याला मिळालेच पाहिजे. हे काम जितके लवकर करता येईल तेवढे लवकर करावे. या प्रयत्नांत जरी तुला वीरगती प्राप्त झाली, तरी मला तुझा अभिमानच वाटेल.

"आता उरली माझी दुसरी इच्छा! मला वाटतं की माझी भाची जोत्स्नादेवी ही तुझी पत्नी व्हावी. तुझ्या मामांची फार इच्छा होती की त्यांची ही दत्तक घेतलेली मुलगी तुझी धर्मपत्नी व्हावी!" असे बोलून सुनंदादेवीने आपले अश्रू पुसले.

कृष्णभूपतीने नम्रपणें म्हटले, "माते, इतक्या लहान गोष्टीसाठीं इतके उदार होण्याचे कारण



नाही. आपल्या इच्छेनुसार जोत्स्ना या राज्याची राणी होईल. तसेच आपली पहिली इच्छा म्हणजे मूल्यवंताला शासन करणें! तो तर माझ्या हातचा खेळ आहे. या बाबतींत मी सेनापती व महामंत्री ह्यांच्याशी सल्लामसलत केलेली आहे.

फक्त कुशद्वीपच नव्हे तर आपल्या आणि त्या बेटामधें असलेली आमर व कल्वार ही बेटे आहेत, त्यांनाही आपण जिंकू शकूं. त्यांच्या किल्ल्यांवर देखील आपला ध्वज झळकेल. या तिन्ही बेटांचे राजे चैनींत दंग आहेत. प्रजेकडे त्यांचे संपूर्ण दुर्लक्ष झाले आहे त्यामुळें प्रजाजन राजांच्या विरोधांत आहेत. बहुधा, येत्या बहुलापंचमीलाच आम्ही त्यांच्यावर चाल करुन जाऊं."

मुलाचे बोलणें ऐकून राजमाता फारच खूष झाली, व मुलाला आशिर्वाद देत म्हणाली, "बाळ,



"तुझा विजय होवो, तूं विजयी होऊन परत ये!"

कृष्णभूपतीने म्हटल्याप्रमाणें, बहुलापंचमीस पहाटेस मलयद्वीपची अगणित सेना घेऊन तो विजय यात्रेसाठीं निघाला या सुसज्ज सैन्यापुढें आमर व कल्यारची सेना टिकूं शकली नाहीं व त्यांचा संपूर्ण पराभव झाला. ते दोन्ही राजे कृष्णभूपतीस शरण आले. अशा प्रकारें कृष्णभूपतीची विजयी सेना कुशद्वीपाकडे निघाली.

संबंध दिवस प्रवास करुन रात्रीं एका छोट्या जंगलात ही सेना पोंचली. राजाज्ञेनुसार त्यांनी तिथें तंबू ठोकले. थकलेला कृष्णभूपती आपल्या तंबू मधल्या शय्येवर पहुडला.

कांही वेळानंतर बाहेर चाललेली गडबड ऐकून कृष्णभूपती जागा झाला. तो चटकन उठून बसला आणि त्याने पहारेकऱ्याला विचारलं, "कसला गोंधळ चाललाय बाहेर?"

बाहेर उभे असलेले दोन पहारेकरी तडक आंत येऊन म्हणाले, "सरकार, कुणी तरुण मुलगा आला आहे. अजून त्याला मिसरुडदेखील फुटलेली नाही आणि सैन्यांत भरती करा म्हणून हट्ट धरुन बसलाय. आपल्या सेनापतीला तर संशय आहे की हा कुणी शत्रूचा गुप्तहेर असावा. म्हणून त्यांनी त्याला पुढें येण्यास रोखले आहे."

कृष्णभूपतीने तंबूच्याबाहेर येऊन पाहिले. सैनिकांच्या समोर उभा असलेला मुलगा खरोखरीच लहान वयाचा दिसत होता. सैनिकांजवळच्या मशालींच्या उजेडांत त्या मुलाचा चेहरा तेजस्वी व विलक्षण मोहक दिसत होता. सैनिकांनी त्याला बहुधा त्रास दिला असावा म्हणून त्याचे डोळे भिरभिरत सर्वांना न्याहाळत होते.

तो इकडेतिकडे निर्भयपणें पाहात असताना त्याचा निग्रहीपणा व धीट स्वभाव लक्षांत येत होता. कृष्णभूपतीने नखशिखान्त त्याच्याकडे पाहिले व त्याला आपल्या तंबूत बोलाविले.

त्या मुलाने आंत येऊन भूपतीला नम्रपणें नमस्कार केला व म्हटले, "सरकार, मी आपला आभारी आहे. आपले दर्शन इतक्या लवकर मला होईल अशी मला मुळीच आशा नव्हती."

त्याचा मधुर आवाज ऐकून भूपतीने विचारले, "कोण आहेस तूं? कोणत्या देशांतला आहेस? आणि माझ्या सैन्यांत तुला भरती होण्याची इच्छा कां झाली?"

"सरकार, माझे नांव कलापूर्ण आहे. मी कोणत्याही देशाचा जरी असलो तरी आत्ता मी अनाथ आहे. मला आता कुणीही नाही. आपण अधर्माविरुद्ध लढण्यासाठीं मोहिमेवर निघाला





आहात. मीदेखील त्यांत भाग घेऊन आपले कर्तव्य पार पाडण्याची इच्छा करतो आहे. रामायणांत सेतुबंधनाच्यावेळीं रामाला मदत करणारी छोटीशी खार होती ना, तसा मी आहे." त्याने विनयाने सांगितले.

"तुला काय वाटलं की तुझ्या या बोलण्यावर विश्वास ठेवून मी तुला माझ्या सैन्यांत भरती करूं? तू युद्धविद्येंत किती निपुण आहेस हे मला कसं कळेल?

कलापूर्णने धीटपणें म्हटले, "अवश्य कळूं शकेल. आपल्या सैनिकांपैकी कोणी आला तर त्याला मी प्रात्यक्षिक दाखवीन."

भूपतीने टाळी वाजवली. एक सैनिक त्वरेने आंत आला. कलापूर्णने सांगितल्यावरुन तो सैनिक तंबूच्या टोकाशी कापडी पडद्याप्रमाणें कनात होती, तिथें तो उभा राहिला.

कलापूर्णने आपल्या कपड्यांतून एक लहानशी लांकडी डबी काढली. त्यांतून त्याने अगदी बारीक सुया काढल्या. एकएक सुई काढत त्याने सैनिकाच्या डोक्याच्या दिशेने फेकायला सुरवात केली.

पंचवीस सुया फेकल्यावर सैनिकाच्या डोक्याच्या बाजूने त्या पडद्यावर सुयांचे एक अर्धवर्तुळ निर्माण झाले. कलापूर्णने सांगितल्यानंतर भीतीने कांपत असलेला तो सैनिक त्या जागेहून सरकला आणि बाहेर गेला. अतिशय कौशल्याने आणि सफाईने फेंकलेल्या त्या सुयांकडे भूपती लक्षपूर्वक पाहात होता. सैनिकाला कोणतीही इजा न होता, इतक्या बारीक सुया त्याच्या डोक्यामागील कपड्यावर नेम धरुन समान अंतरावर कलापूर्णने फेकल्या होत्या. एकही नेम चुकला नव्हता. इतकी एकाग्रता त्याने क्वचितच पाहिली होती. कृष्ण-भूपतीने अभावितपणें टाळ्या वाजवून म्हटलं, "फारच अद्‌भुत आहे हे! कलापूर्ण, तू तर अगदी कमालच केलीस."

कलापूर्णने नम्रपणें म्हटले, "सरकार, या सगळ्या अगदी साध्या सुया आहेत. माझ्याकडे फारच जालीम अशा विषारी सुया पण आहेत."

कांही उत्तर देण्याऐवजी कलापूर्णला आपल्या-जवळ बसवण्यासाठी कृष्णभूपतिने त्याचा हात पकडला व त्याला प्रेमाने जवळ घेऊं लागला.



पण कलापूर्ण म्हणाला, "सरकार, मी इथेंच ठीक आहे." व त्याने आपला हात सोडवून घेतला.

भूपति म्हणाला, "युद्धांत भाग घेण्याचा तुझा निश्चय कायम आहे ना?"

'शंकाच नको. विजय किंवा वीरगती हेच माझे ध्येय आहे." कलापूर्णने न डगमगता उत्तर दिले.

त्यावर भूपती पुढें कांहीच बोलला नाही. त्याने आपल्या तंबूशेजारी कलापूर्णसाठी दुसरा तंबू उभारला. सकाळीं भूपतीने सेनाधिपतीला सांगितले की युद्धभूमीवर कलापूर्ण घोड्यावर बसून भूपती निकटच राहील.

कांही दिवसांनंतर ते युद्ध संपलं. कृतघ्न व विश्वासघातकी मूल्यवंताला कृष्णभूपतिने रणांगणातच ठार मारलं, आणि कुशद्वीपच्या किल्ल्यावर आपला झेंडा फडकवला. त्याच्या शूर सेनेचं त्याने या विजयाबद्दल अभिनंदन केले. त्याशिवाय अभिमन्यूप्रमाणें युद्धभूमींत शत्रूचा सणसणीत पराभव करण्यास मदत केल्याबद्दल, कलापूर्णची खूपच स्तुती केली.

विजयप्राप्तीनंतर कुशद्वीपमधें एक आठवडा विजयोत्सव साजरा होत होता. एका रात्रीं भूपतिने कलापूर्णला बोलावून घेतले व त्याला विचारले, "कलापूर्ण, तुझी आशा आणि आकांक्षा आता पूर्ण झाली आहे. आता तरी तुझी खरी माहिती आम्हाला सांग."

कलापूर्णने याचे उत्तर लगेच दिले नाही. मान खाली घालून तो थोडा वेळ गप्प बसला, व नंतर म्हणाला "सरकार, माझी आणखी एक लहानशी इच्छा आहे. आपण कृपा केलीत तर..." असं बोलताना तो थांबला.

"संकोच कशाला? सांग, तुझी काय इच्छा आहे?" भूपतिने विचारले.

"सरकार, मी अनाथ आहे. पोट भरण्यासाठी कुठे ना कुठे कष्ट हे करायला हवेतच. आपल्याबरोबर मला आपण मलयद्वीपला घेऊन गेलात तर मी आजन्म आपल्या सेवेत राहीन." कलापूर्णने अशी आपली इच्छा प्रकट केली.

कृष्णभूपति हसला आणि म्हणाला, "त्यांत काय मोठंसं? पण प्रथम तुला ते गाणं मात्र मला ऐकवावं लागेल! तू उद्यानवनांत मौलसिरी वृक्षाच्या खाली बसून गात होतास ना? ते गीत."

भूपतिचे हे बोलणें ऐकून कलापूर्ण आश्चर्यचकित झाला आणि चांचरत म्हणाला, "सरकार, आपण तिथें केव्हां आला होतात?"



राजा हंसतहंसतच म्हणाला, "आकाशांत चांदण्याचा प्रकाश होता तेव्हां पूर्णचंद्राला पाहात म्हटले गेले, 'हे चांदण्या, कृष्णपक्षांतल्या काळ्याकाळ्या मेघांमुळें अंधार पसरतो. पण त्यामुळेंच तुझ्या शुभ्र प्रकाशाला इतकी प्रसिद्धी व कौतुक मिळत राहाते. जगांत वाईट नसते तर चांगल्याला इतका मान मिळाला नसता. म्हणून हे चांदण्या, तुझे हे मोठेपण केवळ तुझ्या गुणांमुळे आहे असे समजून आनंदाने बेहोष होऊं नकोस. संपूर्ण श्रेय तर त्या काळ्या अंधाराचे आहे.' जेव्हां तू ते मधुर गीत गाण्यांत तल्लीन झाला होतास, तेव्हां शेजारच्याच आम्रवृक्षाच्या पाठीमागे लपून मी ऐकत होतो."

कलापूर्ण गप्पच होता. मान खाली घालून एखाद्या पुतळ्यासारखा निःशब्द उभा राहिला होता. कृष्णभूपतिने कलापूर्णजवळ येऊन म्हटले, "कलापूर्ण, तुझ्या चेहऱ्यावरचा निर्मल भाव व तुझी नाजूक बोटें पाहून मला पहिल्यापासूनच तुझ्याविषयीं संदेह निर्माण झाला होता. निदान आता तरी, तुझ्याबद्दलची खरीखुरी माहिती सांग आणि माझा संशय दूर कर."

कलापूर्णने लगेच उत्तर दिलं नाही; थोड्या वेळानंतर आपले मस्तक वांकवून त्याने डोक्याभोवती गुंडाळलेले वस्त्र उतरवले. दुसऱ्याच क्षणीं लांबसडक, काळेभोर, मुलायम केस खांद्यावर विखुरले. लागलीच कृष्णभूपतिच्यासमोर गुडघे टेकून ती म्हणाली, "माझा स्वार्थ पूर्ण करण्यासाठी मी सत्य लपवले होते आणि आपल्याला खोटंच सांगितलं होतं. मला क्षमा करावी. मी कलापूर्ण नाही, मी कलाकौमुदी आहे."

भूपतिने दोन्ही हातांनी तिला वर उठवले आणि तो म्हणाला, "त्या दिवशीच मला वाटलं की तू निश्चितच कुणी क्षत्रियकन्या आहेस! खाली बस आणि सांग मला की तू हा पुरुषवेष कां धारण केला आहेस?" असं म्हणून तिला एका आसनावर बसवलं.

राजाचा आदरसत्कार स्वीकारताना कलाकौमुदीच्या डोळ्यांत आनंदाश्रू आले. क्षणभर तिच्या तोंडून शब्द फुटेना. पण थोड्या वेळांतच ती सावरली आणि तिने पुढें सांगितलं:-

(क्रमशः)





# मानव प्रतिमा

फार पूर्वीची गोष्ट आहे. श्रीधर महाराज आपल्या मनांत येईल त्याप्रमाणे गांवातील अधिकाऱ्यांची नेमणूक करीत. त्यांच्या आश्रयाला आलेली माणसें किंवा त्यांची ज्याच्यावर मर्जी असेल त्याचीच ते ग्रामाधिकारी म्हणून नेमणूक करीत. राजाच्या पाठिंब्यामुळे व आश्रयामुळें त्यांतले कांही लोक दुष्टपणा करुं लागले. हे अधिकारी प्रजेचा खूप छळ करीत असत. लोक तरी किती दिवस त्यांचा छळ सहन करणार? त्यांनी प्रभाकरला आपला पुढारी नेमून राजाकडे पाठविले. त्यांची अशी इच्छा होती की प्रभाकरने त्यांच्या दयनीय स्थितीचे राजासमोर वर्णन करुन, राजाकडून त्यांना न्याय मिळवून देण्याचा प्रयत्न करावा.

प्रभाकरने राजाला भेटून ग्रामाधिकारी जनतेवर करीत असलेल्या अत्याचारांच्याबद्दल सर्व माहिती सांगितली. महाराज श्रीधरना प्रभाकरने सांगितलेल्या कडव्या पण सत्य घटना रुचल्या नाहीत व पटल्या पण नाहीत. त्यांचं म्हणणं असं की, ''ज्या लोकांना मी आवडत नाही. ते माझ्यावर उगीचच आरोप करतात. माझं नांव वाईट करायचा प्रयत्न करतात.'' उगीच तक्रार घेऊन आल्याबद्दल त्यांनी प्रभाकरची कानउघाडणी केली.

''महाराज, जनतेचे आराध्य दैवत असलेल्या जनार्दनस्वामींच्या शिळेची शपथ घेऊन सांगतो की जनतेच्या तक्रारी खऱ्या आहेत. माझ्या बोलण्यावर विश्वास ठेवावा. आणि या ग्रामाधिकाऱ्यांची चौकशी करावी.'' प्रभाकरने विनंती केली.

यावर राजा हंसून म्हणाला, ''दगडाची मूर्ती बनवली तरी मूर्तीचे गुण दगडांत उतरत नाहीत. अशिक्षित व अज्ञानी माणसांसाठी मूर्ती आहेत. माझा सत्य व चांगुलपणावर विश्वास आहे. हेच माझे देव आहेत.

मला चांगले माहित आहे की ज्या ग्रामाधिकाऱ्यांवर तू टीका करतो आहेस, त्यांच्यावर आरोप करतो आहेस ते वाईट नाहीत तर चांगलेच आहेत. त्यांच्याबद्दल तू जे कांही बोललास ते सगळे अगदी खोटे आहे. यावेळेस मी तुला माफ करतो. पण तू पुन्हां कधी या लोकांविषयी तक्रारी घेऊन येण्याची हिम्मत केलीस, तर तुला तुरुंगात टाकून कडक शिक्षा करीन.''

''महाराज, आपण मला क्षमा केल्याबद्दल मी आपला आभारी आहे. पण तरीही या ग्रामाधिकाऱ्यांच्याबद्दल मी फिर्याद करीत आहे. आपल्याला योग्य वाटल्यास आपण मला तुरुंगात टाकून पाहिजे ती शिक्षा सुनवा.'' प्रभाकर निर्भयपणे म्हणाला.

त्याचे हे बोलणे ऐकून राजा आश्चर्यचकित झाला. त्याला प्रभाकरचा खूप राग आला. पण त्याची चिकाटी व कर्तव्यदक्षतेचे कौतुक देखील वाटले. त्याने प्रभाकरला कांहीही आश्वासन न देता परत पाठविले. आणि नंतर मंत्र्यांशी विचारविनिमय केला.

त्या राज्यात महावेद नांवाचे एक सज्जन



गृहस्थ होते. ते गांवोगांवी फिरुन लोकांना हितोपदेश करीत असत. आयुष्यांतील नैतिक मूल्यांचे महत्व समजावीत असत. लोक म्हणत की त्यांच्यामुळे कितीतरी दुष्ट व पापी लोक सुधारले व चांगल्या मार्गाला लागले. पुष्कळ लोकांचा असा विश्वास होता की या सत्यवचनी माणसांत देवाचा अंश आहे.

मंत्र्यांनी राजाला सुचविले की ग्रामाधिकाऱ्यांच्या बाबतीत सत्य जाणून घेण्याचे काम महावेदांवर सोपवावे. श्रीधरमहाराजांनी महावेदांना आदराने आपल्या कक्षांत बोलवून सर्व घटना सांगितली व म्हणाले, ''माझे विरोधी माझ्यावर आरोप करत आहेत की ग्रामाधिकाऱ्यांच्या नेमणुकीत मी पक्षपात केला आहे. त्यांचे म्हणणे आहे की मला जे लोक आवडतात त्यांचीच निवड मी या पदासाठी केली आहे. ते या गोष्टीविषयी

त्यागी



निरनिराळ्या अफवा पसरवित आहेत. माझा दुसऱ्या कोणावरही विश्वास नाही. म्हणून आपल्या सारख्या सत्पुरुषावर मी ही जबाबदारी सोपवीत आहे. आपणच ह्याचा न्यायनिवाडा करावा.''

महावेदांनी राजाचे म्हणणे लक्षपूर्वक ऐकले. आणि ते गंभीरतेने म्हणाले, ''आपल्या चाहत्यांच्या तोंडून फार स्तुती ऐकली तर सावध व्हा. त्यांच्याबाबत वाईट गोष्टी ऐकण्यांत आल्या तर त्यावर विचार करा. राजा म्हणून तुमचे हे कर्तव्य आहे. प्रभाकर जे कांही बोलला ते खरे आहे. या गांवात हिंडून मी अगोदरच सत्य गोष्ट काय आहे याचा तपास केला आहे. त्या लोकांना सुधारण्याचा प्रयत्न केला पण तो सफल झाला नाही. तुझ्या आश्रयाला येऊन, तुझ्या बळावर, तुझे नांव पुढे करुन हे लोक स्वतःची मनमानी करीत आहेत. तुला त्यांना कडक शिक्षा केली पाहिजे. तरच ते सुधारण्याची कांहीतरी शक्यता आहे.''

राजाला महावेदांचे म्हणणे देखील पटले नाही. तो म्हणाला ''महामन, प्रत्येक मनुष्यांत देवाचा अंश आहे. असे मी मानतो. पण कांही लोक असे दुष्ट असतील यावर माझा विश्वास बसत नाही. माझा हा विचार जर चुकीचा असेल तर कृपा करुन सांगावे.''

''राजा, या सृष्टीचे एक वैशिष्ट्य आहे. जे कदाचित् तुला माहित नसेल. त्याविषयी एक गोष्ट ऐक. म्हणजे तुझ्या सगळ्या शंका अपोआप दूर होतील.'' असे म्हणून महावेद गोष्ट सांगू लागले.

ब्रह्मदेवाने सर्व प्राणिमात्रांची मिळून एक सृष्टी निर्माण केली. त्याने फक्त मनुष्यांतच देवाचा अंश घातला आणि त्याला बुद्धिमत्ता व बळ दिले. हे वैशिष्ट्य घेऊन मनुष्य जगूं लागला. पण दुसरे बुद्धिहीन प्राणी त्याला त्रास देऊं लागले.

सहनशीलता व शांती हे गुण मनुष्यांत उपजत असतात. पण असं वाटायला लागलं की ही सद्गुणांची खाण मनुष्याकडे उरणार नाही. ब्रह्मदेवाने यावर खूप विचार करुन एक उपाय शोधला. त्यांनी प्रत्येक जीव, पक्षी, प्राणी यांच्यात, एका मनुष्याला त्या त्या रुपाने जन्माला घातले. त्या मनुष्यामुळे इतर प्राण्यांत मनुष्यप्राण्याबद्दल एक आपुलकी, सद्भावना निर्माण झाली. इतकेच नाही तर त्यांच्यात सद्व्यवहाराची भावना पण जागृत झाली. त्यांनी



त्याची संवय स्वतःला करुन घेतली. अशा तऱ्हेने प्रत्येक जीव मनुष्याप्रमाणे व्यवहार करुं लागले. त्यांना मानव जन्माचे महात्म्य कळले.

अशा स्थितीत बाकीचे सर्व जीव ब्रह्माकडे गेले व त्यांनी विनंती केली ''देवा, या सृष्टीतील प्रत्येक जीवाचे एक वैशिष्ट्य आहे. मनुष्यत्व सगळ्यांमध्ये आहे त्यामुळे सगळ्यांना त्याची महानता कळली व ते सुधारले. त्यांनी मनुष्याशी आपलेपणा जोडला. म्हणून आमची अशी इच्छा आहे की त्याचप्रमाणे प्रत्येक जीवजंतूमधून एक प्राणी तू मनुष्यजन्माला घाल. म्हणजे मनुष्य देखील यांचे वैशिष्ट्य समजेल व त्यांच्याशी आपुलकीने वागेल.''

ब्रह्मदेव 'तथास्तु' म्हणाला.

गोष्ट सांगून महावेद श्रीधरमहाराजांना म्हणाले ''मनुष्याच्या दुष्टस्वभावाचे कारण त्या दुष्टजीवांचे अंश होत. त्या दुष्टजीवांची आपण जशी शिकार करतो त्याचप्रमाणे दुष्ट माणसांची पण आपण शिकार केली पाहिजे. नाहीतर राजाच्या मदतीने हे सगळीकडे हाहाःकार माजवितात. यांचा नायनाट करणे हेच राजाचे कर्तव्य आहे.''

महाराज श्रीधरांनी महावेदांना ताबडतोब साष्टांग नमस्कार घालून म्हटले, ''महात्मन्, आपण माझे अज्ञान दूर केलेत. आपल्या सारख्या थोर पुरुषाच्या उपदेशाने, शिकवणीने देखील जे दुष्ट लोक सुधारले नाहीत ते जगण्यास योग्य नाहीत. त्यांना मनुष्यप्राण्यात राहू देणे योग्य नाही. यांना तुरुंगात टाकणे हे माझे प्रथम कर्तव्य आहे.''

यानंतर श्रीधरमहाराजांनी अत्याचारी ग्रामाधिकाऱ्यांची चौकशी करुन त्यांना कडक शिक्षा दिली. व सद्गुणी माणसांचा सत्कार केला.



## भारतवीर प्रश्नावलीत भाग घ्या आणि आकर्षक बक्षिसे मिळवा

# भारताचे वीर – १

मित्रांनो ! या प्रश्नावलींतले सारे वीर इतिहासांत चमकले आहेत आणि ते तुम्हाला माहीत असतीलच.

तीन अचूक उत्तरें देणाऱ्या विजेत्यांस सायकली बक्षीस मिळतील."

1 १५२६ मध्यें मी वादळी वेगाने हिंदुस्तान जिंकला. माझ्या वारसांनी माझे नांव उज्वल केले माझ्या आईच्या कुटुंबावरून आमच्या घराण्याचे नांव पडले आहे. तेव्हां मी कोण आहे? ..............................

2 सुंदर संयुक्ताला उचलून मी माझ्या घोड्यावर बसवले आणि प्रणयरंगी सूर्यास्ताकडे कूच केले. तुम्ही मला ओळखलत कां?
..............................

3 १७व्या शतकांत मी मयूर सिंहासन बनवले, माझ्या पत्नीवर माझे फार प्रेम होते, म्हणून तिच्या मृत्यूनंतर तिचे स्मारक बांधण्यासाठी पुढचे सांगायला नको. माझे नांव काय?
..............................



4 जरी ग्रीक राजपुत्राशी युद्ध हरलो तरी त्याच्यासमोर ताठ मानेने मी सांगितले "एका राजाला साजेशी वागणूक मला दे" मी कोण आहे ते तुम्हाला कळलं असेलच.
..............................

5 एका भीषण युद्धांत मी विजयी झालो. पण माझे जीवन त्यामुळें पालटले. मी हिंसेचा संपूर्ण त्याग केला. माझे नांव ओळखा.
..............................

प्रत्येक प्रश्नाचे उत्तर दिलेल्या ओळीवर लिहा या पांच वीरांपैकी तुम्हाला कोणता वीर आवडतो व कां? 'इतिहासांतला माझा आवडता वीर' याबद्दल दहा शब्द लिहा.
..............................
..............................
..............................

स्पर्धकाचे नांव : ..............................
वय : .............. वर्ग : ..............
पत्ता : ..............................
पिन : .............. फोन : ..............
स्पर्धकाची सही : ..............................
पालकांची सही : ..............................

हे पान नीट कापून ५ नोव्हेंबर पूर्वी पुढील पत्त्यावर पाठवा.

**Heroes of India Quiz - 1**
**CHANDAMAMA INDIA LIMITED**
**No.82, DEFENCE OFFICERS COLONY**
**EKKATTUTHANGAL, CHENNAI - 600 097.**

सूचना :

१. ही स्पर्धा ८ ते १४ वयोगटांतल्या मुलांसाठी आहे.
२. *सर्व भाषांतून फक्त तीन विजेते निवडले जातील. विजेत्यांना योग्य उंचीच्या सायकली बक्षिस दिल्या जातील. एकापेक्षा जास्त अचूक उत्तरें आल्यास विजेत्यांची निवड "माझा आवडता वीर" या वर्णनावरून केली जाईल.
३. परीक्षकांचा निर्णय अंतिम राहील.
४. त्याबद्दल वेगळा पत्रव्यवहार केला जाणार नाही.
५. विजेत्यांना पोस्टाने निर्णय कळवला जाईल.





# आंधळे अज्ञान

रामपूर गांवात रणधीर नांवाचा एक शेतकरी राहात होता. जी थोडीफार जमीन होती ती तो स्वतःच कसत होता आणि सुखासमाधानाने राहात होता.

एका दिवशी रणधीरचा सासरा गोविंद हा राजगडहून एक दुभती म्हैस घेऊन आला. रणधीरला गोविंद म्हणाला, "तू अगदी चांगल्या प्रकारें शेती करतो आहेस. तुझ्याजवळ दुभती जनावरें असली की तुला त्याचा चांगला उपयोग होईल. असं म्हणतात की शेतीचं पीक हे दूधदुभत्याचं भावंड असतं. सध्यां माझ्याकडे बरीच गुरें आहेत म्हणून तुझ्यासाठी मी एक चांगल्या जातीची म्हैस आणली आहे. चांगल्या अन्नधान्याबरोबर दह्यादुधाचीही चंगळ होईल."

सासऱ्याचे बोलणें ऐकून रणधीरने हंसून म्हटले, "दुभत्या म्हशीला पोसणें कांही सोपी गोष्ट नव्हे. दुधादह्याची चंगळ जरूर होईल पण म्हशीलादेखील भरपूर खाऊंपिऊं घालायला हवे की! ते दिलं नाही तर त्रासच व्हायचा. माझ्या शेतांत जेवढं धान्य पिकतं, त्यांत माझी गुजराण नीट होते आहे. माझ्या बैलांना पुरेल इतकं गवत शेतातून मिळतं. आता या म्हशीमुळें मला किती कटकट होईल. दुधादह्याचा आनंद मिळाला तरी हिचे चारापाणी व तिची देखभाल करायची ताकद माझ्यांत मुळीच नाही."

ह्यावर त्याची पत्नी मंगला हिने त्याला समजावत म्हटले, "हल्लीं तुम्ही फारच चिडकूट होत चालला आहात हं! बैलांच्याबरोबर ह्या म्हशीलाही चरायला नेता येईल. दूध आणि धान्य या दोन्हींमधें लक्ष्मीचा निवास असतो. महालक्ष्मीप्रमाणें ही म्हैस आपल्या घरांत आलीय. आता तिला नाकारुं नका! लहान वासरुं किंवा दुभते जनावर घरांत येणं हा एक शुभशकुन असतो असं म्हणतात बरं कां!"

पत्नी व सासऱ्याने जोर दिल्यामुळें रणधीरला त्यांचे म्हणणें ऐकावे लागले. आपल्या

- हेमलता पोडुवाल -



बैलांच्याबरोबर ती म्हैस व तिचे वासरुं त्याने आपल्या झोंपडीत बांधले.

गोविंद खूष होऊन राजगडला परत गेला. जांवयाने आपले म्हणणे ऐकले म्हणून त्याला समाधान झाले होते. दुसऱ्या दिवशी सकाळीं रणधीरने म्हशीचे दूध काढून आणले. तेव्हां मंगला त्याला म्हणाली, ''बाबांनी म्हैस आणून दिली ही आपल्याला मदत झाली आहे. आता यापुढे आपल्याला कधी दहीदूध कमी पडणार नाही. या दुभत्या म्हशीने आपल्या झोंपडींत प्रथमच्च प्रवेश केलाय. म्हणून आजच्या या दुधाचा नैवेद्य आपण वेणुगोपालस्वामी भगवानाच्या मंदिरात दाखवूं या. त्याच्या कृपेने म्हशींच्यासाठी एक वेगळी झोंपडी बांधायची वेळ आली तर बरंच की!'' असं म्हणून तिने दुधाची कासंडी डोळ्यांना लावली आणि रणधीरकडे दिली.

रणधीर ती कासंडी घेऊन मंदिरात गेला. त्यावेळेस पुजारी एका साधूशी बोलण्यांत गुंग झाला होता. रणधीरने पुजाऱ्याला आपण येण्याचे कारण सांगितले.

पुजारी आश्चर्यचकित होऊन रणधीरकडे पाहात राहिला. तो पुढें म्हणाला, ''अरे, रणधीर, वेणुगोपालस्वामीला गाईचे दूध आणि त्याचे पदार्थ.यांचाच नैवेद्य दाखवला जातो, अशी इथली रीत आहे. बरं झालं, हे म्हशीचं दूध आहे हे तू अगोदरच सांगितलंस. नाहीतर माझ्या हातून पाप घडलं असतं. पण मी तुला निराश करणार नाही. तू स्वतःच या दुधाचा देवाला नैवेद्य दाखव. पण मग एक कर. हे साधूमहाराज कुंभ मेळयाला जाणार आहेत. आज रात्रीं हे मंदिराच्या ओवरींत झोंपतील. ते दूध तू यांनाच दे. त्याचे पुण्य तुझ्या पदरांत निश्चित पडेल.''

रणधीरने देवळाच्या बाहेर उभे राहून वेणु-गोपालस्वामीला अत्यंत श्रद्धापूर्वक नमस्कार केला आणि दुधाची कासंडी त्याने साधूसमोर ठेवली. त्यांचे सारे बोलणें साधूने नीट ऐकले होते. त्याने दूध पिऊन टाकले आणि तो म्हणाला, ''रणधीर, हे दूध बिनसाखरेचे असले तरी फारच गोड आहे रे! तुझे अवश्य कल्याण होईल.'' असे म्हणून त्याने डोळे बंद केले आणि थोडा वेळ ध्यान लावले.

त्यानंतर त्याने आपल्या बंद मुठी उघडल्या. त्यांत दोन रुद्राक्ष होते. रणधीरच्या हातांत ते रुद्राक्ष ठेवून साधू म्हणाला, ''तुझ्या देवघरांत हे रुद्राक्ष नीट जपून ठेव. तुझ्या वंशाचा उद्धार करणारे दोन पुत्र तुला होतील.'' साधूने त्याला असा आशिर्वाद दिला.



रणधीर घरी परत गेला. मंदिराजवळ काय घडले ते त्याने मंगलाला सविस्तर सांगितले. दोघांनी ते रुद्राक्ष देवघरांत सुरक्षित ठेवले. त्या दिवसानंतर रणधीरचं भाग्य उजळलं. थोड्याच दिवसांत त्याने दोन एकर सुपीक जमिनीची खरेदी केली. एक गाय व आणखी तीन दुभत्या म्हशी विकत घेतल्या. कांही काळानंतर त्याला दोन मुलगे झाले.

त्याच्या दोन्ही मुलांची आवड निरनिराळी होती. थोरल्याला शेती करायला आवडत होते. तो शेतांत राहून रात्रंदिवस काम करीत असे. त्याचबरोबर निरनिराळे बीबियाणें आणून त्यांचे प्रयोग तो करीत होता व आपल्या शेतांतले उत्पन्न वाढवण्याच्या सतत प्रयत्नांत राहात होता.

दुसऱ्या मुलाला गुराढोरांची आवड होती. गाईबैलांना जरी एखादी लहानशी जखम झालेली दिसली तरी तो दुःखी होत असे. त्याने गुरांच्या वैद्यांना अनेकवेळा भेटून, गुराच्या रोगांबाबतीत बरीच माहिती मिळवली होती. त्याचा उपयोग करून त्याला गुरांच्या आजाराचे निदानही करता येऊं लागले.

मंगला व रणधीरचा गाढ विश्वास होता की हे सारं वैभव त्या साधूने दिलेल्या रुद्राक्षाच्या परिणामामुळें निर्माण झाले होते. अशीच कांही वर्षे आनंदात गेली.

आता रणधीरचा थोरला मुलगा विवाहास योग्य वयाचा झाला होता. चांगल्या सधन घराण्यांकडून विवाहासाठी प्रस्ताव येऊं लागले. आपल्या या सुस्थितीबद्दल कृतज्ञता व्यक्त करावी म्हणून ते दोन्ही मुलांना घेऊन वेणुगोपालस्वामीच्या मंदिरात गेले.

पूजा संपल्यानंतर ते बाहेर आले तेव्हां त्यांना मंदिराच्यासमोरच एक वृद्ध साधू उभा असलेला दिसला त्याच्या डोक्यावरचे सारे केस पांढरे झाले



होते व दाढीही पांढरीशुभ्र होती. तो कंबरेत वाकलेला होता. हा तोच साधू तर नसेल ना, असा विचार रणधीरच्या मनांत आला, तितक्यांत तो साधू हंसून म्हणाला, ''अरे रणधीर, काल रात्रीं मी मंदिराच्या ओंवरीवर पडलो होतो, तेव्हां गांवातल्या लोकांकडून तुझ्याबद्दल खूप चांगल्या गोष्टी ऐकल्या. मला त्यामुळें खूपच समाधान वाटले बघ.''

आता मात्र रणधीरने त्या साधूला ओळखले. लगेच त्याला म्हणाला, ''स्वामीजी, क्षमा करा. आपण दिलेले दोन रुद्राक्ष आणि आपले आशिर्वाद, यामुले आज मी सधन झालो आहे. माझ्या दोन्ही मुलांसह आम्ही सुखाने राहातो आहोत.'' असें म्हणून त्याने आपल्याजवळची दुधाची कासंडी साधूला दिली. तो पुढें म्हणाला, ''हे मात्र गायीचं दूध आहे हं. भगवान वेणुगोपाळाला याचा नैवेद्य दाखवला आहे.''

त्या भांड्याला हात न लावताच साधूमहाराज म्हणाला, ''त्या दिवशीं जे कांही घडलं ते मला चांगलं आठवतंय. पुजाऱ्याला वाटत होतं कीं वेणुगोपालस्वामी फक्त गाईंचाच रक्षणकर्ता आहे. त्याचे अज्ञान पाहून मी चकितच झालो. म्हणून जेव्हां तू आणलेलं म्हशीचं दूध त्याने स्वीकारण्यास नकार दिला, तेव्हां मी ते घेतलं आणि पिऊन टाकलं. तुझी श्रद्धा आणि भक्ती त्या पुजाऱ्याला समजली नव्हती. तुझ्यासारख्या सद्भक्ताचे कल्याण व्हावे म्हणून मी तुला दोन रुद्राक्षे दिली. आणि आशिर्वादही दिला. भगवान वेणुगोपालने माझी सदिच्छा खरी करुन दाखवली.''

नेमका त्याच वेळेला कांठी टेंकतटेंकत तो जुना पुजारीदेखील तिथें आला. पुजाऱ्याने साधूला नमस्कार करुन म्हटले, ''स्वामीजी, भगवान सर्वव्यापी आहे हे माहिती असूनदेखील मी अज्ञानाच्या भोंवऱ्यांतच फिरत होतो. मला वाटे की मी सर्वज्ञ आहे, भगवान वेणुगोपालाचा मीच एकमात्र प्रतिनिधी आहे! पण जे भक्त श्रद्धायुक्त अंतःकरणाने भगवानाला जो प्रसाद अर्पण करतात, त्याचा भगवान सहर्ष स्वीकार करतात व त्या भक्ताला दामदुपटीने तो प्रसाद इतर रुपाने परत करतात. हे सत्य मला आता समजलंय आणि माझे आंधळे अज्ञान आता दूर झालंय.''

साधूने पुजाऱ्याबरोबरच सर्वांना आशिर्वाद दिले आणि तो तिथून निघून गेला.





# यक्ष पर्वत

## 9

*(गुरु मल्लूकला आपल्याबरोबर घेऊन खड्गवर्मा व जीवदत्त अरण्यांतल्या सरोवराजवळ आले. तिथें त्यांना स्वर्णाचारी दिसला. समरबाहूच्या अनुपस्थितीत त्याचे अनुयायी व वीरपूरचे राजसैनिक यांच्यामधे लढाई सुरुं झाली. राजसैनिकांनी आपल्या तलवारी म्यानांतून उपसल्या आणि समरबाहूच्या अनुयायांवर ते तुटून पडले.) - यानंतर पुढे*

वीरपूर राजाच्या प्राणिसंग्रहालयाच्या अधिकाऱ्या-जवळ आता केवळ सात सैनिक उरले होते. त्यांपैकीं एक जखमी झाला आणि लंगडत लंगडत इतर सैनिकांच्या पाठोपाठ येऊं लागला. समरबाहूचे चारच अनुयायी शिल्लक होते, परंतु तरीही त्यांनी राजसैनिकांबरोबर लढायचा निश्चय केला होता.

समरबाहूच्या अनुयायांजवळ पोंचण्यापूर्वी प्राणीसंग्रहालयाच्या अधिकाऱ्यांनी आपल्या सैनिकांना थांबवून त्यांना सांगितले, ''हे लोक व्यापारी असावेत. त्यांना पाहून असं वाटतंय कीं त्यांना लढता येत नसावं. पगड्या अशा कां बांधतात कधी? यांना तलवारदेखील चालवता येत नसेल.''

त्याचे हे बोलणे समरबाहूच्या अनुयायांनी ऐकले. त्यांना राग आला. आपल्या मिशांवर हात फिरवीत, शड्डू ठोकत ते ओरडले, ''आमच्याशी सामना करुन तर पाहा. मग कळेल आम्हाला काय येतंय आणि काय नाही ते! समरबाहू की जय'' असं ओरडत ते जोराने पुढें आले आणि राज-सैनिकांवर तुटून पडले. वीरसिंहच्या सैनिकांपैकी तिघेजण समरबाहूच्या अनुयायांसमोर टिकू शकले नाहीत आणि जमिनीवर पडले. आता लंगडा सैनिक व अधिकारी झाडीमधे लपत पळून जाऊं लागले. अधिकाऱ्याला पळून जाताना पाहून इतर दोघा सैनिकांनी आपला पराभव मान्य केला आणि



समरबाहूच्या अनुयायांसमोर ते नतमस्तक झाले.

लढाई चालू असताना दोन्ही बाजूंचे लोक आरडाओरड करीत होते. जंगली जमातींचे कांही लोक हे आवाज ऐकून पळतच तिथें आले. कुणाकुणाच्यात लढाई चाललीय आणि कोण हार तोय, कोण जिंकतोय, हे कांही त्यांना समजत नव्हतं.

त्यांचे भांबावलेले चेहरे पाहून समरबाहूच्या अनुयायांनी त्या जंगलवासींना सांगितलं, "तुम्ही याच जंगलात राहाता ना? मग आता याच्यापुढे वीरपूर राजाला कर देण्याची कांहीही जरुर नाही. आमचा राजा समरबाहू आता यापुढें तुमचा नवीन राजा आहे."

जंगली जमातीपैकीं एक वृद्ध माणूस पुढें आला आणि म्हणाला, "साहेब, आपण जसं सांगितलंत, तसंच आम्ही करुं. आपण राग मानू नका. पण मला आपण सांगावं कीं आपल्या राजाची राजधानी कुठे आहे?" त्याने घाबरतच हा प्रश्न विचारला होता.

समरबाहूच्या अनुयायांपैकी एकजण या प्रश्नाचें उत्तर देणार होता तेवढ्यांत दोन जंगलवासी दोन घोडे घेऊन तिथें आले. त्या वृद्धाने त्यांना विचारले, "या घोड्यांना तुम्ही कुठे पकडलेत?"

"वीरपुर राजाच्या सैनिकांपैकी दोन सैनिक घोड्यावर स्वार होऊन पळून जात होते. तेव्हां हे दोन घोडे झाडाला बांधलेले होते. त्यांनी त्यांच्या दोऱ्या तोडल्या व ते तिथून पळायला लागले. पळणाऱ्या या घोड्यांना आम्ही पकडले आणि त्यांना इथें घेऊन आलो" त्या दोघा जंगलवासींनी उत्तर दिले.

"तुमच्या दोघांच्या या कामगिरीबद्दल आम्ही खूष आहोत. आम्ही तुमच्या नांवाची शिफारस करुं आणि राजाकडून चांगले बक्षिस देववूं. या दोन्ही घोड्यांना घेऊन तुम्ही आमच्यावरोबर डोंगरातल्या किल्ल्यावर चला." समरबाहूच्या एका अनुयायाने सांगितले.

समरबाहूचे अनुयायी वीरसिंहाच्या कैद केलेल्या सैनिकांना घेऊन निघाले. दोन्ही घोड्यांना घेऊन ते दोघे जंगलवासीही त्यांच्या मागून येऊं लागले. आणि यांनाच प्राणीसंग्रहालयाच्या अधिकाऱ्यांनी पकडून ठेवलेलं होतं.

त्यांना पाहून समरबाहूच्या साथीदारांना उत्साहाचे भरते आले. ते म्हणूं लागले, "ही रानटी जनावरे समरबाहू महाराजांच्या प्राणीसंग्रहालयांत आता यापुढें राहातील. यांनाही आपण किल्ल्यावर घेऊन जा."

तितक्यांत आणखी कांही जंगलवासीदेखील तिथें घेऊन पोंचले. त्यांना पाहून समरबाहूच्या एका साथीदाराने त्यांना विचारलं." सर्व कांही ठीकठाक आहे. पण आजपर्यंत आम्ही कधी असल्या रानटी जनावरांना सांभाळलं नव्हतं. ही श्वापदे आता किल्ल्यापर्यंत कशी नेता येतील?"

तेव्हां तो वृद्ध जंगलवासी पुन्हां पुढें आला आणि सांगू लागला, "साहेब, या पिंजऱ्यांना लहानलहान चाकें बसवलेली आहेत. हे पिंजरे आपण घोडे किंवा उंटांकडून ओढत ओढत किल्ल्यापर्यंत घेऊन जाऊं शकाल."

समरबाहूच्या साथीदारांना त्याने सुचवलेला हा उपाय ठीक वाटला. जंगलवासियांनी लगेच दोरखंडाने दोन उंटांना ते पिंजरे बांधून टाकले. आणखी एका उंटाच्या पाठीवर जंगलातल्या पक्षांची जाळी नीट भक्कम बांधली. त्यानंतर सर्वजण त्या पहाडी किल्ल्याचे बांधकाम चाललेले होते त्या दिशेने जाऊं लागले.

किल्ला बांधण्याच्या कामांत स्वर्णाचारी गुंतला होता. त्या डोंगराच्या पायथ्याशीं जेव्हां ते घोडे, उंट व त्यांच्याबरोबर त्या जंगलवासी माणसांना पाहून तो आश्चर्यचकित झाला. कामावर असलेले मजूरदेखील चकित होऊन हे दृश्य पाहायला लागले.

एका घोड्यावर स्वार असलेला घोडेस्वार समरबाहूच्या एका साथीदाराला सांगायला लागला, "पाहिलंत, महामंत्री स्वर्णाचारी आपल्याला पाहून किती चकित झाले आहेत ते! मी पुढें जाऊन त्यांना ही सारी हकीकत सांगतो." असं म्हणून तो पायउतार झाला आणि दगडाधोंड्यातून मार्ग काढीत, हळूंहळूं पुढें जात, तो स्वर्णाचारीच्याजवळ पोंचला.

तो जसा तिथें पोंचला तशी स्वर्णाचारीने त्याला विचारलं, "तुम्ही शिकारीला गेला होता ना? हे घोडे कुठून मिळाले? हे पिंजरे कुठून आणलेत?





जंगलातली माणसें तुमच्याबरोबर कशी काय आली आहेत?'' त्याच्या स्वरांत खूप उत्सुकता होती.

समरबाहूच्या अनुयायांनी स्वर्णाचारीला नमस्कार करुन म्हटलं, ''वास्तुविद महामंत्रीजी, आम्ही जंगलात वीरपूरच्या राजाच्या सैनिकांची तिरपीट उडवली. त्यांना चांगलेच हरवले. दोघांना कैद करुन आपल्याबरोबर घेऊन आलो आहोत. सात सैनिकांना आम्ही मारुन टाकलं. दोन सैनिक प्राण वाचवून वीरपूरच्या दिशेने पळाले.''

दोघेजण वीरपूरच्या बाजूला पळाले ही बातमी ऐकून स्वर्णाचारी भीतीने कांपू लागला. समर-बाहूच्या अनुयायांनी सांगितलेल्या बातमीने त्याला समाधान झाले नाही. नाराज होऊन, डोळे वटारुन तो त्यांच्यावर ओरडूं लागला, ''तूं म्हणालास कीं वीरपूरचे दोन सैनिक नगराच्या दिशेने पळाले. ही घटना आपल्याला संकटात टाकेल. तू तर इतका खूष दिसतो आहेस कीं जणू कांही यज्ञाचा घोडाच पकडून आणला आहेस! त्या राजसैनिकांशी लढायची काय जरुर होती?'' .....

''आमचे कांही सैनिक घायाळ झाले. शत्रुसेनेशी सामना करताना आमच्या तलवारींची धार गेली. आमचे सैनिक लढतालढता मरण पावले. शत्रूपासून कसाबसा बचाव करुन ही बातमी आपल्याला कसंही करुन सांगावी म्हणून आम्ही इथपर्यंत आलो. मी आणि हा सैनिक फक्त वाचले.''

राजा वीरसिंहाने लगेच सांगितले, ''महामंत्री, आपल्या राज्याच्या सीमेवर बलवान शत्रूने आगमन केलंय. सेनाध्यक्षांना ही बातमी लगेच कळवा.''

प्राणीसंग्रहालयाच्या अधिकाऱ्यांच्या कहाणीवर मंत्र्यांच्या विश्वास बसेना. त्यांनी त्यांना जवळ बोलावले आणि त्यांना स्वतः भोवती गोल गिरकी घेत फिरण्यास सांगितले. त्यांच्या शरीरावर कुठे जखम झालीय किंवा लागलंय कीं नाही ते त्यांनी लक्षपूर्वक पाहिलं. पण मंत्र्याला तसं कांही आढळलं नाही.

तेवढ्यांत सेनाध्यक्ष तिथे येऊन पोंचला. त्याच्या कमरेला तलवार लटकत होती. त्याने आल्याबरोबर राजा आणि मंत्री यांना नमस्कार केला. मंत्र्याने अधिकाऱ्यांनी सांगितलेली बातमी सविस्तरपणे पुन्हां सांगितली.

सेनाध्यक्ष नम्रतेने म्हणाला, ''महामंत्री, माफी असावी. पण मी या उंटवाल्यांची माहिती मिळवण्यासाठी निरंजन नांवाच्या एका अधिकाऱ्याच्या नेतृत्वाखाली एका गुप्तचराला धाडले होते. पण तो तिथें कामासाठी गेला आणि तिथल्या एका सुंदर जंगलवासी तरुणीशी त्याने लग्न केले. त्यानंतर तो तिथेंच राहूं लागला. या कारणामुळें खरी परिस्थिती समजायला विलंब लागला.''

मंत्री म्हणाला, ''शत्रूने मात्र या विलंबाचा पुरेपूर फायदा उठवला आहे असं दिसतं. सेनाध्यक्षजी, जेव्हां आपण गुप्तचरांची नियुक्ती करता किंवा त्यांची या कामासाठी निवड करता, तेव्हां त्यांचं लग्न झालं आहे कीं नाही, त्यांना मूलबाळ आहे कीं नाही, या साऱ्या गोष्टींची माहिती असायला हवी. ब्रह्मचाऱ्यांच्यावर गुप्तचराचं काम सोंपवलं कीं कायकाय गोंधळ होतात ते आता तुमच्या ध्यानांत आलं असेल.

तेव्हां राजाने मधें पडत म्हटलं, ''सेनाध्यक्ष, आपण सेना घेऊन ताबडतोब निघा, आणि शत्रू राजाच्या किल्ल्याला वेढा घाला, त्याचा सर्वनाश करा. शत्रूराजाला जिवंत पकडून आणून माझ्या-समोर हजर करा. ही माझी आज्ञा आहे.''

शंभर घोडेस्वार आणि दोनशे सैनिकांना घेऊन सेनाध्यक्षाने त्या किल्ल्याच्या दिशेने कूच केले. किल्ल्यांचे बांधकाम चालूं होते.



ज्या दिवशी समरबाहूला अस्वलवाल्यांनी कैद केले होते, त्या दिवसापासून स्वर्णाचारीच सरदार बनून साथीदारांचे नेतृत्व करीत होता. जंगलात ते शिकारीला गेले होते. जेव्हां सैनिक वाघ व सिंहांचे पिंजरे घेऊन आले, आणि त्यांनी तिथल्या घटनांवर प्रकाश टाकला, तेव्हां तो स्तंभित झाला. त्याला वाटलं कीं आता कोणत्याही क्षणीं वीर सिंहाची सेना त्याच्यावर आक्रमण करुं शकेल. म्हणून त्यांच्या आक्रमणाला तोंड देण्याची तयारी त्याने सुरुं केली. समरबाहूच्या साथीदाराला वाटलं कीं ही त्यांची अक्षम्य चूक झाली. आपला बचाव करण्याच्या उद्देशाने त्याने स्वर्णाचारीला खोटी माहिती, जरा जास्तच तिखटमीठ लावून सांगितली. त्याने सांगितलं कीं त्या सैनिकांनी आपला अपमान केला आणि समरबाहूला देखील शिव्या दिल्या. त्यामुळें हा अपमान आम्हाला असह्य झाला आणि नाईलाजाने त्यांच्याशी लढावे लागले.

स्वर्णाचारी विचारांत पडला. जेव्हां इतर साथीदार तिथे पोंचले तेव्हां त्याने त्यांना सांगितले, ''आपण त्या राजाशी निष्कारण वैर ओढवून घेतलंय. आपल्या दृष्टीने ही चांगली घटना नाही. दोन्ही राजांकडून जे कांही झालं, ते प्रत्येकजण खुलवूनच सांगणार. किल्ल्याचे बांधकाम चालूं आहे. त्याच वेळेला मोठी सेना घेऊन राजा किल्ल्याला वेढा घालायचा प्रयत्न करील. अशा प्रसंगी समरबाहू महाराज इथें हजर नाहीत. किमान खड्गवर्मा व जीवदत्त जरी इथें हजर असते ना,



तरी आपण वीरसिंहाच्या सेनेशी सामना करूं शकलो असतो.''

स्वर्णाचारीची अटकळ खरी ठरली. पळून गेलेले प्राणीसंग्रहालयाचे अधिकारी व लंगडा सैनिक, वीरपूरच्या राजमार्गावरुन जाताजाता जोरजोरांत ओरडत होते, ''देश संकटात सांपडला आहे, फारच बाईट परिस्थिती आली आहे. राज्याला धोका आहे. शत्रू राजा जंगलात आकाशाला भिडेल असा उंच किल्ला बांधतो आहे. मोठी सेना घेऊन आपल्यावर हल्ला करण्यासाठीं चालून येणार आहे.''

त्यावेळेस राजप्रासादाच्या गच्चीवर राजा वीरसिंह मंत्र्यांबरोबर बोलत होता. यांची आरडाओरड ऐकून राजाला नवल वाटले. तितक्यांत अधिकारी व ते सैनिक किल्ल्याच्या दारापर्यंत पोंचले. पहारेकऱ्याने त्यांना घोड्यावरुन उतरुन आंत पायी जाण्यास सांगितले.

प्राणीसंग्रहालयाच्या अधिकाऱ्यांनी यावर संतापून म्हटले, ''अरे, काय करतो आहेस? एका बाजूला देश संकटात सांपडला आहे, शत्रूचा राजा कोणत्याही क्षणीं आपल्यावर चढाई करूं शकेल, आणि तूं इथें नियम पाळीत बसला आहेस. आमचा मोलाचा वेळ तू फुकट घालवतो आहेस कां?''

संधी साधून लंगडा सैनिक त्वरेने आंत शिरणार होता, पण पहारेकऱ्याने त्याच्या पोटांत कट्यार घुसवली. सैनिक घोड्यावरुन खाली पडला आणि, ''वीरसिंह महाराज की जय'' अशा घोषणा देऊं लागला.

मंत्र्याने हाताने खूण करीत पहारेकऱ्याला सांगितलं, ''त्या दोघांना लौकर किल्ल्यांत येऊं दे.''

अधिकारी व सैनिक राजप्रासादांत वरती आले आणि राजा व मंत्री यांना त्यांना विनयपूर्वक अभिवादन केले. तेव्हां मंत्र्याने अधिकाऱ्याला विचारले, ''देश संकटात सांपडला आहे? आपल्यावर कोण हल्ला करणार आहे?''

राजा व मंत्री यांना पुन्हां एकदा प्रणाम करुन अधिकाऱ्याने सांगितलं, ''महाराज, आपल्याला ठाऊकच आहे कीं मी आपल्या प्राणीसंग्रहालयाचा अधिकारी आहे. आपल्या राज्याच्या प्राणी-संग्रहालयासाठीं नवीन प्राणी व पक्षी पकडण्यासाठीं आम्ही जंगलात गेलो होतो. माझ्याबरोबर कांही सैनिकदेखील होते. तिथे पर्वतावरच्या किल्ल्याचा जो राजा आहे, त्याचा समरबाहू नांवाचा एक सैनिक उंटावर स्वार होऊन आला आणि आमच्यावरच त्याने हल्ला केला. आम्ही त्यांच्याशी निकराने लढलो आणि त्यांच्या कांही सैनिकांना आम्ही मृत्यूच्या दाढेंत ढकलले. कोणत्याही परिस्थितींत बांधत असलेल्या किल्ल्याच्या सुरक्षेसाठी प्रयत्न चालू होता.



जर वीरपूरचा राजा या लढाईत विजयी झाला असता. आणि त्यांचा पराभव झाला असता, तर निसटून जाण्यासाठीं म्हणून त्यांनी दोन भुयारी मार्गांची व्यवस्थादेखील केलेली होती. त्यांनी जंगलवासीयांना थोडेफार धन दिले होते, शिवाय रसदही पुरवली होती. त्याने जंगलवासीयांना सांगितलं कीं त्यांनी अशा एका गुहेंत लपून राहावे, कीं ज्या बाजूने शत्रूची सेना किल्ल्यांत प्रवेश करुं शकेल. वाघ व सिंह ज्या पिंजऱ्यांत बंद आहेत, ते सर्व आता जंगलवासीयांच्या ताब्यांत आहेत. त्यांना आज्ञा दिल्या आहेत कीं जेव्हां शत्रूची सेना त्या मार्गावरुन जाईल, तेव्हां ती हिंस्र जनावरे पिंजऱ्यां-तून मोकळी सोडायची म्हणजे ती सेनेवर तुटून पडतील. या संधीचा मोका साधून जंगलवासींना पुन्हां जंगलात पळून जाण्याची अनुमती दिली होती.

पण जर त्यांना परत जंगलात न जाता, समर-बाहूच्या सेनेस मदत करायची इच्छा असेल तर ती त्यांनी जरुर करावी. तसे केले तर त्यांना किंमती वस्तू भेट म्हणून दिल्या जातील.

स्वर्णाचारीने किल्ल्याच्या रक्षणासाठी योग्य ती सर्व प्रकारची खबरदारी घेतलेली होती. त्याच्यासाठी त्याने एक फार चतुर योजना आंखली. एके दिवशी सूर्योदयाच्या वेळीं त्याला बातमी मिळाली, कीं वीरपुरची सेना किल्ल्याच्या दिशेने पुढें येत आहे. जंगलात लपून बसलेल्या समरबाहूच्या साथीदारांनी स्वर्णाचारीला हा गुप्त संदेश पाठवला होता. स्वर्णाचारीने आपल्या लोकांना भाले व इतर शस्त्रें दिली आणि त्यांना आदेश दिला कीं हे काम अगदी चुपचाप व्हायला हवं!

थोड्या वेळानंतर वीरपुरचा सेनाध्यक्ष सेनेसहित पर्वताच्या पायथ्याशीं येऊन पोंचला. त्याने म्यानांतून तलवार काढली. आणि वर उभे असलेल्या समरबाहूच्या सैनिकांना पुकारत तो म्हणाला, ''अरे बदमाषांनो, मी वीरपूरच्या सेनाध्यक्ष आहे. तुम्ही सर्वजण आपापली शस्त्रें खाली टाका आणि पुढें या. नाहीतर सर्वजण नाहक प्राणाला मुकाल.''

डोंगराच्या कडयावर उभे असलेल्या समर-बाहूच्या साथीदारांनी कांही प्रत्युत्तर न करता शत्रुसेनेवर भाले, बरच्या फेंकायला सुरवात केली. एक भाला तर सेनाध्यक्षाच्या खांद्याला लागला.

-क्रमशः






# संन्याशाचे वरदान

निश्चयाचा पक्का विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला. त्याने झाडावरुन प्रेत खाली उतरवले आणि ते आपल्या खांद्यावर घेतले. तेव्हां प्रेतांत लपलेला वेताळ म्हणाला, "राजन्, अशा मध्यरात्रीं तू इतके कष्ट कां करतो आहेस ते मला समजत नाही. तुला हे करण्याची काम जरुर आहे? कोणतीतरी अद्भुत शक्ती मिळवण्याची तुला इच्छा आहे कां? की कुणाचेतरी कल्याण करण्याच्या हेतूने तू हे सारे करतो आहेस? परंतु असल्या अद्भुत शक्तींचे परिणामही मोठे विचित्र असतात हे तुला माहीत नसेल. त्यांचा प्रभाव वेळोवेळीं बदलत असतो. उदाहरण म्हणून तुला शंकर आणि कालीपाद नांवाच्या दोन व्यक्तींची कहाणी मी सांगतो. तुझा थकवा दूर करण्यासाठी ही गोष्ट ऐक." आणि तो पुढें गोष्ट सांगायला लागला.



''फार पूर्वीची गोष्ट आहे. वराळ देशांतल्या एका छोट्या गांवात धर्मपाल नांवाचा एक शेतकरी राहात होता. त्याला एक मुलगा होता. त्याचे नांव शंकर. शंकरची आई तो अगदी लहान असतानाच वारली होती. धर्मपालने त्याला अतिशय लाडाकोडांत वाढवला होता. असल्या आचरट लाडांमुळे त्याचे शिक्षण मुळींच झाले नव्हते. त्यामुळें शंकर अतिशय सुस्त व आळशी झाला. पित्याला वाटलं की त्याचे लग्न करावे म्हणजे तरी तो सुधारेल. म्हणून कनका नांवाच्या एका मुलीशी शंकरचे लग्न धर्मपालने करुन दिले.

कनकानेदेखील नवऱ्याला सुधारण्याची खूप पराकाष्ठा केली, पण कांहीही उपयोग झाला नाही. तो पोटभर जेवायचा आणि गांवभर भटकत, गप्पाटप्पा करुन संध्याकाळीं घरी परत येत असे. असल्या आळशी व निरुद्योगी मुलाशी आपले लग्न करुन दिले म्हणून ती सासऱ्यावर खूप चिडलेली होती. प्रत्येक बाबतींत ती सासऱ्याशी खरंखोटं करीत वाद घालीत बसे. उलट उत्तरें देई. सासऱ्याला हरतऱ्हेने त्रास देण्याचा प्रयत्न करीत होती. मनांतल्या मनांत तिने सासऱ्याचा सूड उगवण्याचा निश्चय केला होता.

कांही दिवसानंतर धर्मपाल मरण पावला. आता तर शंकरची परिस्थिती जास्तच कठीण झाली. कनका त्याच्यावर आपला अधिकार गाजवत त्याचा रागराग करुं लागली.

एक दिवस शहरांत राहाणारा शंकरचा एक मित्र त्याला भेटायला आला. शंकरने बायकोला सांगितले, ''आज माझा मित्र आलाय. तो माझ्याबरोबर जेवायला बसेल. तेव्हां तू त्याच्यासाठीही स्वयंपाक कर.'' हे ऐकून कनकाच्या अंगाचा तिळपापड झाला. ती जोरांत ओरडत म्हणूं लागली, ''तुम्हाला तर कवडी मिळवण्याइतकीही तुमची लायकी नाही. रोज तुम्हाला मी फुकट जेवायला घालतेच आहे. त्यांत आणखी तुमच्या मित्रासाठीही जेवण बनवूं कां? कुणीही आलागेला उपटसुंभ येऊन इथें त्याला जेवायला वाढायला ही कांही खाणावळ आहे कां?''

शहरांतून आलेला शंकरचा मित्र गोरामोरा झाला. कांहीही न बोलता तो तिथून निघून गेला. शंकरला हा अपमान अगदी असह्य झाला. बायकोच्या या वागण्याने तो फारच नाराज झाला व तसाच घर सोडून तो जंगलात निघून गेला.

शंकर जंगलातून जात होता. अंधार पडूं लागला. तितक्यांत त्याला एक आवाज ऐकूं आला. ''कोण आहेस तूं? अंधार पडायला लागलाय ते दिसत नाही कां तुला? जंगलात आणखी पुढें जाऊं नकोस.



धोक्याचे आहे.'' आवाजाच्या दिशेकडे शंकरने पाहिले.

जवळच्या एका उंच दगडावर एक संन्यासी आसनमांडी घालून बसला होता. लगबगीने शंकर त्याच्याजवळ गेला आणि त्याच्याकडे नीट निरखून पाहूं लागला. संन्याशाच्या चेहऱ्यावर एक अनोखे तेज स्पष्टपणें दिसत होते.

शंकर अगदी श्रद्धापूर्वक संन्याशाच्या पायाजवळ बसला आणि त्याने त्याला आपली रडकथा सांगितली. आपल्या भांडकुदळ बायकोबद्दलही त्याने सविस्तर सांगितले. तो पुढें म्हणाला, ''स्वामीजी, आता उरलेले आयुष्य या बायकोबरोबर घालवण्याइतकी सहनशक्ती माझ्यांत नाही. तिला सुधारण्याचा, एक चांगली पत्नी बनवण्याचा भार आता आपल्यावरच आहे. जर हे आपल्याकडून होणार नसेल तर मी इथेंच आपल्या



पायापाशी पडून राहीन आणि आपली सेवा करत इथेंच जन्म घालवीन.''

संन्याशाने प्रथम नाराजीने शंकरकडे पाहिले, आणि नंतर मात्र हंसतहंसत आपले डोळे बंद केले. शेजारी ठेवलेल्या कमंडलूमधले थोडे पाणी त्याने आपल्या हातावर घेतले, आणि, ''कनकाचा कजागपणा संपूर्णपणें बदलून जाऊं दे'' असं म्हणून हातांतले पाणी त्याने जमिनीवर शिंपडले.

शंकरला पुन्हां संन्याशाने सांगितले, ''या घोर अंधारातून जर तूं अरण्यांत पुढें गेलास तर तुझ्या जिवाला धोका आहे. तू परत फिरुन घरी जावेस हेच योग्य ठरेल. मी तुला खात्री देतो की आता तुझ्यासमोर कांहीही समस्या उभी राहाणार नाही. घरीं परत जा आणि आता तुझ्या पत्नीची वागणूक कशी आहे ते पाहा.''

शंकरने संन्याशाचे पाय धरले आणि तो घरी परत गेला. तोपर्यंत बरीच रात्र झालेली होती. शंकरला पाहून कनकाने त्याच्या पायावर लोळणच घेतली. रडतरडत ती म्हणाली, ''मला क्षमा करा. मी इतके दिवस तुम्हाला खूप त्रास दिला. जे बोलूं नये असंही मी तुम्हाला बोलत होते. माझ्या पापाला कांही प्रायश्चित्त नाही मिळणार.''

शंकरचा आनंद गगनांत मावेना. जो कांही बदल झाला तो संन्याशामुळें झाला होता. ''संन्याशाच्या वरदानामुळेंच तर तूं सुधारली आहेस.'' तो कनकाला म्हणाला. त्याची सविस्तर माहिती कळल्यावर ती आश्चर्यचकित होऊन म्हणाली, ''असं होय! मला वाटलं की फक्त देवदेवताच वरदान देतात. आता हे काम संन्याशीदेखील करायला लागले ना! खरंच, काळ किती बदलत चाललाय! कांही कां असे ना,



शेवटी वरदान ते वरदानच!'' नंतर ती आपल्या हाताकडे पाहात म्हणूं लागली, ''माझा रंग चांगला उजळ होऊं दे आणि माझा लठ्ठपणाही थोडा कमी होऊं दे, असा वर उद्यां संन्याशाकडे जाऊन मागून घ्या!''

आपल्या पत्नीची ही इच्छा पूर्ण करण्यासाठी, दुसऱ्याच दिवशी शंकर संन्याशाला भेटायला गेला. संन्याशाकडून त्याने तो वर मिळवला आणि शंकर घरी आला. कनकाला बघून त्याला आश्चर्याचा धक्काच बसला. कारण आता ती खूपच चांगली दिसायला लागली होती, जास्ती तरुण वाटत होती.

दुसऱ्या दिवशी कनकाने शंकरला सांगितले, ''मला कांही चांगला स्वयंपाक करता येत नाही. माझ्या हातचं जेवण कांही स्वादिष्ट होत नाही. माझ्या माहेरच्या सगळ्याच बायकांना चांगली रसोई रांधता येत नाही हे मात्र अगदी खरं! तुम्ही पुन्हां त्या संन्याशाजवळ जा आणि माझा स्वयंपाक उत्तम होईल असा वर मागून घ्या.''

या असल्या विरकोळ मागणीसाठी संन्याशाकडे जायची शंकरची इच्छा नव्हती. पण काय करणार? लाचार होऊन त्याला पुन्हां जंगलात जावे लागले. संन्याशाने हा वरदेखील एका आठवड्यानंतर कनकाने शंकरला सांगितले, ''आता मी चांगली दिसते. चांगला स्वयंपाकदेखील करूं शकते. पण उपयोग काय? आपली गरीबी आहे तशीच आहे. धनदौलतीशिवाय या गुणांचे कांही चीज आहे कां? तुम्ही आणखी एकदा त्या संन्याशाकडे जा आणि धनसंपत्तीसाठी याचना करा.''

आता मात्र शंकर जरा जास्तच चिडला. पण तिच्या हट्टामुळें तो संन्याशाला भेटायला जंगलात गेला. तिथें जाऊन पाहिलं तर संन्याशी त्या जागेवर नव्हता. त्याने आजूबाजूला जाऊन खूप शोधलं, पण संन्याशाचा कांही पत्ता लागला नाही. निराश होऊन तो घरी परत जायला निघाला. गांवातल्या चौकांत एका भोजनालयाजवळ एक गृहस्थ उभा होता. त्याने शंकरला विचारले, ''शंकर, आता सुखी आहेस ना? आता तुझे आयुष्य आरामांत चालले आहे की नाही?''

दाढीमिशा नसल्यामुळें शंकरने त्या संन्याशाला ओळखले नव्हते. जशी त्याला ओळख पटली, तशी तो म्हणाला, ''स्वामीजी, हे काय? आपली दाढी, मिशा, भगवी वस्त्रें त्यांचे काय झाले?''

संन्याशाने हंसत उत्तर दिले, ''माझं नांव कालीपाद आहे. कुणा विद्वानाने अगदी बरोबर म्हटलंय की अतिकुरूप स्त्रीशी संसार करता येतो. पण भांडकुदळ, कर्कश स्वभावाच्या स्त्रीबरोबर



राहाणें सर्वस्वी अशक्य आहे. माझ्या पत्नीमध्यें हे दोन्ही दोष आहेत. मला ते सहन झाले नाही. मी घर सोडून संन्यास घेतला. परंतु या सहा वर्षांच्या तपस्येचे फळ म्हणजे माझ्या तोंडून एखादी गोष्ट निघाली की ती खरी ठरूं लागली. यामुळें तुझा बिघडलेला संसार सुधारला. हे पाहून माझ्या मनांत आलं की माझाही संसार मी सुधारूं शकेन. म्हणून मी ती भगवी वस्त्रें टाकली. आता मी माझ्या गांवी जायला निघालो आहे.''

संन्याशाचे हे बोलणें ऐकून शंकर एकदम हताश झाला. तो म्हणाला, ''स्वामीजी, सहा वर्षे आपण ध्यानमग्न होतात. आणखी एक दिवस तसंच पुढें चालूं द्या की! यामुळें तुमचं कांही बिघडणार नाही. मला खात्री होती की तुम्ही आम्हाला धनसंपदेच्या प्राप्तीचा वर द्याल आणि आम्हाला सुखांत ठेवाल. हाच वर तुमच्याजवळ मागण्यासाठी तर मी जंगलात



आपल्याला भेटायला गेलो होतो. तिथूनच हा परत येतो आहे.''

त्याचे बोलणें ऐकून कालीपाद जोराने हंसायला लागला. नंतर तो म्हणाला, ''शंकर, आपल्या वाडवडिलांनी म्हटलं आहे की कष्टाचं फळ नेहमीच मधुर असतं. सुस्ती नांवाच्या राक्षसीला तूं दूर पळवून लाव. भरपूर मेहनत कर. जे काम तुला येतंय, ते कर. त्यांतच सुख आहे. आपण पुन्हां केव्हांतरी अवश्य भेटूं. पण मला आत्ता निघालं पाहिजे. कारण माझं गांव इथून बरंच दूर आहे.'' हे सांगून कालीपाद तिथून निघून गेला.

आपल्या गांवी पोंचायला त्याला खूप रात्र झाली. आपल्या घराजवळ तो आला त्यावेळीं घराच्या खिडक्या उघड्या होत्या. आंतले आवाज बाहेर स्पष्टपणें ऐकूं येत होते. त्याची पत्नी बालामणी, दहा वर्षांची मुलगी आणि आठ वर्षांचा मुलगा आपापसांत बोलत होते.

''तुमचे आजोबा भरपूर संपत्ती मागे ठेवून गेले खरे, पण त्याचा काय फायदा? त्याची देखभाल करणारा कुणी इथें हजर नाही. तुमच्या दोघांच्यावर कुणाचा वचक नाही, म्हणून तुम्हाला नीट शिस्तही लागत नाही. आणखी आठदहा वर्षांनंतर तुमची लग्नें करायची वेळ येईल. या सगळ्या जबाबदाऱ्या मी कशा बरं सांभाळूं शकेन? एवढा भार मला सोसवेल तरी कां? तुमचे वडील तर फारच कठोर निघाले. आता हे बरीक खरं, की मी फटकळ तोंडाची बाई आहे. जे मनांत येतं ते लागलीच बोलून मोकळी होते. पण म्हणून काय झालं? असल्या बायकांचे नवरे लगेच कांही संन्यास घेतात कां? मग ज्यांचे नवरे आग्यावेताळासारखे रागीट

असतात, त्यांच्या बायकांनी काय करायला हवं? त्यांनी काय विहिरीत उड्या टाकून जीव द्यायचा? मला तर वाटतं की मेल्याशिवाय कांही माझी सुटका व्हायची नाही." असं मोठ्याने बडबडत बालामणी आपली व्यथा त्या छोट्या मुलांना ऐकवत होती.

मग एक मोठा आवाज झाला. असं वाटलं की कुणीतरी आपलं डोकं फोडलंय. क्षणभर थांबून कालीपाद उघड्या खिडकीपाशी आला आणि म्हणूं लागला, "अग बाला, मी घरी परत आलोय. दार उघड." आणि तो जोरजोराने दरवाजा ठोठावूं लागला.

वेताळाने ही गोष्ट सांगून विचारले, "राजन्, शंकरला कोणतेही खास परिश्रम न घेता आपल्या पत्नीचा कर्कश व कठोर स्वभाव बदलण्यांत यश मिळाले, आणि त्याची समस्या दूर झाली. पण असं वाटतं की सहा वर्षे तपस्या करुनही कालीपादला आपल्या पत्नीचा स्वभाव बदलता आला नाही. असं कां झालं?

जेव्हां वैद्य एखाद्या रोगाची चिकित्सा करुन त्याचा रोग दूर करूं शकतो, तेव्हां तसल्याच रोगाने जरी तो स्वत: ग्रस्त असला तरी तोच इलाज कां करूं शकत नाही? ही गोष्ट जरा चमत्कारिक नाही कां? माझ्या या शंकेचं उत्तर तुला माहीत असूनही जर तूं मौन पत्करलेस तर तुझ्या मस्तकाचे तुकडे तुकडे होतील."

विक्रमार्कानं त्याचा संदेह दूर करण्याच्या उद्देशाने म्हटले, "असं वाटतं की सुरवातीला संन्यासी कालीपादला आपल्या तपस्येवर तेवढा विश्वास नव्हता. पण जेव्हां त्याच्या लक्षांत आलं की त्याच्या वाणीमधें शक्ती आहे आणि त्याचा शंकरला चांगला उपयोग झाला, तेव्हां कालीपादला घरी परत जावेसे वाटूं लागले. त्याने विचार केला की त्याच्या इच्छा शक्तीचा त्याच्या पत्नीवरदेखील प्रभाव पडेल व ती एक चांगली पत्नी बनेल. पण तसे घडले नाही. त्याची बायको आपल्या मुलांना कजाग स्त्रिया आणि रागीट नवरे यांच्याबद्दल सांगत होती. कालीपादला वाटलं की त्यांत सच्चाई आहे. म्हणून त्याने दार वाजवून पत्नीला बोलावले. पत्नीच्या बाबतींत त्याचे कांही चालले नाही. कारण पत्नीच्या बाबतीत त्याची शक्ती उपयोगी पडली नाही. कारण तपस्येच्या शक्तीचा उपयोग स्वार्थी हेतूने करायची इच्छा त्याच्या मनांत उफाळली. अशा शक्तींचा उपयोग वास्तविक इतरांसाठीच व्हायला हवा असतो. त्यांतच परमार्थ आहे."

राजाचे मौनभंग करण्यांत वेताळ सफल झाला. तो प्रेतासहित अदृश्य झाला आणि पुन्हां झाडावर जाऊन बसला.

**(आधार: गायत्रीदेवींची रचना)**



# भारत-गाथा

एका महान परंपरेची झलक -
युगायुगांतील सत्याचा शोध

## २०. निसर्गातल्या पावित्र्याचा शोध



संदीप नि शामला खुषींत होते. त्यांच्या शहराजवळच्याच एका पर्यटनस्थळाजवळ, त्यांच्या आजोबांना, प्रा. देवनाथांना नेण्यांत ते यशस्वी झाले होते. ती जागा एका तलावाच्या कांठावर होती. तलावाशेजारीच एक हिरव्या वृक्षराजीने नटलेली एक छानशी टेकडी होती. मुलांच्याबरोबर त्यांचे मित्रही आले होते.

हवा अतिशय प्रसन्न होती. तलावाभोवतीची बरीच झाडें रंगीबेरंगी फुलांनी लगडलेली होती. संध्याकाळचा दमलेला सूर्य लौकरच अस्ताचलाला जाणार होता.

"किती पवित्र देखावा आहे हा!" सूर्यास्ताकडे पाहातपाहात शामला उद्गारली.

"तुझा शब्द अगदी समर्पक आहे पोरी" प्राध्यापक आनंदाने म्हणाले. "आपल्या परंपरेच्या वारशाचा एक महत्वाचा धागा म्हणजे आपल्या पूर्वजांनी निसर्गाचा पवित्र दृष्टीने विचार केलेला होता. ही प्रवृत्ती आपली सद्विवेकबुद्धी वाढवते. आणि या दृष्टीकोनांतूनच मुनींना हिमालय पवित्र वाटला. त्या बर्फाळ दुर्गम प्रदेशांत त्यांनी देवालये बांधली, मठांची स्थापना केली. हिमालयाच्या उत्तुंग शिखरांपुढे ते नतमस्तक झाले व त्या शिखरांना त्यांनी आदराचे स्थान दिले. उदाहरणार्थ, कैलास पर्वत हे शिवाचे वसतीस्थान ठरले."

"आणि अशा पवित्र ठिकाणीं दर्शनाला येणाऱ्या निरपराध भक्तांवर खुनी माणसें हल्ला

# भारताची ओळख

## प्रश्नावली

सणावारांचे दिवस सुरुं झाले आहेत. कांही सणांचे धार्मिक महत्व असते, कांही सण सुगीचे असतात. तर कांहींना सामाजिक संदर्भ असतात. ह्या महिन्याची प्रश्नावली भारतीय सणांवर आधारित आहे. ते सण कोणते ते ओळखा पाहूं.

१. विष्णुच्या दशावतारांपैकी एक अवतार कुठल्या सणाशी संबंधित आहे?
२. १४ वर्षे वनवासांत राहून रावणवध केल्यानंतर राम अयोध्येस परत आले, ही घटना एका सणाशी जोडलेली आहे. हा सण कोणता? २००१ साली तो कोणत्या तारखेला येतो आहे?
४. मुलांच्या शिक्षणास या विवक्षित दिवशी सुरवात होते. तो कोणता दिवस? बंगाली लोक बुद्धीच्या देवतेची आणखी एका वेगळ्या सणाच्या दिवशी पूजा करतात. तो सण कोणता?
४. बहीणभावांना कोणते दोन सण एकत्र आणतात?
५. पारसी लोक कुठल्या दिवशी त्यांच्या धर्मगुरुचा जन्मदिवस साजरा करतात?
६. मुसलमान आपल्या धर्मगुरुचा जन्मदिवस साजरा करतात जो एका वेगळ्या नांवाने प्रसिद्ध आहे. ते नांव कोणते?
७. 'इस्टर' सणाचे महत्व काय?
८. 'बुद्ध पौर्णिमा' व 'वैशाखी पौर्णिमा' यांचे तिहेरी महत्व आहे. ते काय आहे?
९. या सणाला तमिळनाड मधील बायका तांदूळ शिजवून तो पातेल्यामधून उतूं जाऊं देतात. हा सण कोणता?
१०. 'मकरसंक्रांत' हा सण दक्षिण भारतांतील एका देवळांत घडणाऱ्या असाधारण घटनेशी निगडित आहे. ते देऊळ व ती घटना कोणती?

(उत्तरें पुढील अंकी)

### सप्टेंबर महिन्याच्या प्रश्नावलीची उत्तरें

१. नालंदा
२. रविंद्रनाथ टागोर, १९०१मधे
३. कलाक्षेत्र, रुक्मिणीदेवी अरुंडेल.
४. १९८६
५. सिमला
६. पंडित मदनमोहन मालवीय
७. अलीगड मुस्लिम युनिव्हर्सिटी
८. प्राथमिक शिक्षण किंवा नवी तालीम
९. मौलाना अबुल कलाम आझाद
१०. १८५७
११. १८३५ - लॉर्ड मॅकॉले
१२. डॉ. माल्कम आदिशेषय्या
१३. द्रोणाचार्य
१४. चेरुथुरुत्ती मधील कलामंडलम्
१५. तक्षिला





# देवी भागवत

सूत म्हणाला, "ब्रह्माच्या विनंतीवरुन योगनिद्रा तिथून निघून गेली व विष्णू ध्यानांतून जागे झाले. त्यांच्या या सांगण्यावर मुनींना एक गोष्ट समजली नाही. त्यांनी विचारले, "आम्ही ऐकलं होतं कीं ब्रम्हा, विष्णु, महेश्वर, हे सृष्टीच्या स्थितीचे कारक आहेत. आम्ही हे ही ऐकलं होतं कीं या तिघांमधे विष्णु सर्वोत्तम आहेत. असे विष्णू जेव्हां योगनिद्रेंत ध्यानस्थ असतात, तेव्हां त्यांच्या शक्ती व तेजस्वितेला काय होतं? त्यांच्यापेक्षां जास्त प्रभावी शक्ती आदिशक्तीला कुठून मिळाली? तुम्ही तर सांगत आहात कीं आदिशक्ती हे समस्त कारणांचं मूळ आहे. यातली खरी गोष्ट कोणती तेच आम्हाला कळेनासं झालं आहे!"

त्यावर सूताने असं सांगितलं:

"ऋषींनो, आपल्या प्रश्नाचं उत्तर लक्षपूर्वक ऐका. नारद व इतर महामुनींना देखील आदिशक्तीचा अपार प्रभाव ठाऊक नसल्याकारणाने, विष्णूलाच सारेजण सर्वशक्तीमान समजत होते. पण हा केवळ त्यांचा भ्रम होता. याप्रमाणें इतरांच्या बाबतीत ही त्यांच्यात मतभिन्नता होती. कांहींनी शंकराला भगवान मानले तर कांहींनी सूर्याला! कोणी अग्नीला सर्वश्रेष्ठ स्थान दिले तर कोणी चंद्रास भगवान मानले. अशा प्रकारे प्रत्येकांनी आपलीच मते बरोबर आहेत असे मानले. पण असे कोणीही मानले नाही कीं आदिशक्ती हीच खरी शक्ति आहे. ही शक्ती शिव, विष्णू, सूर्य, वायू, व अग्नींतही दृष्टीस पडते.

ह्या शक्तीमुळेंच विष्णू जेव्हां ध्यानांतून मोकळे झाले तेव्हां ब्रह्मदेवास पाहून विष्णूने विचारले, "बाळ, तपश्चर्या सोडून तूं इथे कां आलास? तुला कसली चिंता निर्माण झाली आहे?"

"आता मी तपश्चर्या कशी करुं शकणार? तुमच्या दोन्ही कानांतून मधु व कैटभ नांवाचे दोन राक्षस जन्मले आहेत आणि मला मारुन टाकण्याची धमकी देत आहेत. त्यांनी युद्धाची घोषणाही केली आहे." ब्रह्मदेवाने सांगितले.

"या लहानशा गोष्टीने तूं इतका घाबरलास?

२. मधु कैटभ का वध-शुक का जन्म



माझ्या हातून कित्येक मोठे मोठे राक्षस मारले गेले नाहीत कां?'' विष्णु असं म्हणत होता तोंच तिथे ते दोघे राक्षस आले आणि ब्रह्मदेवाला म्हणूं लागले. ''इथें लपलास होय? तुला शोधणें हे कांही कठीण काम आहे थोडेच? हा तुझं रक्षण करुं शकेल कां? अरे एकटाच कां नाही मरत? आपल्याबरोबर ह्यालाही कशाला घेऊन जातोस?''

विष्णुने ब्रह्मदेवाला आपल्या पाठोपाठ येण्याची खूण केली. नंतर तो राक्षसांना म्हणाला, ''जे तोंडाला येईल ते उन्मत्तपणें तुम्ही बोलत आहात. थांबा, आत्ताच तुम्हा दोघांचा समाचार घेतो.'' त्या दोघांशी युद्ध करण्यास विष्णु तयार झाला.

विष्णु आणि मधु या राक्षसाच्यामधे तुंबळ युद्ध सुरुं झाले. आकाशांतून देवी हे युद्ध पाहात होती. समुद्र खवळला होता. मधुला थकलेला पाहून कैटभ विष्णुबरोबर युद्ध करुं लागला. आता दोघेही राक्षस आपली सर्व शक्ति एकवटून विष्णूबरोबर निकराने लढूं लागले. तेव्हां विष्णूचे सामर्थ्य कमी पडूं लागले, व त्याला थकवा वाटूं लागला. काय करावे हे त्याला सुचेना. ह्या राक्षसांना कसे ठार करावे ते कांही त्याला कळेना. आता तर त्याला स्वरक्षणाचीच काळजी वाटूं लागली.

विष्णुला विचारांत पडलेला पाहून ते राक्षस म्हणाले, ''युद्ध करण्याची शक्ती नसेल तर आमचा दास हो.

आमच्या समोर वांकून आम्हाला नमस्कार कर. तूं जर असं केलं नाहीस तर प्रथम तुला मारून टाकूं व नंतर ब्रह्मदेवाला!''

विष्णुने शांतपणे उत्तर दिले, ''थकलेल्याला, पळून जात असलेल्याला, घाबरलेल्याला, रणांगणात खाली पडलेल्याला मारणें, हा वीरांचा धर्म नाही. तुम्ही दोघेजण आहात व मी एकटाच आहे. थोडा वेळ थांबून मी पुन्हां तुमच्याशी युद्ध करीन. तुम्हाला दोघांना युद्ध धर्म म्हणने काय, ते ठाऊक नाही कां?''

''ठीक आहे. थोडा वेळ विश्राम कर. आम्हीही थांबून विश्रांति घेऊं.'' दोघा राक्षसांनी सांगितले. तेव्हां विष्णूने आपल्या अंतर्दृष्टीने जाणले कीं ह्या दोन्ही राक्षसांना अमरपदाचे वरदान मिळाले आहे. ह्यांच्याबरोबर युद्ध करण्यांत शक्ती खर्च करणें योग्य नाही. ह्यांना कसे ठार करता येईल याचा तो विचार करत होता. कारण वरदानामुळें त्यांना मरण आले नसते. मग यांना कशा रितीने मारता येईल?'' त्याला प्रश्न पडला होता. अखेर त्याला जगदंबेची आठवण आली. त्याने जगदंबेची प्रार्थना करुन म्हटले, ''माते, तुझ्या कृपेशिवाय मी त्या दोन राक्षसांना मारणे शक्य नाही. कदाचित तेच मला ठार करतील कारण तूच त्यांना वरदान दिले होतेस. आता ह्यांना कसे मारता येईल ते तूच मला सांग.'' विष्णूने मनांतल्या मनांत जगदंबेला विचारले.

विष्णु असा दीन झालेला पाहून देवीला हंसू आले. ती म्हणाली, ''राक्षसांना मी आपल्या मायेने झांकून टाकीन. तेव्हां त्यांच्यावर विजय मिळवता येईल.''



राक्षस विष्णुला म्हणूं लागले, ''अरे, आपला पराजय होईल म्हणून इतका कां घाबरतो आहेस? जय किंवा पराजय हे शूर वीराच्या जीवनांत स्वाभाविक आहेत. तुझ्या हाती कितीतरी राक्षस नाही कां हारले? विजय कांही नेहमीच मिळतो असं नाही.''

हे ऐकन विष्णू एकदम चिडला आणि त्यांना जोराने गुद्दे मारुं लागला. ते दोघे रक्तबंबाळ झाले आणि त्यांनी विष्णूच्या छातीवर आपली पूर्ण शक्ती पणाला लावून ठोसे मारले. अशा प्रकारें दोघांच्यात भयंकर असे मुष्टियुद्ध झाले. विष्णू अतिशय थकला होता. त्याने त्याच वेळेला आकाशांत असलेल्या देवीला पाहिले.

देवीने त्याच क्षणीं जणूं ते कामदेवाचे बाण असावेत, अशी मोहक मायादृष्टी राक्षसांच्यावर पसरली. झालं, राक्षस युद्धाचा विचार विसरले आणि मोहपाशांत अडकले. असा स्थितींत विष्णु त्यांना म्हणाला, ''मी कितीही राक्षसांशी सामना केलेला असला तरी तुमच्यासारखे युद्धकलेंत निपुण असलेले वीर आजपर्यंत पाहिलेले नव्हते. तुमचे युद्धकलेतले नैपुण्य पाहून मी फारच प्रसन्न झालो आहे. तुमची कोणतीही इच्छा असली तरी ती सांगा मी ती पूर्ण करीन.''

देवीच्या प्रभावामुळें राक्षस मायामोहांत पडले होते. विष्णुच्या या बोलण्यावर ते आणखीनच चेकाळले. त्यांनी उत्तर दिलं, ''तुझ्याकडे कांही मागणाऱ्यांतले आम्ही थोडेच आहोत? तुलाच कांही हवं असलं तर सांग. आम्ही तुझी इच्छा पूर्ण करुं.''

''मी मागीन ते द्याल तुम्ही मला? तर मग माझं युद्धकलेतलं नैपुण्य पाहून जर तुम्हाला आनंद झाला असेल, तर माझ्या हातानेच तुम्ही मरण स्वीकारा.'' विष्णुने मागणी केली.

विष्णुचे बोलणे ऐकून राक्षस स्तंभित झाले.



नंतर नीट विचार करुन ते म्हणाले, ''आपला शब्द पाळण्याचे लक्षांत असेल तर ध्यानांत ठेवा तूही आम्हाला वर द्यायचे कबूल केले आहेस. आम्हाला तू अशा विशाल प्रदेशांत मार कीं जिथें अजिबात पाणीच नसेल. या अटीवर आम्ही तुझ्या हातून मरण्यास तयार आहोत.''

विष्णु यावर हंसला. त्याने आपली मांडी थोपटली व त्या मांडीचा आकार वाढवत तो म्हणाला, ''राक्षसांनो, या पुढे!''

राक्षसांनी आपले शरीर विष्णूच्या मांडीपेक्षांही मोठे केले. राक्षस आपल्या शरीराचा आकार वाढवीत गेले तर विष्णू आपली मांडीमोठी करीत होता. पाहातापाहाता विष्णुच्या मांड्या राक्षसांच्या शरीरापेक्षां मोठ्या होत गेल्या. तेव्हां विष्णुने आपल्या चक्राचे स्मरण केले व त्याने राक्षसांचा वध केला. त्यांची मस्तकें पाण्यांत पडली व तिथें एक टेकडी उत्पन्न झाली. तेव्हांपासून जमिनीला मेदिनी म्हणूं लागले.



## व्यासांची तपस्या

सूताने सांगितलेल्या साऱ्या कथा ऐकल्यानंतर मुनींनी त्याला सांगितले, ''तुमच्याकडून आम्हाला कितीतरी गोष्टी ऐकायला मिळाल्या व समजल्या. परंतु पुत्रप्राप्तीसाठी तपस्या करण्यास जेव्हां व्यास निघाला, त्याची कथा तुम्ही अद्याप सांगितली नाहीत.''

सूताने व्यासाच्या तपस्येच्याबद्दल मुनींना खालील कथा सांगितली. ''नारदाने सांगितलेल्या मंत्राचा जप करीत स्वर्णगिरीवरच्या कर्णिकार वनांत व्यासाने तपस्येला प्रारंभ केला. आपली संपूर्ण शक्ती एकवटून जेव्हां ते तपस्या करूं लागले, तेव्हां भूमी व आकाश कांपायला लागले. ते घाबरून देवीदेवतांना घेऊन शिवाच्याकडे गेले आणि त्यांनी त्याला विनंती केली, ''व्यास तीव्र रुपाच्या तपस्येंत मग्न आहेत. आम्हा लोकांच्यावर बहुतेक मोठे संकट येऊन पडणार आहे असं वाटतं. आपण आमचे रक्षण करा.''

''तपस्व्यांचे अनहित कधी करूं नये. कारण ते कधीही दुसऱ्याचे अनहित करीत नाहीत. व्यास पुत्रप्राप्तीसाठी तपस्या करीत, माझे स्मरण करीत आहेत.'' शिवाने देवतांना समजावले आणि व्यासांच्या समोर शिवाने दर्शन दिले. व्यासांची इच्छा पूर्ण झाली, व ते आश्रमांत परत गेले.

त्यांनी अग्नी प्रज्वलित केला व नंतर विचारले, ''अशी कुणी स्त्री आहे कां जी या अग्नीसारखा तेजस्वी पुत्र देऊं शकेल?'' कांहीही असो, स्त्री एक अडथळाच असते, असा विचार त्यांच्या मनांत आला तेव्हां त्यांना आकाशांत घृताची अप्सरा दिसली. तिच्याजवळच उभा असलेला कामदेवही त्यांनी पाहिला. व्यासांच्यावर कामदेवाचा प्रभाव पडला होता. ते स्वतःशीच म्हणूं लागले, ''ही तर मला धोका देण्यासच आली असावी. हिच्याबरोबर जर मी सुखाने जीवन जगायला सुरवात केली तर यामुळें काय नष्ट होईल? हिला जर मी माझी पत्नी



बनवली तर इतर मुनी मला हंसतील कां? ही सुंदर अप्सरा मला आपला मानून मला सुखी करेल कां? कीं ही माझा पुरुरवा करील? उर्वशीसारखी मला सोडून जाईल आणि विरहवेदनेने तळमळत ठेवेल?''

घृताची अप्सरेला पण व्यास आपल्याला शापबीप देतील याची भिती वाटत होतीच. तिने पोपटाचे रुप धारण केले आणि ती उडून गेली. अरणीच्या घर्षणाने व्यास अग्नी प्रज्वलित करीत असताना शुकाचा जन्म झाला. त्याला पाहून व्यास एकदम उद्गारले. ''काय चमत्कार आहे! हा सारा शिवाचा महिमा असावा.'' व्यास त्या पुत्राला घेऊन गंगा नदीवर गेले. त्यांनी त्या पुत्रास स्नान घातले व सर्व आवश्यक संस्कार पुरे केले. त्यावेळेस आकाशांत देवांनी दुंदुभि वाजवल्या, व पृथ्वीवर पुष्पवृष्टी केली. नारद वगैरे मुनींनी गायन केले. रंभा आदि अप्सरांनी नृत्य केले.

घृताची अप्सरा या पोपटाचे रुप धारण करणाऱ्या स्त्रीच्यामुळें पुत्र जन्मला, म्हणून व्यासाच्या पुत्राचे नांव शुक पडले. बालक हळूं हळूं वाढत गेला. शुकाच्यासाठी आकाशाने मृगाजिन, दंड व कमंडलू खाली टाकले. व्यासांनी आपल्या पुत्रास यज्ञोपवीत दिले, संस्कार केले, व बृहस्पतीकडून वेदाभ्यास करवला.

विद्याभ्यास पूर्ण झाल्यावर शुक आपल्या पित्याकडे आला. अध्ययन पूर्ण करून आलेला आपला पुत्र पाहून व्यास संतुष्ट झाले. शुकाचा विवाह करावा असे त्यांच्या मनांत आले. परंतु शुकाने या विचाराला संमती दिली नाही. उलट आपल्या पित्याकडून वैराग्य तत्वाचा उपदेश मिळावा अशी इच्छा व्यक्त केली.

व्यासांनी शुकाला उपदेश केला, ''मनाला ताब्यांत ठेवताना ते शुद्ध व पवित्र ठेवणे हाच मुक्तीचा (मोक्षाचा) मार्ग आहे. मुक्ती प्राप्त होण्यासाठी दुसरा कोणताही मार्ग शोधण्याची आवश्यकता नाही. न्यायाने धन मिळविणें, खोटे न बोलणें, शरीर व मन शुद्ध व पवित्र ठेवणें, अतिथींचा आदर करणें, योग्य प्रमाणांत दान देत राहाणें, ही गृहस्थाची कर्तव्ये आहेत. यांचे पालन करणाराला मुक्ती प्राप्त होते. म्हणून वसिष्ठासारख्या महर्षींनी गृहस्थाश्रम स्वीकारला. तू देखील चांगली कन्या पाहून विवाह करावास व आपल्या पितृ-देवतांना संतुष्ट करावेस.''

इतके समजावून सांगितल्यावर देखील शुकाचे मन वैराग्य तत्वांतच गुंतले होते. हे लक्षांत आल्यावर व्यासांनी पुन्हां त्याला सांगितले, ''पुत्रा, मी फार पूर्वी देवी भागवत या ग्रंथाची रचना केली होती. त्यामुळें मुक्तीचा मार्ग समजतो. तो ग्रंथ तू वाच आणि ज्ञानी हो.'' आणि ते त्या ग्रंथाविषयी पुढें सांगू लागले.

क्रमशः



## भारतवीर प्रश्नावलीत भाग घ्या आणि आकर्षक बक्षिसे मिळवा

# भारताचे वीर-२

तुम्हाला खेळ आवडतात ना? मग तुमच्या आवडत्या खेळांडूबद्दलची ही प्रश्नावली सोडवा.

तीन बिनचूक उत्तरांना बक्षिसादाखल सायकली मिळतील.*

1 १९३२च्या लॉस अँजेलिस ऑलिंपिक्समधें यांनी भारतीय संघाचे नेतृत्व केले आणि हॉकीचे सुवर्णपदक जिंकले. १९२६ ते १९४८ पर्यंतच्या आंतरराष्ट्रीय हॉकी सामन्यांमधें त्यांनी एक हजारापेक्षां जास्त गोल्स केलेले आहेत. त्यांचे नांव काय? ..............

2 हा प्रथम ज्युनियर विंबल्डन टेनिस विजेता होता आणि आता भारताच्या लोकप्रिय जोडीतला एक खेळाडू आहे. त्याचे नांव सांगा.

..............

3 १०,००० पेक्षां जास्त धावा प्रथम काढणारा 'लहानखुरा श्रेष्ठी' 'लिटल मास्टर' कोण आहे?

..............

4 हा विश्वचषक विजेता बुद्धिबळपटु प्रत्येक भारतीयाला माहीत आहे. तुम्हालाही तो ठाऊक असणारच.

..............

5 यांनी १९८० मधें ऑल इंग्लंड बॅडमिंटन चॅंपियनशिप जिंकून जगाच्या नकाशावर भारताचे नांव नोंदवले. ओळीने नऊ वर्षे राष्ट्रीय विजेतेपद जिंकणाऱ्या या खेळाडूचे नांव काय?

..............

प्रत्येक प्रश्नाचे उत्तर दिलेल्या ओळीवर लिहा. या पांच वीरांपैकी तुम्हाला कोणता वीर आवडतो व कां? 'इतिहासांतला माझा आवडता वीर' याबद्दल दहा शब्द लिहा.

..............

..............

..............

स्पर्धकाचे नांव : ..............

वय : .............. वर्ग : ..............

पत्ता : ..............

पिन : .............. फोन : ..............

स्पर्धकाची सही : ..............

पालकांची सही : ..............

हे पान नीट कापून ५ डिसेंबर पूर्वी पुढील पत्त्यावर पाठवा.

HEROES OF INDIA QUIZ - 2
CHANDAMAMA INDIA LIMITED
No.82, DEFENCE OFFICERS COLONY
EKKATTUTHANGAL, CHENNAI - 600 097.

सूचना :

१. ही स्पर्धा ८ ते १४ वयोगटांतल्या मुलांसाठी आहे.
२. सर्व पत्रांतून फक्त तीन विजेते निवडले जातील. विजेत्यांना योग्य उंचीच्या सायकली बक्षिस दिल्या जातील. एकापेक्षां जास्त अचूक उत्तरें आल्यास विजेत्यांची निवड "माझा आवडता वीर" या वर्णनावरून केली जाईल.
३. परीक्षकांचा निर्णय अंतिम राहील.
४. त्याबद्दल वेगळा पत्रव्यवहार केला जाणार नाही.
५. विजेत्यांना पोस्टाने निर्णय कळवला जाईल.





# चांगला चोर

विद्याधरला लहानपणापासूनच काव्याची फार आवड होती. कवितांची पुस्तकें जिथें जिथें मिळतील, तिथून ती आणून तो कविता वाचत बसे. त्यांतल्या बऱ्याच कविता तो पाठ करायचा. वयाच्या दहाव्या वर्षापासूनच तो स्वत: काव्यरचना करायला लागला, व आपल्या गोड आवाजांत गाऊन तो आपली कविता लोकांना ऐकवूं लागला. एक दिवस त्याचा एक नातेवाईक त्यांच्या घरीं आला. विद्याधरच्या कविता ऐकून त्याला फार आनंद झाला. तो विद्याधरच्या आईवडिलांना म्हणाला, "विद्याधरला दंडकारण्या-तल्या वाणीनाथांकडे पाठवा. सहा वर्षांत ते त्याला सर्व शास्त्रांत पारंगत करतील. तुमच्या या मुलाचे भविष्य ते उज्वल करून त्याला लौकिक मिळवून देतील."

या नातेवाईकाचा सल्ला विद्याधरच्या आईवडिलांना पटला. त्यांनी त्याला दंडकारण्यांतल्या गुरुकुलांत पाठवले. सहा वर्षे तो तिथें शिक्षण घेत होता. त्याने अतिशय मन लावून अभ्यास केला. त्याच्या चांगल्या स्वभावामुळें गुरु वाणीनाथ त्याच्यावर प्रसन्न होते. त्याच्या हुशार बुद्धिमत्तेचे त्यांनी कौतुक केले. आठवड्यानंतर विद्याधर घरी परत जाणार होता. तेवढ्यांत एक दुर्घटना घडली.

वाणीनाथांचे शिष्य व विद्याधर एक दिवस कंदमुळे व फळें आणण्यासाठी जंगलात गेले. इकडेतिकडे फिरत असताना त्यांनी एका चोराला पाहिले. ते कांही प्रवाशांना लुटत होते. वाणीनाथांच्या शिष्यांना पाहून ते चोर पळूं लागले. विद्याधर एका चोराचा पाठलाग करूं लागला. तो चोर एका वृक्षाच्या मागे गेला आणि दिसेनासा झाला. त्याला शोधत विद्याधर त्या वृक्षामागे गेला. तिथें एक मुनी ध्यानस्थ बसलेले होते. विद्याधरला वाटले कीं हाच तो चोर असावा. तो त्या मुनीला म्हणाला, "मला फसवायचा प्रयत्न करूं नकोस. वेष बदललास तरी चेहरा मला ओळखता येईल कीं!" असें म्हणून त्याने त्या मुनीची दाढी जोराने ओढली.

त्या मुनीचा तपोभंग झाला. त्याने डोळे उघडले.

'वसुंधरा'



सारा प्रकार समजल्यानंतर मुनीने विचारले, ''अरे मूर्खा, मुनी आणि चोर यांतला फरक जर तुला कळला नाही, तर तूं कसला विद्यावान? मला चोर समजण्याची चूक तू केलीच आहेस. त्याबद्दल मी तुला शाप देतो. एक वर्षभर दररोज एक अपराध करून चोरासारखे जीवन तुला जगावे लागेल. जर तू असे केले नाहीस, तर तुला जे शिक्षण मिळाले आहे ते तू विसरून जाशील.''

विद्याधरने मुनीचे पाय धरले व त्यांची क्षमा मागितली. पण मुनींनी त्याच्यावर दया केली नाही. शेवटी विद्याधर आश्रमांत परत आला आणि गुरु वाणीनाथांना त्याने सर्व हकीकत सविस्तर सांगितली.

वाणीनाथांनी त्याला धीर देऊन म्हटले, ''भाग्यामधे जे व्हायचे असते ते होणारच! त्याबद्दल दुःख करून किंवा गप्प बसण्याने कांही फरक पडत नाही. एक वर्षभर जर तू कांही अपराध केला नाहीस, तर तुझे शिक्षण व्यर्थ होऊन जाईल. मी सांगतो ते ऐक. तू कांभोज नगरांत जा. तिथें पुष्कळ श्रीमंत लोक आहेत. आणि जिथें अगणित संपत्ती असते, ती कांही सर्वस्वी प्रामाणिकपणें मिळवलेली असतेच असं नाही. तू असल्या घरांतून चोऱ्या कर. एक वर्षभर तूं असे अपराध करीत राहा. पण एवढं मात्र कर. कांहीही करून तू पकडला जाणार नाहीस याची काळजी घे. हे अपराध करीत असताना या चोरीच्या कलेतल्या खुब्या व बारकावे शिकून घे. हीदेखील एक विद्या आहे. तुला येतील ते सारे अनुभव ताडपत्रांवर लिहून ठेव. त्यामुळें भविष्यांत राज्यकर्त्यांना व त्यांच्या गुप्तचरांना त्याचा फार मोठा फायदा होऊं शकेल. चोर चोऱ्या कसे करतात व चोरांच्या मनोवृत्ती कशा असतात हे त्यांना कळेल.''

गुरूच्या सांगण्यावरून विद्याधर कांभोज नगरांत गेला. आपली चतुर बुद्धी वापरून, दररोज चोरी करण्याची पद्धत बदलत तो चोऱ्या करूं लागला. नगरांत त्यामुळें गोंधळ सुरुं झाला. एक चलाख चोर नगरांत आला आहे अशी चर्चा सुरुं झाली. सैनिकांनी त्याला पकडण्याचे खूप प्रयत्न केले, पण विद्याधर त्यांच्या हाती लागला नाही.

गुरुने सांगितल्याप्रमाणें आपल्या चोरीबद्दलची सारी माहिती तो ताडपत्रांवर लिहून ठेवीत होता. ती पत्रें त्याने अतिशय जपून, लपवून, ठेवली होती. एव्हाना तो श्रीकर नांवाच्या एका मध्यमवर्गातल्या गृहस्थांच्या घरीं राहूं लागला होता. त्याचे ज्ञान व शहाणपण पाहून त्या घरांतली मंडळीच नव्हे तर आजूबाजूचे शेजारीदेखील आश्चर्यचकित होत असत. त्याचे वागणें इतके सभ्य व सुसंस्कृत होते, की कुणालाही त्याचा संशय आला नसता. अशा तऱ्हेने दिवस जात होते.

श्रीकरला एक चौदा वर्षांची, सोनेरी बाहुली-सारखी देखणी व गोड मुलगी होती. विद्याधरच्या कविता वाचून ती आनंदित होत असे. त्याच्या तोंडून त्याच्या कविता ऐकताना ती देहभान विसरून जात असे. एकदा दिवसभर तो तिला कुठे दिसला नाही.



म्हणून सहजच त्याला शोधत ती त्याच्या खोलींत शिरली. तिथें तिला कांही ताडपत्रें पडलेली आढळली. तिने ती वाचायला घेतली, तेव्हां तिच्या लक्षांत आले कीं नगरांतला महाचलाख चोर हा दुसरातिसरा कुणी नसून खुद्द विद्याधरच आहे. तिला आश्चर्य वाटले आणि मनाला थोडा धक्काही बसला. ती ताडपत्रें घेऊन ती खोलीबाहेर पडली. तेवढ्यांत विद्याधर तिथें आला. काय घडलंय ते त्याला लगेच समजले.

विद्याधर तिला म्हणाला, ''मी या नगरांत उद्यांपर्यंतच राहाणार आहे. तोपर्यंत माझ्याबाबतींत दुसऱ्या कुणालाही कांहीही कळता कामा नये. आता तुला माझ्याबद्दल समजले आहेच. पण मी कांही तुला जिवंत ठेवणार नाही. मी तुझी हत्या कशी केली ते कुणाला कळणारदेखील नाही!''

श्रीकरची मुलगी घाबरली. ती थरथर कांपू लागली व म्हणाली, ''तुम्हीं उद्यां काय करणार आहात ते लिहीलेले आहे, नि मी ते वाचले आहे, तरीदेखील मी कुणाला कांहीही सांगणार नाही. माझ्यावर विश्वास ठेवा! मला मारूं नको हो!''

विद्याधरने तिच्या बोलण्यावर विश्वास ठेवला व तिला जाऊं दिले. परंतु तिने आपला शब्द पाळला नाही. जे झाले ते तिने आपल्या पित्याला सविस्तर सांगितले. तिच्या पित्याने नगराच्या पहारेकऱ्यांकडे ही तक्रार केली. दुसऱ्या दिवशी जेव्हां विद्याधर दुपारच्या वेळेला चोरी करीत होता, त्यावेळेला सैनिकांनी त्याला पकडले. कारण त्याचा थांगपत्ता त्यांना माहीत होता. सैनिकांनी विद्याधरला तुरुंगात टाकले.

या बातमीमुळें नगरांत एकच गोंधळ माजला. नगरपालाने सर्व नागरिकांची एक जाहीर सभा बोलावली. विद्याधरने आपली कथा त्यांना सांगितली. सारी कहाणी ऐकल्यानंतर नगरपाल म्हणाले, ''तुझ्या सांगण्यावर कांही मी विश्वास ठेवणार नाही. तरीदेखील तू सांगतो आहेस त्या गुरु वाणीनाथाकडे



मी माझा माणूस पाठवीन व खरी माहिती त्यांच्याकडून मागवीन. आमचा संशय तुलाच दूर करायला लागेल. तू विद्वान आहेस. तू असे कसे समजतोस कीं गुरुने वर दिल्यामुळें तुझे अपराध झांकले जातील व लोक कांहीही करणार नाहीत? तू आता शेवटच्या अपराधाच्या वेळेला पकडला गेला आहेस. तेव्हां गुरुने तुला दिलेला वर आता निष्प्रभ झाला आहे.''

त्यावर विद्याधरने उत्तर दिले, ''मी माझ्या अपराधाचे प्रायश्चित्त घेणे टाळणार नाही व गुरुजींच्या वराचा फायदा घेणार नाही. म्हणूनच मी केलेल्या प्रत्येक चोरीची हकीगत मी लिहून ठेवलेली आहे. मी फक्त संपन्न घरांतून चोऱ्या केल्या. सामान्य व्यक्तींचे मी नुकसान केलेले नाही. त्यांच्या घरांतून चोरी केलेली नाही. मी चोरलेले सारे धन सुरक्षित ठेवलेले आहे. शापाच्या भितीमुळें मला अपराध करावे लागले. मुदत संपल्यानंतर मी चोरीचे धन ज्याचे त्याला परत करणार आहे. अशा वागण्यामुळें माझ्या पापांचे प्रायश्चित मला मिळेल

असा माझा विश्वास आहे.'' ''नगरपाल हंसून म्हणाला, ''जेव्हां तू श्रीकरच्या मुलीवर विश्वास ठेवलास त्याच क्षणीं तुझ्या विश्वासाला तडा गेला आहे. जर खरोखरीच तुला शापाची भिती वाटत असती, तर तू तिची हत्या केली असतीस. तूं तसं केलं नाहीस. म्हणून तुझ्या सांगण्यावर माझा विश्वास बसत नाही.''

त्यावर विद्याधरने दोन्ही हात जोडून म्हटले, ''महाशय, आपण माझे म्हणणें नीट लक्षपूर्वक ऐकून घ्या. मी अशाच गोष्टी चोरल्या कीं ज्या मला परत करता येतील. श्रीकर यांच्या मुलीची मी हत्या करूं शकलो असतो. पण तिचे प्राण मला परत देता आले नसते. ते सामर्थ्य माझ्यांत नाही. म्हणून मी तिला मारले नाही. फक्त तिला मारण्याची मी धमकी दिली. तिला न मारल्यामुळें माझी वर्षभराची मेहनत वाया गेली. या शापामुळें मी माझे ज्ञान विसरुन जाईन व पुन्हां अज्ञानी होईन, हे माहीत असून देखील मी तिला मारले नाही.'' त्यांचच मला आश्चर्य वाटतंय'' नगरपालांनी म्हटलं. ''तर मग माझं म्हणणं पुढे ऐका. चोरांच्यामधेदेखील चांगले चोर असतात. त्यांना नाईलाजास्तव चोऱ्या करणें भाग पडते. कधी ना कधी चोरीची लूट त्या मालकाला परत करावी अशी इच्छा त्यांच्या मनांत असते. जी लूट परत देणे अशक्य असते, त्याला ते स्पर्शदेखील करीत नाहीत. मी मुनीच्या शापामुळें चोर बनलो, पण मी चांगला चोर आहे. कांहीजण गरिबीच्या शापाची शिकार होतात व चोर बनतात. उपजीविकेसाठी लाचार होऊन ते चोरी करतात. अशा लोकांच्या मनामधें परिवर्तन आणण्यासाठी त्यांना मदत करण्यासाठी माझी ही कहाणी त्यांच्या उपयोगी पडेल.'' विद्याधरने त्यांना खुलासा केला.

त्याच्या या बोलण्यावर तिथें उपस्थित असलेल्या नागरिकांनी टाळ्या वाजवल्या. नगरपालांनी विद्याधरची सुटका केली. इतकेच नव्हे तर त्याचा सत्कारदेखील केला.

चोऱ्या करीत असताना विद्याधरने आपले जे अनुभव लिहून ठेवलेले होते, त्यामुळें अधिकाऱ्यांना व गुप्तचरांना त्याचा साहजिकच फायदा झाला. ते अनुभव वाचल्यानंतर अधिकाऱ्यांना चोरांच्यावर वचक ठेवता आला व चोऱ्यांचे प्रमाण खूपच कमी झाले. त्यानंतर राज्यांतल्या चोऱ्यांची संख्या अगदीच नगण्य झाली. कधीमधी एखादी भुरटी चोरी झाली, तरी त्यांत कुणाची हत्या वगैरे होत नव्हती.







# यक्षपर्वत

## 10

*(वीरपुरच्या राजाच्या आज्ञेनुसार सेनाध्यक्ष कांही घोडेस्वार व सैनिकांना घेऊन गेला. त्याने पर्वतावर राहाणाऱ्या स्वर्णाचारी व समरबाहूच्या अनुयायांना आपल्याला शरण येण्यास सांगितले. परंतु समरबाहूच्या अनुयायांनी आपला पराजय मान्य केला नाही, आणि त्यांनी वीरपुरच्या सैनिकांवर धडाधड भालेबरच्यांचा वर्षाव सुरुं केला. त्यांतला एक भाला सेनाध्यक्षांच्या खांद्याला लागला व ते घायाळ झाले!) - त्यानंतर पुढें*

खांद्यात भाला घुसला आणि सेनाध्यक्ष किंचाळून घोड्यावरून खाली पडला. त्याबरोबर त्याला लागलेला भालाही बाजूला पडला. सैनिकांनी त्याला दूर नेले व त्याच्या जखमेवर मलमपट्टी करण्यास सुरुवात केली.

समरबाहूच्या अनुयायांची प्रशंसा करीत स्वर्णाचारी म्हणाला, ''पहिल्याच हल्ल्यांत आपण शत्रूला धूळ चारली आहे. खरं तर आपण इथें एकूण फक्त सव्वीसजणच आहोत; पण शत्रूला मात्र वाटत असेल कीं आपली संख्या खूप मोठी असेल.''

हे बोलणे ऐकून समरबाहूच्या अनुयायांपैकीं एकाने म्हटले, ''महामंत्रीजी, शत्रूने पर्वतावर चढण्याचा जरी प्रयत्न केला तरीसुद्धां आपले जंगलातले सहकारी त्यांना अनेक तऱ्हेने त्रास देत राहातील, आणि त्यांना पुढें जाऊं देणार नाहीत. तसेच वाघ-सिंह देखील त्यांच्यावर हल्ला करतील, व त्यांना सैरावैरा पळायला लावतील.''

समरबाहूचे दुसरे दोन अनुयायी म्हणाले, ''महामंत्रीजी, आज्ञा द्या; आम्ही सर्वजण मिळून त्यांच्यावर भाल्यांचा मारा करून त्यांना त्रस्त करूं आणि त्यांचे घोडे पकडून आणूं.''

स्वर्णाचारी त्यांना समजावत म्हणाला, ''शत्रूची संख्या आपल्या दसपट आहे तेव्हां उतावळेपणा करणें बरोबर होणार नाही. आपले सर्व उंट पर्वताच्या पायथ्याशी सुरक्षित ठेवलेले आहेत ना?''



"हो तर. ते सर्व एकाच ठिकाणीं सुरक्षित आहेत. आपले दोन पहारेकरी त्यांच्यावर देखरेख करून त्यांना सांभाळत आहेत. शत्रू तिकडे व आम्ही इकडे आहोत. हे बरोबर आहे ना?" समरबाहूच्या अनुयायांना विचारले.

त्यांचे बोलणे ऐकून स्वर्णाचारी हंसून म्हणाला, "युद्ध संपलं आहे असे मात्र समजू नका." आणि त्याने वीरपुरचे सैनिक घोड्यावर स्वार होत आहेत तिकडे बोट दाखवले. दोन सैनिक जखमी झालेल्या सेनापतीला उचलून घोड्यावर बसवीत होते आणि पर्वतावर चढण्यासाठी ते सोपा मार्ग शोधत होते हे या मंडळींच्या लक्षांत आलं.

स्वर्णाचारीने समरबाहूच्या अनुयायांना सावध राहाण्यास सांगितले आणि शत्रूच्या सैनिकांवर बरच्या, भाले फेंकण्यासाठी तयार राहाण्यास सांगितले. त्यानंतर जिथें जंगली साथीदार, पिंजऱ्यांत बंद केलेले सिंह व वाघ होते, तिथें तो एका अनुयायाला घेऊन गेला.

सिंहाचा पिंजरा एका गुहेच्या दारासमोरच होता. दुसऱ्या गुहेच्या दारासमोर वाघांचे पिंजरे होते. त्या पिंजऱ्यावर दोन दोन जंगलातले पहारेकरी बसलेले होते.

स्वर्णाचारीला पाहून जंगलवासीयांचा सरदार म्हणाला, "वीरपुरचे सैनिक पर्वत चढून जसेही जवळ येतील, पिंजऱ्याची दारे उघडली जातील आणि आमचे लोक गुहेच्या वरच्या भागांतून पळून जातील. ही क्रूर जनावरे भुकेली आहेत. ती शत्रूवर तुटून पडतील आणि त्यांना मारतील."

त्याच्या या योजनेवर स्वर्णाचारी फारच खूष झाला. नंतर तो समरबाहूच्या अनुयायांजवळ परत गेला. तिथून त्याने पर्वताच्या खालच्या बाजूकडे नजर टाकली. वीरपुरच्या सेनाध्यक्षाच्या आज्ञेनुसार त्यांचे सैनिक पर्वतावर चढूं लागले होते. त्यांच्यापैकीं कांहींजणांच्या जवळ धनुष्य-बाण दिसत होते.

जेव्हां समरबाहूचे अनुयायी भाले, बरच्यांचा मारा करीत होते, तेव्हां ते सैनिक चालायचे थांबत, आणि उलट बाण सोडीत होते. तेवढ्यांत कांही घोडेस्वार व सैनिक पर्वताच्या मागील बाजूने वर चढूं लागले.

धोका कुठून आहे हे स्वर्णाचारीच्या लक्षांत आले. समरबाहूच्या अनुयायांना धीर देत तो म्हणूं लागला, "अरे शूर वीरांनो, तुमच्यापैकीं कांहीजणांनी शत्रूवर मोठेमोठे दगड खाली ढकला, नि त्यांचा मार्ग रोखा. कांहीजण त्यांच्यावर भाले, बरच्या फेंकत राहा. हे काम सतत करीत राहा."

समरबाहूचे अनुयायी मोठमोठे दगड खाली ढकलत होते. पर्वत चढून येणाऱ्या वीरपुरच्या सैनिकांवर हे दगड गडगडत येऊं लागले. परंतु



त्यांपैकीं बरेचसे मोठे दगड पर्वताच्या खडबडीत मार्गावर आपटून इकडे तिकडे फेंकले गेले. हे पाहून वीरपुरचे सैनिक खूष होऊं लागले, आणि दुप्पट उत्साहाने पुढें जोराने जाऊं लागले. त्यांच्या पाठोपाठ येणाऱ्या घोडेस्वारांच्या नंग्या तलवारी होत्या. व ते आपल्या राजाचा जयजयकार करीत पुढें चालले होते.

इतक्यांत एकाएकी वाघांची डरकाळी व सिंहाची गर्जना कानावर पडली. वाघ व सिंह पिंजऱ्याच्या बाहेर येऊन वीरपुरच्या सैनिकांवर तुटून पडले. या अचानक हल्ल्याला तोंड देण्याची त्यांची तयारी नव्हती. एकदम खूप खळबळ माजली. मागून येणारे घोडे एकदम घाबरले, आणि विथरुन जाऊन इकडेतिकडे पळूं लागले. कांही घोड्यांचा तर पाय घसरला व घोडेस्वारांसकट ते दरींत कोसळले. आता वाघ व सिंहाच्यासमोर कुणीच उरले नव्हते, म्हणून ते जवळच्या जंगलात पळून गेले.

जे कांही झालं, ते पाहून स्वर्णाचारी फारच खूष झाला. त्याने समरबाहूच्या अनुयायांना सांगितलं, "मेलेले आणि जखमी झालेले सैनिक सोडले तरी अजून शत्रूचे बरेच सैनिक पायथ्याशी आहेतच. आता जेव्हां ते आपल्यावर हल्ला करतील, तेव्हां त्यांच्याशी दोन हात करण्याची शक्ती आता आपल्यामधे उरलेली नाही. आपले उंट जे खालच्या बाजूला बांधलेले आहेत. त्यांच्यावर स्वार होऊन आपण जंगलात जर पळून गेलो तर तेच आपल्या दृष्टीने योग्य ठरेल. कदाचित, तिथें आपल्याला ते क्षत्रिय तरूण आणि समरबाहू महाराजदेखील भेटूं शकतील. आता इथून अगोदर निघा आणि जिथें उंट आहेत तिथें जाऊन थांबा." असं म्हणून तो स्वतः पुढें निघाला



व त्याच्यामागून बाकीचे सर्वजणही निघाले.

परंतु जेव्हां ते ठरवलेल्या जागी पोंचले, आणि उंटावर स्वार होऊन येऊं लागले, तेव्हां त्यांना दोनशे गजांच्या अंतरावर वीरपुरचे चाळीस पन्नास घोडेस्वार भाले, तलवारी घेऊन त्यांच्याच दिशेने पुढें येत आहेत असे दिसले.

हे दृश्य पाहून स्वर्णाचारीने आपली तलवार उपसली आणि आपल्या साथीदारांना पुकारून तो म्हणाला, "अरे मर्दांनो, माझ्याबरोबर चला. पर्वतावरच्या देवीमातेला आपण शत्रूचा बळी देऊन प्रसन्न करूं या. समरबाहू महाराज की जय!" नंतर ते सर्वजण पुढें जाऊं लागले. त्याच वेळेला वीरपुरचे घोडेस्वारही "वीरसिंह महाराज की जय" अशा घोषणा देत मोठ्या वेगाने पुढें आले आणि समरबाहूच्या अनुयायांवर तुटून पडले.

स्वर्णाचारीदेखील मोठ्या धैर्याने त्यांच्याशी लढण्यास पुढें सरसावला. ते पाहून समरबाहूचे

लोकही मोठ्या आवेशाने त्याला मदत करण्यास पुढें आले व शत्रूशी निकराने लढूं लागले. दोन्ही बाजूंच्या सैनिकांच्यामधें जोराची लढाई झाली.

ही लढाई थोडावेळ चालली होती. त्यांत समरबाहूचे कांही अनुयायी व वीरसिंहाचे कांही सैनिक जखमी झाले, ते घोड्यावरून व उंटाच्या पाठीवरून खाली पडले. स्वर्णाचारीने आपल्या लोकांना सावधगिरीचा इशारा दिला, व समरबाहूच्या उरलेल्या जेमतेम दहापंधरा अनुयायांसह शत्रूची फळी फोडून त्यांनी जवळच्या अरण्यांत पलायन केले.

तोपर्यंत तिथें जखमी सेनाध्यक्ष पोंचले. पळून गेलेल्या स्वर्णाचारी व त्याच्या अनुयायांबद्दल ते म्हणाले, "शेवटी त्यांची संख्या किती लहान होती! तुम्ही लोकांनी त्यांना पळून जाऊं कसे दिले? हा आमचा घोर अपमान आहे. आमची नालायकी, असमर्थता, यांचे हे प्रतीक आहे. मी ज्या अश्वनायकाला पाठवलं होतं, तो आहे कुठे? जिवंत आहे की मेला आहे?" सेनाध्यक्षांनी जोरजोराने ओरडत आपला राग व्यक्त केला.

हा आरडाओरडा ऐकून तो अश्वनायक सेनाध्यक्षाच्या समोर येऊन उभा राहिला. त्याच्याकडे तीक्ष्ण नजरेने पाहात सेनाध्यक्ष म्हणाला, "त्याच्या अंगावर ना वस्त्र होतं, ना उपवस्त्र! किरकोळ, दुर्बळ दिसणारा तो माणूस, वीरपुरच्या शूर सैनिकांना चकवून जंगलात पळून गेला! त्याने आपले कांही सैनिकदेखील मारण्याचं साहस दाखवलंय. किती लाजिरवाणी गोष्ट आहे ही! तुम्ही लोकांनी तर कहर केला आहेत. तुम्ही जिवंत कसे राहिलात? काय? महाराजांना जर हे कळलं, तर ते आपल्या दोघांना फांसावर चढवतील, आहे ठाऊक?"

त्या अश्वनायकाने कांपऱ्या आवाजांत उत्तर दिलं, "सेनाध्यक्ष, तो कांही सामान्य माणूस नव्हता. दिसायला जरी साधा, अशक्त आणि प्रभावहीन वाटला, तरी तो अतिशय शूर, बुद्धिमान व चतुर आहे. त्याचे अनुयायी तर त्याला महामंत्री म्हणून हांक मारतात. त्याचे कौशल्य, त्याचा पराक्रम पाहिलात तर तो एक महाभारतातला योद्धाच वाटतो."





अश्वनायकाचे बोलणें पूर्ण होण्यापूर्वीच सेनाध्यक्षाने तार सप्तकांत ओरडून सांगितलं, "बंद कर तुझं काव्य! गप्प बैस! ताबडतोब पांच सैनिक बरोबर घे आणि जंगलात त्यांना शोध. ते जिथें लपले असतील तिथून त्यांना शोधून काढ. तोपर्यंत मी या पर्वतावरचा किल्ला माझ्या ताब्यांत घेईन आणि वीरपुर राज्याचा झेंडा त्या किल्ल्यावर फडकवीन. नंतर आपल्या सैनिकांना घेऊन मी जंगलात येईन. माझ्या आज्ञेचं लागलीच पालन करा!"

अश्वनायक तिथून निघाला. परंतु तोपर्यंत स्वर्णाचारी बराच दूरवर गेलेला होता. वाटेंत त्यांना एक सरोवर दिसलं. स्वर्णाचारी व समरबाहूचे अनुयायी त्या ठिकाणीं थांबले. त्यांनी पाणी प्यायलं आणि उंटांनादेखील पाणी पाजले. नंतर त्यांना चरण्यासाठीं त्यांनी मोकळे सोडले.

असाच अर्धा तास गेला. समरबाहूचे दोन अनुयायी खाण्यासाठीं फळें शोधूं लागले. सरोवराच्या बाजूला येत असलेले कांही अस्वल वेषधारी त्यांना दिसले. हे दोघे अनुयायी पळतपळत स्वर्णाचारीकडे गेले व त्याला ही बातमी त्यांनी सांगितली.

"छान झालं, हे लोक दिसले ते! या असल्या लोकांनीच आपल्या समरबाहू महाराजांना कैद केलेलं होतं." स्वर्णाचारीने सांगितलं. तेवढ्यांत अस्वलासारखा वेष केलेले लोक सरोवराजवळ येऊन पोंचले.

त्यांच्यापैकी एकाला तिथें चरत असलेला उंट दिसला. तो पाहून तो म्हणाला, "वृकेश्वरी माते, आता तूच आम्हाला वांचव." त्याने तो उंट इतरांना दाखवला.

दुसऱ्याच क्षणीं स्वर्णाचारी व समरबाहूचे



अनुयायी झाडीमधून "समरबाहू महाराज की जय" अशा गर्जना करीत बाहेर आले आणि हातांत भाले घेऊन त्यांच्या दिशेने सरसावले. त्यांना पाहून अस्वलवेषधारी हताश झाले व म्हणूं लागले, "वृकेश्वरी माते, तू हे काय केलंस? आता आम्ही तर संपलोच आहोत." असं म्हणून ते पळून परत जाऊं लागले.

परतीच्या वाटेवर त्यांना खड्ग, जीवदत्त, समरबाहू आणि गुरु भल्लूक दिसले, स्वर्णाचारीबद्दल त्यांनी सगळी माहिती दिली "स्वर्णाचारी तर किल्ला बांधण्याच्या कामांत गर्क असेल. तो कशाला आत्ता इथें आला आहे? कांहीतरी अडचणींत तर तो सांपडला नसेल ना? आणि म्हणून इकडे पळून आलाय?" जीवदत्ताने आपली शंका प्रकट केली.

"स्वर्णाचारी अतिशय राजनिष्ठ आहे. असं असेल, कीं अस्वल वेषधाऱ्यांपासून मला वांचवायला तो निघाला असेल नि इकडे पोंचला



असेल.'' समरबाहूने मोठ्या समाधानी सुरांत सांगितलं.

असं बोलतबोलत ते सरोवराजवळ आले. त्यांना पाहून स्वर्णाचारी अतिशय आनंदित झाला. तो त्यांच्याजवळ पळतपळत आला आणि म्हणाला, ''समरबाहू महाराज, क्षत्रिय वीरांनो, माझा आपल्याला प्रणाम.'' त्याने त्यांना वाकून प्रणाम केला.

''स्वर्णाचारी, किल्ल्याचं बांधकाम पूर्ण होण्यापूर्वीच तू अरण्यांत फिरायला आला आहेस असं वाटतंय.'' जीवदत्त म्हणाला.

''क्षत्रिय वीरांनो, त्या किल्ल्यावर शत्रूंनी कबजा केला आहे. तो त्यांच्या ताब्यांत आहे. मी आणि समरबाहूचे सैनिक मिळून किल्ला राखायची शर्थ केली. त्या प्रयत्नामधें कांही अनुयायी मारले गेले.'' स्वर्णाचारीने दुःखी आवाजांत सांगितलं.

''आता किती अनुयायी शिल्लक राहिले आहेत?'' खड्गवर्माने विचारलं. ''मी धरून आम्ही सोळाजण वाचलो आहोत. आमचे उंटही इथें आहेत.'' स्वर्णाचारीने उत्तर दिले.

''काय म्हणालास? किल्ल्यावर शत्रूने आक्रमण केलंय? किल्ल्यावर कबजा मिळवलाय? हा कोण शत्रू आहे?'' समरबाहूने दांतओंठ खात, मिशांवर हात फिरवत कर्कश आवाजांत विचारले.

स्वर्णाचारीने सारा वृतांत ऐकवला.

सारी सविस्तर माहिती ऐकल्यानंतर समरबाहूने एक दीर्घ उसासा टाकला आणि म्हटले, ''याचा अर्थ असा होतो कीं किल्ल्याबरोबर आपण जे धन एकत्र जमवलं होतं, ते ही शत्रूच्या ताब्यांत गेलं आहे. वीरपुरचे महाराज क्षमा करण्याच्या लायकीचे नाहीत. त्यांचा निकाल लावलाच पाहिजे. खड्ग, जीवदत्त, माझं हे लक्ष्य तुम्हा दोघांच्या मदतीशिवाय पूर्ण होऊं शकणार नाही.''

जीवदत्ताने क्षणभर विचार केला आणि नंतर तो म्हणाला, ''समरबाहू, ज्यांनी आपलं राज्य गमावलं आहे अशांच्यापैकीं कांही तू नाहीस. तर मग वीरपुरच्या राजाचा सूड उगवण्याचा प्रश्नच येत नाही. माझं तर असं मत आहे कीं या अरण्याच्या एखाद्या भागांत तू आपल्या अनुयायांच्या बरोबर राहायला लाग. आणि शेती करून आरामांत आयुष्य घालव. यामुळें तुझ्या सर्व चिंता मिटतील.''

समरबाहूने यावर कांहीही उत्तर दिले नाही. खाली मान घालून तो निमूटपणें उभा होता. तेव्हां स्वर्णाचारी मधेंच म्हणाला, ''क्षत्रिय वीरांनो, माझी एक विनंती आहे. यांच्या नांवावरून हे स्पष्ट समजतं, कीं हे एखाद्या मोठ्या क्षत्रिय घराण्यांतले आहेत. अशा राजाकडे मंत्री बनून काम करायची माझी तीव्र इच्छा आहे. माझी खात्री आहे कीं जर तुम्ही मदत केलीत तरच हे शक्य होऊं शकेल.

वीरपुरच्या राजाला या डोंगराळ प्रांतातून दूर पळवून लावता येईल. इथली पर्वजराजी व आसपासच्या जंगलांतली गांवे, एकत्र करून त्यांचे राज्य स्थापन करणें शक्य आहे. आणि हे सगळं जमेल, फक्त जर तुम्हा लोकांची मदत मिळाली तरच!''

जीवदत्ताने खड्गवर्माकडे बघत म्हटलं, ''खड्ग, यांना ही मदत आपण करणं योग्यच ठरेल.'' नंतर तो स्वर्णाचारी व समरबाहूकडे वळून म्हणाला, ''प्रथम आपण वीरपुरचा सैनिकांचा समाचार घेतला पाहिजे. आपले लोक त्यांच्यापेक्षां संख्येने कमी आहेत खरे, म्हणून त्यांच्याशी सरळ युद्ध करून जिंकण्याची आशा करायलाच नको. इतर कांहीतरी मार्गाने हे शक्य होईल. त्याच्यासाठीं त्यांचे सगळे सैनिक गुरु भल्लूकाच्या गुहेंत जमले पाहिजेत.''

''हे कसे शक्य होईल, जीवदत्त महाराज?''

स्वर्णाचारीने आपली शंका व्यक्त करीत म्हटले. ''त्याला एक मार्ग आहे. गुरू भल्लूकच्या शिष्यांपैकी दोनतीन शिष्य वीरपुरच्या सैनिकांच्या प्रमुखाकडे जातील, आणि त्याला सांगतील कीं आपण सगळेजण त्या गुहेंत लपलेलो आहोत. आपल्याला मारण्यासाठीं ते त्या गुहेंत प्रवेश करतील.'' एवढें सांगून जीवदत्त अचानक थांबला आणि नंतर गुरू भल्लूकाला त्याने सांगितलं, ''भल्लूक, कोणत्याही परिस्थितींत तुझे शिष्य तुझी आज्ञा पाळतीलच. अगदी खरंखरं सांग, हे म्हणणे बरोबर आहे ना? तुझे शिष्य गुरुची अवज्ञा करणाऱ्यांपैकीं तर नाहीत ना?''

हा प्रश्न ऐकून गुरू भल्लूक संतापला व उठून म्हणाला, ''महाराज, पर्वताच्या कड्यावरून जरी उडी टाकायला मी सांगितले तरी ते माझी आज्ञा पाळतील. आता इथें कांही फार उंच असा डोंगर नाही, तेव्हां माझ्या शिष्यांपैकी कुणीही एकाने समोरच्या वृक्षावर चढावे आणि सर्वात वरच्या फांदीवरून खाली उडी मारावी.''

जीवदत्त 'नको नको' म्हणत होता तरी एक अस्वलवेषधारी पळत पळत आला, समोरच्च असलेल्या मोठ्या वृक्षावर सरसर चढला आणि शेवटच्या फांदीवर पोंचून तिथूनच ओरडला, ''गुरु भल्लूक, माझा शेवटचा प्रणाम स्वीकारावा.'' असं म्हणून त्याने खाली तोंड वळवून उडी मारली.

- क्रमशः



वेताळ कथा

# विश्वसेनची दिशाभूल



पवनकुमार
बेल्लारी

निश्चयी राजा विक्रमार्क पुन्हां झाडाजवळ गेला. त्याने झाडावरून प्रेत खाली उतरवले आणि आपल्या खांद्यावर घेतले. तो स्मशानाच्या दिशेने चालूं लागला तेव्हां प्रेतांत लपलेला वेताळ त्याला म्हणाला, "राजन्, मी इतक्या वेळां तुला सांगतो आहे, तरी तूं हे धाडस कशासाठी करतो आहेस? मध्यरात्रीं या स्मशानांत जाण्याचे साहस कां करतो आहेस? तुला माहितच आहे कीं इथें भुतेंप्रेते आहेत, भयंकर हिंस्र जनावरे आहेत; हीं कोणत्याही क्षणीं तुझे नुकसानच करतील. एका



क्षत्रियाने तरी असला धोका पत्करूं नये. एका क्षत्रियाला उचित ठरेल असा हा निर्णय नाही. तुझे हे कठोर परिश्रम पाहून मला तर असं वाटतं आहे कीं तू आपल्या राज्याचा विस्तार करण्याचा प्रयत्न करतो आहेस. त्याच्यासाठी मोठी सेना एकत्र जमवण्याचे ठरवतो आहेस, मंत्रतंत्रांची मदत घेऊन धनसंपदा जमवतो आहेस. पण हे कधीही शक्य होणार नाही. हे एक केवळ दिवास्वप्नच राहील. तुला सावध करून, तुला योग्य मार्ग दाखवण्याचे माझे कर्तव्य आहे. म्हणून तुला मी विश्वसेन नांवाच्या एका राजाची गोष्ट सांगणार आहे. जेव्हां त्याच्या सार्‍या इच्छांची पूर्ति होणार होती, तेव्हां त्याने चंचलपणाने आपल्याच पायावर धोंडा पाडून घेतला. केल्यासवरल्या गोष्टींची माती झाली. मला भीती वाटते आहे कीं तू देखील त्या राजाच्यासारखाच शेवटच्या क्षणीं कांहीतरी चूक करून ठेवशील, आणि तुझ्या सगळ्या आशेचे रूपांतर निराशेंत होईल. तू आपला विचार, धोरण सुधार, जास्ती सावध राहा, स्वतःचा विचार कर. नाहीतर तुझा सर्वनाश होईल. तुझा थकवा कमी होण्यासाठीं राजा विश्वसेनची कथा लक्षपूर्वक ऐक." आणि नंतर वेताळाने पुढील गोष्ट सांगितली.

विश्वसेन हा मैथिली राज्याचा राजा होता. त्याला शिकारीची फार आवड होती. किंबहुना, त्याला शिकारीचे वेड होते. राज्यकारभारांतल्या महत्वाच्या गोष्टींकडे तो लक्ष न देता सरळ शिकार करायला निघून जात असे. एकदा कांही सैनिकांना सोबत घेऊन तो शिकारीसाठीं म्हणून अरण्यांत गेला. दोन दिवस त्यांनी बरेच निरनिराळे प्राणी मारले.

तिसर्‍या दिवशी राजधानीला परत येत असताना दोन सैनिक आपापसांत चर्चा करीत होते, ते राजाने ऐकलं. त्यांच्या चर्चेत कांही आश्रमांचा उल्लेख होता. राजाला ते आश्रम पाहाण्याची इच्छा झाली. त्याने लगेच आपल्या सैनिकांना सांगितलं, "तुम्ही सगळ्यांनी माझ्याबरोबर पुढें यायची कांही आवश्यकता नाही. मी इथल्या कांही ऋषींचे दर्शन करायला जातो आहे. सूर्यास्त होण्यापूर्वीच मी इथे परत येईन."

त्या भागांत दोन वर्षे लागोपाठ पावसाने दगा दिला होता. त्याकारणाने राज्यांत दुष्काळ पडला. परिस्थिती गंभीर झालेली होती. जनतेत हाहाःकार माजला होता. अरण्यांत जाताना राजाच्या मनांत हाच विचार घोळत होता. ही समस्या कशी सोडवायची हे त्याला सुचत नव्हते. तोच त्याच्या डोळ्यांसमोर एक माकडाचे छोटे पिलूं झाडावरून खाली पडले आणि घाबरुन व वेदनेने कळवळूं लागले.

"बिचारे पिलूं! याची आई बहुधा मेलेली असावी. झाडावर उड्या मारीत हिंडण्याचे ज्ञान त्याला अद्याप मिळाले नसावे. ठीक. आता मी याला बरोबर घेऊन जाईन, आणि एखाद्या सैनिकाला याच्या पालनपोषणाची जबाबदारी घ्यायला सांगीन." असा विचार करून पिल्लाला हातांत उचलण्यासाठी राजाने आपला हात पुढें केला तेवढ्यांत झाडांतून उडी मारून



त्याची आई माकडीण जमिनीवर आली. तिने राजाच्या हाताला बोंचकारले आणि आपल्या पिल्लाला घेऊन ती पळून गेली.

या घटनेने राजा अस्वस्थ झाला. थोड्याच अंतरावर चालून तो एका आश्रमांत पोंचला. तिथल्या ऋषींनी राजाचे आदरपूर्वक स्वागत केले आणि म्हटले, "राजन्, आपण शिकारीसाठीं इतक्या दूरवर आला आहात, पण आपल्या चेहर्‍यावर कांही आनंद दिसत नाही. याचं काय कारण आहे ते मला कळेल कां?"

विश्वसेनाने एक दीर्घ श्वास घेतला आणि माकडाची ही गोष्ट त्यांना सांगितली. माकडिणीने त्याला बोंचकारलं, हे ही सांगितलं. आपली चिंता व्यक्त करताना राजा ऋषीला म्हणाला, "मनुष्यप्राणी इतर प्राण्यांबद्दल दया व सहानुभूति दाखवण्याची इच्छा करतो. असहाय्य प्राण्यांना मदत करावी हा माणसांच्या मनांतला हेतू असतो. परंतु बघताबघता हादेखील अधिकार त्यांच्यापाशी राहिलेला दिसत नाही. परिस्थितींत रोज बदल होतो आहे. कोणाचेंही भले करायचीदेखील इच्छा असली तरी माणसें घाबरायला लागली आहेत."

राजाच्या या विचारावर ऋषींने हंसून उत्तर दिले, "महाराज, कोणत्याही विषयावर खूप गंभीर विचार-विनिमय करणारे अनेकजण असतात. आपापसांत उलटसुलट खल करीत बसतात, अशा लोकांपैकीं आपण दिसत नाही. आपणदेखील कितीतरी निष्पाप प्राण्यांची आजवर हत्या केली असेल. मारल्यानंतर त्या प्राण्यांच्या पिल्लांवर कोणती परिस्थिती ओढवेल याचा विचारदेखील आपण केला नसेल. ती पिल्लेंही अजाण असताना कशी अनाथ होत असतील हे आपल्या लक्षांत आलं नसेल. त्या माकडाच्या पिल्लाबद्दल आपण इतके अस्वस्थ आहात. ही खरोखरच आश्चर्याची गोष्ट आहे. ही समस्या भविष्यांत गंभीर रूप धारण करील. आपण राजा आहात. जनतेचे रक्षण करण्याचा आपला धर्म आहे.



ही समस्या कशी सुटेल आणि दुष्काळांतदेखील जनतेचे संरक्षण कसे होऊं शकेल, याचा आपण कधी विचार केला आहे कां?"

ऋषीवराचे हे कटु शब्द ऐकल्यावर राजाचा चेहरा उतरला. त्याने जरा चांचरतच म्हटले, "ऋषिवर, ही कांही अनोळखी परिस्थिती नाही. चारपांच वर्षांत एखादे वर्ष पुरेसा पाऊस पडला नाही कीं दुष्काळ हा पडणारच. कित्येक वर्षे हे असं चाललेलं आहे. माझ्या पूर्वजांच्या राज्यांतदेखील अशी परिस्थिती अनेकवेळां आलेली आहे."

"मग त्याच्यावर दुसरा कोणता उपाय सांपडत नाही?" ऋषीने धारदार आवाजांत प्रश्न केला.

कांही क्षण विश्वसेन विचारांत पडला. नंतर आपले मस्तक लववून त्याने ऋषिवरांना प्रणाम केला व म्हटले, "यावर अवश्य उपाय आहे, ऋषिवर! अधिक संपत्ती जमा करायची, सेनाबळ जास्त वाढवायचे, दुसरी राज्यें जिंकून आपल्या आधीन



करायची. त्यांच्या राज्यांतले धनधान्य व इतर सामुग्री आपल्या राज्यांत आणायची. असं केलं तरच ही समस्या सुटेल, दुष्काळाचे निवारण होईल आणि प्रजा सुखी होईल."

"वा! किती चांगली कल्पना आहे आपली! याचा अर्थ असा होतो कीं धन व सैन्य यांच्या जोरावर आपण सम्राट बनण्याची महत्वाकांक्षा बाळगता आहात. जर आपला हाच हेतू असेल तर आपण एक काम करावे. इथून चार कोस अंतरावर उत्तरेच्या दिशेने गेलात तर तिथें आपल्याला चांदीचे पर्वत दिसतील. त्यांतली हवी तेवढी चांदी घेऊन आपल्या राज्यांत नेता येईल." ऋषीने हंसत सांगितले.

विश्वसेनने ऋषीच्या सांगण्यानुसार उत्तरेला प्रयाण केले. तिथें त्याला सूर्यप्रकाशांत चमचम करणारे चांदीचे पर्वत खरोखरच दिसले. आनंदून जाऊन तो स्वतःशीच म्हणूं लागला, "अरे देवा, इतकी चांदी! ही चांदी राज्यापर्यंत वाहून न्यायला मला शेंकडों वाहने लागतील." तो तिथून फिरला.

जवळच त्याला एका मुनीची झोंपडी दिसली. त्यावेळेला ते मुनी अंगणात बसून एका हरिणीच्या दोन पाडसांना कोंवळी पाने भरवत होते. तिथूनच थोड्या अंतरावर हरीण व हरिणी आपल्या पाडसांकडे मोठ्या प्रेमाने पाहात होते. ते दृश्य पाहून राजाच्या मनाला मोठा धक्का बसला. तो विचार करूं लागला, "बापरे, अशा निष्पाप प्राण्यांना मारण्यासाठी मी जंगलात येतो कां? किती पापी आहे मी !" मुनींच्याजवळ जाण्यास राजाला संकोच वाटूं लागला. तेवढ्यांत मुनींनी त्याला पाहिले आणि म्हटले, "राजन्, संकोच कसला? आपण यावे! इतक्या दूरवर आपण एकटेच, अंगरक्षक न घेता कसे काय आलात?"

विश्वसेनाने मुनींना आदरपूर्वक प्रणाम केला. मुनींपासून त्याला कांहीही लपवायचे नव्हते. म्हणून त्याने चांदीच्या पर्वताची गोष्ट सांगितली आणि तिथें येण्याचे कारण सांगितले.

सारे कांही ऐकल्यानंतर मुनीने राजाला नख-शिखान्त न्याहाळले, व म्हटले, "राजन्, चांदीचे हे पर्वत पाहून तू फारच मोहरून गेला आहेस. तूं आणखी चार कोस उत्तरेला गेलास तर तिथें तुला सोन्याचे पर्वत दिसायला लागतील."

सोन्याच्या पर्वताची गोष्ट ऐकताच विश्वसेनच्या आनंदाला पूर आला. त्याने मुनीला वंदन केले आणि उत्तरेकडे तो पायींच निघाला. तिथें पोचल्यानंतर त्याने सोन्याचे पर्वत पाहिले. ते अवर्णनीय दिसत होते. तो आश्चर्यचकित व आनंदित झाला होता. हर्षातिरेकाने तो ओरडूं लागला, "माझे जीवन धन्य झाले आहे. सोन्याचे हे सारे पर्वत आता माझ्या मालकीचे झाले आहेत."

जवळच एक सरोवर होते. एक योगी स्नान करून त्यांतून बाहेर येत होता. त्याने राजाचे बोलणें ऐकले होते. त्याने आपल्या हातांतला दंड वर धरला आणि तो राजाला म्हणाला, "राजा, सोन्याचे ते पर्वत पाहून



तू जास्तच संतुष्ट झाला आहेस, होय ना? अरे, पण हे वैभव त्या हिऱ्यांच्या खाणीपुढें कमीच आहे. त्या खाणी इथून चार कोसांवर तर आहेत."

"खरंच कां योगीमहाराज?" असं म्हणून राजाने योग्याला प्रणाम केला. तिथें आणखी एक क्षणदेखील न थांबता, तो उत्तरेकडे चालायला लागला.

योग्याने सांगितल्याप्रमाणें त्या खाणी त्याला दिसल्या. सूर्याचे किरण त्या खाणींवर पडल्यामुळें त्यांची चमक अप्रतिम दिसत होती. त्या हिऱ्यांच्यामधून सरपटत जाणारे सर्पही राजाला दिसले.

हिऱ्याच्या त्या खाणी पाहून विश्वसेनला हर्षवायू होण्याची वेळ आली. त्याचा आवाज कांपत होता. तो स्वतःशीच बोलला, "माझे निपुण सैनिक आपल्या एकएक बाणाने या दोनतीन सर्पांना सहज मारूं शकतील. हे सगळे महासर्प मारले कीं मी हे सारे हिरे हत्ती व उंटांच्या पाठीवर लादून माझ्या राज्यांत घेऊन जाईन. आपले राज्य सधन व बलवान करीन. माझे सेनासामर्थ्य मी इतके वाढवीन की मी आसपासची राज्यें माझ्या ताब्यांत घेईन. साऱ्या देशांचा मी सम्राट होईन आणि चांगले राज्य करीन. माझी सगळी स्वप्नें साकार होतील. माझ्यापेक्षां श्रेष्ठ या जगांत दुसरा कुणीही नसेल."

तितक्यांत अचानक एक धीरगंभीर आवाज कानावर पडला, "राजन्, तुझ्यापेक्षां अधिक संपन्न, तुझ्यापेक्षां अधिक भाग्यवान, तुझ्यापेक्षां अधिक महान व्यक्ती या जगांत अनेक आहेत. त्यांच्यापैकीं मीही एक आहे. हे शब्द ऐकताच राजा विश्वसेन चमकला.

क्षणांतच एक दिव्य, तेजपुंज अशी आकृती राजासमोर उभी राहिली. राजा भारल्यासारखा होऊन स्तब्ध उभा राहिला.

त्या तेजस्वी व्यक्तीने गंभीर आवाजांत म्हटले, "तुझी सारी स्वप्नें साकार होत आहेत ना? चांदी,



सोने, हिरे, तुझ्या राज्यांत तू घेऊन जायचे ठरवतो आहेस, इतर राजांशी युद्ध करून त्यांना पराभूत करून त्यांची राज्यें तुला जिंकायची आहेत, तुला सम्राट व्हायचे आहे. परंतु तू हे चिरंतन सत्य विसरून गेला आहेस कीं या युद्धांच्यामुळें अपार धननाश होईल, अनेक निरपराध मरण पावतील. याचा तू जरासुद्धा विचार केला नाहीस ना?"

त्यावर विश्वसेनने न घाबरता धिटाईने उत्तर दिले "हे महापुरुष, आपल्याला माहीत आहेच कीं राज्याचा विस्तार करणें ही कोणत्याही क्षत्रियाची आकांक्षा असतेच. हा क्षत्रियधर्म आहे. क्षत्रिय याच्यासाठींच जगतो आणि याच्यासाठींच मरतो."

त्या तेजस्वी पुरुषाने मंदस्मित करून सांगितले, "ज्यामुळे जनतेचे कल्याण न होता नुकसानच होते, तो धर्म होत नाही. प्रत्येक शासनकर्ता क्षत्रिय धर्माच्या नांवाखाली जेव्हां इतर राज्यांतर स्वारी करतो, त्यावेळेला त्या राज्यांतल्या प्रजेची अवस्था किती दयनीय असते, ते कोणत्या संकटांना सामोरे

जातात, हे तुला माहीत नाही? ती सारी तुमच्या हातांतली खेळणी बनतात, निर्बल प्यादी होतात. राजन्, मी तुला एक आशीर्वाद देतो. तू युद्धांत यशवंत होऊन सम्राटपद मिळवशील, किंवा तुझ्या राज्यांत भविष्यांत कधीही दुष्काळ पडणार नाही. या दोन्हींपैकीं एक गोष्ट तुझ्या मनासारखी होईल.'' असं म्हणून तो तेजस्वी पुरुष अंतर्धान पावला.

राजा लगेच मागे फिरला व जिथें त्याचे सैनिक त्याची वाट पहात थांबले होते, तिथे परत गेला. मात्र यावेळेला त्याने आलेल्या मार्गाविरुन न जाता दुसरा मार्ग निवडला. सैनिकांच्या तळावर पोंचल्यानंतर राजाने त्यांना सांगितले, ''आजपासून तुम्ही सर्वांनी आपापली आयुधें घरीं सुरक्षित ठेवायची आहेत. यानंतर तुम्ही प्रत्येकांनी राज्यांतल्या एकएक गांवात जाऊन तिथल्या दुष्काळी परिस्थितीची खरी माहिती मला वेळोवेळीं देत राहायचे. आता आपण राजधानीला परत जाऊं या.''

विश्वसेनाची ही कथा सांगून वेताळाने राजाला विचारले, ''राजन्, विश्वसेनची दीर्घकाळ इच्छा होती कीं अपार धनसंपत्ति जमवावी आणि सेनाबल वाढवावे. इतर राज्यांवर आक्रमण करुन ती राज्यें जिंकायची त्याची इच्छा होती. तशी त्याल संपत्ति सांपडली. त्या तेजस्वी पुरुषाने त्याला आशिर्वाद-देखील दिला होता. परंतु सम्राटपद किंवा राज्यांतला दुष्काळ नाहीसा करणें, यांतली एकच इच्छा त्या आशिर्वादामुळें पूर्ण होणार होती. राजा जर महत्वाकांक्षी होता तर युद्धांत जिंकण्याची इच्छा त्या आशिर्वादामुळें त्याने कां मागितली नाही? माझ्या या शंकांचे समाधान करणारे उत्तर तुला ठाऊक असूनदेखील तू गप्प बसलास तर तुझ्या मस्तकाची शंभर शकलें होऊन पडतील.''

त्यावर विक्रमार्कने उत्तर दिले, ''त्याच्या मनांत धन व कीर्ति मिळवण्याची आकांक्षा असते, त्याच्या मनांत मानवता, दया, सहानुभूति त्या संवेदनाशील भावना नसतात असे नाही. माकडाच्या पिल्लाला जीवदान देण्याबाबत, किंवा ऋषी हरिणांच्या पाडसांना भरवत होते, ते पाहून राजाच्या मनांतले कोमल भाव जागृत झाले. त्यावरुन आपल्याला स्पष्ट कळतं कीं राजा विश्वसेनाच्या मनांत दयाळूपणा जरुर कुठेतरी लपलेला होता. युद्धाचे जे भयंकर परिणाम होतात त्यांच्यावर त्या तेजस्वी महापुरुषाने कटु सत्य भाष्य केलेले होतेच. त्यांतले कटु सत्य त्याने राजाला जाणवून दिले. त्यामुळें राजाने जनतेच्या कल्याणासाठीच काम करण्याचा निर्णय घेतला. त्याने घेतलेला निर्णय अगदी बरोबर आहे. जनतेसाठी त्याने आपल्य आकांक्षांचा त्याग केला.''

राजाचे मौन भंग झाले, आणि वेताळ पुन्हां शवासहित अदृश्य झाला व झाडावर जाऊन बसला.



# चतुर मल्लू



कथा
एम्. शंकरराव
विजयनगरम






























ते त्या झाडाजवळ आले तेव्हां गोशालाने महावीराला त्याच्या संवादाची आठवण करून दिली. तो म्हणाला, "हे पाहा, आता तुझ्या कळ्यांची फुलें कांही झालेली नसतील बरं!"

"असं वाटतं तुला?" महावीराने नवल वाटून प्रश्न केला.

"माझ्या वाटण्याचा प्रश्नच येत नाही. माझी खात्री आहे." गोशालाने उर्मटपणें सांगितले.

दोघेही त्या जागेजवळ पोंचले. आणि काय आश्चर्य! वेल जिथें उपटून टाकलेली होती, तिथेंच तिने मूळ धरले होते. रात्रभर पाऊस पडला होता आणि त्या सगळ्या कळ्या उमलून त्यांची सुंदर फुलें डोलत होती.

महावीराने त्या फुलांकडे बोट दाखवले. पण तो पुढें कांहीच बोलला नाही. गोशाला अतिशय अस्वस्थ झाला. त्याने महावीराशी भांडण करून काढले. आकांडतांडव करीत तो म्हणाला, "जर प्रत्येक गोष्ट अगोदरच ठरलेली असते, तर आपल्या करण्याचा कांहीतरी उपयोग आहे कां? मग या असल्या आयुष्याचा अर्थ तरी काय?" तो परतपरत तेच उगाळत राहिला, आणि नंतर महावीराला सोडून तो निघून गेला.

त्यानंतर तो महावीराला पाण्यांत पाहूं लागला. महावीर जे कांही बोलेल ते सगळे खोडून काढण्यांतच तो आपला सगळा वेळ घालवूं लागला. एकदा तर त्याने कांहीतरी चेटूक करून महावीराला मारण्याचाही प्रयत्न केला होता. परंतु सुदैवानें महावीराची पुण्याई जबरदस्त होती. त्याच्यावर त्या करणीचा कांहीही अपाय होऊं शकला नाही. उलट जी वाईट शक्ती गोशालाने महावीरावर सोडली होती. ती उलटून गोशालावरच आदळली. गोशाला आजारी पडला, त्याला वेड लागले आणि तो लौकरच मेला.

एखाद्याचा मत्सर करत गेले तर आपल्याच आयुष्याची दुर्दशा कशी होते ते पाहा ना!" देवनाथांनी तात्पर्य सांगून आपली कथा संपवली.







# देवी भागवत

शुकाने विवाह न करण्याचा हट्टच धरला होता, म्हणून व्यासांनी स्वतःच रचलेली देवी भागवत कथा शुकाला सांगितली.

लहान बालकाच्या रूपांत विष्णुभगवान वडाच्या पानावर पहुडले होते. ते विचार करूं लागले, "मी इथें बालक बनून कां आलो आहे? माझी सृष्टी कुणी निर्माण केली? हे सर्व सविस्तर मला कसे समजेल?" विचारांत पडलेल्या बालक-रूपी विष्णूला पाहून देवीच्या मनांत दया उत्पन्न झाली. तिने त्या बालकाला अर्धा श्लोक ऐकवला आणि म्हटले, "यांतच सर्व कांही सार आहे. याचा अर्थ समजून घेतलास, तर तुला तुझ्या सर्व प्रश्नांची उत्तरें मिळतील."

विष्णूंनी तो श्लोक ऐकला परंतु लगेच त्याचा अर्थ कांही त्यांच्या ध्यानांत आला नाही.

म्हणून तो अर्धा श्लोक त्यांनी पुन्हां पुन्हां म्हणायला सुरवात केली. थोड्याच वेळांत महादेवी त्यांच्यासमोर प्रकट झाली. तिच्या चारी हातांत शंख, चक्र, गदा, पद्म ही सारी आयुधें होती. तिने उत्तम भरजरी वस्त्र नेसले होते. तिच्या साऱ्या शक्ती तिच्याबरोबर आलेल्या होत्या.

महादेवीला पाहून बालकरूपी विष्णू भांबावले. त्यांच्या मुखांतून शब्द उमटेना. देवी त्यांना म्हणाली, "मायेच्यामुळें तूं मला विसरला होतास. आता तू सगुणरूप धारण कर, मी सत्वशक्ती आहे. तुझ्या नाभिकमलांतून ब्रम्हाचा जन्म होईल. तो रजोगुणी होऊन लोकसृष्टी निर्माण करील. त्या सृष्टीवर तुझा अधिकार चालेल. त्यावेळीं ब्रम्हदेवाच्या दोन भुवयांमधें क्रोधामुळें रुद्राचा जन्म होईल. तो रुद्र कडक तपश्चर्या करील. त्या तपाचे फळ मिळून तो सगुण होईल. प्रलयकाल आला कीं ब्रम्हाने निर्माण केलेल्या संसाराचा तो नाश करील. माझी मदत घेऊनच तूं जगाचे पालनपोषण करूं शकशील. तेव्हां माझ्या सत्वशक्तीशी तूं परिचय करून घे आणि तिची शक्ती जाणून घे. मी सदैव तुझ्या हृदयस्थानीं राहीन."



त्यावर विष्णूने महादेवीला विचारले, "मी अर्धा श्लोक ऐकला. आपण सांगा कीं मी तो कसा ऐकला आहे?"

"तूं मला सगुणरूपांत पाहातो आहेस. जिने तुला हा अर्धा श्लोक ऐकवला, ते होते देवीचे निर्गुणरूप. हा श्लोक म्हणजे भागवत नांवाचा मंत्र आहे. त्याचे पठण केल्याने सर्व गोष्टी शुभदायक होतात." देवी म्हणाली.

त्या मंत्र। या बलाने विष्णूने मधुकैटभ राक्षसांचा वध केला. त्या राक्षसांच्या त्रासाने भयभीत झालेल्या ब्रम्हाला या मंत्राचा प्रभाव सांगितला. पुढें ब्रम्हाने नारदांना, व नारदांनी व्यासाला, ह्या मंत्राचा उपदेश दिला. व्यासाने हा उपेश शुकाला देताना सांगितले, "मी याची रचना सविस्तर रूपांत अनेक संहितामधून केलेली आहे.

शौनक व इतर मुनींना सूताने शुकाची कथा सांगितली. त्यानंतर सर्व मुनींनी सूताला देवीची कथा सांगावी म्हणून विनंती केली.

अयोध्या ही कोसल देशाची राजधानी होती. ध्रुवसंधी नांवाचा राजा तिथें राज्य करीत होता. त्याला मनोरमा व लीलावती नांवाच्या दोन बायका होत्या. मनोरमाच्या मुलाचे नांव सुदर्शन होते, व लीलावतीच्या मुलाचे नांव शत्रुजित होते. एक दिवस ध्रुवसंधी शिकार करत असताना सिंहाने त्यावर झडप घातली. दोघांत झटापट होताना शेवटीं दोघेही मरण पावले.

मनोरमाचे वडील वीरसेन कलिंग देशचे राजे होते. आपल्या जांवयाच्या मृत्यू झाला आहे, ही बातमी कळताच आपला नातू सुदर्शन याला भेटण्यास तिथे गेले. त्याचप्रमाणें शत्रुजितचे आजोबा युधाजित हे उज्जयिनीहून तिथे आले.

आता सुदर्शन राजा होणार कीं शत्रुजित? याविषयीं दोघांच्या मातांमधें मतभेद झाला. त्यांच्यात शत्रुत्व निर्माण झाले व ते इतके विकोपाला गेले कीं युधाजिताने वीरसेनास ठार मारले.

आपला मुलगा सुदर्शन याला घेऊन मनोरमा भरद्वाजांच्या आश्रमांत आली. भरद्वाजांनी दोघांचे स्वागत केले, त्यांना आश्रय दिला व शत्रूपासून त्यांचे रक्षण केले. सुदर्शनला त्यांनी अनेक विद्या शिकवल्या. तो योग्य वयाचा झाल्यावर महादेवीने त्यास स्वप्नामधे दर्शन दिले व त्याला अस्त्रविद्या शिकवली.

या काशीराजाची कन्या शशिकला अत्यंत रूपवान होती. सुबाहू या तिच्याशी विवाह करावा अशी सुदर्शनची इच्छा होती. त्याचप्रमाणें सुदर्शनशीच विवाह करावा असा शशिकलाचाही निश्चय होता.

सुबाहूने आपल्या मुलीचे, शशिकलेचे स्वयंवर होईल. अशी घोषणा केली, अनेक देशांचे राजे काशीला आले. परंतु सुदर्शनाशिवाय इतर कुणाशीही विवाह न करण्याचा शशिकलेचा निर्णय ठाम होता.

राणीने आपल्या मुलीला समजावले, "मुली, कितीतरी राजे तुझ्याशी विवाह करण्याच्या इच्छेने इथें आले आहेत. अशा वेळेला तुझा हा हट्ट योग्य नाही. सुदर्शन खेरीज कुणाशीही विवाह करणार नाही



हे या प्रसंगी अनुचित मत आहे. त्यामुळें आपण संकटांत सांपडूं. आलेले सारे राजे आपले शत्रू होतील. युद्धाला सुरवात होईल. आणि आपण त्यांच्यापुढें दुर्बल ठरूं. तू स्वयंवराच्या मंडपात अवश्य यायला हवंस. जर तू सुदर्शनशीच विवाह करण्याचा हट्ट धरलास, तर युधाजित त्या सुदर्शनच्याबरोबर तुला, मला आणि तुझ्या वडिलांना देखील ठार मारील. कारण तो फार क्रूर व दुष्ट आहे." तिने मुलीला खूप सांगून पाहिले. तिच्या सांगण्यामधें मुलीबद्दल मायाही होती, आणि धोक्याची सूचनादेखील होती.

परंतु शशिकलाने इतर कुणाही राजाशी विवाह करण्यास सरळसरळ नकार दिला. तिने आपल्या पित्याला स्पष्ट शब्दांत सांगितलं, "तुम्ही या राजांना घाबरता आहात. तसं जर असेल तर तुम्ही एक गोष्ट करा. सुदर्शनशी माझा विवाह करून द्या, आणि आम्हाला राज्याच्या सीमेपर्यंत पोंचवण्याची व्यवस्था करा. जर युद्ध पेटलेच तर सुदर्शन इतर राजांचा पराभव करतील."

"हे बघ पोरी, अनेकांशी एका वेळेला वैर पत्करणें हे धोक्याचं आहे. या सर्वांच्याविरुद्ध लढणें ही कांही सोपी गोष्ट नाही. समज, मी तुम्हाला रथांत बसवून सीमापार जरी केले, तरी हे दुष्ट लोक तुम्हाला घेरून मारून टाकतील. त्यांची काय खात्री देता येणार? अशा वेळीं तुम्ही काय करूं शकाल? मला एक उपाय सुचला आहे. सीतेच्या विवाहाच्यावेळीं जसा पण लावला होता, तसा आपण लावूं या. त्या परीक्षेंत जो हा पण जिंकेल, त्याच्याशी तूं विवाह कर." सुबाहूने मुलीला सांगितले.

"पण यामुळें समस्या थोडीच सुटणार आहे? पण जिंकणाऱ्या राजाशी इतर राजे लढायला तयार होतीलच. ते थोडेच गप्प बसतील? कोणत्याही परिस्थितींत युद्ध टाळणें आता शक्य होणार नाही. तुम्ही महादेवीवर विश्वास ठेवा आणि सुदर्शनशी माझा विवाह करुन द्या." शशिकला म्हणाली. तिचा



निर्धार पाहून सुबाहुने तिची योजना स्वीकारली.

सुबाहुने गुप्तपणें विवाहाची सारी तयारी सुरुं केली. त्याने सुदर्शनला बोलावले, व शास्त्रोक्त कन्यादान केले. आपल्या जांवयाला त्याने दोनशे रथ, हजारों घोडे, शेंकडों हत्ती आणि इतर मूल्यवान भेटवस्तू वरदक्षिणा म्हणून दिल्या. त्याने नवी विहीण मनोरमेला त्याने म्हटले, "देवी, आजपासून माझी मुलगी आपल्या पुत्राची सहधर्मचारिणी झाली आहे. आपण तिची प्रेमाने काळजी घ्यावी."

मनोरमा संतुष्ट होऊन म्हणाली, "महाराज, राज्य नसलेला माझा पुत्र - आपण महाराज असूनही त्याच्याशी आपल्या मुलीचा विवाह लावलात. आपल्यासारखे थोर मनाचे उत्तम पुरुष जगांत फार विरळ असतात. आपल्या कन्येची जबाबदारी आमच्यावर आहे आणि आमची जबाबदारी आपल्यावर आहे."

त्यावर सुबाहुने उत्तर दिले, "देवी, आपला पुत्र राज्यविहीन आहे असे आपण कां समजता? माझे राज्य त्याचे नाही कां? माझी सारी सेना त्याची आहे.



आपण असे कशासाठी मानावे कीं कुणी राजा आहे तर कुणी सेवक असतो? जगदंबा आपल्या बाजूला आहे. तेव्हां आता आपल्याला कशाला भिती असायला हवी?''

''किती महत्वाची व प्रसन्न गोष्ट आपण सांगितलीत. आपले सदैव कल्याणच होईल. आपण आपल्या देशाचा राज्यकारभार सांभाळावा. जगन्मातेची कृपा असली तर माझ्या पुत्राला त्याच्या पित्याचे राज्य पुन्हां प्राप्त होईल. नशिबाने जर आम्हाला साथ दिली तर मातीला हात लावला तरी त्याचे सोनेच होईल. अशा वेळेला आपण जेजे करतो, त्याचा परिणाम चांगलाच होतो. सर्वजण आपल्याला मदत करायला पुढें येतात. आता माझ्या मुलाचा चांगला काळ आला आहे. त्याचं कांहीही वाईट होणार नाही.'' मनोरमाने विश्वासपूर्ण आवाजांत म्हटले.

सुबाहुने गुप्तपणे मुलीचे लग्न लावून दिले आणि जेव्हां मुलीला व जांवयाला निरोप द्यायची वेळ झाली, तेव्हां कांही लोकांनी येऊन सांगितले कीं आत्ता वधुवरांना निरोप देऊन त्यांची पाठवणी करूं नका. शत्रू वाटेतच लपून त्यांचा नाश करण्यासाठी तयार झालेला आहे.

सुबाहु राजा अनुभवी होता. या बातम्यांतला खरेपणा त्याला माहीत होता. म्हणून मुलीला व जांवयाला निरोप देण्यास त्याचे मन तयार होईना. तेव्हां सुदर्शनने त्यास सांगितले ''महाराज, आपण आमची पाठवणी करताना अजिबात चिंता करूं नये. जेव्हां देवी माझ्या बाजूने रक्षण करते आहे, तेव्हां हे सारे राजे एकत्र असले तरी माझ्या केसालाही ते धक्का लावूं शकणार नाहीत.''

काशीराजाने आपल्या जांवयाला अगणित संपत्ती दिली आणि सेनेसहित तो स्वतः त्यांच्याबरोबर गेला. अर्ध्या वाटेवरच त्यांची वाट पाहात इतर राजे लपून बसले होते. त्यांनी ह्या सर्वांना पाहिले. ''तो पाहा रथ. तोच सुदर्शन आहे. तो पत्नीसमवेत येतो आहे. चला, त्यांचा समूळ नाश करूं या.'' त्यांच्यापैकी एकजण म्हणाला.

सुबाहुने शत्रूंच्या राजांना थोपवून धरले. सुदर्शन मंत्राचा जप करूं लागला. त्याने देवीचे ध्यान केले. त्याच वेळेला शत्रुजित व युधाजित त्याच्यावर चालून आले. सुबाहुने आवेशाने शंख फुंकला आणि युधाजितवर बाणांचा मारा केला. दोघांच्यात घनघोर युद्ध झाले.

तितक्यांत देवी जगदंबा आपल्या दिव्य स्वरुपांत, अनेक प्रभावी आयुधांसहित, पुष्पमालासहित, सिंहावर स्वार होऊन तिथें प्रत्यक्ष उपस्थित झाली. देवीला पाहून सुदर्शनचे मन आनंदाने भरून गेले. शरीर पुलकित झाले. त्याने आपल्या सासऱ्याला देवी दाखवली आणि सुदर्शन म्हणाला, ''आता आपल्याला कसलीही भीती उरलेली नाही.'' आणि तो रथांतून खाली उतरला, आपली पत्नी व सासरे यांच्यासहित त्याने देवीच्या पदकमलांना सादर प्रणाम केला.

देवीचा सिंह पाहून हत्ती बिथरले. ते घाबरून





ओरडूं लागले. त्यांना पाहून सिंह गर्जना करूं लागला. त्याच वेळेला जोराचा वारा सुटला. मनांतल्या मनांत सगळे राजे भयभीत झाले. भांबावून जाऊन ते जागच्या जागी खिळल्यासारखे उभे राहिले व निस्तेज दिसूं लागले.

तेव्हां सुदर्शनने सेनापतीस सांगितले, ''महादेवी आपल्या पाठीशी आहे. तुम्ही निःशंक मनाने शत्रूंच्यावर हल्ला करा. आपल्या सेनेला तशी आज्ञा द्या.''

काशीराजाची सेना राजांच्यावर चालून गेली.

तेव्हां युधाजित त्या निमूटपणें उभ्या असलेल्या, सर्व राजांना म्हणाला, ''एखाद्या स्त्रीला सिंहावर स्वार झालेली पाहून तुमची मति भ्रष्ट कशी झाली? एक अयोग्य व्यक्ती एका स्त्रीला आपल्याबरोबर घेऊन आला आहे. तुम्ही तर राजे आहात. राजे असून इतके भ्यायलात? ते देखील एका अबला स्त्रीला पाहून? व्हा पुढें! सुदर्शनला कांही क्षणांतच आपण मृत्यूलोकाची वाट दाखवूं आणि राजकन्येला आपल्याकडे ओढून आणूं.'' असं म्हणून युधाजितने आपला नातू शत्रुजित याला बरोबर घेतले व तो सुदर्शनशी लढायला पुढें सरसावला.

त्यावेळेला देवीने सगळ्या राजांना आपले वेगवेगळ्या आकारांत दर्शन दिले व ती एकटीच सर्वांशी लढत राहिली. लौकरच युधाजित व शत्रुजित बाण लागून खाली पडले व मरण पावले. सुबाहुच्या डोळ्यांत आनंदाश्रू तरळत होते. त्याने पराशक्तीचे स्तुतीस्तोत्र म्हटले. नंतर त्याने देवीला म्हटले, ''माते, तुझे दर्शन झाल्यामुळें मी धन्य झालो आहे. माते, तू माझ्या हृदयांत सदैव राहावेस म्हणून शाश्वत रूपांत तूं काशीमधेंच राहावेस. मला इतर कुणाच्या सहाय्याची आवश्यकता नाही. असं म्हणतात कीं जोपर्यंत भूमीचे अस्तित्व असेल, तोपर्यंत काशीनगरीही असेल. जोपर्यंत काशी आहे, तोपर्यंत तू इथेंच राहा. काशीला व मला शत्रूच्या भितीपासून सुरक्षित ठेव. मी फक्त हाच वर तुझ्याजवळ मागतो आहे.''

महादेवीने त्याची ही मागणी मान्य केली.

त्यानंतर सुदर्शनने महादेवीची आराधना केली. त्याने देवीला विचारले, ''माते, आता माझे कर्तव्य कोणते आहे? मी आता कुठे जाऊं? मी स्वतः असमर्थ आहे, परंतु तुझी मदत असल्यामुळें मी कोणतेही कठीण लक्ष्य साध्य करूं शकेन असा मला विश्वास आहे. आता यानंतर माझे कर्तव्य काय आहे हे मला समजावून सांगण्याची माझ्यावर कृपा कर.''

यावर देवीने सांगितले, ''आता यानंतर काय काय करायला हवे आहे? आपल्या पत्नीसह अयोध्येला जा, सिंहासनावर बसून न्यायाने राज्यशासन चालव. मी तुझे रक्षण करीत राहीन. प्रत्येक अष्टमी, नवमी, चतुर्दशीला माझी पूजा करीत राहा. मला शरत्काल अतिशय आवडतो. नवरात्री पूजा तू करीत जा. माघ, चैत्र, आश्विन, आषाढ महिन्यांत माझे उत्सव नियमितपणें करावेत.'' असं म्हणून ती अदृश्य झाली.

त्यानंतर एकएक राजा पुढें आला व ज्यात-हेने देवी, देवता इंद्राला प्रणाम करतात, त्याप्रमाणें ते सुदर्शनला प्रणाम करूं लागले आणि अंबादेवीची स्तुति करूं लागले. सुदर्शनला आपला चक्रवर्ती राजा म्हणून त्या सर्वांनी स्वीकारले.

सुदर्शन अयोध्येला पोंचण्यापूर्वीच तिथें ही वार्ता पोंचली होती. म्हणून मंगलवाद्यांसहित मंत्री त्याचे स्वागत करण्यास आले आणि सुदर्शन व त्याची पत्नी शशिकला यांना त्यांनी सन्मानाने नगरांत नेले.

सुदर्शन आपल्या सावत्र मातेकडे गेला. ती आपल्या पुत्राच्या मृत्यूबद्दल विलाप करीत होती. त्याने सावत्र मातेला सांगितले, ''माते, आपल्या पुत्राला व पित्याला मी मारले नाही. महाशक्तिने त्यांचा संहार केला. त्यांनी जी पापें केली त्याबद्दल तूं कां दु:खी होते आहेस?

आपण मला आपला पुत्रच मानावा. मी नेहमी आपली सेवा करीत राहीन. मी जेव्हां लहान होतो, तेव्हां आपल्या पित्याने लोभापायी, पापी हेतूने मला निर्वासित केले. हे तर मी केवळ माझे दुर्भाग्य मानतो. जेव्हां माझी माता दु:खी अंत:करणाने मला घेऊन अरण्यांतून जात होती. तेव्हां चोरांनी आमची चीजवस्तू लुटली.

नंतर गंगेच्या कांठी असलेल्या ऋषींच्या आश्रमांत आम्हाला आश्रय मिळाला. त्यांच्या अनुग्रहांच्या बळावरच मी आज मोठा होऊं शकलो आहे. आता माझ्या मनांत कुणाविषयींही द्वेष नाही. कुणाबद्दलही शत्रूभावना नाही.''

त्याचे बोलणें ऐकून लीलावती लज्जित झाली, व त्याला म्हणाली, ''मी नको नको म्हणत असताना देखील माझ्या पित्याने तुझ्याशी अन्याय केला. आणि ते एकटेच नव्हे तर माझा पुत्रही त्यामुळें मरण पावला. तुझी माता माझी थोरली भगिनी आहे, आणि तू माझ्या सख्ख्या पुत्राप्रमाणेंच आहेस असे मी आता समजते आता मी कशाला चिंता करूं? तू त्यांच्या मृत्यूला कारणीभूत झालेला नाहीस हे मला ठाऊक नाही कां?''

सुदर्शनने नंतर आपल्या मंत्र्यांच्या मदतीने एक सुवर्णसिंहासन निर्माण केले. त्यावर जगदंबेच्या मूर्तीची स्थापना केली. तो रोज त्या मूर्तीची पूजा करूं लागला. राज्याभिषेक झाल्यानंतर त्याने दीर्घकाल मोठ्या सुखासमाधानाने राज्य कारभार चालवला.







# रिकामपण

रोज संध्याकाळीं राघव गांवातल्या मंदिरात जात असे आणि तिथें आलेल्या भक्तांसमोर पुराण सांगत असे. कुणाला कांही शंका असली तर तो नीट समजावून सांगत त्यांचे शंका निरसन करीत असे. भक्तांच्या प्रश्नांची उत्तरें देऊन त्यांना मार्गदर्शन करण्यांत त्याला खूप आनंद होत असे. म्हणून तो त्या दिवशी घरी संध्याकाळच्या पुराणकथेची तयारी करण्यांत गर्क होता. संध्याकाळी जे कथानक श्रोत्यांना सांगायचे, त्याचा एकवार पुन्हां विचार तो करीत असे. त्यामुळें श्रोत्यांच्या शंका त्याला समाधानपूर्वक सोडवता येत.

राघवची पत्नी सीता कापसाच्या वाती करीत असे. त्या विकून जी थोडीफार रक्कम हातांत येई, ती एका पेटींत जमवून ती सुरक्षित ठेवीत असे.

त्यांना तीन मुलगे होते. थोरला मुलगा कौशिक होता आणि त्याच्या कामात फारच हुशार होता. त्याची पत्नी कमला दिवसभर घरकामांत गुंतलेली असे. दुसरा मुलगा चांगल्यापैकी कारागीर होता. कुमारच्या पाठचा तिसरा मुलगा नरसिंह घरामागच्या मोठ्याथोरल्या बागेचे माळीकाम करीत होता. त्या बागेंत नुसतीस फळांची झाडे नव्हती, तर अनेक प्रकारच्या भाज्या व फुलांची झाडेही होती. त्याचे उत्पन्नही रोज चांगले येत असे. तो दिवसभर मेहनत करीत असे.

सारा गांव राघवचा संसार किती आदर्श आहे असं कौतुक करीत असे. बऱ्याच लोकांचे असे म्हणणें असते, कीं प्रत्येक घरांत जर अशी कामामधे व्यग्र असण्याची वृत्ती असली, तर घरांतल्या मंडळींमधें एकी असते व मनही शांत असते. एकमेकांविरुद्ध तक्रारी करण्याची फारशी वेळ येत नाही.

शेजारच्या गांवातल्या माधवचा परिवार याच्या अगदी विरुद्ध प्रकारचा होता. त्या घरांत रोज

किशन पुरोहित



सासूसुनेचे भांडण, भावाभावांच्यात कुरबूर होत होती. आणि हा रोजचाच प्रकार सर्वांना ठाऊक होता. एकदिवसदेखील माधव शांत मनाने घरांत बसूं शकत नव्हता.

राघव हा माधवचा दूरचा नातलग होता. माधवने राघवच्या संसाराबद्दल खूपवेळा चांगले ऐकलेले होते. घरांत इतकी माणसें मिळूनमिसळून राहूं शकतात आणि एखाद्या परिवारांत इतकी शांती व समाधान असूं शकते यावर माधवचा विश्वास बसत नव्हता. यामागचे काय रहस्य असावे, हे जाणून घेण्यासाठी तो आपली पत्नी सुलक्षणा हिच्यासह राघवच्या पोंचला. राघवच्या सर्व कुटुंबियांनी या दांपत्याचे मोठ्या प्रेमाने स्वागत केले. एक दिवस सर्वांनी मोठ्या आनंदात घालवला. दुसऱ्या दिवशी राघवने आपल्या प्रवचनाच्या तयारीला नेहमीसारखी सुरवात केली. त्यावर माधवने नाराजी दर्शवून म्हटले, "अरे, मी दोन दिवस तुझ्याबरोबर घालवावे म्हणून आलो आहे. दोन दिवस आपण दोघे बरोबर गप्पाटप्पा करूं. आणि सारा वेळ एकत्र घालवूं तुझे हे पुराण-प्रवचन तर रोजचेच आहे. आता हे बंद कर आणि सांग कीं आज आपण काय करायचं?" त्यावर हंसतच राघव उत्तरला, "सर्व प्राण्यांत सुस्त प्राणी म्हणजे मनुष्य। एकदा नियम सुटला आणि परिस्थितींत बदल झाला तर समजावे कीं तो वेळ व्यर्थ गेला. पुन्हां नियमित वागणें कठीण होऊं लागते. आपण वेळप्रसंग पाहून जरूर गप्पा मारूं या. पण आत्ता यावेळेला तशी कांही जरूरी आहे असं मला वाटत नाही. चला, आपण दोघे मिळून पुराणाचा अभ्यास करूं, त्यांतला अर्थ समजावून घेऊं. त्यामुळें मलाही उत्साह वाटेल आणि तुझा दृष्टीकोनही मला कळेल."

"पण मग मला तर वाटेल कीं तुझ्याकडे येऊन मी तुझा वेळ वांया घालवला, तुझ्या अभ्यासांत मी व्यत्यय आणला. यापुढें मी तुझ्याकडे येणार नाही कधी." जरा रुष्टावून माधव राघवला म्हणाला.

"माझ्या घरांत तुला असे वाटणार नाही. तू माझ्या कामांत व्यत्यय आणला आहेस असं तुला वाटणारच नाही. हे तुला स्वतःलाच यापुढें समजेल. चल, आता आपण दोघेही जरा पुराणाचा अभ्यास करायला बसूं या." राघवने शांतपणें त्याला उत्तर दिले.

दोघे मिळून पुराणाचा अभ्यास करायला बसले. माधवला प्रथमच लक्षांत आलं कीं पुराणांत इतका खोल व गंभीर अर्थ भरलेला आहे. त्याने नवे, तऱ्हेतऱ्हेचे प्रश्न राघवला विचारले. त्या सर्व प्रश्नांची उत्तरें राघवने समर्पक रितीने त्यांला दिली.

माधवला आता सत्य आणि वास्तव ज्ञान समजण्यास वेळ लागला नाही. तो म्हणाला, "यापुढें मी जेव्हां तुझ्या घरीं येईन तेव्हां पुराणांचा अभ्यास करायलाच येत जाईन. माझ्याकडे जेव्हांजेव्हां तू येशील, तेव्हां तुझ्याबरोबर ग्रंथ जरुर आणत जा." आंत घरामधें माधवची पत्नी सुलक्षणा, सीताला म्हणत होती, "या उतारवयांत आता या वाती कशाला वळत बसता आहात? उगीचच कां इतके कष्ट करीत बसायचं आपण? शांतपणें बसावं आणि उरलेले म्हातारपण आरामांत घालवावं." सीताने उत्तर दिलं, "अहो, मी तरूण होते तेव्हां घरांतलं सारं कामकाज मी पाहात होते. आता तर आरामांत बसते आहे कीं! उगीचच नुसतं निरुद्योगी राहाण्यापेक्षां कांही उपयोगाचं काम हातांत असलं कीं बरं वाटतं."

"तुम्ही बसल्याबसल्या वाती वळत राहाता म्हणून तर तुमची सून तुमच्याशी बेफिकीरपणे वागते. नुसती बसूनच राहाते ती! तुम्हाला पाह्यलं कीं उठून उभीदेखील राहाण्याचे नांव नको! स्वयंपाक करताना, घरांतली आवरासावर करताना, तुमचा सल्ला घेत नाही. तुमचं मत विचारण्याची जरूर आहे असं कांही तिला वाटत नाही. तुम्हाला ती परकी तर मानत नाही ना? तुम्ही या घरांतली मोठी मालकीण आहात आणि तुमचा मान राखायला हवा हे ती बहुतेक विसरून जात असावी!" सुलक्षणाने हातवारे करून मोठ्या ठसक्यांत सांगितलं.

त्यावर सीता नुसतीच किंचित हंसली, आणि म्हणाली, "सुरवातीला मलाही तसंच वाटायचं. शेजारीपाजारी मी सुनेच्या तक्रारी करत असे. तिला टोंचून बोलत असे. पण त्याने माझ्या मनांतली शांतता नाहीशी झाली. मी नेहमी अस्वस्थ आणि दुःखी राहूं लागले. माझ्या सुनेबद्दल माझ्या मनांत विरोधी भावना तीव्र होत गेल्या. त्यामुळें माझा रक्तदाब वाढला आणि मी वरचेवर आजारी पडूं लागले. तेव्हां वैद्यांनी मला सल्ला दिला कीं मी नुसतं बसून राहूं नये. कांहीतरी कामांत स्वतःला गुंतवलं पाहिजे. भरपूर रिकामपण असलं कीं माणसाच्या मनांत निरर्थक शंकाकुशंका येत राहातात. त्याच्या मनांत सैतान घर करून राहातो. आपणच कामांत गुंतलेलं असलं कीं दुसऱ्याच्या दुर्गुणांकडे लक्ष द्यायला वेळ मिळत नाही."

घरांत नांदणाऱ्या सुखशांतीचं रहस्य सुलक्षणाला आता समजून चुकलं.



भारतवीर प्रश्नावलीत भाग घ्या आणि आकर्षक बक्षिसे मिळवा

# भारताचे वीर - ३

रामायण आणि महाभारत तुमच्या आवडीचे आहे ना? मग त्यांतल्या कांही वीरांबद्दलची ही प्रश्नावली आहे.

तीन बिनचूक उत्तरांना बक्षिसादाखल सायकली मिळतील.*

1 सूर्यदेवाचा हा दानशूर पुत्र मित्रासाठी प्राणाचेही दान देण्यास तयार होता. तो कोण आहे?

---------------------------------------------------

2 मातेच्या गर्भात असतानाच युद्धविद्येचे पाठ याने शिकले होते. बलाढ्य सेनेशी युद्धभूमीवर लढताना तो मृत्यू पावला. त्याचे नांव काय?

---------------------------------------------------



3 या वानर राजपुत्राला श्रीरामाचा दूत म्हणून लंकेला पाठवला होता. हा वीर कोण?---------------------------------------

4 या वीराला इच्छामरणाचे वरदान मिळाले होते. लढाईत पडल्यानंतर शुभवेळ येईपर्यंत तो बाणांच्या शय्येवर पडलेला होता. तो कोण होता?

---------------------------------------------------

5 आपल्या भावांबरोबर अज्ञातवासांत असताना हा महान धनुर्धर एका नृत्यशिक्षकाच्या भूमिकेत राहिला होता. नांव ओळखण्यासाठी आणखी कांही सांगणे नकोच !

---------------------------------------------------

प्रत्येक प्रश्नाचे उत्तर दिलेल्या ओळीवर लिहा. या पांच वीरांपैकी तुम्हाला कोणता वीर आवडतो व कां? 'इतिहासांतला माझा आवडता वीर' याबद्दल दहा शब्द लिहा.

...................................................................

...................................................................

...................................................................

स्पर्धकाचे नांव : ..........................................................

वय : .............................. वर्ग ..............................

पत्ता : ..........................................................

पिन : .............................. फोन : ..............................

स्पर्धकाची सही : ..........................................................

पालकांची सही : ..........................................................

हे पान नीट कापून ५ जानेवारी २००२ पूर्वी पुढील पत्त्यावर पाठवा.

HEROES OF INDIA QUIZ - 3
CHANDAMAMA INDIA LIMITED
No.82, DEFENCE OFFICERS COLONY
EKKATTUTHANGAL, CHENNAI - 600 097.

सूचना :

१. ही स्पर्धा ८ ते १४ वयोगटांतल्या मुलांसाठी आहे.
२. *सर्व भाषांतून फक्त तीन विजेते निवडले जातील. विजेत्यांना योग्य उंचीच्या सायकली बक्षिस दिल्या जातील. एकापेक्षा जास्त अचूक उत्तरें आल्यास विजेत्यांची निवड ''माझा आवडता वीर'' या वर्णनावरून केली जाईल.
३. परीक्षकांचा निर्णय अंतिम राहील.
४. त्याबद्दल वेगळा पत्रव्यवहार केला जाणार नाही.
५. विजेत्यांना पोस्टाने निर्णय कळवला जाईल.

ही बक्षिसें देत आहे






# वेळेची किंमत

दीक्षित हा त्या गांवातला प्रसिद्ध वैद्य होता. तो अतिशय हुशार होता. रोग्याला योग्य औषध देण्यांत तो निष्णात होता असे सर्व लोक म्हणत असत. एकदा कमलशेठ नांवाचा एक सावकार त्याला भेटायला गेला.

कमलशेठला पाहून दीक्षितने ''या, बसा शेठजी, एक मिनिटभर जरा थांबा'' असे म्हणत औषधाच्या पुड्या त्यानें आंत नेऊन ठेवल्या.

दुसऱ्याच क्षणीं बाहेरून एका भिकाऱ्याची हांक ऐकूं आली. ''मालक, मी लंगडा आहे, चालता येत नाही, दोन्ही डोळ्यांनी दिसत पण नाही, मला कांहीतरी दान द्या मालक!''

दीक्षितने त्या भिकाऱ्याला पुढें जायला सांगितले आणि तो भिकारी पुढें निघून गेला.

कमलशेठ कांहीतरी बोलायला सुरवात करणार तेवढ्यांत आणखी एक भिकारी तिथें ओरडत आला. ''साहेब, मी म्हातारा आहे, माझ्या अंगात काम करण्याची ताकदसुद्धा नाही. मला कांहीतरी दान द्या आणि पुण्य मिळवा!'' यावेळेस दीक्षिताने कठोर स्वरांत म्हटले, ''जा जा, चल जा इथून.'' हे ऐकल्यानंतर तो म्हातारा भिकारी तिथून निघून गेला.

तेव्हां कमलशेठने बोलणे सुरुं केले, ''दीक्षितजी, मी इथें अशा कारणासाठी आलो होतो की....'' तितक्यांत बाहेर जोरजोरांत ढोलकें वाजवण्याचा आवाज सुरुं झाला.

आपल्या चेहऱ्यावर रंग लावलेला एक बलदंड माणूस स्वतःला चाबकाचे फटकारे मारीत होता. त्याच्या जवळच एक बाई होती

- काशीराम -



ती ढोलकें वाजवीत होती. त्यांना पाहून दीक्षित लागलीच बाहेर आला आणि त्याने आपल्या खिशांतून एक रुपया काढून त्या बाईला दिला. ती दोघेही लगेच तिथून निघून पुढें गेली.

ह्याच्यावर आश्चर्य वाटून कमलशेठने म्हटलं, "मला एक छोटीसी शंका आहे."

"शंका ती शंकाच असते. त्यांत छोटी मोठी असा फरक नसतो. कांही कां असेना, तुम्ही सांगा, तुम्हाला कसली शंका आहे?" दीक्षितने विचारले.

"पहिले जे दोन भिकारी आले होते, त्यांना तुम्ही कांहीच दिलं नाहीत, पण नंतर ढोलकें वाजवत जी बाई कडकलक्ष्मीबरोबर आली, तिला तुम्ही एक रुपया दिलात. वास्तविक पहिला भिकारी लंगडा होता, दुसरा म्हातारा व अशक्त होता, पण ढोलकेवाले दोघेही धष्टपुष्ट होते. ज्यांना भिक्षेची गरज होती. त्यांना दान न देता आपण या दोघांना दान कां दिलेत? तुम्ही असं कां केलंत ते मला सांगता कां?"

"शेठजी, तुम्ही अगदी योग्य प्रश्न विचारलात. खरं म्हणजे भीक देताच कामा नये. मी देखील आत्ता कुणालाच भिक्षा किंवा दान दिलेले नाही. जर मी लंगड्या भिकाऱ्याला किंवा म्हाताऱ्याला भिक्षा दिली नसली तरी ते मरणार थोडेच होते? आणखी कुठेतरी जाऊन ते भीक मागणारच. मी जे ढोलकीवाल्या



बाईला दिलं, ती भीक नव्हतीच," दीक्षितने म्हटलं.

"मग त्याला काय म्हणायचं?" शेठजींनी विचारलं, "तर मग ऐका. शेवटी जे दोघे आले ते खरे भिकारी होते. तिने ढोलकें वाजवायचे आणि त्याने स्वतःला चाबकाने मारून घ्यायचे हे पाहणें मला सहन झाले नाही. पैसे दिले नसते तर ही कटकट चालूंच राहिली असती. आणि आपल्याला घाणेरड्या शिव्या देत ते नंतर गेले असते. केवळ यासाठीं मी ताबडतोब पैसे दिले व त्यांना घालवून दिले. पंधरा मिनीटे कटकट झाली असती आणि मनाला त्रास झाला असता तो वांचला." दीक्षित म्हणाला.

इतक्यांत अचानक कमलशेठला कांहीतरी सुचले व त्याने खिशांतून एक रुपया काढून म्हटले, "घ्या हा रुपया. माझ्या शंकेला उत्तर देण्यांत तुमचीही पंधरा मिनिटे खर्च झालीच. आणि हा वेळही आपल्या दृष्टीने महत्वाचा आहे."

दीक्षितने तो रुपया घेतला नाही. शेठजींच्याजवळ जरा सरकून दीक्षित उत्तरला, "हे बघा, शेठजी, आपला कांहीतरी गैरसमज झालेला आहे. मी त्या भिकाऱ्याचा वेळ खरेदी केला आहे. त्याला कोणत्याही परिस्थितींत मी एक रुपयापेक्षा जास्त देणार नाही. त्याच्यासाठीं मी एकच रुपया खर्च केला. परंतु तुम्ही या वैद्याचा मूल्यवान वेळ घेतला आहे. त्यासाठी एक रुपया पुरेसा होणार नाही. माझ्या या वेळेची किंमत मी आपले बोलणें ऐकल्यानंतरच करीन. आपण इथें कोणत्या कामाकरता आला आहात?" दीक्षितने विचारले.

हा प्रश्न ऐकून शेठजी आपले डोकें खाजवू लागला आणि आठवूं लागला कीं आपण कोणत्या कामासाठीं इथें आलो आहोत ते!

दीक्षितने जोरांत हंसत म्हटले, "विसराळू-पणावर औषध मागण्यासाठी तुम्ही आला आहात. खरं ना?"

कमलशेठने आनंदाने म्हटलं, "हो हो, आत्ता आठवलं. आजकाल मी फारच विसराळू होत चाललो आहे."



ORISSA
*The soul of India*

तुमच्यासाठी एक स्पर्धा

# कोणार्क

December
1-5, 2001
Konark Festival

ओरिसांतल्या कोणार्कमधें एक अतिभव्य व नेत्रदीपक असे सूर्यमंदिर आहे. तेराव्या शतकांत बांधलेले हे मंदिर स्थापत्यकलेचा एक अद्भुत नमुना मानला जातो. या गांवाचे कोणार्क हे नांव देखील या मंदिरामुळें पडले आहे कोन म्हणजे कोपरा आणि अर्क म्हणजे सूर्य - सूर्याचा कोन.

या मंदिराचा एक आगळाच विशेष म्हणजे त्याचा आकार - सूर्यदेवाच्या भल्यामोठ्या रथासारखा या मंदिराचा आकार आहे. रथाला जोडलेले सात वास्तव आकाराचे घोडे आणि रथचक्रांच्या बारा जोड्या मिळून हे शिल्पपूर्ण होते. चाकांच्या बारा जोड्या म्हणजे वर्षाचे बारा महिने आणि सात घोडे हे सात दिवसांचे प्रतीक आहे. बंगालच्या उपसागराच्या किनाऱ्यावर बांधलेले हे मंदिर, उगवतीच्या सूर्याचे वेगवेगळे रंग व कोनांतून दिसणाऱ्या छटा प्रवर्तित करते.

या मंदिराला 'काळा पागोडा' असेही म्हणतात. मंदिराचा निमुळता कळस सुमारें ७० मी. उंच होता, तो कोसळला आहे. पण नृत्यांगण व प्रेक्षागृह अजून सुस्थितींत आहे. संपूर्ण मंदिराच्या भिंतींवर उत्कृष्ट कोरीव काम केलेली शिल्पें व चित्रें आहेत. जागतिक वारसा स्थान म्हणून युनेस्कोने मान्यता दिलेल्या कांही स्मारकांपैकीं हे एक आहे.

सूर्यमंदिराच्या पडझडींतली अनेक सुंदर शिल्पें मंदिराच्या संग्रहालयांत आहेत. हेही कोणार्कचे एक आकर्षण आहे.

## तुमच्यासाठी एक स्पर्धा

**फक्त चौदा वर्षाखालील मुलामुलींसाठी**

**स्पर्धा - IV**

१. सूर्य मंदिराजवळ कुशभद्रा नदी जियें समुद्राला मिळते, तियें आणखी एक प्रसिद्ध मंदिर आहे. ते कोणते आहे?

२. पूर्वी एक बंदर असणारा आजचा ओरिसांतला प्रसिद्ध किनारा कोणता आहे?

३. आशिया खंडातल्या सर्वात मोठ्या धरणामुळें ओरिसांत एक कृत्रिम तलाव निर्माण झाला आहे. त्याचे नांव काय?

दिलेल्या ओळीवर तुमची उत्तरें सुवाच्य अक्षरांत लिहा. खाली दिलेले कूपन भरा व तुमची प्रवेशपत्रिका खालील पत्त्यावर पाठवा.

**Orissa Tourism Quiz Contest**
**Chandamama India Limited**
**No.82, Defence Officers Colony**
**Ekkatuthangal, Chennai - 600 097**

नांव : ........................................

वय : ........................................

पत्ता : ........................................

पिनकोड: ............... फोन: ........................

ORISSA TOURISM

Winners picked by Orissa Tourism in each contest will be eligible for **3-days, 2-night** stay at any of the **OTDC Panthanivas**, upto a maximum of four members of a family. Only original forms will be entertained. The competition is not open to CIL and Orissa Tourism family members. Orissa Tourism, Paryatan Bhaven, Bhubaneswar-751 014. Ph: (0674) 432177, Fax : (0674) 430887, e-mail : ortour@sancharnet.in, Website : Orissa-tourism.com




# यक्ष पर्वत

**11**

*(पर्वतावरच्या किल्ल्यांत वीरपुरच्या घोडेस्वारांनी स्वर्णाचारीला पराभूत केले. तेव्हां तो कांही ताज्या दमाच्या सैनिकांबरोबर जंगलात पळून गेला. तिथें त्याला जीवदत्त व समरबाहू दृष्टीस पडले. आपल्या शिष्यांची गुरुभक्ती शाबित करण्यासाठी, गुरू भल्लूकाने आपल्या शिष्यांपैकीं एकाला उंच झाडावरून खाली उडी मारण्याची आज्ञा दिली. त्याचे शब्द पूर्ण होताच त्यांतला एक शिष्य झरकन झाडावर चढला आणि धडाम्‌दिशी त्याने खाली उडी मारली. त्यानंतर पुढें....)*

गुरू भल्लूकाचा शिष्य त्या वृक्षावर चढला तेव्हांच जीवदत्त पळत आला आणि तो शिष्य जमिनीवर पडण्यापूर्वीच त्याने आपली काठी जमिनीवर ठेवली. अस्वलवाल्याने आपल्या गुरूचे नांव घेऊन उडी मारली व तो त्या काठीवरच पडला. जीवदत्ताने मोठ्या शिताफीने त्याला पकडले आणि जमिनीवर उभे केले.

अस्वलवाल्याला या गोष्टीबद्दल फार खेद झाला. आपल्या गुरूवरची भक्ती दाखवण्याची संधी त्याला मिळालीच नाही. त्याने दुःखी आवाजांत म्हटलं, "आपण मला वांचवलंत खरं, पण स्वर्गप्राप्तीची माझी संधी त्यामुळें आपण हिरावून घेतली." त्याच्या या बोलण्यावर जीवदत्त हंसून म्हणाला, "कुणास ठाउक तुला स्वर्ग मिळणार होता कीं नरक! कांहीही होवो, तू मरणापासून वांचलास. आता तुझे गुरू व तूं - तुमच्यावर समरबाहूला मदत करण्याची मोठी जबाबदारी येऊन पडली आहे."

तोपर्यंत गुरु भल्लूक, समरबाहू आणि खड्गवर्मा तिथें पोंचले. गुरु भल्लूकाच्या आनंदाला सीमा नव्हती. त्याने जीवदत्त व खड्गवर्मास म्हटले, "आपण स्वतः पाहिलेत ना माझे शिष्य किती निष्ठावंत आहेत ते?"



"त्यांची गुरुभक्ती अवर्णनीय आहे हे मात्र खरं हं! आता तुमच्या एका शिष्यावर मी एक काम सोंपवणार आहे ते त्यांना पुरे करावे लागेल."

गुरू भल्लूकने आणखी एका शिष्याला आपल्या-जवळ बोलावले. जीवदत्तने त्या दोघा शिष्यांना सांगितले, "वीरपुरचे घोडेस्वार इथेंच आजूबाजूला कुठेतरी असतील. तुम्ही दोघांनी असे नाटक करायचे कीं तुम्ही बेसावध असून त्यांचा हातांत सांपडला आहात व फसला आहात. त्यांना असे वाटले पाहिजे कीं या पहाडी दुर्गावरून समरबाहूचे सर्व अनुयायी तुमच्या गुरूच्या भुयारी किल्ल्यांत लपलेले आहेत. समजलं ना?"

"होय महाराज! लक्षांत आलं. हे तर गुरूचे व राजाचेसुद्धां काम आहे. आपल्या सांगण्याप्रमाणेंच आम्ही वागू व आपला हेतू साध्य होईल." भल्लूकाच्या शिष्यांनी सांगितले.

त्यानंतर ते दोघे तेथून निघाले. ते बराच वेळ-पर्यंत जंगलात भटकत राहिले. सूर्यास्ताच्या-वेळीं त्यांना दोन घोडेस्वार एका झाडाखालीं बसलेले दिसले. दोघे आपसांत कांहीतरी बोलले व उंच आवाजांत ओरडले, "गुरू भल्लूक, आपण कुठे आहात? आम्ही इथें आहोत." असे चारपांच वेळां ते ओरडले.

त्यांचा आवाज ऐकून वीरपुरचे घोडेस्वार दचकले. त्यांच्या पुढाऱ्याने एकदम तलवार उगारली व आपल्या अनुयायांना म्हटले, "हे ओरडणारे कोण असावेत? बहुतेक हेच अस्वलाचा वेष पांघरणारे आहेत. यांच्यापासून आपल्याला धोका आहे, चला!" असे म्हणून गुरू भल्लूकाच्या शिष्यांकडे ते वेगाने गेले.

घोडेस्वारांना पाहून शिष्यांनी आपले भाले मागे घेतले व म्हणाले, "महाराज, आम्हाला मारूं नका, आम्ही आपला पराभव मानला आहे. शत्रूने बहुतेक आमच्या गुरूला पकडले असावेसे वाटते. तेव्हां आता आम्ही कुणासाठी जगायचे?"

हे ऐकून त्या तुकडीच्या नेत्याने आश्चर्य प्रकट करून म्हटले, "तुमच्या गुरूला शत्रूने पकडले आहे कां? ते शत्रू कोण आहेत?"

शिष्यांपैकीं एकाने म्हटले, "महाराज, सकाळीं कांही लोक उंटावर स्वार होऊन अचानक आमच्या भुयारी किल्ल्यांत घुसले. आम्ही सर्वलोक त्यावेळीं देवीची पूजा करण्यांत गुंतलो होतो, म्हणून त्यांच्याशी लढूं शकलो नाही. आमच्यापैकीं बहुतेक सर्व लोक त्यांनी मारले.



आम्ही दोघेच वाचलो आणि आमच्या गुरूबरोबर जंगलात पळून आलो."

त्या तुकडीच्या नायकाने कांही सैनिकांना परत किल्ल्यावर परत जाण्याची आज्ञा दिली, व त्यांना सांगितले, "त्यांना बातमी कळवा कीं शत्रू भुयारी किल्ल्यांत दडून बसले आहेत." तसेच त्याने गुरू भल्लूकच्या शिष्यांना सांगितले, "शत्रू कुठे आहे ही माहिती देऊन तुम्ही आम्हाला फारच मदत केली आहेत. सेनाधिकारी आले कीं त्याबद्दल तुम्हाला योग्य ते बक्षिस देण्याची जरूर व्यवस्था होईल."

शिष्यांनी नकारार्थी डोके हालवून म्हटले, "आम्ही देवीचे उपासक आहोत. आम्ही आपले बक्षिस स्वीकारणारे अनुयायी थोडेच आहोत? आम्हाला जायची अनुमती द्यावी."

त्या अधिकाऱ्याने नाराज होऊन म्हटले, "जरा थांबा. भुयारी किल्ला दाखवण्याची जबाबदारी आता तुमच्या दोघांवर आहे. तुम्ही ह्या झाडाखालीच उभे राहा."

सेनाधिकाऱ्याने पाठविलेल्या सैनिकांनी ही सर्व हकीकत सेनाध्यक्षाला सांगितली. ते ऐकून त्याचा आनंद गगनांत मानेना. तो म्हणाला, "ह्याचा अर्थ असा आहे कीं ते सर्व राजद्रोही एकाच ठिकाणीं उपस्थित आहेत." नंतर तो कांही घोडेस्वार व कांही सैनिक घेऊन त्या तुकडीच्या नायकाकडे पोंचला.

सेनाध्यक्षाला नायकाने सर्व सविस्तर माहिती दिली. लगेच सेनाध्यक्षाने भुयारी किल्ल्यांत जाण्याची आज्ञा दिली. भल्लूकचे शिष्य पुढेंपुढें जाऊं लागले, आणि सैनिक त्यांच्या मागेमागे जाऊं लागले. पंधरा मिनिटांतच ते सर्व भुयारी किल्ल्यांजवळ पोंचले.



सेनाध्यक्ष घोड्यावरून खाली उतरला व पुढें चालूं लागला. गुहेच्या तोंडाजवळ खाली पाहात तो मोठ्या आवाजांत म्हणाला, "अरे, मी वीरपुरचा सेनाध्यक्ष आहे. मोठे सैन्य बरोबर घेऊन आलो आहे. तुम्ही सर्वजणांनी आपापली हत्यारें तिथेंच टाका आणि वर या. थोड्या वेळांत जर तुम्ही सर्वांनी शरणांगती पत्करली नाहीत तर मी स्वतः भुयारांत प्रवेश करीन आणि तुमचा निःपात करीन."

घटकाभरांत त्या भुयारांतून कुणीच बाहेर आले नाहीत. सेनाध्यक्ष संतापाने दांतओठ खात बसला होता. नंतर त्याने घोडेस्वारांना आज्ञा दिली कीं त्यांनी आपले घोडे जवळच्या झाडांना बांधावेत आणि लगेच त्याच्याजवळ यावे. घोडेस्वारांनी घोडे बांधले व ते सेनाध्यक्षाजवळ आले. त्यांच्यासह व इतर सैनिकांसह सेनाध्यक्ष अतिशय सावधपणें

भुयारांत उतरला. गुरू भल्लूकचे शिष्य त्याच्या पुढेंपुढें जाऊं लागले.

ते जसे गुहेच्या आंत शिरले तसे इकडे चार अस्वलवाले झाडीतून बाहेर आले. घोड्यांच्या-जवळच्या दोन्ही रक्षकांना त्यांनी पकडले, त्यांना दोरीने बांधले व कांटेरी झाडींत फेंकून दिले.

त्याच वेळेला खड्गवर्मा, जीवदत्त, गुरू भल्लूक व समरबाहू तिथें पोंचले. जीवदत्त गुरू भल्लूकाला म्हणाला, "आता आपल्यासमोर मोठाच प्रश्न उभा राहिला आहे. तो म्हणजे वीरपुरच्या सेनाध्यक्षाला जिवंत कैद करणें! ज्यांनी गुहेंत प्रवेश केलेला आहे, त्यांना भिववण्यासाठी गुहेच्या तोंडाजवळ वाळलेली लांकडे आणून रचायची व ती जाळायची. म्हणजे त्यांचा धूर गुहेंत पसरला जाईल. हे काम तुमचे शिष्य म्हणजे समरबाहूचे अनुयायी करतील."

गुरू भल्लूकाची आज्ञा झाल्यानंतर त्याचे शिष्य वाळलेली लांकडे गोळा करून घेऊन आले. भुयाराच्या तोंडाशी ती रचून त्यांनी आग पेटवली. जीवदत्ताने भुयारांत वांकून बघत मोठ्याने ओरडून सांगितले, "अरे, वीरपूरच्या सेनानायका, तूं आणि तुझे सैनिक तिथेंच हत्यारें टाकून द्या व ताबडतोब गुहेच्या बाहेर या, नाहीतर एकहीजण जिवंत राहाणार नाही. तुम्ही सर्वजण या आगींत जळून जाल."

सेनाध्यक्ष शत्रूच्या सैनिकांना शोधत होता. त्याने गुहेंतल्या सगळ्या ओवऱ्या शोधल्या, पण तिथें कुणीही दिसले नाही. गुरू भल्लूकाच्या शिष्यांनी त्याला फसवले आहे हे त्याच्या लक्षांत ले.

आता काय करावे ह्या विचारांत तो पडला होता. तोंवर आगीतला पाचोळा व ज्वाळा आजूबाजूस पसरण्यास लागल्या. पण मोठ्या संकटात सांपडलो आहोत हे त्याच्या लक्षांत आले. त्याने आपले हत्यार खाली टाकले व आपल्या सैनिकांस तसेच करण्याची आज्ञा दिली. तो भुयाराच्या दाराकडे



पाहून ओरडला, "मी वीरपुरचा सेनाध्यक्ष आपल्या सैनिकांसह निःशस्त्र होऊन तुम्हाला शरण आलो आहे व आम्ही गुहेबाहेर येत आहोत."

"खड्ग, या सेनाध्यक्षाच्या बोलण्यांत कांही फसवाफसवी असावीसे वाटत नाही. त्याला गुहेच्या बाहेर यायला सांगायचे कां?" जीवदत्ताने खड्गवर्माला विचारले.

खड्गने उत्तर देण्यापूर्वीच गुरू भल्लूकने म्हटले, "महोदय, राजा आणि त्याचे सैनिक हे विश्वास ठेवण्याच्या लायकीचे नाहीत. अगोदर माझ्या शिष्यांना भुयाराच्याबाहेर पाठवायला सांगा. त्यांच्याशी बोलून खरी हकीकत कळली कीं मग काय करायचे ते ठरवता येईल. जीवदत्तने हंसून म्हटले, "चोराची पावले चोरालाच ठाऊक असतात. बरं तर भल्लूक, आपल्या शिष्यांना प्रथम वर यायला सांगा."

गुरु भल्लूकाने आपला भाला वर उचलला आणि "वृकेश्वरी माता की जय" असं म्हणत तो भुयाराच्या आंत ओरडला, "शिष्यांनो, प्रथम तुम्ही दोघेही वरती या. तोपर्यंत बाकीचे सर्वजण तिथेंच उभे राहातील. एक तसूभर देखील कुणी पुढें येऊं नका, अशी या किल्ल्याचे महाराज समरबाहू यांची आज्ञा आहे."

गुरुंची आज्ञा मिळताच दोन्ही शिष्य गुहेबाहेर वरती आले.

गुहेंत उभा असलेल्या सेनाध्यक्षाला आपण असहाय्य आहोत याची जाणीव होऊन फार संताप आला होता. आता काय होईल या भीतीने तो थरथर कांपू लागला.

भुयारांतून वर आल्यानंतर भल्लूकच्या शिष्यांनी



सर्व हकीकत सांगितली. आता खड्ग, जीवदत्ताने सेनाध्यक्षाला वर येण्याची आज्ञा दिली. गुहेच्या बाहेर आल्यानंतर सेनाध्यक्ष खड्ग व जीवदत्ताला नम्रतापूर्वक वंदन करूं लागला. तेव्हां जीवदत्ताने समरबाहूकडे बोट दर्शवून म्हटले, "हे या प्रांताचे राजे आहेत, चंद्रवंशज आहेत. तुम्ही त्यांना वंदन करा."

वीरपुरच्या सेनाध्यक्षाने मान लववून समरबाहूला नमस्कार केला. तितक्यांत शस्त्ररहित असलेले सैनिक गुहेबाहेर आले. समरबाहूने तेव्हां स्वर्णाचारीस विचारले, "महामंत्री, ह्या शत्रूंना कोणती शिक्षा द्यायची?"

स्वर्णाचारीने खड्गवर्मा व जीवदत्ताला सल्ला विचारला व त्यानंतर म्हटले, "महाराज, भविष्यांत वीरपुरच्या राजाच्या वागणुकीवरच यांना कोणती शिक्षा द्यायची?"



स्वर्णाचारीने खड्गवर्मा व जीवदत्ताला सल्ला विचारला व त्यानंतर म्हटले, "महाराज, भविष्यांत वीरपुरच्या राजाच्या वागणुकीवरच यांना कोणती शिक्षा द्यायची ते अवलंबून राहील. आत्ता प्रथम त्यांना आपल्या गडावरच्या तुरुंगात बंद कोठडींत ठेवावे."

समरबाहू म्हणाला, "आपण फारच चांगला सल्ला दिला आहेत." आत्तापर्यंत समरबाहू फक्त चोरांचा सरदार होता. पण आता त्याच्या बोलण्यांत व हावभावांत राजेशाही रुबाब दिसूं लागला. ते पाहून आश्चर्यचकित झालेल्या खड्गवर्माने जीवदत्ताला हलक्या आवाजांत म्हटले, "एका लहानशा विजयाने लुटारू समरबाहूंत केवढा बदल दिसून आला आहे."

समरबाहूने खड्ग व जीवदत्ताला म्हटले, "क्षत्रिय वीरांनो, आता आपल्या किल्ल्याकडे जाऊं या कां?"

"राजाच्या आज्ञेचं पालन कोण करणार नाही?" जीवदत्ताने उत्तर दिले.

समरबाहूचे अनुयायी उंट व घोड्यावर स्वार झाले. त्यांच्या पाठीमागे वीरपुरचे युद्धकैदी येऊं लागले. सर्वांत पुढें होते, समरबाहू, स्वर्णाचारी, खड्गवर्मा व जीवदत्त! ते सर्वजण घोड्यावर बसले होते.

थोड्या वेळानंतर जेव्हां ते पहाडी किल्ल्याजवळ आले तेव्हां त्यांना पायथ्याशी झाडांजवळ एक लहानसा तंबू दिसला. तिथें उंच आसनावर एक वृद्ध माणूस बसलेला होता. त्याच्या चारी बाजूला लोक बसलेले होते. हा वृद्ध कोण आहे ते खड्ग व जीवदत्ताला समजले नाही. तो वृद्ध गृहस्थ दोन सैनिकांसह त्यांच्याजवळ आला व सांगू लागला, "मी वीरपुरच्या महाराजांचा प्रधानमंत्री आहे. तुम्हा दोघांच्याबद्दल आमच्या गुप्तहेरांकडून मी खूप ऐकलं हे. तुम्ही दोघे खड्गवर्मा व जीवदत्त आहात ना?"

होकारार्थी मान हलवत दोघांनीही त्या वृद्धाला वंदन केले. तोपर्यंत तिथें घोड्यावरुन आलेल्या समरबाहू व स्वर्णाचारीचा परिचय करून देत त्यांनी त्या वृद्ध मंत्र्याला सांगितले, "हे पहाडी किल्ल्याचे राजे समरबाहू आहेत. हे त्यांचे महामंत्री स्वर्णाचारी आहेत."

वृद्ध मंत्र्याने मान डोलावत म्हटले, "आपल्या शक्तिच्या सामर्थ्याने या प्रांताची भूमी यांनी जिंकली आहे, त्या भूमीवर महाराज समरबाहू आपला राज्यकारभार करूं शकतात. त्यांना तसा पूर्ण अधिकार आहे. हे मी आमच्या महाराजांच्या वतीने त्यांचा प्रधानमंत्री या नात्याने जाहीर करीत आहे. परंतु मी इथें जो आलो आहे तो तुम्हा दोघांसाठी! तुमच्याशी एकांतात मला कांही बोलायचे आहे."

आपण आता राजा आहोत या गोष्टीवर समरबाहूचा विश्वासच बसत नव्हता. त्याने वीरपुरच्या सेनाध्यक्षाला म्हटले, "आपण व आपले सारे सैनिक आज आमचे पाहुणे आहात. उद्यां सकाळीं तुम्ही सारेजण तुमच्या राजधानीला परत जाऊं शकता."

वीरपुरच्या प्रधानमंत्र्याने समरबाहूला मंद स्मित करताना पाहिले. खड्गवर्मा व जीवदत्ताला जरा बाजूला नेऊन त्याने त्यांना म्हटले, "खड्ग, जीवदत्त, आम्हाला तुमच्या दोघांबद्दल आमच्या गुप्तहेरांकडून बऱ्याच गोष्टी समजल्या आहेत. परंतु त्याहीपेक्षां जास्त माहिती तुमच्याबद्दल आम्हाला कळली आहे ती एका यक्षाकडून!"

"यक्ष! तो यक्ष कोण आहे?" दोघांनी एकदमच त्या वृद्धाला विचारले. आश्चर्यचकित झालेल्या जीवदत्ताने खड्गवर्माला विचारले, "खड्ग, हे मंत्री ज्या यक्षाचा उल्लेख करत आहेत, तो यक्ष म्हणजे पद्मपूरची राजकन्या पद्मावतीचे अपहरण करून घेऊन गेला, तो तर हा नव्हे?"

खड्गवर्मादेखील अचंबित झालेला होता. वीरपूरचा मंत्री कांहीही न बोलता पुढें चालत होता. तो पुढे जाऊन एका कड्यावर उभा राहिला. खाली वाहात असलेल्या नदीकडे हात दाखवत तो म्हणूं लागला, "खड्ग, जीवदत्त, नदीच्या पात्रांत दिसत असलेली रथाच्या आकाराची नाव नीट लक्षपूर्वक पाहा."

खड्ग जीवदत्ताने ती नाव पाहिली. दगडी रथासारखा तिचा आकार होता, आणि तिच्याबद्दल त्यांनी पद्मपुरांत ऐकलं होतं आणि अरण्यपुरांत पाहिलं होतं.

जीवदत्ताने मोठ्या उत्साहाने आपला दंड वर उगारला आणि तो म्हणाला, "आहा, इतक्या दीर्घ कालावधीनंतर तो दुष्ट यक्ष आमच्याशी युद्ध करायला सिद्ध होऊन आला आहे तर! फार छान, आम्हालाही आता आमच्या शक्तीचे प्रदर्शन करण्याची संधि मिळणार आहे." असं म्हणून तो नदीकडे जाऊं लागला.

(क्रमशः)











# अंधारकोठडी

एक चोर राजवाड्यांत चोरी करण्यास गेला. पण पकडला जाण्यापूर्वी त्याने एका सैनिकाला घायाळ केले. सैनिक त्या चोराला राजाकडे घेऊन गेले व सारी हकीकत राजाला सांगितली.

राजा रागावला व त्याने आज्ञा दिली, "याला पांच वर्षेपर्यंत अंधारकोठडींत बंद करून ठेवा. जर हा तोपर्यंत जिवंत राहिला तर सुटकेच्या दिवशी त्याला माझ्याकडे घेऊन या."

बघताबघता पांच वर्षे उलटली. सैनिक त्या चोराला राजाकडे घेऊन आले. चोर एकदम हाडकुळा झाला होता आणि खंगलेला, आजारी दिसत होता. त्याला पाहून राजाच्या मनांत दया उत्पन्न झाली. राजाने त्याला सांगितलं, "असं वाटतंय, कीं अंधारकोठडींत तुला फारच कष्ट सहन करावे लागले आहेत. आज मी तुझी सुटका करतो आहे."

तेव्हां चोराने दोन्ही हात जोडून म्हटले, "महाराज, अंधारकोठडींत मी प्रथम फारच दुःखी होतो, तिथें रहाणे कठीण होते, पण नंतर सुखच सुख अनुभवाला आले. पूर्वी पहाट होताच मी झोपेतून उठलो कीं भूक भागवण्यासाठी नवे उपाय शोधत असे, कुठे चोरी करूं, कशी चोरी करूं, आणि त्यासाठी कोणत्या गल्लींतल्या कुठल्या घरांत घुसून चोरी करायची ते! मला एक फार वाईट संवय आहे. मला उजेड आणि थंड हवा मुळींच सोसत नाही. कृपा करून मला पुन्हां त्या अंधारकोठडींत रहाण्याची परवानगी द्यावी."

त्याचे उत्तर ऐकल्यानंतर राजा समजला कीं माणसाला कितीही कष्ट सहन करावे लागले तरी तो परिस्थितीला सामोरा जातो आणि ते जीवन त्याला आवडायला लागते. राजाने त्या चोराला समजावत म्हटले, "घाबरूं नकोस. हळूंहळूं स्वतंत्रपणें जगण्याचीदेखील तुला संवय होईल. यापुढें तू माझ्या माळ्याबरोबर बागकाम कर व त्याखेरीज जे काम तुला आवडेल ते करीत राहा."

**- भवानी शंकर**



वेताळ कथा

# संन्याशाची कोडीं

आकाशांत विजा चमकत होत्या. काळोख्या रात्रीं ढगांचा गडगडाट जास्त भेसूर वाटत होता. पाऊस कोसळत होता. अशा रात्रीं भुतेखेते असतातच. त्यांचे विकट हास्य वातावरण जास्तच भीतिदायक करीत होते. इकडेतिकडे हाडें, कवट्या विखुरलेली होती आणि मधूनच सांखळदंडाचा आवाज आल्यासारखा वाटत होता. परंतु राजा विक्रमादित्य याकडे लक्ष न देता धीटपणे पुढें चालत होता. त्याने वेताळाला शब्द दिला होता, म्हणून



अंधारी रात्र व पाऊस, यांची तमा न बाळगता राजा, वेताळ प्रेतासह लपला होता त्या जुनाट वृक्षाजवळ गेला. राजा झाडावर चढला, त्याने प्रेत खांद्यावर घेतले आणि निर्जन स्मशानाच्या दिशेने तो जाऊं लागला. तेवढ्यांत वेताळ पुन्हां बोलूं लागला.

''हे राजा,'' वेताळ म्हणाला, ''तू हा निरर्थक प्रयत्न कां करतो आहेस? तू यशस्वी होणार नाहीस हे तुला माहीत आहे. तेव्हां इतके कठोर परिश्रम तू कशासाठी करतो आहेस? हा कुणी खास संन्यासी किंवा कुणी विरक्त आहे कां, कीं जो स्पष्ट न बोलता फक्त कोड्यांतच बोलतो? अशा लोकांच्या मनांत काय असतं ते कांही इतरांना कळत नाही. उदाहरण म्हणून मी तुला एक गोष्ट सांगतो, म्हणजे या एकाकी वाटेवर तुला कंटाळा येणार नाही, आणि त्यांतून तुला कांहीतरी शिकताही येईल.''

असं म्हणून वेताळाने पुढील गोष्ट सांगितली.

''कोणे एके काळीं, मार्तंडदेव नांवाचा एक राजा होता. तो अतिशय हुशार असून चांगला राज्यकारभार करीत होता. त्याला एका नव्या सल्लागाराची नेमणूक करायची होती. परंतु ही नोकरी कुणाला द्यावी याबद्दल त्याचा निर्णय होत नव्हता. त्याला असा सल्लागार हवा होता कीं जो कोणताही निर्णय घेण्यापूर्वी सर्व बाजूंनी सांगोपांग विचार करूं शकेल. अशा चतुर, सूज्ञ व्यक्तीच्या शोधांत राजा होता. अखेरीस त्याला वाटलं कीं आपल्याच दरबारांतला हुशार व चुणचुणीत सरदार मणिभद्र हा योग्य सल्लागार ठरेल. परंतु, त्याच वेळीं राणीने आपल्या धाकट्या काकांचे, विश्वबंधू सरदाराचे नांव सुचवले.

''माझे काका विश्वबंधू मणिभद्रपेक्षां कोणत्याही बाबतींत कमी नाहीत. शिवाय ते वयाने मोठे व अनुभवी आहेत. तेच जास्त चांगले काम करूं शकतील आपण त्यांनाच कां नेमून टाकत नाही?'' राणीने आर्जवाने विचारले.

''तूं म्हणतेस तसे ते जास्त हुशार व योग्य असले तर माझी कांहीच हरकत नाही. पण दोघांचीही नीट परीक्षा घेऊन नंतरच आपण आपले मत बदलले पाहिजे.'' राजा उत्तरला.

त्यानंतर तशी संधी लौकरच आली. राज्यांतल्या एका धनवंत व्यापाऱ्याची सुंदर मुलगी होती. तिला तीन तरुणांनी मागणी घातली. तिघेही तरूण कुलशीलवान, रूपगुणसंपन्न असे होते. त्यांच्यापैकीं कोणता वर आपल्या मुलीसाठी



निवडावा, हे कांही व्यापाऱ्याला समजेना म्हणून त्या तिघांनाही त्याने डोंगरावर राहाणाऱ्या एका साधूकडे पाठवले. व्यापाऱ्याची त्या साधूवर असीम श्रद्धा होती.

साधूने त्या तरुणांकडे नीट निरखून पाहिले. नंतर कांहीही न बोलता त्याने एकेक शंख प्रत्येकाला दिला. एका शंखात माती भरली होती, दुसऱ्यांत पाणी होते आणि तिसऱ्यांत धान्य होते.

साधूचा हा निर्णय कांही व्यापाऱ्याला समजला नाही. एखाद्या चतुर माणसाकडूनच याचा उलगडा करून घ्यायला हवा असे त्याला वाटले. त्या तिन्ही तरुणांना घेऊन तो राजाच्या दरबारांत गेला. साधूच्या या कृतीचा अर्थ काय असेल ते समजावून सांगावे म्हणून त्याने दरबारांत राजाकडे याचना केली.

राजाने त्या तिन्ही तरूणांना या कृतीचा अर्थ विचारला. ''महाराज,'' पहिला तरूण म्हणाला, ''साधूमहाराजांनी मला एका शंखात माती भरून दिली आहे. माती शिवाय धान्य किंवा पाणी, यांचा कांहीच उपयोग नाही. म्हणून यांच्या मुलीशी विवाह करण्यास मीच योग्य आहे असे साधूमहाराजांना सुचवायचे असावे असे मला वाटते.''

दुसरा तरूण म्हणाला, ''मला तर वाटतं कीं माती किंवा धान्य, पाण्याशिवाय निरूपयोगी आहे. साऱ्यांचं जीवन पाण्यावर अवलंबून असतं. म्हणून सर्वांत मूल्यवान वस्तू म्हणजे पाणी! ते मला देऊन साधूमहाराजांनी माझीच निवड केली असावी.''

तिसऱ्याचे विचार वेगळे नव्हते. तो म्हणाला,



''पाणी आणि माती या गोष्टी धान्य उगवायला मदत करतात. पण सर्वांत महत्वाचं असतं ते धान्याचं पीक. ते मिळावं म्हणून सगळे प्रयत्न असतात. मला धान्य दिलं त्यावरून साधू-महाराजांचा निर्णय अगदी उघड आहे. त्यांनी माझीच निवड केलेली आहे.''

राजा बुचकळ्यांत पडला. त्याला दिसलं कीं हे तिघेही तरूण अगदी पटेल असं मुद्देसूद बोलत होते. या तरुणांपैकी योग्य तरूणाची निवड करण्याचे कठीण काम त्याने सल्लागाराच्या जागेसाठी मनांत असलेल्या दोघा उमेदवारांवर सोंपवायचे ठरवले. त्यामुळें त्यांचे शहाणपण व चतुराई यांचीही परीक्षा झाली असती. सुदैवाने मणिभद्र व विश्वबंधू हे दोघेही त्यावेळेस दरबारांत उपस्थित होते.



विश्वबंधूकडे वळून राजा म्हणाला, ''तुमचं काय मत आहे?'' ''मला वाटतं कीं तिन्हीपैकी पाणी ही सर्वांत महत्वाची आणि आवश्यक अशी गोष्ट आहे. माती आणि धान्य या दोन्ही गोष्टींची उपयुक्तता पाण्यामुळेंच होते. पाण्याखेरीज त्या दोन्हींचा कांहीही उपयोग होऊं शकत नाही.''

''तुझं काय मत आहे?'' राजाने मणिभद्राला विचारलं. ''महाराज, माझं मत देण्यापूर्वी मला या गोष्टी जवळून पाहायच्या आहेत.'' मणिभद्र म्हणाला. त्याने पाण्याची चव पाहिली, मातीचा वास घेतला आणि धान्यांतून बोट फिरवले.

नंतर तो म्हणाला, ''महाराज, साधुमहाराजांनी ज्या तरुणाला शंखात माती दिलीय त्याची निवड केलेली आहे असे मला वाटते.''

पण या उत्तरामुळे राजाचा प्रश्न कांही सुटला नव्हता. आता विश्वबंधू व मणिभद्र - या दोघांपैकीं बरोबर कोण ठरणार? राजाच्या विनंतीवरून साधूमहाराज दुसऱ्या दिवशी दरबारांत आले. त्यांनी प्रसन्न स्मित केले व ते म्हणाले, ''खरी रत्नें दुर्मिळ असतात, राजन्! आपल्या दरबारांत एक आहे. त्याची पारख करा - आपल्या राज्याच्या कल्याणासाठी आणि आपल्यासाठी!''

राजा मार्तंडदेवने साधूमहाराजांकडे पाहिले. त्याला त्यांच्या बोलण्याचा अर्थ समजला. त्याने सूचक स्मितहास्य केले आणि आपल्या सल्लागाराची लागलीच निवड जाहीर केली.

वेताळाने आपली कथा इथेंच संपवली आणि विक्रमादित्य राजाकडे वळून तो म्हणाला, ''हे राजन्! हे साधुमहाराज सदैव कोड्यांतच बोलत होते. राजाने आपला सल्लागार म्हणून कुणाची निवड केली व कां केली? साधूमहाराजांचे शेवटले कोड्यांतले बोलणें होते. त्याचा अर्थ राजाने काय लावला? जर या साऱ्या प्रश्नांची उत्तरे तुला माहीत असूनही तू गप्प बसलास तर तुझ्या डोक्याची शंभर शकले होतील. म्हणून सांगतोय राजा, कीं तू मला नीट विचार करून तुझं उत्तर दे.''

राजा विक्रमादित्याने ताबडतोब उत्तर दिले. तो म्हणाला, ''राजा मार्तंडदेव हा स्वतःच एक हुशार राज्यकर्ता होता. साधुमहाराजांनी कोणत्या तरुणाची निवड केली हे कोडे राजाला सोडवायचे होते. तेव्हां तो निर्णय ठरवूं शकला नाही. परंतु त्याने चतुराईने हा निर्णय घेण्याचे काम, सल्लागाराच्या जागेसाठीं राजाच्या मनांत असलेल्या दोन उमेदवारांच्यावर सोंपवले व त्यांतून मार्ग काढला. जेव्हां त्या दोघांचा निकाल ऐकूनदेखील राजाला हा प्रश्न समाधानपूर्वक सोडवता आला नाही, तेव्हां त्याने साधूमहाराजांनाच येण्याची विनंती केली.

''साधुमहाराजांनी ज्याप्रमाणें व्यापाऱ्याच्या मुलीसाठी योग्य तरुणाची निवड केली, त्याचप्रमाणें राज्याच्या सल्लागाराच्या जागेसाठी देखील ते अचूक निवड करतील याची राजाला खात्री होती. साधुमहाराजांनी, त्यांच्या स्वभावानुसार पुन्हां कोड्यांतच उत्तर दिले. पण यावेळेला राजा सावध होता. ते काय म्हणाले ते राजाला उमगले. त्यांनी खऱ्या रत्नाचा जेव्हां उल्लेख केला, तेव्हां त्यांच्या मनांत मणिभद्राचीच निवड होती. कारण मणिभद्र या नांवाचा अर्थ आहे 'चांगले रत्न'! म्हणून राजाने लगेच मणिभद्राची नेमणूक जाहीर केली.

''दरबारांत उपस्थित असलेल्या सर्व मंडळींनी ते तिन्ही शंख पाहिले होते. परंतु त्यांतील वस्तू कुणीही पारखून पाहिल्या नाहीत. फक्त मणिभद्राने तसे केले. वरकरणीं पाहिले तर माती, पाणी व धान्य, या तिन्ही वस्तूंचे महत्व सारखेच आहे, व आवश्यकताही सारखीच आहे. त्याचप्रमाणें ते तिन्ही उपवर तरुणदेखील सारख्याच योग्यतेचे होते. परंतु जेव्हां मणिभद्राने एकेक शंख उचलून त्यांत भरलेल्या वस्तूची नीट पाहाणी केली तेव्हां त्याला पाणी व धान्यांत दोष असलेला आढळला, पाणी गढूळ होते व धान्यांत तुसें होती.

त्याखेरीज तिसऱ्या शंखातली माती स्वच्छ, चांगली व चांगल्या वासाची असली पाहिजे. हा पुरावा गृहित धरुन मणिभद्राने आत्मविश्वासपूर्वक आपले मत दिले. आणि म्हणूनच राजाने योग्य निर्णय घेऊन त्याला आपला सल्लागार नेमला.''

विक्रम राजाचे हे उत्तर नेहमीप्रमाणेंच अगदी बरोबर होते. परंतु त्याने मौन भंग झाल्यामुळे, वेताळ कांहीही न बोलता प्रेतासह उडून त्या जुनाट वृक्षावर जाऊन बसला. राजा विक्रमादित्याने आपली तलवार उपसली आणि तो वेताळाच्या पाठोपाठ गेला.



व्यक्तिरेखा इतकी प्रभावी आहे कीं इतरांना तिची इच्छा, किंवा तिला जे योग्य वाटत होतं तेच करावे लागत होते."

प्राध्यापक थोडा वेळ गप्प बसले आणि त्यांचे तिन्ही श्रोतेही स्तब्ध होते. शामलाने आजोबांच्या हातांतला रिकामा कप घेतला व म्हणाली, "पण आजोबा, मग रामायणांत शेवटी सीतेने पुन्हां अग्निपरीक्षा न करता भूमींत कां प्रवेश केला?"

"छान प्रश्न विचारलास पोरी. हे पहा, पहिल्या वेळेला अग्निपरीक्षा देण्याचा निर्णय तिचा स्वतःचा होता. दुसऱ्या वेळेला इतरांनी तिला पुन्हां अग्निपरीक्षा देण्यास सुचवले होते. या दोन्ही वेळेच्या परिस्थितीमधें फार मोठे अंतर आहे. सर्व सामान्य जनतेपुढें आपले पावित्र्य सिद्ध करण्याची तिच्यावर कांही सक्ती नव्हती. त्या मंडळींची तितकी लायकी नाही हे ती ओळखून होती. तुला माहीत आहेच कीं सीता जमिनीतून वर आलेली होती. म्हणून तिने पुन्हां भूमींतच प्रवेश करण्याचे ठरवले असावे. तिचा अवतार हा रावणरूपी अंधःकार आणि जुलूम या दोन पाशवी शक्तींचा नाश रामाकडून व्हावा, म्हणूनच झालेला होता. हे तिच्या जीवनाचे उद्दिष्ट होते. तिचे काम पूर्ण झाले होते. पण आदर्श राज्यकार भार कसा असावा याचे एक उत्तम उदाहरण म्हणून रामराज्य स्थापन करणें हे रामाच्या जीवनांतले कार्य अजून व्हायचे होते. पण मुलांनो, मी तुम्हाला हे मात्र सांगितले पाहिजे कीं या महाकाव्याचा अखेरचा भाग, जो 'उत्तरकांड' या नांवाने प्रसिद्ध आहे, तो वाल्मिकीने लिहीलेला नाही. मूळ रामायणांत राम अयोध्येला परत जातो व त्याला राज्याभिषेक होतो इथेंच समाप्ती आहे. पण शेवटचा खंड मात्र कुणा दुसऱ्या प्रतिभावंत कवीने लिहीलेला आहे." असं म्हणून देवनाथांनी आपली कथा संपवली.

(क्रमशः)







# देवी भागवत

रंभ व करंभ दानवाचे मुलगे होते. त्यांना मुलें नव्हती, म्हणून त्यानी दीर्घकाळ तपश्चर्या केली. करंभ पंचनदीच्या तीर्थांत बुडी मारून तप करीत होता. रंभाने एका झाडावर बसून तपश्चर्या केली.

इंद्राने मगरीचे रूप घेऊन नदींत प्रवेश केला व करंभाला ठार केले. आपल्या भावाच्या मृत्यूमुळें रंभ एकदम चिडला व अग्नीला आपले मस्तक अर्पण करण्यास तयार झाला. आपले मस्तक कापण्यासाठीं जेव्हां त्याने आपली तलवार उपसली, तेव्हां अग्निदेव प्रगट झाला व म्हणाला, "तूं आत्महत्या कां करायला निघाला आहेस? त्याने काय साध्य होणार आहे? तुझ्या तपश्चर्येने मी प्रसन्न झालो आहे. सांग, तुला कोणता वर हवाय?"

"देवा, आपल्याला खरोखरच माझी दया आली असेल तर मला एक असा अजेय पुत्र द्या कीं देवता व दानवदेखील त्याला जिंकू शकणार नाहीत." रंभने सांगितले.

"तुझी मनीषा पूर्ण होईल." असं म्हणून अग्निदेव अदृश्य झाला.

रंभ जेव्हां परत येत होता, तेव्हां त्याने एका सुंदर प्रदेशांत एक म्हैस पाहिली. हा प्रदेश यक्षांच्या स्वाधीन होता. ती म्हैस त्याच्याबरोबर पाताळांत आली.

तिथें या म्हशीचा पाठलाग करत दुसरी म्हैस आली. ते पाहून रंभ दुसऱ्या म्हशीवर नाराज झाला, व तिला त्याने खूप मारले. त्या म्हशीने रंभाला आपल्या शिंगावर घेऊन शिंगाने ठार केले. रंभाचे हे हाल पाहात ती म्हैससुद्धां त्याच्याबरोबर आगींत जळाली. त्या ज्वाळांतून दोन राक्षस प्रकट झाले. एकाचे नांव महिषी व दुसरा रक्तबीज.

राक्षसांनी महिषासुराला आपला राजा निवडले.

महिषासुर वध - ४



महिषीने कांचन पर्वतावर घोर तपस्या केली. त्याचे फळ म्हणून ब्रम्हदेव प्रत्यक्ष अवतीर्ण झाले. ब्रम्हाकडून महिषीने वर मागितला, ''महात्मा, माझा मृत्यू होऊं नये.''

त्यावर ब्रम्हाने उत्तर दिले, ''ज्याला जन्म आहे त्याला मृत्यू निश्चित आहे. त्यापासून कुणीही वांचू शकत नाही. हे जर सत्य आहे तर तुला 'अमर हो' असा वर मी कसा देऊं? भूमी, समुद्र, पर्वत ह्यांचासुद्धां नाश होतो. त्यांतून कुणीही वांचत नाही. अमरत्व सोडून इतर कांहीही माग. मी तुझी इच्छा अवश्य पूर्ण करीन.'' तेव्हां महिषीने म्हटले, ''मला कुणी स्त्री कांही मारुं शकणार नाही म्हणून मला असा वर द्या कीं त्यामुळें कुणीही मानव, दानव व देव यांच्या हातून मला मरण येऊं नये.''

''ठीक आहे, तसेंच होईल. पण ध्यानांत ठेव, तू एका स्त्रीच्या हातूनच मरशील.'' असं म्हणून ब्रम्हदेव निघून गेले.

हे वरदान मिळाल्यामुळें महिषी अतिशय उद्धट झाला. त्याला कुणीही पुरुष मारूं शकणार नाही याची खात्री होतीच. त्या वरदानाच्या बळावर त्याने स्वर्गावर आक्रमण करायची तयारी सुरुं केली. त्याने एका सेवकाला बोलावून आज्ञा केली कीं त्या सेवकाने स्वर्गात जाऊन इंद्राला युद्धाची सूचना द्यावी. त्या सेवकाने जाऊन इंद्राला हे वर्तमान कळवले.

इंद्राने चिडून जाऊन आपल्या दिक्पालांना बोलावून सांगितले, ''रंभचा मुलगा महिष याला ब्रम्हाने वर दिला आहे. त्यामुळें तो उन्मत्त झाला आहे व युद्धासाठी तो सेना जमवीत आहे, मोठ्यामोठ्या बढाया मारतो आहे. स्वर्गाला जिंकणार आहे अशा वल्गना करतो आहे. त्याच्या दूताने इथें येऊन संदेश दिला आहे.

''संदेशात त्याने विचारलंय कीं तुम्हाला युद्ध करायचे आहे कीं महिषाचे सेवक बनून राहाणे मान्य आहे? या परिस्थितींत काय करायचे हा निर्णय तुम्हीच ठरवावा. शत्रू कितीही बलाढ्य असला तरी त्याला कधी क्षमा करूं नये. जिंकणें किंवा हारणें हे परमेश्वराच्या हातीं असते. तेव्हां आपण नुसतेच स्वस्थ बसणें योग्य ठरणार नाही. आपल्याकडून जितका जास्त प्रयत्न होईल तितका आपण करूं या ! तहाची बोलणीं करता आली तर चांगलेच. परंतु असल्या दुष्ट प्रवृत्तींच्याबरोबर तह केला तर परिस्थिती जास्तच चिघळेल. युद्ध करायचे जरी असले तरी प्रथम आपण आपल्या व शत्रूसैन्याच्या बळाचा अंदाज घ्यायला हवा. त्याच्यासाठी इथून आपण एका व्यक्तीला पाठवूं या.''

इंद्राने धाडलेला दूत परत आला आणि महिषाच्या सैन्यबळाबद्दलची संपूर्ण माहिती त्याने दिली. ती ऐकून इंद्र चकितच झाला. त्याने आपल्या



पुरोहिताला बोलावले आणि सांगितले, ''अपार सेना घेऊन महिष आपल्याबरोबर युद्ध करण्यासाठी निघाला आहे. हे आक्रमण थांबवण्यासाठीं काय उपाय करता येईल?''

इंद्राला इतका भ्यायलेला पाहून बृहस्पती म्हणाला, ''कोणतेही संकट समोर येऊन उभे राहिले तरी आपले धैर्य कमी होता कामा नये. धीर धरा. जे होणार आहे ते टळणार नाही. तरीसुद्धां शक्य तितके सर्व प्रयत्न करीत रहा. याकरीता महिषमोक्षासाठी तपश्चर्या करायला हवी. केवळ परमेश्वरावर भरंवसा ठेवून काम कधी होत नाही. आपण प्रयत्नाची पराकाष्ठा करूनही जर कांही फळ मिळाले नाही तर मगच परमेश्वराचा आधार घ्यावा.''

इंद्र म्हणाला, ''देवा, प्रयत्नांखेरीज कोणतेही काम सफल होत नाही हे मला मान्य आहे. ज्याप्रमाणें यतींसाठी विज्ञान आवश्यक आहे, ब्राम्हणांना तृप्ती आवश्यक आहे, त्याचप्रमाणें राजालाही शत्रूसंहार आवश्यक आहे. आपण जर युद्धाला संमतिदर्शक सल्ला दिलात, तर मी युद्धाची तयारी सुरुं करीन. आपण, व्रजायुध व हरिहर माझे सहाय्यास आहात.''

तेव्हां बृहस्पतीने इंद्राला उत्तर दिले, ''युद्ध करणें किंवा न करणें हे तुझ्या इच्छेवर अवलंबून आहे. युद्ध करावे किंवा करूं नये याबाबतींत मी सल्ला देणार नाही. तुला जे योग्य वाटेल त्यावर तू नीट विचार करून निर्णय घे.''

यानंतर इंद्र ब्रम्हाला शरण गेला व म्हणाला, ''महिष नांवाचा राक्षस मदोन्मत्त होऊन स्वर्गावर आक्रमण करण्यासाठी येतो आहे. त्याच्याबरोबर बरीच मोठी सेना आहे. मला तर फारच अस्वस्थ वाटते आहे. मला या संकटातून वांचवा.''

ब्रम्हाने उत्तर दिले, ''आपण जर शिव आणि विष्णू यांना बरोबर घेतले तर बरे होईल, व शत्रूशी



युद्ध करता येईल. चला, आपण प्रथम कैलास पर्वतावर जाऊं.''

दोघेही मिळून शिवाकडे गेले आणि त्यांनी सविस्तर माहिती सांगितली. नंतर ते तिघेजण विष्णूकडे गेले. पूर्ण विचारांती निर्णय ठरला कीं महिष राक्षसाबरोबर युद्ध अवश्य करायचे. ब्रम्हा हंसावर, शिव नंदीवर व विष्णु गरुडावर बसून निघाले. त्यांच्या जोडीला मोरावर बसून कुमारस्वामी व हत्तीवर बसून इंद्रही निघाले. देवतांचे सैन्य आणि राक्षसांचे सैन्य आता समोरासमोर आले.

अत्यंत भीषण असे युद्ध झाले. सर्व दिक्पालक, इंद्र व त्रिमूर्तींनी आपला पराक्रम गाजवला, परंतु महिषापुढे त्यांचा टिकाव लागला नाही. शेवटी त्यांनी युद्धभूमीतून पलायन केले. आता स्वर्गावर महिषाचे राज्य आले. इंद्राच्या आसनावर महिष बसला आणि इतर आसनें त्याने आपल्या राक्षसांना दिली. त्याने देवांचा खजिना आपल्या ताब्यांत घेतला.



स्वर्गसुखाचा अनुभव घेत तो आपला राज्यकारभार बेधडकपणें करूं लागला.

हे असले कष्टमय जीवन देवीदेवतांना नकोसे झाले. त्यांना हा अपमान सहन होईना. ते सर्वजण मिळून ब्रम्हाकडे दरबारांत गेले आणि म्हणूं लागले, "एकट्या महिषासुराने आमच्यावर विजय मिळवला आणि आम्हाला असल्या दुर्धर परिस्थितींत टाकले. आपण आम्हाला पित्यासमान आहात. आमच्या या दारुण अवस्थेकडे आपले लक्ष जात नाही कां? आपण सर्वज्ञ आहात, आपणच सांगा, आमचं काय होणार आहे?"

"मी तरी काय करणार? कोणत्याही पुरुषाच्या हातून न मारला जाण्याचा वर त्याने मिळवला आहे. त्याला एक स्त्रीच मारूं शकेल. प्रथम आपण शिवाशी व नंतर विष्णूशी या विषयावर गंभीरपणे चर्चा करूं या" ब्रम्हाने सांगितले.

सर्व देव ब्रम्हाबरोबर शिवाकडे आले.

"कोणत्या कामासाठी येणं झालंय?" शिवाने विचारले.

"आपल्यापासून काय लपवायचं? महिषासुरने स्वर्ग जिंकून ताब्यांत घेतला आहे आणि इंद्र व इतर देवी देवतांनी तो फार त्रास देतो आहे. या सर्वांना आपली मदत हवी आहे." ब्रम्हाने सांगितले.

शिव हंसून म्हणाला, "आपणच तर देवतांना या अवस्थेप्रत आणून ठेवले आहे. आपल्या वरदानामुळें कोणताही पुरुष त्याचा वध करूं शकत नाही. आता त्याला मारण्यासाठीं कोणत्या स्त्रीला पाठवता येईल ते आपणच सुचवावे. आपण आपल्या धर्मपत्नीला पाठवाल कां? कीं मी माझ्या धर्मपत्नीला पाठवूं? नाहीतर इंद्रपत्नी हे काम करील कां? परंतु आमच्या पत्नींपैकी एकीलाही युद्धविद्या परिचित नाही. त्यांना पाठवलं तरी कांही उपयोग होणार नाही. तेव्हां आता विष्णूला भेटून त्यांना काय करायचं ते विचारूं या. त्यांच्याकडून निश्चित



कोणतातरी मार्ग आपल्याला सांपडेल."

सर्वजण मिळून विष्णूकडे गेले. त्यांच्या येण्याचे कारण समजल्यावर विष्णूने म्हटलं, "आपण सगळेजण महिष राक्षसाच्याहातून पराजित झालो आहोत. त्याचा वध फक्त एक स्त्रीच करूं शकते ना, तर मग आपण आपल्या तेजस्वी दृष्टीने एका स्त्रीची निर्मिती करूं या. तिला आपण आपली शस्त्रें देऊ आणि नंतर ती स्त्री व महिष यांच्यात युद्ध होईल."

विष्णू हा उपाय सांगत असतानाच त्यावेळांत सर्व देवतांचे तेज प्रकट झाले. ते ओळीने एकत्र झाले आणि अखेरीस अठरा हातांची एक स्त्री सर्वांसमोर सजीव रूपांत प्रगट झाली. देवांनी आपापली शस्त्रें तिच्या हातांत ठेवली. तेव्हां त्या स्त्रीने सर्व देवांना उद्देशून म्हटले, "भिऊं नका. तो राक्षस माझ्या हातूनच मारला जाईल." असं सांगून तिने सिंहनाद केला.

महिषासुराने हा नाद ऐकला तेव्हां ते म्हणाला, "कोण आहे हा, जो सिंहासारखा डरकाळ्या फोडतो आहे? ताबडतोब त्याला पकडून माझ्यासमोर घेऊन या. माझ्याकडून पराभूत झालेले देव हे असलं साहस करणं शक्यच नाही."

महिषाच्या आज्ञेनुसार कांही सैनिक आले. पण महादेवीचा अवतार पाहताच ते थरथर कांपू लागले. ते पळतपळत परत गेले आणि महिषाला सांगू लागले. "कुणीतरी सिंहावर आरूढ होऊन आली आहे. शरीरावर आभूषणें आहेत. तिच्या अठरा हातांमधें शस्त्रें आहेत."

महिषाने आपल्या मंत्र्याला सांगितलं, "कसंही करून त्या स्त्रीला इथें घेऊन या. मी तिला माझी पट्टराणी बनवीन."

मंत्री आला आणि दूर उभा राहून त्या स्त्रीला म्हणाला, "माते, आपण कोण आहात? आपण इथें कशासाठी आला आहात? सर्व लोकींचा राज्यकर्ता महिषासुर आपल्याशी विवाह करूं इच्छित आहे."

देवीने स्मितहास्य करून म्हटले, "त्याचा वध करण्यासाठीं मी इथें आले आहे. तू चांगला वाटतो आहेस. म्हणून मी तुझा संहार करणार नाही. तुझ्या राजाला जाऊन सांग मी कोणत्या कामासाठी आले आहे ते!"

महिषाला आपल्या मंत्र्याचे सांगणे खरे वाटले नाही. त्याने आपला सेनापती ताम्र याला समेट करण्यासाठीं पाठवले. देवीने त्याला ठार मारले. महिषाने आपले दुसरे इतर सेनापती पाठवले. त्यांनाही देवीने ठार मारले. मग महिषासुर स्वतः आला. दोघांच्यात अतिशय भीषण युद्ध झाले. महिषाने वेगवेगळी रूपें धारण करून युद्ध केले. शेवटी देवीने चक्रायुधाने त्याचे मस्तक उडवले.

देवांचा आनंद अवर्णनीय होता. सर्वांनी देवीची स्तुतिस्तोत्रें गायली.





# नित्य संतोषी

भीम व राम शेजारी होते. राम नेहमीं आनंदी असे. परंतु भीम मात्र नेहमी दुःखी आणि चिंताग्रस्त असे.

रामची चार एकर शेतजमीन होती. भीमाला वाटले कीं त्यामुळेंच राम सदैव खुषींत असतो. म्हणून त्याने रात्रंदिवस खूप कष्ट केले, पैसे मिळवले आणि माळरानांतली पांच एकर जमीन खरेदी केली. तरीदेखील भीमपेक्षां राम अधिक समाधानी होता. भीमाच्या मनांत सारखा विचार येई कीं रामाच्या आनंदी असण्याचे कारण काय असूं शकेल? तो नेहमीच आनंदात कसा काय असूं शकतो?

रामचे लग्न झाले. त्याची पत्नी फार सुंदर होती, जणूं चंद्राची कोरच! भीमाला वाटले कीं लग्न झाल्यामुळें राम जास्त खूष दिसतो आहे. म्हणून भीमाने बऱ्याच मुली पाहून, रामच्या पत्नीपेक्षां जास्त सुंदर पत्नी निवडून लग्न केले. तरीसुद्धा तो रामइतका आनंदी झाला नाही. परंतु त्याने आनंदी राहायचा खूप प्रयत्न केला.

रामने दोन मजल्यांचे घर बांधले, तर भीमाने तीन मजली घर बांधले. राम रोज दहाजणांना भोजन देई, तर भीमाकडे वीसजण जेवायला असत. प्रत्येक बाबतींत भीम रामच्यापेक्षां श्रेष्ठ ठरण्याचा प्रयत्न करी पण त्याला त्याचा आनंद मात्र मिळत नसे.

रामच्या रोजच्या वागणुकीवर भीम लक्ष ठेवू लागला. राम कोणत्या वेळीं काय करतो यावर लक्ष ठेवूं लागला. रामच्या दुप्पट काम भीम करायला लागला. तरीदेखील भीम कष्टी होता, रामसारखा समाधानी नव्हता. म्हणून भीम सदैव उदास राही.

अशा वेळेला त्या गांवात एक साधु आला. त्याला मोठ्या आदराने रामने आपल्या घरी नेले व त्याचे प्रेमाने आदरातिथ्य केले.

त्याचे प्रेम व वागणें पाहून साधू खूष झाला व म्हणाला, "पुत्रा, तुला काय हवे ते माग."

रामने विनयपूर्वक म्हटले, "माझी पत्नी सद्‌गुणी आहे, माझी मुलें सुस्वभावी आहेत, जे माझ्याजवळ

श्रीराम कमल



आहे त्यांत मी संतुष्ट आहे. मी आनंदात आहे व शक्य होईल तशी लोकांना थोडीफार मदतही करतो. माझा परिवार निरोगी आहे. हेच माझे भाग्य आहे, व तेवढें मला पुरेसे आहे. आपण मला असा आशिर्वाद द्यावा कीं माझी परिस्थिती सदा अशीच राहावी."

"तुझी तृप्ती व संतोष खरोखरच कौतुकास्पद आहे. परमेश्वर सदा तुमच्यावर कृपा करील." असं म्हणून साधूने रामला आशिर्वाद दिला.

त्यानंतर साधूमहाराज भीमाच्या निमंत्रणावरून त्याच्या घरीं गेले. भीमाने मोठ्या थाटांत साधूचे आदरातिथ्य केले. रामच्या दुपटीने त्याने आदरसत्कार केला होता. साधूने संतुष्ट होऊन त्यालाही काय हवे ते मागण्यास सांगितले.

"माझा शेजारी राम हा कोणत्याही बाबतींत माझ्यापेक्षां जास्त श्रेष्ठ असूं नये, एवढा आशिर्वाद मला पुरे आहे." भीमाने लगेच आपली इच्छा प्रकट केली.

साधूने आश्चर्य व्यक्त करून म्हटले, "स्वतःसाठीं जे हवंय ते मागून घे, त्यांत इतरांबद्दल बोलणें, त्यांना खाली ओढणे हे चांगले नाही, हा तर अधर्म आहे." असं म्हणून त्याने भीमाला सूचकपणें सावध केले. त्यांवर भीम म्हणाला, "रामपेक्षां वरचढ असणें यांतच माझा आनंद आहे. मला आपण हा आशिर्वाद देऊं शकत असाल तर अवश्य द्यावा, नाहीतर मी हे माझे दुर्भाग्य समजेन."

साधूने क्षणभर डोळे मिटले आणि नंतर म्हटले, "तुझी इच्छा जरूर पुरी होईल. परंतु त्यासाठीं रामची अनुमती पाहिजे."

साधूच्या या बोलण्यावर भीम नाराज झाला

आणि बोलला, "आपल्याला मला आशिर्वाद द्यायचा नसेल तर देऊं नका. पण यासाठीं राम अनुमती देईल या भ्रमांत आपण राहूं नका."

"अरे वेड्या, रामने जर अनुमती दिली ना, तर तू त्याच्यापेक्षांही अधिक संतुष्ट, वैभवशाली होशील. रामने जर संमती दिली नाही तर तुलनेने तो तुझ्यापेक्षां कमी प्रतीचा ठरेल. हे रहस्य रामला ठाऊक नाही, म्हणून दोन्ही प्रकारें तुझाच फायदा होणार आहे. रामला इथें मी बोलावलंय म्हणून लगेच निरोप पाठव." साधुने सांगितलं. भीमाने रामला बोलावून घेतले. रामला आल्यानंतर जेव्हां भीमाची इच्छा समजली, तेव्हां त्याने लगेच अनुमती दिली.

साधूने आश्चर्य व्यक्त करून रामला विचारले, "पुत्रा, प्रत्येकाला असं वाटत असतं कीं दुसऱ्यांपेक्षां आपण श्रेष्ठ असावं. भीम तुझ्यापेक्षां श्रेष्ठ असावा, त्यासाठी तू संमती दिली आहेस. तू असं कां केलंस ते मला समजेल कां? त्याच्यामागे तुझा कसला हेतू आहे?"

"आपण महात्मा आहात. आपल्यापासून काय लपवायचं? आसपासचे लोक जर आपल्यापेक्षां कमी स्थितींत असले तर त्यांचे द्वेष, ईर्ष्या, तिरस्कार हे भाव जास्त उफाळून येतात आणि आपल्याला जाचक होतात. आपल्या मनाला त्याचा खूप त्रास होतो. ते आपल्यापेक्षां श्रेष्ठ असले तर ते आपल्याबाबतींत विसरून जातात, त्यांना एकतर आपल्याबरोबर कांही देणेघेणें नसते, किंवा आपल्यावर दया दाखवून ते आपल्याला मदत करायला पुढें येतात. जर आपण आपल्याबद्दलच विचार करीत बसलो, आणि आपल्या प्रगतिबद्दल आपण संतुष्ट राहिलो, तर हा संतोष कधीं कमी होणारा नाही. दुसऱ्यांची प्रगति व्हावी अशी इच्छा करणारे आणि ती प्रगति आनंदाने पाहणारे नेहमींच तृप्त असतात, संतुष्ट असतात."

या बोलण्यावरून रामच्या समाधानाचे रहस्य भीमाला कळले. साधूने हे सत्य त्याला समजावे म्हणूनच या भेटीचे आयोजन केले होते हेही भीमाच्या लक्षांत आले. त्या दिवसापासून भीम दुसऱ्यांच्या प्रगतिमधें आनंद मानायला शिकला. आता त्याला खराखुरा संतोष मिळूं लागला. अशा तऱ्हेने तोही नित्य संतोषी बनला.



# सर्वोत्तम स्वप्न



विनायक हा उत्कृष्ट स्वयंपाकी होता. त्याला जवळचे कोणी नातलग नसल्यामुळे, तो एका गांवाहून दुसऱ्या गांवाला मिळतील तशी कामे करत फिरत असे. कांही वर्षांनंतर त्याने एका ठिकाणी स्थायिक व्हायचे ठरविले. त्याला एका श्रीमंत माणसाच्या घरी काम मिळाले.

त्याचा मालक रघुवीर हा अतिशय कंजूष होता. त्याने लग्न केले नाही. कारण लग्न म्हणजे मुलें आलीच. त्याला आपली संपत्ती मुलांमधे वाटायची नव्हती.

वय झाल्यावर त्याला, त्याच्यासाठी स्वयंपाक करण्यास, धुणेभांडी करण्यासाठी कुणीतरी पाहिजे असे वाटूं लागले. मुळातच कंजूष असल्याने कामासाठी बायकोमुलें असलेला माणूस त्याला नको होता. त्यामुळे विनायकाच्याबद्दल माहिती कळताच त्याला आनंद झाला हे सांगायला नकोच. रघुवीरला जसा नोकर हवा होता तसाच तो असल्याने विनायकाला तावडतोब काम मिळाले. पण रघुवीर त्याच्या अति काटकसर करण्याच्या स्वभावाने विनायकाला फार कटकट करत असे. तो स्वतः अतिशय कमी खात असे आणि विनायकलाही पोटभर खाऊ देत नसे.

दिवाळीचा दिवस होता. गांवातल्या सगळ्या घरांत तयारीची गडबड चालू होती. लोकांनी घरें स्वच्छ करून सजविली होती. खूप तऱ्हेची पकान्नें बनविली होती. विनायकाने पण रीतीप्रमाणे बनणारे न सांगताच ते बनवले होते. कांही झालं तरी दिवाळी हा सण आहे, तेव्हां मालक रागवणार नाहीत असे त्याला वाटले.

रघुवीर दिवाळीच्या दिवशी जेवायला बसला, तेव्हां टेबलावरील इतके पदार्थ पाहून तो थक्कच झाला. दांतओठ खात त्याने विनायकाला विचारले "हे काय? तू काय पूर्ण आठवड्याचा स्वयंपाक केला आहेस कां?"

विनायक हळूंच म्हणाला "मालक, आज दिवाळी आहे. वर्षातला एक दिवस तरी

"हो, नक्कीच! कां नाही?" रघुवीर मोठ्याने म्हणाला. कारण त्याला असे वाटले की आपण जर याविरुद्ध कांही बोललो तर हा स्वैपाकी आपल्याला तुच्छ लेखेल.

"अन्नावर पैसे उधळायचे! आणि मी चांगले सुग्रास अन्न याला खायला कां देऊं?" असं त्याला वाटलं.

रघुवीरने ठरवले कीं हे चविष्ट पदार्थ, जेवढे म्हणून आपल्याला खाता येतील तेवढे खायचे. सगळे पदार्थ खूपच चवदार झाले होते, त्यामुळे त्याने जवळपास सगळे पदार्थ खाऊन टाकले. आता त्याचे पोट चांगले गोलगरगरीत फुगले. पण, अरेरे! कितीही प्रयत्न केला तरी रघुवीरला जिलब्या खाता येईनात. तरी त्या स्वार्थी मालकाला आपल्या नोकराला जिलब्या खाऊन द्यायच्या नव्हत्या. म्हणून आपल्या स्वैपाक्याला जिलब्या खाता येणार नाहीत अशी युक्ती करायची त्याने ठरविली.



"विनायक, जिलब्या केल्यानंतर कांही वेळानंतरच खायला चांगल्या लागतील. तेव्हां त्या बाजूला ठेवून दे. मी त्या संध्याकाळी खाईन." तो म्हणाला.

लौकरच रात्र झाली. तरी रघुवीरला कांही भूक लागली नाही. पण त्याला सगळ्या जिलब्या स्वतः खायच्या होत्या. म्हणून त्याने विनायकला बोलवले आणि म्हणाला "आपण आपल्यांत एक स्पर्धा खेळूंया. त्याने या सणाला आणखी रंगत येईल. आपण आज रात्री झोपी जाऊया आणि कांहीतरी मनोरंजक स्वप्नें पाहाण्याचा प्रयत्न करूया. जो उद्यां सकाळी जास्त चांगले स्वप्न सांगेल त्याने सर्व जिलब्या खायच्या."

विनायक मालकाला उलट उत्तर देऊं शकला नाही. "ठीक आहे मालक." तो म्हणाला. रघुवीर मोठ्या आनंदात झोपायला गेला. 'उद्यां सकाळीं मला भूक लागेल आणि मी त्या जिलब्या खाऊन टाकीन. मी असं सांगीन की माझंच स्वप्न, छान होतं. तो मूर्ख मला कांही उलटं उत्तर देऊं शकणार नाही.' रघुवीरने विचार केला.

थोड्याच वेळांत विनायकाला आपला मालक मस्त घोरत असलेला ऐकूं आला. ताबडतोब तो पाय न वाजवता स्वयंपाक घरांत गेला. पोट भुकेने गुरगुरत होते. त्याने जिलब्या ठेवलेल्या डब्याचे झांकण उघडले.

"हं ... जिलब्या काय मस्त दिसतायत!" त्याने विचाऱ्याने सकाळपासून कांहीच खाल्लेले नव्हते. पण त्याच्या मालकाने मात्र बरेचसे अन्न फस्त केलेले होते. त्याने सगळ्याच्या सगळ्या जिलब्या खाऊन टाकल्या आणि तो झोंपी गेला.

रघुवीर दुसऱ्या दिवशी सकाळीं उठल्यावर त्याने विनायकला विचारले, "हं सांग, काल तू कोणते स्वप्न बघितलेंस?"

"मालक, काल रात्रीं मी फार भयानक स्वप्न पाहिले." आपले हात छातीशी घट्ट धरत विनायक म्हणाला.

"मला काय स्वप्न पडले ते तुला ऐकायचे नाही कां?" मला फारच छान स्वप्न पडले. मी एका सुंदर राजकन्येशी लग्न केले आहे. आणि तिच्या राज्याचा राजा झालो आहे. माझा राज्याभिषेक झाल्यावर मी आणि राणी, सर्व दरबारी, मानकरी, यांच्या गर्दीत दरबारांत बसलो आहोत. आम्ही दिवसभर राज्यांतल्या उत्तमोत्तम गायक व नर्तकांचे गायन, नर्तन व वादन ऐकतो आहोत, आणि मजा करत आहोत." रघुवीर म्हणाला. "पण तू तुझ्या स्वप्नाबद्दल मला कांही सांगितले नाहीस."

खिन्नपणे विनायक म्हणाला "मालक, जशी मला झोप लागली तशी काली माता माझ्यासमोर उभी राहून रागवून ओरडत म्हणाली, "दुर्दैवी माणसा, या आनंदाच्या दिवशी सकाळपासून रात्रीपर्यंत तुझी उपास करायची हिम्मतच कशी झाली? आता स्वयंपाकघरांत जाऊन लौकर जिलब्या खा. नाहीतर मी तुझा गळा दाबीन." तिने मला धाक घातला. मी घाबरत म्हणालो, "हे माते! मी जिलब्या खाऊं शकत नाही. माझे मालक आणि माझं असं ठरलंय की ज्याला पडलेले स्वप्न सर्वोत्तम असेल त्यानेच जिलब्या खायच्या. आता मी माझे वचन मोडूं शकत नाही. पण ती माझे कांही न ऐकता म्हणाली, "ताबडतोब स्वयंपाकघरात जाऊन जिलब्या खा. माझं ऐकले नाहीस तर मी तुला मारुन टाकीन. मालक, मला दिवाळीच्या दिवशी मरायचे नव्हते म्हणून मला जिलब्या खायला लागल्या."

मालकाला या लांबलचक गोष्टीमुळे वैताग आला. तो म्हणाला "आवाजाने मला कशी जाग आली नाही? मी तर शेजारच्या खोलींतच झोपलो होतो. तू मला हाक मारली असतीस तर मी तुझ्या



मदतीला आलो असतो. शहाण्या, तू त्या एवढ्या सगळ्या जिलब्या खाण्याची गरज नव्हती."

"मालक, तुमची मदत घ्यावी असं मला वाटलं. पण तुम्हीतर राणीबरोबर त्या मोठ्या दरबारांत होता. तुमच्या भोवती दरबारी, गायक, वादक, नर्तक यांचा गराडा होता. शेवटी धाडस करुन मी तुमच्या जवळ यायचा प्रयत्न केला, तर शिपायांनी मला अडवून हाकलून दिले. ते मला तुमच्या जवळ येऊं देईनात." विनायक शक्य तेवढ्या दीनवाण्या आवाजात म्हणाला.

रघुवीरला बोलायला तोंड नव्हते. आपल्या मूर्खपणाची त्याला लाज वाटली. विनायक त्याच्यापेक्षा सवाई हुषार निघाला. आणि रघुवीरला कांही हा विश्वासू व चांगला नोकर गमवायचा नव्हता. त्यानंतर तो स्वतःतर नीट जेवूं लागलाच, पण विनायकलाही भरपूर जेवण देऊं लागला.

